॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

देवभक्तचरित्रमाला.

४.

तैसें हारपलें आपणपें पावें। तें संतांतें पाहतां गिंवसावें
ह्मणोनि वानावे ऐकावे। तेचि सदा ॥ ( ज्ञाने अ० १६-४०० )

---

# श्रीतुकारामचरित्र.



क्तिज्ञान आणि वैराग्यें आगळा। ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥
व्रतपयज्ञ लाजविलीं दानें। हरिनामसंकीर्तनें करूनीयां ॥

रामेश्वरभट.

—:०:—

ग्रंथकार

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.**
संपादक मुमुक्षु पुणें.

---

श्रीकृष्णाष्टमी शके १८४२, सपटंबर १९२०.

---

किंमत रुपये तीन.

॥ श्रीविठ्ठल ॥

# प्रस्तावना.

—*:*—

१ श्रीपांडुरंगाच्या कृपेनें तुकाराममहाराजांचें हें चरित्र महाराष्ट्रवाचकांच्या हातीं देण्याचा योग आज ( शके १८४२ च्या कृष्णाष्टमीस ) आला आहे. मोरोपंतांचें चरित्र आणि काव्यविवेचन हा माझा पहिला चरित्रग्रंथ आठ वर्षांच्या परिश्रमानंतर शके १८३० च्या कार्तिकांत प्रसिद्ध झाला. त्यानंतर एकनाथमहाराजांचें संक्षिप्त चरित्र शके १८३२ च्या पौषांत व ज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र आणि ग्रंथविवेचन शके १८३४ च्या चैत्रांत क्रमानें प्रसिद्ध झालीं. तेव्हांपासून आठ वर्षांनीं हा चौथा चरित्रग्रंथ प्रसिद्ध होत आहे. तुकोबारायांच्या ऋणांतून अंशतः मुक्त होण्याचा सुप्रसंग नारायणानें आणला त्याबद्दल त्या दयाघनाच्या चरणकमलाचें स्मरण करून दोन प्रास्ताविक शब्द लिहितों.

या ग्रंथाची इमारत कोणत्या आधारांवर उभारली आहे याचा उलगडा करणें अवश्य आहे. पहिला आणि मुख्य आधार म्हणजे तुकोबांचे अभंग हा होय. तुकोबांचें चरित्र त्यांच्या अभंगांतच उत्कृष्ट लिहिलें गेलें आहे. त्यांचें अंतरंग, त्यांचा अभ्यास, त्यांचे अनुभव, त्यांचे उपदेश त्यांच्या अभंगांत इतक्या स्पष्ट रीतीनें प्रकट झाले आहेत कीं दुसऱ्या कोणालाही ते तसे वर्णन करून सांगतां येणार नाहींत. अभंगांचें परिशीलन आणि मनन जितक्या आस्थेनें, आवडीनें व आदरानें करावें तितकें महाराज आपलें हृदय उघडें करून दाखविण्यास तयार आहेत. परंपरेचें साह्य मात्र अवश्य घेतलें पाहिजे. परंपरेचें साह्य व श्रवणमनननिदिध्यास या दोनही प्रकारांनीं तुकोबांचा संग दीड दोन तपांचा झाला आहे असें स्पष्ट सांगण्यास मला कांहीं भय वाटत नाहीं. तुकोबांचे अभंग हे त्यांचे सहजोद्गार आहेत, त्यांत कृत्रिमपणाचा लेशही नाहीं; विचारांत नाहीं, व भाषेंतही नाहीं. कांहीं ग्रंथ ज्ञानसंग्राहक असतात, कांहीं उपदेशपर असतात व कांहीं आत्मगत भाषणासारखे असतात. तुकोबांनीं जगाच्या ज्ञानभांडारांत भर टाकण्याच्या हेतूनें अभंग केले नाहींत. जगाला उपदेश करण्यासाठीं ते कांहीं अभंग बोलले आहेत; तथापि बहुतेक अभंग देवाच्या—त्यांच्या एकांतांत स्वयंस्फूर्तीनें निघाले आहेत,

किंवा ते आपले आपल्याशीं बोलण्यांत निघाले आहेत. ' तुका म्हणे करूं मनाशीं संवाद । आपुलाची वाद आपणाशीं ' अशा प्रकारची त्यांच्या मनाची बैठक असल्यामुळें त्यांचे अभंग त्यांचे स्वगत सहजोद्गार आहेत. बहुतेक प्रसंगीं मीं त्यांचे त्यानांच बोलूं दिलें आहे, म्हणजे त्यांच्या अभंगांतील भरपूर अवतरणें त्या त्या प्रसंगीं दिलीं आहेत त्याचें बीज हें होय.

३ तुकोबांचे अभंग हा ह्या चरित्राचा पहिला आधार म्हणून सांगितलें खरें, पण अभंगांची निवड कशी केली, कोणते गाथे पाहिले व प्रमाण मानले हें सांगितलें पाहिजे. माधवचंद्रोबांनीं तुकोबांचा गाथा शिळाप्रेसवर प्रथम शके १७८७-८९ मध्यें छापून प्रसिद्ध केला. यांत ३३२८ अभंग छापले आहेत. यानंतर सर-अलेक्झांडर ग्रँट, मुंबई शाळाखात्याचे डायरेक्टर, यांच्या शिफारसीवरून सरकारनें २४ हजार रुपये खर्चून विष्णुशास्त्री पंडित व शंकर पांडुरंग पंडित यांजकडून शोध करवून साडेचार हजार अभंगांचा गाथा इंदुप्रकाश-प्रेसकडून छापविला. पंडितांनीं देहू, तळेगांव, कडूस व पंढरपूर येथील जुन्या प्रती पाहून त्यांवरून एक प्रत तयार करून हा गाथा शके १७९१ मध्यें छापिला. ह्या गाथ्यावर वारकऱ्यांचे त्यावेळचे प्रसिद्ध पुढारी भाऊ काटकर यांचा ' हा ग्रंथ आह्मीं देहू मुक्कामीं पाहिला, सर्वांनीं घेण्यायोग्य आहे ' असा ढोबळ अक्षरांनीं छापलेला एका पानावर शिक्का आहे ! महिपत-बोवांच्या आधारें ह्या गाथ्याला तुकोबाचें चरित्र इंग्रजींत व मराठींत—जोडलें आहे. ह्या गाथ्यांत खालीं टीपेंत पाठभेद दिले असून शेवटीं कठिण शब्दांचा अर्थकोश दिला आहे. ज्या जुन्या वह्यांवरून हा गाथा तयार केला त्या वह्या मीं पाहिल्या आहेत. त्या शेंसवाशें वर्षांमागच्या नाहींत, तथापि त्यांना परंपरा असलीच पाहिजे. पंडितांना संताजी जगनाड्यांची वही पाहण्यास मिळाली नव्हती हें उघड आहे, तथापि हा ' इंदुप्रकाश ' गाथा एकंदरींत फार चों-गला आहे. छापील गाथ्यांत हाच गाथा सर्वोत्तम आहे.३ यानंतर माडगांवक-रांनींही पाठभेदांसह एक गाथा छापला आहे.४ आवटे,५ निर्णयसागर वगैरेंनींही विषयवारी करून गाथे छापले आहेत.६ तुकाराम तात्याचा ९ हजार अभंगांचा गाथा शके १८११ मध्यें प्रसिद्ध झाला. तुकोबांच्या अभंगांचा एकसूत्रीपणानें विचार केला म्हणजे यांतील पुष्कळ अभंग तुकोबांचे नाहींत असें वाटतें, तथापि इतर गाथ्यांत नसलेले व यांत असलेले सर्वच अभंग प्रक्षिप्त आहेत असा माझा आ-

ग्रह नाहीं. अभंगांचा शोध व निर्णय अद्याप कसोशीनें झाला नाहीं. बहुतेक जुन्या गाथ्यांतून साडेचार हजार अभंगांपेक्षा अधिक अभंग नाहींत, व इतकेच तुकोबांचे अभंग बहुधा सर्वमान्य आहेत. शके १८३१ मध्यें विष्णुबोवा जोग यांनीं सार्थ गाथा छापला. सर्व अभंगांचा अर्थ करण्याचा प्रथम प्रयत्न या दृष्टीनें हा गाथा कौतुकावह आहे. हा छापण्याचें काम मात्र तितकें काळजीपूर्वक झालेलें नाहीं. ह्या गाथ्याला विष्णुबोवांनीं १२ पानांची प्रस्तावना जोडली असून बोवांच्या आग्रहावरून मीं लिहिलेलें तुकोबाचें अल्पचरित्र त्यापुढेंच १२ पानांत जोडलें आहे. वारकरीमंडळांत पंढरपुरीं असलेल्या दोन जुन्या वह्या प्रासादिक समजल्या जात आहेत: एक बडव्यांची वही व दुसरी माळ्यांची वही. बडव्यांची वही ही २०० वर्षांपूर्वींचे प्रख्यात भक्त प्रल्हादबोवा बडवे यांच्या वेळची आहे असें म्हणतात. ही गंगुकाकांच्या मठांत आहे. दुसरी माळ्यांची वही ही देहूकर व वासकर यांच्या फडांत मान्य आहे. बडव्यांच्या वहीप्रमाणें आर्यभूषणप्रेसनें हरिभाऊ आपटे यांच्या नजरेखालीं एक गाथा छापला, त्यांत ४०९२ अभंग आहेत, माळ्यांच्या वहीबरहुकूम गोडबोले बुकसेलर यांनीं जगद्धितेच्छुप्रेसमध्यें गाथा छापून काढला, त्यांत साडेचार हजार अभंग आहेत. हे दोन्ही गाथे १८३५ मध्यें प्रसिद्ध झाले. हे दोन्ही गाथे सांप्रदायिक असून वारकऱ्यांची भजनें त्याप्रमाणें चालतात. याशिवाय आणखी तीन गाथ्यांचा येथें उल्लेख केला पाहिजे. तुकोबांचें प्रयाण होऊन तीनशेंही वर्षे झालीं नाहींत तों पाठभेद व प्रक्षिप्त अभंग यांविषयीं मतभेद कां उत्पन्न व्हावे व खास त्यांच्या अभंगांविषयीं सर्वांचें ऐकमत्य कां नसावें हा एक प्रश्न आहे व या प्रश्नाचें उत्तर शोधण्यांतच अस्सल गाथा मिळविण्याची भूक संशोधकांत उत्पन्न झाली. तुकोबांचे लेखक गंगाराम मवाळ व संताजी तेली जगनाडे यांच्या हातच्या वह्या मिळाल्या तर तुकोबांचे अस्सल अभंग कोणते याचा निर्णय करणें सुलभ जाईल अशी भावना उत्पन्न झाली. मीं याच भावनेनें शके १८२५ सालीं तळेगावीं जाऊन जगनाडे यांच्या घरचीं दप्तरें शोधलीं. संताजी व त्याचा पुत्र बाळाजी यांच्या हातच्या वह्या पाहिल्या. त्यांत तीन ठिकाणीं 'हस्त अक्षर संताजी तेली जगनाडे' असे लेख पाहून मला आनंद झाला व मीं ता० २८।४।१९०३ च्या केसरींत एक दुकालमी लेख लिहून त्या गाथ्याकडे लोकांचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला. संताजीच्या एका लेखांत शक १५६८ दिला असून दुसऱ्या लेखाचा

शक १६१० आहे, यावरून संताजी तुकोबांच्या पश्चात् ४० वर्षें तरी हयात होता हेंही उघड झालें. माझ्याहातून संताजीचा गाथा उतरून घेऊन तो छापण्याचें काम झालें नाहीं, तरी त्याकडे संशोधकांचें लक्ष गेलें. दत्तोपंत पोतदार यांनीं संताजीच्या वहीप्रमाणें २५८ अभंग लिहून काढले व ते भा. इ. सं. मंडळाच्या पंचमसंमेलनवृत्तांत प्रसिद्ध केले. त्यानंतर संताजीच्या आणखी एका वहीचा शोध लावून ठाण्याचे विनायकराव भावे यांनीं नुक्ताच 'तुकारामबोवांचा अस्सल गाथा' दोन भागांत छापला असून सुमारें १३०० अभंग प्रसिद्ध केले आहेत. हा गाथा बराच महत्त्वाचा आहे. यांत जे अभंग दिले आहेत ते खास तुकोबांचे अभंग होत याविषयीं शंका उरत नाहीं. विनायकराव लक्ष्मीपुत्र असून विद्वान् आहेत, त्यांनीं हें काम निरपेक्ष कार्यप्रेमानें केलें आहे. ही 'जगनाडी संहिता' अद्याप अपुरी आहे, या गाथ्यांत छापलेले अभंग संताजींचे अस्सल आहेत, व शुद्धलेखन मात्र तुकोबांच्या वेळचें पण संताजीचें आहे हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. तुकोबांचें अध्ययन किती उच्च दर्जाचें होतें हें पुढें येणार आहे.संताजीच्या शिक्षणाच्या मानानें यांत शुद्धाशुद्धें आलीं आहेत. देहूस मीं १०।२० फेऱ्या केल्या व तेथील तुकोबांच्या घराण्यांतील बहुतेक कागदपत्र पाहिले,जुनीं बाडें व दप्तरें पाहिलीं व त्या संशोधनाचा उपयोग प्रस्तुत चरित्रांत यथास्थल व यथाकाल केला आहे.तेथें मुख्य घरांत तुकोबांच्या हातचें लिखित ह्मणून एक जुनी वही फार जपून ठेवलेली आहे.ती मोठ्या प्रयासानें मला पाहण्यास मिळाली. तींत तुकोबांचे २२५ अभंग आहेत. लिखाण निःसंशय तुकोबांच्या वेळचें व संताजीच्या वहींसारखेंच आहे. मात्र लिखित अधिक शुद्ध व व्यवस्थित आहे. तुकोबांच्या घराण्यांत ही तुकोबांच्या हातची अस्सल वही ह्मणून परंपरेनें मानली जाते. ह्या वहींतल्या दोन अभंगांचा फोटो अन्यत्र दिला आहे. तुकोबांचें हस्ताक्षर, निदान सही तरी अस्सल मिळावी ह्मणून मीं नाशीक व त्र्यंबक येथील देहूकरांच्या मूळवह्याही पाहिल्या आहेत. तुकोबांची सही मिळती तर कोण बहार झाली असती ! असो. आणखी एका गाथ्याचा उल्लेख करून हें गाथाप्रकरण संपवितों. बहिणाबाईचा अस्सल गाथा मला शिऊर येथें मिळाला आहे. छापील गाथा नकलेवरून छापला आहे, असलेवरून नव्हे. ! छापील गाथ्यांत पृ० १३० वर पुढील अभंग दिला आहे:—

**कळों आलें तुझें जिणें । देवा तूं माझें पोषण ॥ १ ॥**
**आठवितां नांवरूपा । सदा निर्गुणींच लपा ॥ २ ॥**

वाट पाहे आटव्याची । सत्ता नुरेचि मुळींची ॥ ३ ॥
बहोणि ह्मणे परदेशीं । येथें आह्मांसंगें जिसी ।

हा अभंग वाचतांच हा तुकोबांचा आहे असें वाटून मीं गाथे पाहिले तों खरेंच हा तुकोबांचाच निघाला. इंदुप्रकाश गाथ्यांत याचा पाठ असा आहेः —

कळों आलें तुझें जिण । देवा तूं माझें पोषणें ॥ १ ॥
वाट पाहसी आठवाची । सत्ता सतंत कईची ॥ ध्रु० ॥
बोलावितां यावें रूपा । सदा निर्गुणींची लपा ॥ २ ॥
तुका ह्मणे तूं परदेशी । येथें आह्मां अंगेंजिसी ॥ ३ ॥

आर्यभूषण गाथ्यांत हा अभंग असाच आहे. जगद्धितेच्छु गाथ्यांत ' सत्ता संसातें कैसी ' एवढाच पाठ वेगळा आहे. बहिणाबाईच्या मुळ गाथ्यांत सदर अभंग असा आहे:—

कळो अल तुझ जिन । देवा तूं माझ पोसन ॥ १ ॥
आठवितां याव रुपा । सदा निर्गुणींच लपा ॥ छ ॥
वाट पाहे आठवाची । सत्ता नोर मुळिची ॥ ३ ॥
तुका ह्मणे परदेसि । येथें आह्मांसंगें जीसी ॥ ४ ॥

संताजीच्या गाथ्यांत इंदुप्रकाशगाथ्यासारखाच पाठ आहे. असो. इंदुप्रकाशगाथा, दोन सांप्रदायिक गाथे, संताजीचा गाथा, बहिणाबाईचा गाथा हे पांच गाथे ( पांचवा छापलेला नाहीं ) मुख्य आहेत. थोडे फार पाठभेद आहेत, शुद्धाशुद्धतेंत फरक आहेत, संशोधन होणें अगत्याचें आहे; तथापि तात्पर्यार्थाच्या बाजूनें पाहतां गाथ्यागाथ्यांत डोंगराएवढा फरक आहेत असें नाहीं ! संप्रदायाचे सिद्धांत माहीत असले, तुकोबांच्या विचारांचा व भावनांचा अंतरंगपरिचय असला, निदान विचारांचा एकसूत्रीपणा पटलेला असला म्हणजे कोणताही गाथा वापरला तरी परमार्थाची विशेष हानी होण्याचा संभव आहे असें मला वाटत नाहीं ! अभंगाचे शुद्ध पाठ मिळण्यास एक तुकोबांच्या हातचा, निदान त्यांना सर्वतोपरी मान्य असलेला गाथा तरी मिळाला पाहिजे; किंवा हे पांचचार गाथे बारकाईनें अभंगशः तपासून आणखी शोध करून एक सर्वजनमान्य होईल असा नवीन गाथा परंपरेच्या व संशोधनाच्या अशा दुहेरी दृष्टीनें तरी तयार झाला पाहिजे. मी हे सारे गाथे पाहिले आहेत, विशेष महत्वाचे व मर्माचे अभंग प्रत्येक गाथ्यांत

ताडून पाहिले आहेत व अशा रीतीनें, संप्रदायपरंपरेच्या दृष्टीनें, वारकऱ्यांत प्रेमानें मिसळून वागल्यानें व आळंदी देहू, पंढरी येथील परंपरेप्रमाणें कथा-कीर्तनें व पुराणें ऐकल्यानें व केल्यानें संप्रदायशुद्ध विचारसरणी करून घेऊन तदनुरोधानें अभंगांचा अभ्यास व मनन झालें आहे. चरित्राचा पहिला आधार जे तुकोबांचे अभंग त्याविषयीं हें विवेचन झालें.

४ चरित्रग्रंथाला दुसरा आधार संशोधनाचा. एकच मनुष्य संशोधक आणि भाविक कसा असूं शकतो याचा कित्येकांस विस्मय वाटतो ! संतचरित्रकार तरी भाविक, रसिक व चिकित्सक किंवा संशोधक असला पाहिजे अशी माझी समजूत आहे. परंपरा, उपासना व भक्तिभाव यांच्या उत्कटतेशिवाय संतांचीं रहस्यें समजून त्यांचे ग्रंथ उलगडत नाहीत. नवीन मन्वंतरांत वावरणाऱ्या मनुष्याला संशोधनाकडे दुर्लक्षही करितां येत नाहीं. तेव्हां दोहोंचा शक्य तितका मिलाफ चरित्रग्रंथांत करण्याचा माझा परिपाठ आहे. प्रस्तुत ग्रंथासाठीं शक्य तितकें संशोधनाचें कार्य मी केलें आहे. त्याचें थोडें दिग्दर्शन वर केलेंच आहे. संशोधनाचें कार्य सर्व चरित्रभर दिसणार आहे त्याचा येथें पाल्हाळ करण्याचें कारण नाहीं. देहूस दहावीस वेळ जाऊन तेथील तुकोबांच्या वंशजांकडील पोथ्या, कागदपत्रें, व इतर दप्तरेंही बहुतेक पाहिलीं व त्यांतून प्रस्तुत चरित्राला पोषक व आवश्यक तेवढाच मजकूर घेतला आहे. शिवरायांनी तुकोबांच्या पुत्रास म्ह० नारायणबोवास आलेलीं दोन पत्रें मला मिळालीं आहेत. तुकोबांच्या पुत्रांचें वांटणीपत्र, इतर कांहीं पत्रें, बहिणाबाईच्या वचन्यासंबंधाचें एक शक १५८० मधलें निवाडपत्र वगैरे पत्रांचा या चरित्राशीं विशेष संबंध येत नाहीं म्हणून त्यांची याला जोड देऊन ग्रंथ फुगवणें मला योग्य वाटलें नाहीं. तुकोबांची आजपर्यंतची वंशावळही देहू पंढरपूर, नाशीक, त्र्यंबक येथील वंशावळींवरून व जुन्या लेखांवरून तयार केलेलीही येथें दिली नाहीं. तुकोबांचा औरस वंश देहूस व इतरत्र भरपूर आहे. तुकोबांचे पश्चात् त्यांच्या घराण्यांत गोपाळबुवा, रामोबा व वासुदेवबुवा हे तीन पुरुष व तुकोबांचे कर्तृत्ववान् पुत्र नारायणबोवा हे मिळून चार पुरुष नांवाजण्यासारखे झाले. नारायणबोवांनी शाहूमहाराजांकडून ३ गांव इनाम मिळविले. राज्याभिषेक शक ३० ( शके १६२६ ) च्या देहूगांवच्या सनदेंत ' राजश्री तुकोबा गोसावी सत्पुरुष यांचे पुत्र नारोबा गोसावी यांणीं किल्ले प्रसिद्धगडचे मुक्कामीं आपले शिष्य सखोबा गोसावी यांबरोबर

पत्र पाठविलें तेथें लिहिलें कीं तुकोबा गोसावी सत्पुरुष हे मौजे देहू तर्फ हवेली प्रांत पुणें **भगवतकथा कारितां अदृश्य झाले ही गोष्ट विख्यात आहे त्याचे हाते पुज्या श्री-या देवाची मूताची होत होती** तीं पूजा चालवीत आहे ' इ० मामुली मजकूर आहे. जाड टाइपांत घेतलेली वाक्यें महत्त्वाचीं आहेत. तुकोबा 'भगवत्कथा कारितां अदृश्य झाले,' 'ही गोष्ट विख्यात आहे,' व तुकोबा आपले 'हातें श्रीदेवाची मूर्तीची पूजा करीत होते' या नारायणबोवांनीं सांगितलेल्या तिन्ही गोष्टी महत्त्वाच्या आहेत. सनदेंतील बाकीच्या मजकुराशीं आपणांस कर्तव्य नाहीं. कांहीं कागदपत्रांचा व लेखांचा उपयोग 'पूर्वपीठिका' ह्या प्रकरणांत केला आहे. ह्या चरित्रांत तुकोबांचे पणतु गोपाळबोवा यांचा उल्लेख कांहीं ठिकाणीं येणार आहे. ते गोपाळबुवा तुकोबांचे मधले पुत्र विठोबा यांचे नातु होत. राघोबा हे विठोबांचे पणतू. विठोबा-गोविंद-गोपाळबोवा. विठोबा-गणेश-त्र्यंबक-राघोबा.

तुकोबांचे प्रथम पुत्र महादेवबुवा. त्यांच्या वंशांत वासुदेवबुवा झाले. तुकोबा-महादेव-आबाजी-मुकुंद-वासुदेव. तुकोबांचे पश्चात् हे पुरुष घराण्यांत चांगले निघाले. वासुदेवबुवांपासून देहूकरांचा फड चालू झाला असेंही म्हणतात. बाकीची वंशावळ देण्याचें कारण नाहीं. शिऊर मुक्कामीं मी गेलों असतांना तेथें बहिणाबाई व शंकरस्वामी यांचेकडे जी माहिती मिळाली ती पुढें येणारच आहे (पृ० २४५ ते २४८; ४६८ ते ४७४). निळोबारायांचा हस्तलिखित ओवीबद्ध चरित्रग्रंथ मिळाला त्याचा उपयोग (४७५ते४७८) ही केला आहे. देहूचें वर्णन (पृ० ४७ते५१) व लोहगांवचें वर्णन व शिलालेख (४६४-४६६) हेंही पाहावेत. तुकोबांचा कालनिर्णय हें सर्व प्रकरण संशोधनात्मक आहे. वारकरी संप्रदायाचें स्वरूपवर्णन या ग्रंथांत जागोजाग आलें आहे. असो कागदपत्र, जुन्या वह्या, वाडे वगैरे ज्यांचा ज्यांचा शोध लागला त्यांचा तलास बरोबर लावला आहे. कोठें संशोधन व्हायचें अजून राहिलें असेल किंवा कोणापाशीं कांहीं माहिती असून ती कदाचित् यानंतर प्रसिद्ध होणार असेल तर त्याबद्दल मी जबाबदार नाहीं, आज आठ वर्षें ह्या चरित्रग्रंथाचा पुकारा झाला असून व तत्संबंधीं अनेक लेख व व्याख्यानें प्रसिद्ध झालीं असून ज्यांनीं मला ती माहिती पुरविली नाहीं त्यांजकडे हा दोष येईल!

५ चरित्रग्रंथाचा तिसरा आधार ह्मणजे तुकोबांच्या प्रयाणापासून आजपर्यंत ज्यांनीं त्यांचें गुणगौरव केलें, आख्यायिका लिहिल्या, चरित्रें किंवा

निबंध लिहिले त्यांच्या कार्याचें पर्यालोचन हें होय. याचाही विचार करूं. प्रस्तुत चरित्रांत तुकोबांच्या गुणांची व भगवत्कृपेच्या प्रसंगांची हकीकत सविस्तर येणार आहे ते त्यांचे गुण व ते दिव्य प्रसंग त्यांच्या हयातींतच जगजाहीर झाले होते यामुळें त्यांची वाखाणणी समकालीन व पश्चात्कालीनही सर्व संतकवींनी मोठ्या प्रेमभरानें केली आहे. कसें तें आपण पाहूं. देवानें डोहांत वह्या तारल्याची गोष्ट शके १५६२ च्या पूर्वींच कोल्हापुरापर्यंत पसरली होती त्याप्रमाणेंच १५६२ मध्यें कोल्हापुरीं जयरामस्वामी त्यांचे अभंग कीर्तनांत ह्मणत याबद्दल बहिणाबाईच्या आत्मचरित्रांत प्रमाणें आहेत. रामेश्वरांनीं तुकोबांचें गुणगौरव कसें केलें आहे तें पुढें ( पृ० ३९४ ) येणारच आहे. त्यांच्या एका आरतींत 'जळीं दगडासहित वह्या । तारियेल्या ऐशा लाह्या' असा एक चरण आहे. सदेह वैकुंठाला गेल्याबद्दल रंगनाथ स्वामींचें सुंदर पद शेवटच्या प्रकरणांत येईल, त्यांचे बंधु विठ्ठल ( जन्म श. १५३८ ) यांनीं 'उठिं उठिं बा पुरुषोत्तमा' ह्या लोकप्रसिद्ध भूपाळींत 'त्यांच्या वह्यालागीं पाणी ! लागों दिलें नाहीं त्वां ' असें एक वचन आहे. देवदासानें शके १६०४ मध्यें रचलेल्या संतमालिकेंत:—

**जातीचा वाणी तुकाराम । तुझ्या भजनीं अत्यंत प्रेमा ॥**
**त्या पावलासी पुरुषोत्तमा । उदकीं कागद तारिले ॥ ६० ॥**

श्रीधरस्वामींच्या संतप्रतापांत वह्या तारल्याचा उल्लेख आहे. शके १६०० नंतर रचलेल्या संतमालिकांतून तुकोबांच्या भगवद्भक्तीचें व वह्या तारिल्या आणि सदेह वैकुंठाला गेले या दोन गोष्टींचें गौरव केलेलें आहे. शिवदीनकेसरी, मध्वमुनीश्वर देवनाथमहाराज, यांनीं आपल्या पदांतूनही तुकोबांची स्तुति करीत वरील दोन कथा सांगितल्या आहेत. समर्थ सांप्रदायिकांनीही तुकोबांविषयीं अत्यंत प्रेमच व्यक्त झालें आहे. खुद्द समर्थांची व तुकोबांची भेट झाली असली पाहिजे यांत शंका नाहीं. 'भिक्षामिषें लहान थोरें । परीक्षुनि सोडावीं,' 'महंतें महंत शोधावा ' असें दासबोधांत सांगणारे समर्थ दक्षिणेंत कृष्णातीरीं शके १५६६ मध्यें येऊन तुकोबांच्या प्रयाणा( श० १५७१ )पूर्वींच्या पांच वर्षांत तुकोबांना भेटल्याशिवाय राहिले असतील हें शक्यच नाहीं. त्यांच्या भेटीच्या गोष्टी रामदासी ग्रंथांतून वर्णिल्या आहेत, उद्धवसुत समर्थचरित्रांत, रंगनाथ, आत्यास्वामी, वामन, नयराज, बोधलेबोवा, जयरामस्वामी, तुकोबा व समर्थ यांच्या भेटी पंढरपुरास झाल्याचें वर्णन ( अ० १७ ) करितात.

भमिस्वामींच्या संतलीलामृतांत २० अभंग तुकोबाच्या चरित्राला दिले असून त्यांतही समर्थतुकोबांच्या भेटीची हकीकत दिली आहे व त्यांत तुकोबांच्या कांहीं प्रसिद्ध व कांहीं अप्रसिद्ध गोष्टी दिल्या आहेत. ' दासविश्रामधामांतही असाच प्रकार आहे. तुकोबांच्या बऱ्याच नवीन गोष्टी याही ग्रंथांत दिलेल्या सांपडतात. त्यांत तुकोबांच्या विपत्तीचें, धैर्याचें, निस्पृहतेचें व अलोट भक्तीचें वर्णन पुष्कळ केलें आहे. संतांच्या अनेक लहान मोठ्या चरित्रांत व काव्यांत तुकोबांचें गुणगौरव नाहीं असें क्वचित्च आहे. तुकोबांच्या सर्व आख्यायिका एकत्रित करून व त्यांच्या घरचीं परंपरेची माहिती मिळवून संतचरित्रकार महिपतबावा यांनीं तुकोबांच्या चरित्रावर प्रथम भक्तविजयांत ( शके १६८४ ) पांच अध्याय व नंतर भक्तलीलामृतांत (श. १६९६) सोळा अध्याय लिहून तुकोबांची बहुमोल सेवा केली. ह्या सर्व प्रकारांवरून महाराष्ट्रभर सर्व संप्रदायांतल्या लोकांत--वारकऱ्यांत व इतर पंथांतही--त्यांच्या कीर्तीचा झेंडा कसा नाचला हें समजून येत. वरील सर्व गौरवापेक्षां मोरोपंतांनीं तुकोबांवर ज्या ३०।३५ आर्या केल्या आहेत त्यांत पंतांनीं तुकोबा, त्यांचे अभंग, अभंगांचे कीर्तनांवर व कीर्तनद्वारां जनसमूहावर झालेले परिणाम यांचें फारच मार्मिक वर्णन केलें आहे. तुकोबा हे ' विमद विराग विमत्सर ' होते, नारदप्रल्हादांप्रमाणें हरिकथारस लोकांना पाजायला वैकुंठाहून अवतरले होते, असा ह्या ज्ञानांबुधि व 'भक्तिरसाचि मूर्त' असा तुकाराम सर्वांनीं 'प्रेमें गावा ध्यावा, भस्म कराया अघा, तुका वाणी.'

स्वात्मानुभव पहातां तुकया केवळ सखाचि जनकाचा ।
वैराग्यें डोलविला माथा जेणें मुनींद्र सनकाचा ॥ १८ ॥
ज्याच्या होय अभंगांवांचुनि होऊनि हरिकथा नाहीं ।
श्रोत्यांसि अभंगाही ती दे जसि माय हरिख थानांहीं ॥१९॥
भगवद्भक्ति कराया बहु जड जीवांसि जो तुका शिकवी ।
त्याच्या दुसरा धरणीवरि येइल कोण हो तुकासि कवी ॥२०॥

५ इंदुप्रकाशगाथा प्रसिद्ध झाल्यापासून सुशिक्षितांचें लक्ष तुकोबांच्या अभंगाकडे व चरित्राकडे लागलें. बंगाली व कानडी भाषेंतही त्या गाथ्यांत प्रथम दिलेल्या चरित्रांच्या आधारें त्रोटक चरित्रें झालीं. बाळकृष्ण मल्हार हंस यांचा सरस निबंध ( शके १८०२ ), केळुसरकरांचें चरित्र (श० १८१८) भिड्यांचा ' तुकोरामबोवा ' हा निबंध व या सर्वांपेक्षां इंदोरचे प्रो. शांताराम

देसाई यांचा ‘ तुकारामाच्या अभंगरत्नांचे हार ’ हा सत्यजिज्ञासाप्रधान व मूळाचा ठाव घेणारा कळवळ्याचा निबंध हे निबंधवजा ग्रंथ प्रसिद्ध झाले. फ्रेझर साहेबांनीं कित्येक अभंगांचे इंग्रजींत भाषांतर केलेलें प्रसिद्ध आहे. आमचे ख्रिस्तधर्मी बांधवही तुकोबांच्या गौरवांत फार मागें नाहींत. डॉ. मेरी मायकेल व विशेषतः रेव्हरंड नेहेम्या ( नीलकंठ गोरे ) यांचे लेख पाहण्यासारखे आहेत. विशेषतः नीलकंठ गोरे यांचा ‘ तुकारामाचें धर्मविषयक ज्ञान ’ हा १०० पृष्ठांचा निबंध तर अत्यंत विद्वत्ताप्रचुर आहे. रे० नवलकर व डॉ. मॅकनिकल यांचे इंग्रजी लेखांचा नामनिर्देश केला पाहिजे. येथील तुकारामचर्चासोसायटीचा यत्नही अभिनंदनीय आहे. आजवर तुकोबांच्या अभंगांचा व चरित्राचा ज्यांनीं ज्यांनीं आपापल्या मतीनें विचार केला आहे त्या सर्वांचे आभार मानून मी प्रस्तुत ग्रंथाच्या धोरणाविषयीं दोन शब्द लिहितों.

७ तुकोबांच्या अभंगांचें सूक्ष्मावलोकन, संशोधन व आजवर झालेल्या कामगिरीचें निरीक्षण हे तीन आधार सांगितले, आतां प्रस्तुतग्रंथाचें स्वरूप संक्षेपानें सांगतों. मंगलाचरणानंतर प्रथम कालनिर्णयाचा प्रश्न सोडविला आहे. पुढील दोन प्रकरणांत तुकोबांचें पूर्व चरित्र सांगितलें असून संबंध मध्यखंड उपासनाप्रधान आहे. सर्वांना, विशेषतः वारकरीबांधवांना संप्रदायाची पायाशुद्ध माहिती व्हावी, तुकोबा कोणत्या सोपानानें चढत साक्षात्काराच्या पायरीवर गेले हें कळावें, सगुणोपासनेचें वर्म ध्यानीं यावें, श्रीविठ्ठलस्वरूपाचा बोध व्हावा व परमार्थमार्ग चोखाळतां यावा, साधकांना भक्तिमार्ग स्वच्छ दिसावा या हेतूनें हा उपासनाखंड तुकोबांच्या वचनाधारें सविस्तर लिहिला आहे. भाविक प्रेमळांना हा मध्यखंड फार प्रिय व बोधप्रद होईल. वारकरी संप्रदायाची सिद्धांतपंचदशी(पृ० ११३–११६) सांगून एकादशिव्रत,नामसंकीर्तन, सत्संग व परोपकार यांचें महत्त्व व तुकोबांचा पूर्वाभ्यास प्रथम सांगितला असून पुढें तुकोबांनीं कोणत्या ग्रंथांचें अध्ययन् कसें केलें व त्यांतून काय बोध घेतला हें भरपूर अंतरंग प्रमाणें देऊन सिद्ध केलें आहे. ७वें प्रकरणीं गुरुकृपा व गुरुपरंपरा याचें विवरण आहे. चित्तशुद्धीच्या साधनांत तुकोबांच्या लोकप्रियतेचें बीज ( २६६–२७० ), मनोजय ( २७०–२७८ ) एकांतवास (२८७–२९१), आत्मपरीक्षण (२९१-३०० ) व नामसंकीर्तन ( ३०६–३११ ) हे भाग पहावे. भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व ( ३१३–३२० ), सगुणनिर्गुणविवेक ( ३२०–३२७ ), विठ्ठलोपासना व

मूर्तिपूजा ( ३२७-३३४ ), देवाच्या भेटीची तळमळ ( ३३४-३५० ) हे भाग पहात सगुणप्रेमा चित्तांत सांठवीत विठ्ठलस्वरूपाची ओळख करून घ्यावी (३५०-३६७) व विठ्ठलमूर्ती ध्यानार्थ चित्तीं सांठवावी (३६८-३६९) रामेश्वरभट व तुकोबा यांचें वादाचें वर्म ( ३७३-३७७ ) व तुकोबांची ध्याननिष्ठा समजून घेऊन सगुणसाक्षात्काराचा आनंद तुकोबासमवेत ( ३८६ ) भोगावा. मध्यखंड हें भक्त तुकोबांचें हृदय आहे. मेघवृष्टींत त्यांनीं संसारिकांना परोपरीनें कसे जागे केले ( ४१४-४२६ ), दंभस्फोट केला ( ४२७-४३३ ) हें पाहून तुकोबा व शिवाजी(४३६-४४६) हा भाग समग्र पाहिल्यावर वाचकांस संतांवरील आक्षेपांचें खंडण ( ४४६-४५२ ) यथार्थ वाटेल. खोळा शिष्यांच्या गोष्टी, निळोबाचें महत्त्व ( ४७४ ) व नंतरचे बारकऱ्यांचे पुढारी ( ४७९-४८० ), तुकोबा व जिजाई यांचा संसार, दोघांत दोषी कोण याचा निवाडा ( ४८५-४८९ ) पहात पहातां तुकोबा ज्ञानभक्तीचा परमानंद कसा भोगते झाले ( ४९८--५०४ ) व सदेह वैकुंठाला गेले हें पहावें.

८ आभार प्रदर्शनाचे दोनच शब्द. इंदूरसंस्थानाधिपति श्री. सवाई तुकोजीराव होळकर यांनीं प्रस्तुत चरित्रग्रंथ बहुतेक लिहून झाल्यावर ह्या सत्कार्यास बरीच मोठी देणगी दिली याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. तुका प्रेमी गृहस्थ रा. शिवराव कृष्ण कैकिणी, कै. कर्नल कीर्तिकर व प्रकरणें मांडतांना चर्चेनें साह्य देणारे बाबूराव भिडे यांचेही अत्यंत उपकार आहेत. पांडुरंगाचे आभार शब्दांनीं कोठवर मानूं ?:—

**देवा आतां करी सरतीं हीं वचनें । तुझ्या कृपादानें बोलिलों जीं॥१**
**तुझें देणें तुझ्या समर्पूनी पायीं । झालों उतराई पांडुरंगा ॥ २ ॥**

साधुसंतांचा दासानुदास,

पुणें, मुमुक्षुकचेरी.
गोकुळाष्टमी शके १८४२

लक्ष्मण रामचन्द्र पांगारकर.

# अनुक्रमणिका.

## पूर्वखंड.



## मध्यखंड.



## उत्तरखंड.



## फोटो.



श्रीपंढरपूरनिवासी पांडुरंग.

A. B. PRESS, POONA.

॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

# मंगलाचरण.

—:०:—

## अभंग.

१

समचरणदृष्टि विटेवरि साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥ १ ॥
आणिक न लगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥ ध्रु. ॥
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी[2] । तेथें दुश्चित्त झणी जडो देसी २
तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जें जें कर्मधर्म नाशिवंत ३

२

पुंडलीक भक्तराज । तेणें साधिलें हें काज ।
वैकुंठींचें निज । परब्रह्म आणिलें ॥ १ ॥
पांडुरंग बाळमूर्ती । गाईगोपाळांसंगतीं ।
येउनीयां प्रीती । उभें समचि राहिलें ॥ ध्रु० ॥
येकां आगळें अक्षरें । ( भू ) वैकुंठाचि दुसरें ।
म्हणवीती येरें । परि तीं ऐसीं नव्हेती ॥ २ ॥
पाप पंचक्रोसीमधीं । येउं न सकेची आधीं (कधीं) ।
केंची तेथें विधी--। निषेधाची वसती ॥ ३ ॥
पुराणें वदती ऐसें । चतुर्भुज तीं माणसें ।
सुदर्शन वसे । रिग न घडे कल्पांतीं ॥ ४ ॥
महाक्षेत्र हें पंढरी । अनुपम्य इची थोरी ।
धन्य वारकरी । तुका म्हणे तेथींचे ॥ ५ ॥

---

१ वासना. २ स्थानें. ३ हें चंचल चित्त. ४ बालरूपाचे श्रीकृष्ण. ५ एका अक्षरानें-भू या-अधिक, श्रेष्ठ. ६ इतर क्षेत्रें. ७ प्रवेश.

३

कर कटावरी तुळशीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावी हरी ॥ १ ॥
ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावी डोळां ॥ ध्रु० ॥
कटीं पीतांबर कास मिरवली । दाखवी वहिली ऐशी मूर्ती ॥ २ ॥
गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ॥ ३ ॥
झुरोनि पांजरा होऊं पाहे आतां । येईं पंढरिनाथा भेटावया ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनंती उदास करूं नये ॥ ५ ॥

४

सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥ १
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्वकाळ ॥ ध्रु० ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ २ ॥
तुका म्हणे कांहीं न मागें आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ३ ॥

५

राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया[२] ॥१॥
कस्तुरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ ध्रु० ॥
मुकुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें वोतलें सकळही ॥ २ ॥
कास सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयानो ॥३॥
सकळही तुम्ही व्हागे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ४

६

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥
तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ध्रु०
मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ २ ॥

१ [illegible] २ त्याच्या तेजापुढें सूर्यचंद्राचें तेज लोपतें. आदित्य, चंद्रमा, व अग्नि यांस माझ्यापासून तेज मिळाले आहे असें देवच म्हणतात. " तरी सूर्यासगट आघवां । हे विश्वरचना जे दावां । ते दीप्ति माझी जाणावी । आद्यंतीं आ[illegible] ( श्रीज्ञानेश्वरी ) १५-३[illegible]) २ डोलत हालत. ३ कंबरेला पीतांब[illegible] ४ शेला. ५ एकीकडे. ६ झळकत आहेत.

तुका ह्मणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ३ ॥

७

श्रीअनंता मधुसूदना । पद्मनाभा नारायणा ।
जगव्यापका जनार्दना । आनंदघना अविनाशा ॥ १ ॥
सकळदेवाधिदेवा । कृपाळुवा जी केशवा ।
महानंदा महानुभावा । सदाशिवा सहजरूपा ॥ ध्रु० ॥
चक्रधरा विश्वंभरा । गरुडध्वजा करुणाकरा ।
सहस्रपादा सहस्रकरा । क्षीरसागरा शेषशयना ॥ २ ॥
कमलनयना कमलापती । कामिनीमोहना मदनमूर्ती ।
भवतारका धरित्या[1] क्षिती । वामनमूर्ती त्रिविक्रमा ॥ ३ ॥
अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगज्जीवना ।
वसुदेवदेवकीनंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ॥ ४ ॥
तुका आला लोटांगणीं । मज ठाव द्यावा चरणीं ।
हेंचि करितसे विनवणी । भवबंधनीं सोडवावें ॥ ५ ॥

८

आनंद अद्वय नित्य निरामय । जें कां निजध्येय योगियांचें ॥ १ ॥
ते हे समचरण साजिरे विटेवरी । पहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥ ध्रु०
पुराणांसी वाड श्रुति नेणती पार । तें झालें साकार पुंडलीका २॥
तुका म्हणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग

९

विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ १ ॥
आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपळिया धन ॥ ध्रु० ॥
विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत[2] हे संजीवनी ॥ २ ॥
रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥ ३ ॥

---

१ पृथ्वीला धारण करणाऱ्या. " मी रिगालों असे भूतळीं । म्हणौनि समुद्र-महाजळीं । हे पांसूची ढपुळी । विरेचिना ॥ ( ज्ञाने० १५-४०१ )

२ विठ्ठलरंगीं रंगलेली वाणी ही अमृतसंजीवनी होय.

१०

माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायिली ॥ १ ॥
कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनी ॥ ध्रु० ॥
केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर, कोंवळी ॥ २ ॥
तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस[2] ॥ ३ ॥

११

आषाढी निकट । आला कार्तिकीचा हाट ॥ १ ॥
पुरे दोन्हीच बाजार । नलगे आणीक व्यापार ॥ ध्रु० ॥
तेंचि द्यावें तेंचि घ्यावें । कैवल्याच्या राशी भावें ॥ २ ॥
कांहीं कोणी नेणे । विठोबाचुनि तुका ह्मणे ॥ ३ ॥

१२

पंढरिये माझें माहेर साजणी । ओवियें कांडणीं गाऊं गीत ॥ १ ॥
राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता माहियेर ॥ ध्रु० ॥
उद्धव अक्रूर व्यास अंबऋषी । भाई नारदासी गोरवीन ॥ २ ॥
गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । यांचें कवतुक वाटे मज ॥ ३ ॥
मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ॥४॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ॥५॥
नागो जनामित्रा नरहरी सोनारा । रोहिदास कबिरा सोयरिया ॥६॥

---

१ हट्ट, लाड.

२ तुकोबा अन्यत्र म्हणतातः—'जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी होचि ज्ञान ब्रह्म होय ॥ ' सगुण निर्गुण एक विठ्ठलच होय, व सगुण प्रेम भोगतां भोगतां निर्गुणबोध अनायासें होतो, याबद्दल नाथराय म्हणतात, " दीपकळिका हातीं चढे । तैं घरभरी प्रकाश सांपडे । माझी मूर्ती जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आतुडे अवघेंचि ॥ " ( नाथभागवत अ. ११–१४९९ ).

३ वारकऱ्यांनीं आषाढी व कार्तिकी हे दोनच बाजार ( महायात्रा ) संभाळल्या तरी पुरेत. या बाजारांत कैवल्यसुखाची देवघेव करावी. येथें विठ्ठलावांचून कोणी कांहींच जाणत नाहींत.

परिसा भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळांसी ॥७॥
चोखामेळा संत जीवाचे सोईरे । न पडे विसर यांचा घडी ॥ ८ ॥
जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाठका कान्हया मिराबाई ॥९॥
आणीकही संत महानुभाव मुनी । सकळां चरणीं जीव माझा १०॥
आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ॥११॥
तुका म्हणे माझा बळिया बापमाय । हर्षे नांदताहे घराचारी ॥१२॥

१३

काय या संतांचे मानूं उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥
काय द्यावें त्यांसीं व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ध्रु.
सहज बोलणें हितउपदेश । करुनी सायास शिकविती ॥ २ ॥
तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसें मज येती सांभाळीत ॥३॥

१४

ब्रह्मरूपाचीं[2] तीं कर्मे ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥१॥
ठेविलिया दिसे रंगापेसी शिळा । उपाधिनिराळा स्फटिकमणी ॥ध्रु.
नाना भाषे माते आळविती बाळें । प्रबोध तो मूळ जननीठायीं ॥२
तुका ह्मणे माझें नमन जाणतियां । लागतसे पायां वेळोवेळां ॥ ३ ॥

---

१ गृहस्थाश्रमी. एवढा मुलाबाळांचा परिवार असल्यामुळें श्रीकृष्ण गृहाश्रमीच होत. “ चहूं आश्रमां प्रकाशकू । त्रिलोकीं श्रीकृष्ण गृहस्थ एकू ” ( नाथ-भागवत १–२९७ )

२ ब्रह्मरूप झालेल्या पुरुषाचीं कर्मे संकल्पपूर्वक होत नसल्यामुळें ब्रह्मरूपच होतात, तीं त्याला बंधकारक होत नाहींत. ३ स्फटिकाची शिळा ज्या रंगापाशीं ठेविली असेल त्या रंगाची भासते, पण तो रंग तिचा नसतो. “ पैं कास्मीराचा ( स्फटिकाचा ) रवा ( खडा )। कुंकुमावरी पांडवा । आणिका गमे लोहिवा ( तांबडा )। तो तरी नव्हे ॥ २४९ ॥ तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडे । परी कर्ता भोक्ता ऐसें आवडे ( वाटे )। ते जाण गा भ्रांती ॥ १५० ॥ ” ( ज्ञाने० अ. १५ ). ४ लेंकरें अनेक शब्दांनीं मातेला आळवितात, पण त्यांच्या बोलण्याचें खरें ज्ञान आईला होतें.

१५

सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा
समाधीचें सुख सांडा ओवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥ध्रु०
पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ २ ॥
उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ३
तुका म्हणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥४॥

१६

सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥
सर्वसुख ल्यालों सर्व अळंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ॥ ध्रु० ॥
असों ऐसा कोठें आठवाचि नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥२॥
तुका ह्मणे आह्मी जालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥३॥

१७

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरिचीं ॥ १ ॥
न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ध्रु०॥
ठायींच बैसोनी करा एक चित्त । आवडी अनंत आळवावा ॥ २ ॥
रामकृष्ण हरी विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ३ ॥
याविण तें नाहीं दुसरें साधन । वाहतसे आण विठोबाची ॥ ४ ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनी । शाहणा तो धणी घेतो येथें ॥५॥

१८

आनंदाच्या कोटी । सांठवल्या आम्हांपोटीं ॥ १ ॥
प्रेम चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ ध्रु० ॥
अखंड खंडेना जीवन । रामकृष्ण नारायण ॥ २ ॥
घडी आह्निक्य परत्र । तुका म्हणे समतीर ॥ ३ ॥

१९

हरिचिया भक्ता नाहीं भय चिंता । दुःख निवारिता नारायण ॥१॥
नलगे वाहणें संसार उद्वेग । जडों नेदी पांग देवराव ॥ ध्रु० ॥
असो द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥ २ ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियलें जग तेणें एकें ॥ ३ ॥

१ पूर्णानंद, परम समाधान.

## प्रकरण पहिलें.

# कालनिर्णय.

जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें ।
ऐसा ओघ हा स्वभावें । आद्य असे ॥ ४९ ॥
ऐसिया काजालागीं । अवतरें मी युगींयुगीं ।
परी हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥ ५७ ॥

—श्रीज्ञानेश्वरी अ० ४

१ महात्म्यांच्या चरित्राचें गांभीर्य. २ कालगणनेची परमार्थदृष्टीनें अनवश्यकता व इतिहासदृष्टीनें तिचें महत्त्व. ३ प्रस्तुतप्रकरणीं ज्योतिर्विदांचें साहाय्य. ४ तुकोबांच्या प्रयाणकाळाबद्दल तीन मतें. ५ त्या मतांची विचारणा. ६ प्रयाणकाळाचा निर्णय. ७ जन्मशकाबद्दल चार मतें. ८ त्या मतांचा विचार. ९ राजवाडे यांचा शक १४९० व त्यांचीं कारणें. १० त्यांच्या मताचें परीक्षण, व प्रमाणपंचकानें तो अग्राह्य. ११ दुष्काळाचें वर्ष. १२ कान्होबांच्या शोकपर अभंगांचें वर्म. १३ पूर्वपरंपरा. १४ गुरूपदेशाचें वर्ष. १५ कवित्वस्फूर्तीनें अभंगरचना. १६ तात्पर्य.

१ श्रीतुकाराममहाराजांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या प्रसंगांचा कालानुक्रम आपणांस येथें प्रथम निश्चित करावयाचा आहे. तत्वतः पाहतां महात्म्यांच्या आयुर्दायाचा हिशेब आपण काय लावणार ! मरणाला मारून उरलेले व काळाच्या माथां पाय देऊन जगत्कल्याणार्थ स्वेच्छेनें या भूलोकीं संचरणारे महात्मे—त्यांना जन्म कोठचा व मृत्यु कोठचा ? मुक्तकोटींतले महात्मे जगत्कल्याणाची सूक्ष्म विमलवासना चित्तीं ठेवून वेळोवेळीं मृत्युलोकीं

अवतरतात व कांहीं सभाग्य जीवांना संगलाभ देऊन ठायींच्या ठायींच विराम पावतात. त्यांच्यावर आह्मी जन्ममृत्यूंचे मिथ्या आरोप करीत असतों ! उदयास्ताचें प्रमाण मानून स्वस्थानीं स्थिर असलेल्या सूर्यावर आह्मी आकाशगमनाचा आरोप करितों आणि त्यांतही आमच्या माजघरांत त्याच्या प्रकाशाचा कवडासा पडला व तो चढत उतरत नाहींसा झाला यावरून दिवसाच्या गतीचें मान मोजीत असतों—त्यांतलाच प्रकार रामकृष्णादि भगवदवतारांच्या व तत्तुल्य विभूतींच्या चरित्रांचा होय ! त्यांचें अजत्वें जन्मणें, अक्रियता कर्म करणें, व न मरतां मरणें हेंच त्यांचें खरें चरित्र होय ! तुकाराम महाराजांच्याच चरित्राचा विचार केला ह्मणजे तें लिहिण्याचें भलतेंच धाडस आपण अंगावर घेतलें आहे कीं काय असें वाटून मति कुंठित होते व विचारांचे कल्लोळ चित्तांत उठून लेखणी काम करण्याचें विसरते. महाराजांच्या चरित्रास प्रारंभ कोठून झाला तें समजत नाहीं व त्याची अखेर अद्याप झाली नसून तें केव्हां संपेल हेंही सांगतां येत नाहीं. " आह्मी वैकुंठवासी । आलों याच कारणासी ।"—कोणत्या कारणासी ? " पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंदें " हा त्यांच्या अवताराचा हेतु. " वाचा बोलूं वेदनीती । करूं संतीं केलें तें " हें त्याचें चरित्र. " तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप " असा देवाचा निरोप घेऊन भक्तीचा डांगोरा पिटण्यासाठीं, कळिकाळाला दरारा बसविण्यासाठीं, वेदनीतीचा मार्ग उजळण्यासाठीं जे आले म्हणजे सिद्धपणेंच जे अवतरले त्यांचें चरित्र सामान्य मुमुक्षुसाधकांच्या चरित्रासारखें क्रमानें सांगणें युक्त होईल काय ? दुष्काळ आला, स्त्रीपुत्र अन्नान्न करून मेलीं, जीवाला लज्जा व खंती वाटून वैराग्य आलें, भंडारा

गांठला, ग्रंथवाचनाचा व नामस्मरणाचा सपाटा चालविला, स्वप्नांत गुरूचा अनुग्रह झाला, कृतार्थ झाले, कवित्व करण्याची स्फूर्ति होऊन मुखावाटे अभंगगंगा लोटली, कीर्तनें केलीं, प्रयाण केलें—हेंच तुकोबांचें चरित्र आम्ही सांगणार ना ? या मार्गानें किती तरी जीव प्रत्यहीं चालले आहेत, मग तुकोबांची दिव्यस्फूर्ति त्यांमध्यें उत्पन्न कां होत नाहीं ? [दुष्काळ, अपमान, आपत्ति, स्त्रीपुत्रविरह या गोष्टींमुळें तुकोबांना वैराग्य प्राप्त झालें असें आम्ही चरित्रकार लिहिणार, पण हा आपत्तींचा धडा रोज गिरवणारे कोट्यवधि पामर दुनियेंत आहेत, मग तुकोबांच्या प्रखरतर वैराग्याचा लेशही त्यांच्यांत उत्पन्न होत नाहीं हें कां ? आपत्तीमुळें गांगरून जाऊन विहीर किंवा अफू जवळ करणारे व पैसा दुर्मिळ झाला तर तो मिळविण्यासाठीं जीवाचा आटापिटा करून शेंबडांतल्या माशीप्रमाणें त्यांतच आपल्या आयुष्याची इतिश्री करणारे प्राणी पुष्कळ आढळतात, पण आपत्तीवर खोगीर चढविणारे व धनाला गोमांस मानून तें तिरस्कारानें दूर लोटणारे तुकोबांसारखे गाढ वीर तशाच बिकट परिस्थितींत कसे निर्माण होतात ?] तेव्हां महात्म्यांच्या बाबतींत आमची कार्यकारणसंबंध लावण्याची युक्ति अयुक्त ठरते हेंच मानणें प्राप्त होतें. [तुकोबांसारखे संतवीर हे एका जन्मांत तयार होत नाहींत. ते अनेकजन्मसंसिद्ध असतात. तुकोबांनीं या देहूच्या परिसरांत जें पुण्यकार्य केलें तेंच मागील अनेक जन्मांत ते करीत आले असल्यानें त्यांच्या सहजसिद्ध तेजापुढें आपत्तींचे डोंगर विरघळून गेले. [आपत्तीमुळें त्यांना वैराग्य प्राप्त झालें हें म्हणणें योग्य नसून त्यांच्या जन्मसिद्ध अलोट भक्तिज्ञानवैराग्याच्या प्रचंड लोंढ्यापुढें आपत्तींचे वाळूंचे बंधारे ढांसळून गेले असेंच म्हटलें पाहिजे.]

मागें बहुतां जन्मीं हेंचि करित आलों आह्मी।
भवतापश्रमी दुःखें पीडिले निववूं त्या ॥ १ ॥
गर्जूं हरीचे पवाडे मिळवूं वैष्णव बागडे।
पाझर रोकडे काढूं पाषाणामध्यें ॥ २ ॥

आणि हेंच काम तुकोबा बहुत जन्म करीत आले यांत शंका नाहीं, नाहींतर तें त्यांच्याहातून इतकें सर्वोत्कृष्ट झालें नसतें. तुकोबांनींच एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं 'देवा! जेव्हां जेव्हां तुम्ही अवतार घेऊन आलेंत तेव्हां तेव्हां तुमच्याबरोबर भक्तिसुख भोगावयाला व जीवांना तें वाटावयाला मीही आलों आहें.' नृसिंहावतारीं प्रल्हाद, रामावतारीं अंगद, श्रीकृष्णावतारीं उद्धव, कलियुगांत आधीं नामदेव आणि नंतर तेच तुकोबा झाले असा वारकरी मंडळांत पूर्ण विश्वास आहे आणि मलाही हेंच खरें वाटतें. अनेक अवतारांत तुकोबांनीं पूर्वी जें भक्तांच्या डांगोरा पिटण्याचें कार्य केलें व जें ते यापुढेंही करितील तेंच कार्य त्यांनीं देहूच्या अवतारांत केलें. तुकोबांच्या सर्व अवतारांचें संपूर्ण कार्य कोणाला सांगतां येईल? त्यांच्या अनेक अवतारांचें एकवट चरित्र कोण वर्णूं शकेल? त्याला त्यांच्यासारखाच दिव्यदृष्टि महात्मा पाहिजे. महात्म्यांच्या मागच्यापुढच्या सर्व अवतारांचें मिळून जें कार्य तें ज्याच्या दिव्यदृष्टीला संपूर्ण दिसेल तोच त्यांच्या चरित्राचें यथार्थस्वरूप वर्णूं शकेल. अत्यंत सूक्ष्मबुद्धीच्या विचारवंतालाही चिरपरिचित स्नेह्याचेंही अंतर्गत मनोव्यापार नीट समजत नाहींत, त्याच्या स्वभावाचें, गुणदोषांचें व चरित्राचें कोडें उलगडतां येत नाहीं, त्याच्या उत्क्रांतीच्या इतिहासाचें गुंतोडें बरोबर उकलतां येत नाहीं, त्याच्यावर आलेल्या विविध प्रसंगांचें खरें स्वरूप समजत नाहीं—फार काय पण ज्याचें त्यालाही स्वतःचें खरें अंतरंग ओळखतां येत नाहीं—तेथें महात्म्यांच्या चरित्राचें रहस्य जाणणें

किती कठिण आहे हें काय सांगायला पाहिजे? महात्म्यांच्या चरित्राला हात घालणें हें खचितच आकाशाला गवसणी घालण्यासारखें अत्यंत धाडसाचें काम आहे. महात्म्यांचें चरित्र महात्म्यांनींच लिहावें. संत होऊनच संताला जाणावें. आपण अंगें संत झाल्याशिवाय संतचरित्राचें वर्म ठावें होत नाहीं. तुकोबांसारख्यांचें चरित्र तुकोबांसारख्यांनींच लिहावें, तथापि मी हें चरित्रलेखनाचें साहस करीत आहे. कालिदासानें ह्मटल्याप्रमाणें उंच मनुष्याच्या हातालाही प्रयासानें लागणारें वृक्षावरील फळ घेण्यासाठीं ठेंगण्या माणसानें हात वर करण्यासारखें उपहासास्पद हें होईल कीं काय अशी मला भीतिही वाटे, पण बाळाची फलग्रहणाची उत्कंठा पाहून सभोंवारचे संतसज्जन त्याला आधार देऊन फलग्रहणापुरतें तरी उंच उचलून धरितात, त्याप्रमाणें साधुसंतांच्या कृपाशीर्वादाच्या बळावरच मी हें काम हातीं घेतलें आहे. पार पाडणार तेच समर्थ आहेत. भक्तचरित्र भगवंताला प्रिय आहे. "तेही प्राणापरौते। आवडती हे निरुते। जे भक्तचरित्रातें। प्रशंसिती ॥ २२७॥ पैं प्रेमळांची वार्ता। जे अनुवादती पांडुसुता। ते मानूं परमदेवता। आपुली आम्ही ॥ २३८॥" (ज्ञाने० अ० १२) ह्या श्रीज्ञानेश्वरमाउलीच्या वचनाप्रमाणें हें पुण्यकार्य भगवंताच्या प्रीतीला पात्र होण्याचा सर्वोत्कृष्ट उपाय आहे अशी दृढश्रद्धा चित्तीं बाळगून श्रीपांडुरंगस्मरणपूर्वक मी ह्या वाग्यज्ञास प्रारंभ करितों.

२ श्रीतुकाराममहाराजांचा जन्म कोणत्या शकांत झाला, त्यांना गुरूपदेश कधीं झाला, त्यांचें प्रयाण केव्हां झालें, त्यांच्या आयुष्यांतल्या इतर महत्वाच्या गोष्टी कोणत्या क्रमानें झाल्या, व त्यांचा एकंदर आयुर्दाय किती वर्षांचा होता या गोष्टींची थोडीफार चर्चा आजवर झाली आहे, पण त्यांचा सर्व बाजूंनीं

पूर्ण विचार करून कोणीं निर्णय लावला नाहीं. असा कांहीं निर्णय लावतां येतो कीं काय हें आपण या प्रकरणांत पाहूं. परमार्थदृष्टीनें पाहतां कालगणनेचा विचार विशेष महत्वाचा आहे असें नाहीं, तथापि इतिहासदृष्टीनें तिचें महत्व अतिशय आहे. महात्म्यांच्या चरित्राचा विचार करितांना त्यांच्या अंगीं कोणकोणते उज्ज्वल गुण वसत होते, ते त्यांनीं कसे संपादन केले, परिस्थितीशीं झगडत ते महत्पदावर कसे आरूढ झाले, त्यांना वैराग्य कसें प्राप्त झालें, त्यांनीं आपला अभ्यासक्रम कसा ठरविला व विविध आपत्तींशीं टक्कर देत तो कसा पार पाडला, त्यांची ज्ञानभक्ति व ईश्वरनिष्ठा किती निश्चळ होती, देवानें त्यांचीं सांकडीं कशीं वारलीं, त्यांचा जगाला उपदेश काय होता इत्यादि गोष्टींचें विवेचन मुमुक्षु-साधकांना मुख्यतः पाहिजे असतें, आणि तें योग्यही आहे. संत-महात्म्यांचें चरित्र पाहून आपलें चरित्र सुधरावें, त्यांच्या निर्मल चारित्राचा शुद्ध आरसा आपल्या डोळ्यांपुढें सतत असावा, त्यांच्या भक्तिज्ञानवैराग्याचें चिंतन घडावें, त्यांचीं पावलें पाहतां पाहतां आपणही एकेक पाऊल पुढें टाकीत मुक्काम गांठावा अशी भगवत्कृपेनें ज्यांना शुभेच्छा उत्पन्न झाली आहे त्यांना कालगणनेची चर्चा अंमळ नीरस वाटली तर त्यांत मोठेंसें नवल नाहीं. तीव्रक्षुधा लागलेला मनुष्य आम्रवनांत शिरला तर तो प्रथम माळीदादा गांठील, त्याच्या हातांपायां पडून चार आंबे मिळवून आपली क्षुधा शमवील तेव्हांच त्याला चैन पडेल; ही बाग कोणाची, आंब्याचीं कलमें कोठून आणलीं, यांना बाजारभाव काय मिळतो इ० प्रश्न त्याला सुचणार नाहींत व क्षुधानिवृत्तीच्या दृष्टीनें या प्रश्नांना विशेष महत्वही नाहीं. खरी भूक लागलेला मनुष्य भूक शांत करण्याचे तेवढेच उपाय शोधील. आजूबाजूला पाह-

च्याचें त्याला कारण नाहीं. महाभक्त प्रल्हाद कोणत्या शतकांत, कोणत्या जातींत, कोणत्या प्रांतांत कधीं जन्मला व त्याचें आयुष्य किती वर्षांचें होतें, तसेंच भागवतग्रंथ व्यासांचा कां बोपदेवाचा व कोणत्या शतकांतला इ० प्रकारची चिकित्सा परमार्थाची तळमळ लागलेल्या मुमुक्षुभाविकाला निरर्थक वाटेल. प्रल्हादानें केवढ्या लोकोत्तर निष्ठेनें बापाचा छळ सोसून नारायणाची जोड केली या विचारांत तो गुंगून जाईल, 'किती वय ! कसें तप ! प्रखर काय विश्वास तो !' असें मनांत येऊन त्याला प्रल्हादाविषयीं सकौतुक प्रेम वाटेल आणि

'हांकेसरसी उडी । घालूनीयां स्तंभ फोडी ॥ १ ॥
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ २ ॥'

हें त्या कथेचें वर्म जिव्हारीं धरून तुकोबांप्रमाणें तो भगवत्प्रेमानंदांत तल्लीन होऊन जाईल. खऱ्या भाविकाचा मार्ग हा आहे; व आत्मश्रेयाचा उपाय हाच आहे यांत संशय नाहीं. तथापि अर्वाचीन पद्धतीला अनुसरून चरित्रग्रंथ लिहिणाराला कालगणनेची उपेक्षा करितां येत नाहीं. [इतिहासाच्या व समाजशास्त्राच्या दृष्टीनें कालनिर्णयाचा फार उपयोग आहे. कालनिर्णय हा इतिहासाचा डोळा आहे; कालनिर्णयावांचून इतिहास आंधळा आहे. कालनिर्णय बिनचूक झाला नाहीं तर कार्यकारणसंबंध नीट लक्ष्यांत येत नाहींत, कित्येक मिथ्याभ्रम समाजांत फैलावतात व मिथ्यासंबंध जोडले जातात.] या दृष्टीनें कालनिर्णयाचा प्रश्न बाजूला सारतां येत नाहीं. म्हणून कालनिर्णयाचा प्रश्न आपण ह्या पहिल्या प्रकरणांत सोडवून मग दुसऱ्या प्रकरणापासून तुकोबारायांच्या चरित्राकडे क्रमाक्रमानें वळूं.

२ आधीं मला हें सांगितलें पाहिजे कीं या प्रकरणांत तिथवार-

शकाचा मेळ मीं प्रसिद्ध ज्योतिर्विदांकडून मिळविला असून मगच हें प्रकरण लिहिलें आहे. पुणें येथील प्रसिद्ध ज्योतिषी रा. केतकर, रा. सा. खरे व ग्वाल्हेरचे प्रो. आपटे यांचें या कामीं साह्य झालें आहे, पण मुख्य उपकार लो. बळवंतरावजी टिळक यांचे आहेत. त्यांनीं आठ दिवसांत गणित करून मला पाहिजे असलेल्या शकमित्यांचा निर्णय एका लिखितावर करून देऊन तें माझ्या हवालीं केलें. तेव्हां या प्रकरणांतील ज्योतिर्गणित तयार करून दिल्याचें श्रेय त्यांचें आहे. याकामीं मनःपूर्वक साह्य केल्याबद्दल सदर ज्योतिर्विदांचें आभार मानून आपण आतां कालनिर्णयाकडे वळूं.

४ तुकोबांच्या जन्मशकाबद्दल निश्चित असें कांहीं एक प्रमाण उपलब्ध नाहीं; तथापि जीं अनुमानें आहेत त्यांत चार मतें आहेत. प्रयाणशकाबद्दलही तीन मतें आहेत. या सर्व मतांचें परीक्षण करून त्यांत ग्राह्य कोणतें हें ठरविण्याचा आपण प्रयत्न करूं. जन्मकाळ काय किंवा प्रयाणकाळ काय कोणताही ठरला तरी त्यांत कोणाचें कांहीं जात नाहीं. कालनिर्णयाचा विषय तरी आग्रहाचा नाहीं. गणितानेंच हा विषय निश्चित करण्याचा आहे. पण जेथें गणिताचें साह्य अपुरें पडतें तेथें तारतम्यबुद्धीचीही मदत घ्यावी लागते. जन्मकाळ आणि प्रयाणकाळ या दोहोंपैकीं एक खुंटा बळकट करून मग दुसरीकडचा खुंटा ठोकणें श्रेयस्कर होईल. आपण प्रयाणकाळ प्रथम निश्चित करण्याचा प्रयत्न करूं. याबद्दल तीन मतें आहेत ह्मणून वर सांगितलेंच आहे:—

( १ ) प्रयाणकाळाबद्दल सर्वांत जुना लेख उपलब्ध आहे तो तुकोबांचा लेखक संताजी जगनाडे—याच्या पुत्राचा—बाळाजी जगनाडे याच्या हातचा आहे. या उभयपितापुत्रांच्या हातच्या

अभंगांच्या वह्या तळेगांवीं आहेत. बाळाजीच्या हातच्या वहींत पृ० २१६ वर पुढील लेख आहे:—" श्रीनृप साळीवाहण सक १५७२ वीकुति नाम संवतसरे फळगुण वदि २ द्वीतीया वार सोमवार ते दीवसीं तुकोबा गोसांवी वैकुंठास गेले. स्वदेहीनसी गेले. " ह्या लेखावरून तुकोबांचा प्रयाणदिवस सोमवार शके १५७२ फाल्गुन वद्य २ हा दिसतो. श. १५७२

( २ ) देहू येथें देहूकरांच्या पूजेंत जी अभंगांची वही आहे तींत शेवटीं एका पानावर पुढील लेख आहे:—" सके १५७१ वीरोधीनाम संवछेर शीमगा वद्य द्वीतीया: वार सोमवार. ते दीवसीं: प्राथ:काळीं: तुकोबानीं: तीर्थास प्रयाण केलें: शुभ भवतु: मंगळ " हाच काळ महिमतबावानींही भक्तिलीलामृत अ० ४० मध्यें दिला आहे:—

शके पंधराशें एकाहात्तर जाण । विरोधी संवत्सर नामाभिधान ।
फाल्गुन वद्य द्वितीया दिन पूर्ण । आलासे दिन चार घटिका ॥१८३॥

जगनाडयांच्या वहींतल्या लेखानंतरचे हे दोन्ही लेख असून हेच बहुमान्य झालेले आहेत. श. १५७१

( ३ ) शके १५७० च्या फाल्गुन वद्य द्वितीयेला सोमवार येत असल्यामुळें १५७० साल पत्करावें असें राजवाडे म्हणतात. श. १५७०

५) ह्या तीनही लेखांत फाल्गुन वद्य द्वितीया ही तीथ दिली आहे ती सर्वस्वी प्रमाण आहे. देहूस आणि वारकरीमंडळांत तुकोबांच्या प्रयाणापासून ह्याच तिथीस दरसाल उत्सव होत असतो, तरी फाल्गुन वद्यांतली द्वितीया ही तीथ निश्चित समजावी. शकाविषयीं तीन मतें पडलीं आहेत, पण मौज ही कीं शके १५७०।१५७१।१५७२ ह्यांपैकीं कोणत्याही वर्षाच्या फाल्गुन वद्य द्वितीयेला सोमवार येत

नाहीं ! १५७१ च्या फाल्गुन वद्य २ ला सोमवार येत नाहीं म्हणून सोमवार कायम समजून राजवाड्यांनीं प्रयाणशक एक वर्ष मागें नेला आहे, पण १५७० च्या फाल्गुन व द्वितीयेलाही सोमवार येत नसून रविवार येतो. शक १५७० धरिला तर वद्य द्वितीयेला रविवार येतो, १५७१ धरिला तर शनिवार येतो व १५७२ धरिला तर गुरुवार येतो ! एवंच यापैकी कोण-त्याही वर्षी फाल्गुन वद्य २ ला सोमवार येत नाहीं. आतां १५७० पासून १५७२ पर्यंत केव्हां तरी तुकोबांचें प्रयाण झालें पाहिजे हें मान्य करावें लागतें. शिवाजी राजे यांचा जन्म शिवनेरीवर शके १५४९ च्या वैशाख शुद्ध २ ला झाला. दादाजी कोंडदे-वांच्या साह्यानें त्यांनीं स्वराज्यस्थापनेच्या कार्यास शके १५६५ चे सुमारास प्रारंभ केला. शिवरायाची मनोभूमि धार्मिक, जिजाई व दादाजी यांची शिकवण त्याच प्रकारची, साधुसंतांचा कृपाशी-र्वाद मिळाल्याशिवाय राजकारणांत यश नाहीं ही श्रद्धा त्यामुळे चिंचवडकर देव व देहुकर तुकोबाराय यांच्या दर्शनाचा योग-ही त्यास १५६५ नंतरच्या ५।६ वर्षांतच येऊन कीर्तनाचा छंद-ही लागला. पुण्यास दादाजी सुभेदार असतांना तेथील संन्याशाच्या सांगीवरून त्यांनीं तुकोबास पुण्यास बोलावलें व तुकोबांच्या वैराग्य-भक्तीची छाप पुण्यावर पडली इ० कथा महिपतबावांनीं सांगितली आहे. दादाजीचा मृत्यु शके १५६९।७० चे सुमारास झाला असला पाहिजे, निदान १५६८चे पूर्वी नाहीं—कारण त्या सालचा त्यांचा एक महजर प्रसिद्ध आहे. दादाजीनें तुकोबास पुण्यास बो-लावणें, व तुकोबांच्या कीर्तनास भुलून पुणेकरांनीं त्यांचा जयजयकार करणें, तुकोबांच्या पुष्कळ कथा शिवबांनीं ऐकणें इत्यादि प्रकार १५६६ ते १५७१ चे दरम्यानचे आहेत. शके १५७०।७१च्या

सुमारास तुकोबा, शिवबा व समर्थ यांच्या भेटी झाल्या असण्याचा पूर्ण संभव आहे. एकंदरीनें इतिहासाची दृष्टि लावून पाहिलें असतां शके १५७० ते १५७२ चे सुमारास तुकोबांचें प्रयाण झालें असलें पाहिजे. आतां या तीन शकांपैकीं कोणता शक निश्चित होण्यासारखा आहे हें ठरविण्यास आपण एका गोष्टीचा विचार करूं.

६. तुकोबांनीं जिजाईस 'पूर्णबोध' नांवाचा ११ अभंगांत उपदेश केला आहे. हे अभंग तुकोबांनीं प्रयाणापूर्वी ४।५ दिवसच आधीं केले असले पाहिजेत याबद्दल ते अभंग पाहिल्यावर कोणाचीही खात्री होईल. या अभंगांचा विचार पुढें 'तुकोबा व जिजाई' या प्रकरणांत होणार असल्यामुळें प्रस्तुत मुद्द्यापेक्षां येथें त्यांचा जास्त विचार करण्याचें कारण नाहीं. वैकुंठीं जाण्याचा टकळा लागल्या-वेळीं हे अभंग सांगितले आहेत. यांत तुकोबा जिजाईस ह्मणतात: " घरदार, गुरेंढोरें, मुलेंलेंकरें यांवरील ममत्व सोडून तूं आपला स्वतःचा गळा उगवून घे. ज्याचें त्याचें प्रारब्ध स्वतंत्र आहे, ह्मणून तूं यांच्या मोहांत पडून आत्मघात करून घेऊं नकोस. घरदार व भांडींकुंडीं सर्व ब्राम्हणांस दान देऊन एकदम मोकळी हो, ह्मणजे पहा, आपण बरोबरच वैकुंठास जाऊं. देव, ऋषि मुनि हे आपला उभयतांचा जयजयकार करितील." या वेळचा पुढील अभंग पहा:—

**अभंग.**

**आईक हें सुख होईल दोघांसी । सोहळा हे ऋषी करिती देव १**
**जाडित विमानें बैसविती मानें । गंधर्वाचें गाणें नामघोष ॥ ध्रु० ॥**
**संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्व सुखा पुरे कोड तेथें ॥ २ ॥**
**आलिंगूनी लोळों त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी मायबापें ॥३॥**
**तुका ह्मणे तयां सुखा वर्णू काय । जेव्हां बापमाय देखों डोळां ॥४॥**

ह्या अभंगावरून हे पूर्णबोधाचे अभंग तुकोबांनीं 'वैकुंठींचा

टकळा ' लागल्यावर केले आहेत असें उघड दिसतें. ' आह्मी वैकुंठीं जातों ' असें ते प्रयाणाच्या पूर्वीं कांहीं दिवस जिजाईस सांगत असत, पण तिला तें खरें वाटलें नाहीं. तथापि तुकोबांना ' ते देवऋषि, ' ' तीं जडितविमानें, ' ते ' वैकुंठींचे मायबाप ' डोळ्यांसमोर दिसूं लागल्यावरचे हे अभंग उघडच दिसतात. [वैकुंठाचा टकळा शुद्ध १० पासूनच लागला होता. शुद्ध १० स देव तुकोबाला भेटायला वैकुंठीहून आले. तेव्हां तुकोबांजवळ त्यांचा सत्कार करण्यास योग्य साहित्य नव्हतें.

" पाहुणे घरासी । आजी आले हृषीकेशी ॥ १ ॥
काय करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर ॥ ध्रु० ॥
दरदरीत पाण्या-। माजी रांधियेल्या कण्या ॥ २ ॥

हा अभंग तेव्हांचा आहे, तुकोबांनीं देवाला कण्या पाण्यांत रांधून जेवूं घातले, या गोष्टीचें स्मारक म्हणून फाल्गुन शुद्ध १० स दरसाल देवाला कण्याचा नैवेद्य दाखविण्याची वहिवाट अद्याप देहूस चालत आली असून फाल्गुन शुद्ध १० ला तेथें ' कण्याची दशमी ' म्हणतात !]

आणखीही एक विचार असा सुचतो कीं, [वैकुंठी जाण्याचा त्यांचा निर्धार झाल्यावरच आपल्या धर्मपत्नीला ' पूर्णबोध ' करून आपल्या कर्तव्यांतून मोकळे व्हावें ह्मणून त्यांनीं प्रयाणापूर्वीं हा अखेरचा बोध जिजाबाईस केला असला पाहिजे. उपदेश कोणत्या दिवशीं झाला तें पुढील अभंगावरून स्पष्ट होतें.]

## अभंग.

देव पहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत ॥ १ ॥

---

१ ही केवळ माझीच कल्पना आहे असें नाहीं. निळोबारायांच्या चरित्रांत 'मागें स्वर्गीं जातां वेळीं । तुकारामें स्त्री बोधिली । तिनें वचनें नाहीं आयकिलीं । मग राहिली मृत्युलोकीं ' ( अ० ३-१५६ ) असें ह्मटलें आहे.

दिनशुद्ध सोम सकाळीं पातला । द्वादशीं घडला पर्वकाळ ॥ ध्रु० ॥
द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन । देईं वो हें दान यथाविध ॥ २ ॥

ह्या अभंगांत तुकोबा म्हणतात: "सकाळीं द्वादशी पर्वकाळ लागला आहे, शुद्धपक्षांतला आज सोमवार आहे. तर या पर्वणीस मन घट्ट करून हें सर्व दान करून टाक!" ह्मणजे यावरून फाल्गुन शुद्ध १२स सोमवारीं—वैकुंठगमनाचा निर्धार झाल्यावर—तुकोबांनीं हा उपदेश जिजाबाईस केला हें उघड आहे. आतां फाल्गुन शुद्ध ११स रविवार, द्वादशीस सोमवार, त्रयोदशीस मंगळवार, चतुर्दशीस बुधवार, पौर्णिमेस गुरुवार, वद्य प्रतिपदेस शुक्रवार व वद्य २स शनिवार असा हा आठवडा तयार होतो, व पिले यांच्या कॅलेंडरवरून पाहतां बरोबर असाच निघतो. फाल्गुन शुद्ध १२स सोमवार होता हें तुकोबांच्याच अभंगावरून जर सिद्ध आहे व याच क्रमानें जंत्रीवरून पाहतां जर वद्य २ला शनिवार येतो तर शके १५७०।७१।७२ या तीन वर्षांपैकीं ज्या वर्षीं फाल्गुन वद्य २ला शनिवार येईल तेंच वर्ष तुकोबांच्या प्रयाणाचें मानलें पाहिजे हें उघड झालें. शके १५७२ च्या फाल्गुन वद्य द्वितीयेला गुरुवार येतो ह्मणून तें वर्ष त्याज्य. शके १५७० च्या फाल्गुन वद्य २ ला रविवार येतो ( शुद्ध १२ ला मंगळवार येऊन ) म्हणून तेंही त्याज्य. फक्त १५७१ च्या फाल्गुन वद्य २ ला शनिवार येतो म्हणून हें वर्ष ग्राह्य होय. शके १५७१ च्या फाल्गुन शुद्ध १२ ला सोमवार येऊन वद्य २ ला शनिवार येतो यासाठीं तुकोबांच्या प्रयाणाचें हेंच वर्ष मान्य केलें पाहिजे हें स्पष्ट झालें. वेगवेगळ्या जुन्या पांचपन्नास बाडांतून शके १५७१ मध्येंच तुकोबांचें प्रयाण झाल्याचें लिहिलें आहे. तात्पर्य

२ ह्या दिवशीं इंग्रजी तारीख ४ मार्च इ. स. १६५० ही येते, व तुकोबांच्या प्रयाणाची इंग्रजी तारीख ९ मार्च इ. स. १६५० ही ठरते.

केलें आहे त्यांवाचून दुसरा कोणाचाही कोठलाही आधार नाहीं व त्यांनींही आपल्या मतास कांहीं प्रमाण दिलें नाहीं, यामुळें या शकास ग्राह्य मानतां येत नाहीं. शक १५२० हा देहू व पंढरपूर येथील वंशावळींत दिला आहे, व या वंशावळी मीं पाहिल्या आहेत. त्या ५०।७५ वर्षांमागच्या नाहींत. त्यांना अधिक मागचा आधार असण्याचा संभव आहे पण तो उपलब्ध झाला नाहीं. या वंशावळींत ' माघ शुद्ध ५ गुरुवार ' ही जन्मतीथ दिली आहे, पण १५२० च्या माघ शुद्ध ५ ला गुरुवार ही जन्मतिथी येत नाहीं. देहू येथील तुकोबांचे वंशज रामभाऊ देहूकर यांजकडून तुकोबांचा ' जन्मकाळ १५२० माघ शुद्ध ५ गुरुवार ' हा नगरचे ' भारद्वाज ' यांस कळून त्यांनीं ( सुधारक २१ आगष्ट १९०५ ) याची चर्चा केली आहे. माघ शुद्ध० ५ स गुरुवार येत नाहीं हें त्यांस कळून आलें, पण ते लिहितात " जालनापूर प्रांतीं राहणारा एक वृद्ध वारकरी मला पैठणास भेटला व त्यानें माघ वद्य ५ शके १५२० हा तुकोबांचा जन्मकाल मला सांगितला. माझे मतें हाच बरोबर आहे. " पण भारद्वाज चुकले आहेत. माघ शुद्ध ५ स गुरुवार येत नाहीं व वद्य ५ सही गुरुवार येत नाहीं. शके १५२० च्या माघ शु० ५स रविवार येतो व माघ वद्य ५स सोमवार येतो ! दिवसाचा विचार सोडून नुस्ता शक १५२० मान्य करावा असें कोणी ह्मणेल तर तो विचार स्वतंत्र आहे. याप्रमाणें दोन्ही जन्मशकांचा विचार झाला. आतां राजवाडे यांनीं दिलेला शक १४९० हा स्वीकारतां येईल कीं काय याचा विचार करूं.

९ रा. वि. का. राजवाडे यांनीं तुकोबांचा जन्म शक १४९० त ठरविण्याचा प्रयत्न केला आहे (ग्रंथमाला, नं. ११६)व त्याला यांनीं तीन प्रमाणें दिलीं आहेत:—

(१) त्यांना वाईप्रांतीं करजखोप मुक्कामीं सांपडलेल्या वंशावळींत 'तुकोबांचा जन्म सके १४९०' असा दिलेला आहे.

(२) निबंधमालेच्या ६४ व्या अंकांत वामन विष्णु लेले यांनीं 'एका रुमालांत एक सांपडलेलें पत्र'[1] प्रसिद्ध केलें आहे, त्यांत तुकोबांच्या गुरूपदेशाबद्दल ५ अभंग कोणी महिपतीनामक पुरुषानें केलेले दिले आहेत. त्यांपैकीं ४ था अभंग असा आहे:—

**बाबाजीचैतन्य योगीराज धन्य। तुकयालागून प्रगटले ॥ १ ॥**
**शालिवाहन शके चौदाशें त्र्याणव। प्रजापतिनाम संवत्सरीं २**
**वैशाखवद्य द्वादशीचे दिनीं। समाधी स्वामींनीं घेतलीसे ॥ ३॥**
**तेथूनि तिस वर्षां भेटी तूकयासी! देऊनि तयासी पूर्णपण ॥४॥**
**महीपति ह्मणे झाले समाधिस्थ। तुकया क्रीडत ब्रह्मानंदें॥ ५ ॥**

ह्या अभंगांत बाबाजी चैतन्यांनीं शके १४९३ प्रजापति नाम संवत्सरीं वैशाख वद्य १२ स समाधि घेतली व तेथून पुढें ३० वर्षांनीं तुकोबांस अनुग्रह दिला असें म्हटलें आहे. प्रजापति संवत्सरापासून ३० वा संवत्सर शके १५२२ शार्वरी हा होय. पण 'माघ शुद्ध १० पाहोनि गुरुवार। केला अंगीकार तुका ह्मणे।' असें तुकोबांचें वचन असल्यामुळें गुरूपदेशाच्या संवत्सरांत माघ शुद्ध १० ला गुरुवार असलाच पाहिजे व तो तर शके १५२२ ला येत नाहीं, शके १५२० विलंबी संवत्संरांत मात्र माघ शुद्ध १० ला येतो असें जंत्रींत पाहून राजवाड्यांनीं ठरविलें कीं ह्याच सालाला अनुलक्षून महिपतीनें 'तिसवर्षां' असें लिहिलें आहे! "तीस

[1] हें पत्र 'वामन दाजी ओकांनीं' लिहिल्याचें राजवाडे वारंवार लिहितात, पण ती चूक आहे हें अंक ६४ वा पाहता कोणांसही समजेल. हा अंक माझ्यासमोर आहे!

ह्या शब्दाचा अर्थ पंचवीसतीस किंवा तीसपसतीस करणें येथें जरूर आहे. 'तीस वर्षांच्या सुमारास' ह्या अर्थानें 'तीस' हा शब्द महिपतीनें घातला आहे." एवंच राजवाड्यांच्या मतें 'बाबाजी चैतन्यानें तुकोबांस शक १५२० विलंब संवत्सर माघ शु. १० गुरुवारीं उपदेश दिला. तुकोबांचा जन्म शक १४९० व गुरूपदेशशक १५२० असें ठरवून मधले तुकोबांच्या चरित्रांतले २१ वर्षांपर्यंतचे प्रसंग महिपतबावांच्या ह्मणण्याप्रमाणेंच त्यांनीं घेतले आहेत. शके १५७१ च्या फाल्गुनांत तुकोबांचें प्रयाण झालें अर्थात् त्या समयीं त्यांचें वय ८१ वर्षांचें होतें. आतां वरील अभंगांत शके १४९३ मध्यें बाबाजी चैतन्यांची समाध असून ३० वर्षां तुकोबांस अनुग्रह होता हें खरें मानल्यास तुकोबांचें वय त्यासमयीं २५।३० वर्षांचें असलें पाहिजे हें उघड आहे, ह्मणजे त्याचा जन्म शके १४९० किंवा त्या सुमारासच मानला पाहिजे.

( ३ ) 'जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी' या तुकोबांच्या ।भंगावरून 'तुकाराम मरणसमयीं जरूर ह्मातारा झाला होता.'

( ४ ) याशिवाय राजवाड्यांनीं न दिलेलें पण क्वचित् त्यांच्या र्फे पुढें आणतां येण्यासारखें एक चवथें प्रमाण मीच देतों. तुको-बांचे शिष्यांपैकीं शिवबा कासार हे लोहगावीं राहत असून त्यांनीं तेथें एक विहीर बांधलेली आहे व त्या विहिरीवर शके १५३४ मध्यें कोरलेला एक शिलालेख आहे. लोहगांवच्या या शिलाले-खाचें संशोधन मींच केलें असून त्यावर एक लेख 'भारतइति-हाससंशोधकमंडळा' पुढें मीं शके १८३७ मध्यें वाचला होता. सदर लेखांत तुकोबांचें लोहगांव कोणतें याबद्दलच्या राजवाड्यांच्या निराधार कल्पनेचें सप्रमाण खंडण केलें असून वर उल्लेखिलेला शिलालेखही मी मंडळास सादर केला होता. 'शिवबा कासार

यानें जर शके १५३४ मध्यें सदर विहीर बांधली तर त्याचे गुरु तुकोबा यांचा जन्म तत्पूर्वीच झाला असला पाहिजे, शिवबा-कासाराच्या विहिरावरील शिलालेखावरून तुकोबांचा जन्म शके १४९० मध्यें झाला असावा असें ह्मणण्यास बळकटी येते.

१० आतां राजवाड्यांचा शके १४९० हा कबूल करितां येतो कीं काय तें आपण क्रमशः पाहूं.

( १ ) राजवाड्यांस वाईप्रांतीं सांपडलेली वंशाजवळ प्रमाण मानल्यास त्या वंशावळींत चूक कां सांपडावी हें समजत नाहीं. महिपतबोवा व देहुकरांची वंशावळ हे दोघेही एकमतानें सांगतात कीं विश्वंभरबावाच्या दोन मुलांपैकी हरि हा वडील व मुकुंद हा धाकटा होता, पण वाईच्या वंशावळींत मुकुंद वडील व हरि धाकटा असें ह्मटलें आहे. शिवाय वाईच्या वंशावळींत तुकोबांच्या आजाचें नांव रंगनाथ व पणजाचें नांव सोमाजी दिलें आहे, पण महिपतबावा व देहूकरांची वंशावळ हे तुकोबांच्या आजाचें नांव कान्हया व पणजाचें नाव शंकरबोवा असें देतात.हे दोन भेद सूक्ष्मपणानें पाहतां लक्ष्यांत येतात. येथें हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजें कीं वाईप्रांतीं कोणातरी वारकऱ्याच्या पोथींत सांपडलेल्या वंशावळीपेक्षां तुकोबांचे सच्छिष्य व शोधक महिपतबावा व तुकोबांचे वंशज यांच्याच वचनाला या बाबतींत मान देणें उचित आहे. अर्थात् ज्या वाईच्या वंशावळींत अशा चुका सांपडतात त्या वंशावळींत दिलेला तुकोबांचा जन्म शक १४९०हा तरी किती विश्वसनीय मानावा याबद्दल शंका येते.

---

१ भक्तलीलामृत अ. २५ पहा. 'दोघे पुत्र असती जाण। हरी मुकुंद नामाभिधान' ( १२९ ); 'धाकट्या मुकुंदाची राणी। सहगमनीं निघाली।' ( १९९ ) 'अमाईची ज्येष्ठ सून। ते गरोदर होती पूर्ण' ( २०१ ) इत्यादि बावांच्या उद्गारांवरून हरि हा वडिल पुत्र व मुकुंद हा धाकटा पुत्र असें स्पष्ट होतें.

( २ ) निबंधमालेच्या ६४व्या अंकांतील लेल्यांच्या पत्रांतील अभंगांपैकीं ४था गुरूपदेशाचा जो अभंग राजवाड्यांनीं घेतला आहे तो कोणाचा—कोणत्या महिपतीचा—याचा त्यांनीं नीट विचार केला नाहीं. हे पांचही अभंग कोणा तरी महिपतीचे आहेत, व संतचरित्रकार महिपतबावांचे नाहींत असें ह्मणण्यास त्या अभंगांतच दोन प्रमाणें आहेत. ( रा ) तुकोबांस गुरूपदेश झाला तो देहूसच झाला असें महिपतबावांनीं दोन्ही ठिकाणीं स्पष्ट म्हटलें आहे. ‘ इंद्रायणीचे स्नानास जात । तंव काय करी पंढरीनाथ ।’ ( भक्तविजय अ० ५२–२३९ ) व ‘ इंद्रायणीस करून स्नान । देउळासी जात वैष्णवजन ।’ ( भक्तलीलामृत अ० ३३–१५७ ) अशा समयीं ह्मणजे देहूसच तुकोबांस गुरूपदेश झाल्याचें महिपतबावांनीं स्पष्ट लिहिलें आहे. पण वरील अभंगांत ‘ ओतुरासी आला स्वामीपाशीं । समाधी वंदोनी वंदी तये स्थानीं ।’ असें ह्मटलें आहे ह्मणजे ह्या अभंगांचा कर्ता जो महिपती त्याचें ह्मणणें आहे कीं तुकोबांस ओतुरास उपदेश झाला. ( म ) वारकरीसंप्रदायाप्रमाणें राघवचैतन्य, केशवचैतन्य व बाबाजीचैतन्य ही तुकोबांची गुरुपरंपरेची त्रयी आहे. त्याला अनुसरूनच बाबांनीं हे तीन वेगवेगळे पुरुष होते, असें स्पष्ट म्हटलें आहे. याचा विशेष विचार अन्यत्र होणार आहे. या अभंगांत मात्र केशवचैतन्य व बाबाजी चैतन्य हे एकच होत असें म्हटलें आहे. ह्या दोन्ही प्रमाणांवरून हें स्पष्ट होतें कीं ताहराबादकर महिपतबावांचे हे अभंग खास नाहींत. भक्तविजय व भक्तलीलामृत ह्या ग्रंथांत महिपतबावा जे आपल्या गुरुविषयीं बोलतात त्याच्या अगदीं उलट ते अभंगांत उद्गार खास काढणार नाहींत. यावरून निबंधमालेंतले पांच अभंग महिपतबावा ताहराबादकरांचे नसून दुसऱ्या कोणा तरी महिपतीचे

आहेत हें सिद्ध झालें, अर्थात् त्या अभंगांचे व त्यांतून राजवाड्यांनीं उद्धृत केलेल्या चवथ्या अभंगाचें महत्त्वही कमी झालें. तो कोणाचा तरी उद्गार आहे एवढीच बाकी राहिली. वाईची वंशावळ व महिपतीचा अभंग ह्या ज्या दोन मुख्य आधारांवर राजवाड्यांनीं तुकोबांच्या ८१ वर्षांच्या आयुष्याची इमारत उभारली, ते आधार याप्रमाणें कच्चे ठरल्यावर आतां आणखी प्रमाणांचा विचार करूं.

एवढ्या दोन प्रमाणांनींही शक १४९० हा मानतां येत नाहीं, तथापि आणखी प्रमाणें पाहूं:—

(३) जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी ।
मृत्याचिये भेटी जवळी आली ॥ १ ॥
आतां माझ्या मना होईं सावधान ।
पुण्याची जाण कार्यसिद्धी ॥ ध्रु० ॥
शेवटील घडी बुडतां नलगे वेळ ।
साधाया तो काळ जवळी आला ॥ २ ॥
तुका ह्मणे चिंती कुळींची देवता ।
वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ३ ॥

असा तुकोबांचा एक अभंग आहे. ‘ ह्या अभंगावरून तुकाराम मृत्युकालीं वयोवृद्ध झाला होता हें स्पष्ट आहे ’ असें राजवाडे ह्मणतात, पण मला तसें वाटत नाहीं. ‘ जरा कर्णमूळीं गोष्टी सांगों आली ’ हा एक जुना भाषणप्रकार आहे. कानाजवळचे केस पांढरे होऊं लागले ह्मणजे कृतांताच्या आगमनाचें पहिलें निशाण फडकलें असें ह्मणण्याची रीत आहे. ३८व्या वर्षापासून ६० वर्षाच्या वयापर्यंत प्रत्येकाच्या प्रकृतिमानाप्रमाणें व गृहस्थितीप्रमाणें लवकरउशीरा केस पांढरे होऊं लागतात. तुकोबांच्या शरीराची १८ वर्षांच्या पुढें आबाळच झाली ह्मणून ४०च्या सुमारास वरीलसारखा

उद्गार त्यांच्या तोंडून निघणें स्वाभाविक आहे. शिवाय 'सांगों आली गोष्टी' ह्यावरून हा जरेचा ह्म० केश पांढरे होण्याचा आरंभच दिसतो. ऐशीच्या घरांत गेलेल्या मनुष्याचें पुंड बहुतेक पांढरें होऊन जातें व त्या वयांत 'सांगों आली गोष्टी' असा आरंभसूचक शब्दप्रयोग होण्याचें कारण नाहीं. आतां 'जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी' हा जरावस्थेच्या आरंभाचा सूचक असा जुना भाषणप्रकार कसा आहे तें सांगतों. कथासरित्सागरांतील द्वितीय लम्बक, द्वितीय तरंग, श्लोक २१६वा पहा.

अथ तस्य जरा प्रशान्तिदूतीमुपयाता क्षितिपस्य कर्णमूलम्।
सहसैव विलोक्य जातकोपा बत दूरे विषयस्पृहा बभूव ॥

पुढील सुभाषित तर ह्या संबंधानें प्रसिद्धच आहे:—

कृतान्तस्य दूती जरा कर्णमूले समागत्य वक्तीति लोकाः श्रुणुध्वम्।
परस्त्रीपरद्रव्यवांछां त्यजध्वं भजध्वं रमानाथपादारविंदम् ॥

संस्कृत वाङ्मयांतून आणखीही अशीं पुष्कळ अवतरणें देतां येण्यासारखीं आहेत. शिवाय तुकोबा प्रयाणसमयीं जर राजवाड्यांच्या ह्मणण्याप्रमाणें जरव ह्मातारे असते तर वृद्धत्वसूचक असे आणखीही उल्लेख त्यांच्या अभंगांत सांपडले असते व ते राजवाडे यांनीं दिलेही असते. पण ते त्यांनीं दिले नाहींत आणि खरोखरी तसे सांपडतच नाहींत.

( ४ ) आतां शिवबा कासाराच्या विहिरीवर १५३४ हा शक दिलेला आहे त्यावरून तुकोबांचा जन्मशक याच्या मागें बराच नेला पाहिजे असें कोणी ह्मणेल तर तेंही मान्य करितां येत नाहीं. तुकोबांची कृपा झाल्यावर शिवबा कासारानें ती विहीर त्यांचे आज्ञेवरून बांधली असें महिपतबावांनीं ( भक्तलीलामृत अ० ३६ ) ह्मटलें आहे, पण बावांनीं हें केवळ लोकप्रवादावरून लिहिलें असलें

पाहिजे. विहिरीवरील शिलालेखांत ' शीऊजी ' असें नांव आहे खरें, पण हा शीऊजी म्हणजे तुकोबांचा शिष्य शिवबा, कां त्यांचा आजा कां दुसरा कोणी याचा निश्चयानें उलगडा करण्यास साधन नाहीं. मात्र एवढें निश्चित ह्मणतां येतें कीं तुकोबांचा शिष्य व टाळकरी शिवबा कासार यानें तुकोबांच्या आज्ञेवरून ही विहीर जर बांधली असती तर त्या शिलालेखांत श्रीगणेश व श्रीकालिका यांना प्रथम जें नमन केलें आहे त्याऐवजीं किंवा त्याच्या मागेंपुढें ' श्रीपांडुरंगाय नमः ' ' श्रीरुक्मिणीविठ्ठलाभ्यां नमः ' असेंही नमन खास असतें ! तुकोबांचा शिष्य व वारकरी झाल्यावर तो गणेश व कालिका यांचें मात्र स्मरण करील व विठोबारखुमाई ' यांना विसरेल हें शक्यच नाहीं. यावरून ही विहीर बांधणारा शिवबा एकतर तुकोबांचा शिष्य शिवबा कासार नाहीं अगर तोच असला तरी विहीर बांधण्याच्या वेळीं तो तुकोबांचा शिष्य तरी खास नव्हता. ज्या शिवबानें विहीर बांधली तोच पुढें कित्येक वर्षांनीं तुकोबांचा शिष्य झाला असें ह्मणणें असेल तर तुकोबांचा जो जन्मशक १५३० पुढें ठरत आहे त्या शकाशीं या शिलालेखाच्या शकाचा विरोध न येतां विहीर बाधल्यावर कित्येक वर्षांनीं म्ह० शके १५६०च्या आंतबाहेर उपदेशकाळीं तो बराच वृद्ध म्हणजे ६०।६५ वर्षांचा होता असें फार तर ठरेल. एवंच लोहगांवच्या कासारविहिरीवरच्या शकाचें शके १४९० ह्या शकाला आनुकूल्यही मिळत नाहीं व शक १५३० ह्या शकाला त्याचा विरोधही येत नाहीं.

( ५ ) तुकोबांची आयुर्मर्यादा ८१ वर्षांची होती असें मानायला एक मोठी अडचण त्यांच्या प्रयाणसमयीं त्यांची स्त्री जिजाबाई ही गरोदर होती ही होय. तुकोबांचीं दोन्ही लग्नें त्यांचे आईबाप अस-

तांना झालीं होतीं व आईबाप त्यांच्या वयाच्या सतराव्या वर्षीं वारले असें महिपतबावांनीं स्पष्ट ह्मटलेंच आहे. राजवाड्यांनींही त्यांचें पहिलें लग्न त्यांच्या वयाच्या बाराव्या वर्षी व दुसरें चवदाव्या वर्षी झालें हें कबूल केलें आहे. अर्थात् तुकोबांची दुसरी बायको जिजाबाई त्यांच्यापेक्षां फार तर ५।६ वर्षांनीं धाकटी असली पाहिजे म्हणजे तुकोबांचें प्रयाणकाळीं ८१ वर्षांचें वय होतें तर जिजाबाईचें वय ७५।७६ वर्षांचें होतें असें मानावें लागतें. राजवाड्यांचा जन्मकाल खरा मानला तर बाळपणीं लग्न होऊन यथाकाल मुलें झालेलीं, ८१ वर्षांच्या ह्मातान्या नवऱ्याची ७५ वर्षांची बायको इतक्या उतारवयांत गरोदर राहिली असें मानणें प्राप्त होतें, पण ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे हें कोणाही व्यवहारज्ञ मनुष्यास कबूल करावें लागेल. राजवाड्यांच्या लेखावर मागेंच आक्षेप निघाले होते व त्यास त्यांनीं पुन्हां उत्तर देऊन ( ग्रंथमाला अंक १२५ ) आपलेंच म्हणणें चालविलें. एवढ्या उतारवयांतही मूल होतें असें प्रतिपादतांना त्यांनीं निजामउल्मुल्ख, जर्मन तत्त्ववेत्ता गेटी, व गुरुचरित्रांतील वांझेला वृद्धपणीं मूल झाल्याची कथा अशीं तीन उदाहरणें दिलीं आहेत !

( १ ) ह्यापैकीं निजामुल्मुलुखाला निजामअली हा मुलगा ८० व्या वर्षी झाला म्हणून म्हटलें आहे, पण निजामअलीची आई ही त्याची कितवी बायको होती, किती वर्षांची होती व राजकीय पुरुषांच्या जन्मकथांतही प्रसंगविशेषीं किती भानगडीही असतात, याचा त्यांनीं नीट विचार केला नाहीं. या प्रसंगीं निजामउल्मुलुखासारख्यांचीं उदाहरणें महात्म्यांच्या चरित्रांत देणेंही प्रशस्त नाहीं.

( २ ) दुसरें उदाहरण गेटीचें. पण गेटी हा ६० वर्षेंपर्यंत

ब्रह्मचारी असून पुढें त्यानें लग्न केलें व त्याच्या वयाच्या मानानें पुष्कळच तरुण अशा युवतीशीं केलें यामुळें तेंही उदाहरण येथें लागूं पडत नाहीं. शिवाय शीतकटिबंधांत जन्मलेल्या व वाढलेल्या मनुष्याचें प्रमाण उष्णकटिबंधांत जन्मलेल्या व वाढलेल्या मनुष्यास लावणें उचित होणार नाहीं.

( ३ ) तिसरें उदाहरण गुरुचरित्रांतील स्त्रीचें. राजवाडे म्हणतात कीं "प्रसिद्ध गुरुचरित्र ह्या ग्रंथांत विटाळ जाऊन पांचपंचवीस वर्षें लोटलेल्या एका वृद्धस्त्रीला संतति झाल्याचें लिहिलें आहे. ही बाई प्रसूतिसमयीं ७०।७५ वर्षांची असावी." आतां ज्या बाईच्या कथेचा येथें उल्लेख केला आहे ती बाई म्हणजे गुरुचरित्राच्या ३९ व्या अध्यायांतील सोमनाथाची कांता गंगा ही होय. पण ह्या बाईला ६० व्या वर्षी श्रीगुरुकृपेनें संतति झाल्याचे स्पष्ट उल्लेख असून राजवाड्यांनीं तिला स्वमताच्या आग्रहानें बळेंच ७०।७५ वर्षांची बनविली आहे !! गुरुचरित्राच्या ५३ व्या उपसंहाराध्यायांत

**'सोमनाथाची गंगा युवती । साठवर्षांची वंध्या होती ।**
**तीस दिधली पुत्रसंतती । एकुणचाळिसावे अध्यायीं ॥५७॥**

असें म्हटलें असून ३९ व्या अध्यायाचा आरंभही 'सिद्ध म्हणे नामधारका । पुढें अपूर्व वर्तलें ऐका । साठीं वर्षीं वांझेसी एका । कन्यापुत्र झालीं परियेसा ॥' असाच केला आहे व पुढें कथेंतही ६० वर्षांचा उल्लेख वारंवार केला आहे. दुसरें ही गंगाबाई वांझ असून पुत्रमुखदर्शनाची तिची लालसा अपार वाढली होती व जिजाईला तारुण्योद्गमापासूनच मुलेंबाळें व्हायला लागलीं असून तिला 'नको हीं मुलेंबाळें व नको हा संसार' असें आर्वीच होऊन गेलें होतें ! तिसरें गंगाबाई ही वांझ स्त्री असून तिचे मुला-

बाळांसाठीं नवससायास झाले, ती देवाची पुत्रप्राप्तीसाठीं प्रार्थना करीत असे व श्रीगुरूंनीं आपल्या सिद्धिबळानें अपूर्वचमत्कार घडवून आणून तिला साठाव्या वर्षीं संतति दिली तसा कांहीं प्रकार जिजाईच्या गोष्टींत नाहीं. ७५ वर्षांची संसाराला वैतागलेली जिजाबाई मुलासाठीं देवाला आळवीत नव्हती व नारायणबोवांच्या जन्मकथेंत असा कांहीं चमत्कार असता तर तो आजपर्यंत कोणीतरी कौतुकानें वर्णिला असता; पण तसें कोठेंच वर्णन नसून तुकोबांच्या प्रयाणसमयीं जिजाई गरोदर असणें हा स्वाभाविक क्रमापैकींच एक भाग आहे असेंच सर्वत्र दिसतें. अर्थात् तुकोबांचें प्रयाणकाळीं वयही ८१ वर्षांचें नव्हतें व जिजाईचा तेव्हां विटाळही गेला नव्हता ! चवथें, वयाच्या विसाव्या वर्षींच वैराग्य पावलेले तुकोबा ८१ व्या वर्षीही ग्राम्यधर्मरत असतील अशी कल्पनाही करवत नाहीं. 'शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् । वार्धके मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम् ॥' ( रघुवंशसर्ग १–८ ) हा साधारण वर्णाश्रमधर्माचा नियम तुकोबांनीं झुगारून दिला असें कोणीही समंजस मनुष्य म्हणेल असें मला वाटत नाहीं. विषयव्यावृत्तात्मा कोणीही धर्मशील हिंदु ५०-५५ वर्षांच्या पुढें प्राय: ग्राम्यधर्मनिरत होत नाहीं अशी प्राचीन परंपरा आहे; मग 'धर्मरक्षावयासाठीं । करणें आटी आह्मांसी । वाचा बोलूं वेदनीती । करूं संतीं केलें तें ॥' असें आपल्या अवताराचें प्रयोजन सांगणारे तुकोबा ८१ वर्षांच्या वयांतही प्राकृत पामरांच्या मार्गानें जात होते असें मानावयास बिलकूल मन धजत नाहीं.

११ राजवाड्यांचा जन्मकाल अग्राह्य धरण्यास वर जें प्रमाणपंचक दिलें आहे त्यावरून कोणाही समंजस मनुष्याची खात्री होईल असें वाटतें. आतां राहतां राहिला शक १५३०. हा प्रमाण

माननयास ऐतिहासिक पुरावा व परंपरा या दोहींचीही मदत आहे. महिपतबावांनीं ' पूर्वार्ध संपलें ' असें म्हटलें आहे तें वाच्यार्थानेंही खरें आहे असें मानावयास एक ऐतिहासिक आधारही आहे. तुकोबांचें ४१।४२ वर्षांचेंच आयुष्य धरलें म्हणजे त्यांचा जन्म शके १५३० हा धरावा लागतो. ' एकविसाव्यांत विपरीतकाळ ' पातला व महाघोर दुष्काळांत त्यांची पहिली स्त्री अन्नान्न करीत मेली हें महिपतबावांनीं सांगितलेंच आहे. अर्थात् तुकोबांच्या २१ व्या वर्षीं म्हणजे शके १५५१ त पुणेंप्रांतीं फार भयंकार दुष्काळ पडला असला पाहिजे, आणि शक १५५१।५२ त म्हणजे इ० स० १६२९–३० त पुणें प्रांतींच काय पण संपूर्ण महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडल्याचा इतिहासांत सुरेख दाखलाही आहे ! अबदूल हमीर लाहोरी नामक एका मुसलमान इतिहासकारानें शहाजहान बादशहाच्या कारकीर्दीपैकीं पहिल्या २० वर्षांचा एक इतिहास लिहिला आहे. त्याचें नांव ' बादशहानामा ' असें आहे. हा लाहोरी इ. स. १६५४ मध्यें मेला, अर्थात् हा तुकोबांचा समकालीनच होता. तो म्हणतोः—" मागील ( इ. स. १६२९ ) सालीं बालाघाटाकडे पाऊस पडला नाहीं आणि दौलताबादनगरच्या बाजूस तर पावसानें मुळीच टाळा दिला. ह्यासालीं ( इ. स. १६३० ) सभोंवारच्या प्रांतांत धान्याची कमतरता झाली आणि दक्षिण प्रांतांत व गुजराथेंत तर हाहाकार उडाला. येथील रहिवाश्यांच्या दुर्दैवाची शिकस्त झाली. एका भाकरीच्या तुकड्यासाठीं जनावरें व मुलेंही लोक विकूं लागले, पण गिऱ्हाईकच मिळेना ! दान देऊन देऊन उदार बनलेला हात एका तुकड्यासाठीं याचना करूं लागला ! मृतांचीं हाडें कुटून पिठांत लोक घालूं लागले. दुष्काळ शेवटीं इतक्या शिगेला पोंचला कीं माणसें माण-

सांना खाऊं लागलीं, इतकेंच काय, पण पुत्रप्रेम विसरून लोक आपल्याच मुलांना खाऊं लागले! जिकडे तिकडे प्रेतांच्या राशि पडल्या. ज्या जमीनी सुपीकपणाविषयीं प्रसिद्ध होत्या त्या जमीनींत दाणा उगवला नाहीं. पावसाचा थेंब नाहीं व धान्याचा कण नाहीं अशी स्थिती भोंवतालच्याही अनेक प्रांतांची झाली....” (इलिअट अँड डाउसन. भाग ७ पृ. २४० ). ह्याचाच उल्लेख एल्फिन्स्टनचा इतिहास ( पृष्ठ ५०७ ) व पूना गॅझेटिअर ( भाग ३ पृ. ४०३ ) यांतही केलेला आहे. पुणें प्रांतीं शके १५५१।५२ मध्यें असा भयानक दुष्काळ पडल्याचा उल्लेख याप्रमाणें तुकारामांच्याच एका समकालीन इतिहासकारानें केलेला आहे. शके १५५१ चा पावसाळा पावसावांचून गेल्यामुळें हिवाळ्यांत व उन्हाळ्यांत दुष्काळ बराच जाणवला, तथापि पूर्वीचें थोडेंबहुत धान्य असल्यामुळें तें साल लोकांनीं रडतकढत कसेंबसें काढलें. पण १५५२ चा पावसाळा आला व पावसावांचून गेला तेव्हां मात्र लोकांचें धाबें दणाणलें व माणसानें माणसास खाण्याची वेळ आली व हजारो माणसें अन्नपाण्यावांचून तडफडून मेलीं, ही गोष्ट मुसलमान इतिहासकारानें सांगितली असलेली वर दिलीच आहे. पण ह्या १५-५१।५२ च्या दुष्काळाला आपल्याकडेही एक प्रमाण सांपडलें आहे. रा. राजवाडे यांचा ‘मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें—खंड १५’ हा ‘शिवकालीन पत्रव्यवहार’ या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील लेखांक ४१३।४१४ व ४१९ हे तीन लेखांक पहा: ‘मौजे निगुरडे किले मजकूर’ येथील मोकदम (पाटील) यांनीं शके १५५२ च्या अश्विनांत चावर ३१ मौजे मजकुरची निमे मोकदमी एकून ४५ होन दुसऱ्यास विकतांना झटलें आहे कीं ‘आफत ( आफत, आपत्ती ) व फितरती (फितुरी?)

नाली याकीरतां उपवासी मरो लागलों भोई पडिलों घरबूड हों लागली ' यास्तव ' आपण तुह्मांस निमी मोकदमी आपले खुसीनें दिधली. लेंकरांचे लेकरी मिरासी करून दिधली आहे. ' हा पंचा-समक्ष जो महजर ( ठराव ) झाला त्याची पुनरुक्ति पुन्हां शके १५५३ च्या आषाढांत वेगळ्या लेखांत केली आहे. त्यांत ह्मटलें आहे, ' आपण दुकाळाकरितां बहुत भोईस पडलों खावयास कांहीं नाहीं दुकाळ मोठा काहार पडिला याकरितां आपणास कोणी वाणी वेव्हारा नव्हे मग आपले बुद्धीनें आपली मोकादिमी मौजे मजकुरीची निमे पैकीं तकिसीम निमे तुह्मांस किमती होन २२॥ साडेबाविसांस तुह्मांस विकत दिधली आहे. " पुन्हां शक १५५५ च्या अश्विनांत ' आपल्यानें लावणी नव्हे दुकाळ थोर कारबार अवस खावया अन्न नाहीं बैलढोर नाहीं आपण बहुत भोई पडिलों सुजों लागलों ' इ० उल्लेख करून बाकीची विकली आहे. असो. त्या व्यवहाराशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. शके १५५२ त दुष्काळानें महाराष्ट्रांत केवढा कहार मांडिला होता तें दाखविण्यासाठीं या गोष्टीचा येथें उल्लेख केला आहे.[1]—

१ महिपतबावांनींही या दुष्काळाबद्दल ' पर्जन्य निःशेष गेला, ' ' चाऱ्यावीण बैल गेले, ' ' झाली धारण शेराची, ' ' महादुष्काळीं अन्नावीण । प्राणी उदंड पावले मरण ' असेच उद्गार काढले आहेत. बाबांचें हें वर्णन ऐकीवच असलें पाहिजे. श्रीसमर्थ रामदासस्वामीही या दुष्काळाचे वेळीं २१।२२ वर्षांचे होते. त्यांच्या तीर्थयात्रेचा व परिभ्रमणाचा काळ याच सुमारास आला होता. त्यांचें वर्णनही लाहोरीप्रमाणेंच यथादृष्ट आहे ते ह्मणतातः—

पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ।
येणें करितां बहुतांला । संकट आलें ॥ २८ ॥
लोकें स्थानभ्रष्ट झालीं । कित्येक तेथेंचि मेलीं ।
उरलीं तें मराया आलीं । गांवावरी ॥ २९ ॥

१२ तुकोबांच्या प्रयाणानंतर त्यांचे धाकटे बंधु कान्होबा यांनीं शोकपर असे १८ अभंग केले आहेत. ते पाहिले म्हणजे तुकोबा प्रयाणसमयीं ८१ वर्षांचे होते असें वाटत नाहीं. तुकोबांचें प्रयाण ८१ व्या वर्षीं झालें असतें तर तो देहत्यागाचा योग्य समयच होता व हें कान्होबांच्याही लक्षांत येऊन त्यांच्या शोकाचा आवेग पुष्कळच कमी झाला असता. पण ह्या कान्होबांच्या शोकपर अभंगांत इतका करुणरस भरला आहे कीं तो पाहून तुकोबा अकालीं अनपेक्षित रीतीनें सर्वांना चटका लावून गेले असाच वाचकांच्या मनावर परिणाम होतो. कान्होबा तुकोबांच्या पाठचेच होते, त्यांच्याहून फार तर २।४ वर्षांनीं लहान होते. तुकोबांना प्रथम वैराग्य झालें तेव्हां ते त्यांच्यांशीं भांडून विभक्त झाले होते. ही तुकोबांच्या पंचविशींतली गोष्ट. पुढें कान्होबांना तुकोबांची योग्यता कळून आली तेव्हां त्यांना पश्चात्ताप होऊन ते त्यांचे शिष्य झाले. तुकोबांचें प्रयाणसमयीं ८१ वर्षांचें वय असतें तर ' सख्यत्वासी गेलों करीत सलगी, ' ' कष्टविलासी म्यां चांडाळें संसारीं ' असले अनुतापाचे उद्गार—शिष्यत्वाचें नातें ४०।५० वर्षें पाळून पूर्वकर्म धुवून टाकल्यानंतर—इतक्या आवेशानें आले नसते. शिवाय तुकोबांचें यथाकाल प्रयाण झालें असतें तर कान्होबांच्या

---

माणसा खावया अन्न नाहीं । आंथरुण पांघरुण तेंही नाहीं ।
घर कराया सामग्री नाहीं । काये करीती ॥ ३१ ॥
पुढें आला प्रजन्य काळ । धान्य महर्ग दुष्काळ ।
शाकार नाहीं भळभळ । रिचवे पाणी ॥ ३२ ॥

तात्पर्य ' सदा दुश्चित अवघे जन । उद्वेगरूपी, ' ' अद्यापि दुश्चिन्हें दिसती ' कित्येक जातिभ्रष्ट झाले, कित्येक विष घेऊन मेले, कित्येक पाण्यांत बुडाले, ' जाळिलीं ना पुरिलीं किति एक. ' दुष्काळ व परचक्र एकाच वेळीं आलेले दिसतात. ( रामदास आणि रामदासी वर्ष १ अंक १० )

'नेलें माझें पांघरूण;' 'माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लाविलीं काहार । तारातीर करूनि ॥;' 'हे कां भक्तीचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर,' या उद्गारांत मग स्वारस्यही राहिलें नसतें ! यावरून वार्धक्य सुरू होण्याच्या पूर्वींच तुकोबांचें प्रयाण झालें असें ठरतें. शिवाय कान्होबांच्या या उद्गारांत 'आक्रंदती बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी फुटों पाहे ॥' असाही एक उद्गार आहे. तुकोबांचें ८१ व्या वर्षीं प्रयाण झालें असतें तर त्यांचीं मुलेंबाळें चांगलीं कोणी ४० कोणी ५० कोणी ५५ इतक्या वयांचीं असतीं, व एवढाले मुलगे घरांत असतांना कान्होबांचे 'लेंकरें बाळें दारोदार' 'आक्रंदती बाळें करुणावचनीं' हे उद्गार पुष्कळसे निरर्थक ठरले असते. कान्होबांच्या सर्व उद्गारांवरून तुकोबांचीं व कान्होबांचीं मुलेंबाळें पंधराविशीच्या आंतबाहेर असलीं पाहिजेत असें स्पष्ट दिसतें. आणखी कान्होबांच्या वाणींतला करुणरस तुकोबांच्या संसाराचा रंग उडाला होता असें दर्शवित नाहींत. वियोगाला योग्य अशा कालाची छाया पडली नसतांना वियोग झाला तरच करुणरस शोभतो किंबहुना स्फुरतो हें रसिकांस कांहीं सांगावयास नको. हे अभंगही 'प्रक्षिप्त' आहेत असें म्हणायचीही सोय नाहीं, कारण ते संताजी जगनाडे यांच्या अस्सल वहीवरून रा. भावे यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'अस्सल गाथा, भाग १' या पुस्तकांतही आहेत, (विशेषतः अभंग १५० ते १६० पहा ).

१३ वरील सर्व प्रमाणांवरून तुकोबांचें आयुष्य ८१ वर्षांचें होतें असें मानतां येत नाहीं, अर्थात् त्यांचा जन्मशक १४९० इतका मागें नेतां येत नाहीं हें मला वाटतें सर्वांस कबूल व्हावें. जन्मशक १५३० हा कबूल केल्यानें सर्व चरित्राची सांखळी

बरोबर जुळतें. २१ त्या वर्षीं पूर्वार्ध संपलें हें बावांचें म्हणणें वाच्यार्थ व लक्ष्यार्थ ह्या दोन्ही प्रकारांनीं खरें ठरतें, जिजाई प्रयाणसमयीं गरोदर होत्या या म्हणण्यांत विसंगतपणा रहात नाहीं ( कारण मग त्या प्रयाणसमयीं ३६।३७ वर्षांच्या अर्थात् पुत्रोत्पादनसमर्थ अशा वयाच्याच ठरतात ), 'एकविसाव्यांत विपरीतकाल पातला' या बावांच्या म्हणण्याप्रमाणें शके १५५१ मधला महाभयानक दुष्काळाचा वणवा दक्षिणभर पेटल्याची इतिहासाची साक्ष पूर्ण पटते, कान्होबांच्या शोकाची सार्थता प्रतीतीस येते व अशा प्रकारें जन्मशक १५३० हा कबूल करण्यास पूर्वपरंपरेचेंही पाठबळ मिळतें. निळोबारायांच्या चरित्रकारांनीं ४२ वर्षांचेंच चरित्र दिल्यानें त्यास १५३० हाच जन्म शक पटल्याचें स्पष्ट आहे. परशुरामपंततात्या गोडबोले यांनीं नवनीताची पहिली आवृत्ति शके १७७६ मध्यें प्रसिद्ध केली. त्या आवृत्तींत तात्या म्हणतातः— " तुकाराम ४० वर्षांच्या वयांत हा लोक सोडून परलोकास गेला असें म्हणतात. ' सरकारच्या मदतीनें छापलेल्या इंदुप्रकाश गाथेला जोडून जें तुकोबांचें अल्पचरित्र जोडलें आहे त्यांतही म्हटलें आहे कीं ' शके १५३० ह्या सालीं देहु मुक्कामीं तुकोबांचें जन्म झालें. तुकारामाचें वय गुप्त होण्याच्या वेळीं ४२ वर्षांचें होतें असें सर्व संतमंडळांत व तुकारामाच्या वंशजांत सर्वत्र प्रसिद्ध आहे.' ह्याप्रमाणें सर्व प्रमाणें पाहतां तुकोबांचा जन्मशक १५३० हाच निश्चित ठरतो व ज्योतिषाचीही हा जन्मशक मुक्रर करून तुकोबांच्या चरित्रांतील अन्य प्रसंगांची व्यवस्था लावण्यास पूर्ण अनुकूलता आहे. तस्मात् तुकोबांचा जन्मशक १५३० हाच होय असा निर्बाध निर्णय सर्वांना मान्य होईल अशी मला उमेद आहे.

१४ आतां तुकोबांच्या गुरूपदेशाचें वर्ष कोणतें होतें तें पाहूं.

जन्मशक १५३० ठरल्यामुळें १५५१।५२ तल्या दुष्काळांत तुकोबांची बायको अन्नान्न करून मेल्यावर त्यांना वैराग्य उत्पन्न झालें हें उघडच झालें. तेव्हां गुरूपदेशाचा काल शके १५५२ नंतरच असला पाहिजे. तसेंच तो शक १५५८ च्या पूर्वींच येतो असें मानण्यास एक आधार आहे. तुकोबांची अनुग्रहीत बहिणाबाई यांचा जन्म शके १५५० हा आहे. त्यांचा समाधिकाल 'धन्य शत शोषडवरी द्वाविंशत्काळीं । धन्य अश्विन शुद्धप्रतिपदा बुधमेळीं । ( बहिणाबाईंचा गाथा, भाग १ पृ० १८३ ) म्हणजे शके १६२२ अश्विन शुद्ध १ बुधवार हा आहे. त्यावेळीं त्यांचें वय ७२ वर्षांचें होतें असें त्याच निर्याणाच्या अभंगांत सांगतात. 'बाहात्तर वरुषें आयुष्यमर्यादा । आजि झालीं सिद्धासनीं पूर्ण । ' ( सदर पृ० १७७ ) अर्थातच त्यांचा जन्म शके १५५० मध्यें झाला हें उघड आहे. बहिणाबाईंना ११।१२ वर्षांच्या वयांत तुकोबांनीं स्वप्नांत अनुग्रह दिला. 'कोणी एके वेळे अकराव्या वरुषांत ' ( पृ० ६ ) बहिणाबाई पतीसमवेत कोल्हापुरीं असतांना जयरामस्वामींच्या कथा ऐकत असतां व तुकोबांची कीर्ति कानांवर जाऊन त्यांना तुकोबांचा वेध लागला असतां 'कार्तिकांत वद्य पंचमी रविवार । स्वप्नीचा विचार गुरुकृपा ॥" (पृ० १३)कार्तिक वद्य ५ स रविवारीं तुकोबांनीं 'स्वप्नामाजीं पूर्ण कृपा केली । ' आतां शके १५६२ मध्यें कार्तिक वद्य ५ ला रविवार येतो तेव्हां बहिणाबाईच्या स्वप्नानुग्रहाचा काल शके १५६२ कार्तिक वद्य ५ रविवार हाच ठरतो. ह्यावेळीं 'तेरा दिवस ज्यानें वह्या उदकांत । घालुनिया सत्य वांचविल्या ॥ ' ही गोष्ट कोल्हापुरापर्यंत वायुवेगानें पसरली होती. ह्यानंतर बहिणाबाई पती व मातापितर यांसह साक्षात् देहूस आल्या. त्या देहूस आल्यावर तेथें मंबाजीबोवांच्या घरीं

त्यांचा मुक्काम कांहीं काळ होता. ' सोमवारीं आहे अमावास्या पुढें । रहा भक्तिकोडें सुख घ्यावें ' असें सांगून त्यानें राहवून घेतलें. ' सोमवारीं अमावास्या ' हा योग १५६२ च्या फाल्गुनांत आहे, १५६३ च्या कार्तिकांत आहे, १५६४ च्या श्रावणांतही आहे. ह्या कोणत्याही सालीं त्या देहूस गेल्या असण्याचा संभव आहे, तथापि त्यांतल्यात्यांत १५६२ च्या कार्तिक वद्य ५ रविवारीं त्यांना तुकोबांचा स्वप्नानुग्रह होऊन त्या त्याच सालच्या फाल्गुनांतच गुरुदर्शनोत्कंटेनें देहूस जाण्याचा ज्यास्त संभव आहे. तेथें गेल्यावर मंबाजीबोवानें त्यांचा छळ केला पण त्या छळांत ' रामेश्वर भट आर्त योग्य थोर । तेही नमस्कार त्यासा करिती ॥ " अशी मंबाजीची तक्रार आहे. मंबाजी म्हणतो कीं ' रामेश्वरभट अतियोग्य व थोर आहेत पण तेही तुकोबांच्याच भजनीं लागले आहेत ? ' अर्थात् ह्या दोन्ही उल्लेखांवरून शके १५-६२ च्या पूर्वींच रामेश्वरभटानें तुकोबांच्या वह्या बुडवणें व देवानें त्या तारणें या गोष्टीची प्रसिद्धि झाली होती हें निष्पन्न झालें. आतां ' यातिशूद्र वैश्य केला वेवसाय ' ह्या आत्मचरित्रपर अभंगांत तुकोबांनीं आपल्या चरित्रांतील गोष्टींचा जो क्रम दिला आहे तो गुरूपदेशानंतर कवित्वस्फूर्ती व कांहीं कविता झाल्यानंतर वह्या बुडविल्याचा प्रसंग असा आहे. बहिणाबाईच्या कानावर कोल्हापुरीं वह्या बुडविल्याची गोष्ट शके १५६२ च्या कार्तिकापूर्वींच गेली होती. ती गोष्ट नुक्तीच घडून आली असेल किंवा १।२ वर्षांपूर्वीं घडली असेल. शक १५६० च्या सुमारास वह्या तरल्याची गोष्ट घडून आली असें साधारणतः समजण्यास हरकत नाहीं. तुकोबांना कवित्वस्फूर्ति होऊन ते अभंग करूं लागल्यास दोन तीन वर्षे शके १५६० मध्यें झालीं असावींत. ते कीर्तनांत

स्वरचित अभंग म्हणत असल्याचा व त्यांत वेदार्थ उमटत असल्याचा बोभाटा रामेश्वरभटाच्या कानीं जाऊन विरोधी पक्ष छळ करूं लागल्याचा जर शक १५६० धरावयाचा तर १५५७।८ त तुकोबांस कवित्वस्फूर्ति झाली व तत्पूर्वी पण शक १५५२ नंतर कोणत्यातरी माघ शुद्ध १० ला गुरुवार असलेल्या सालांत तुकोबांस गुरूपदेश झाला असें मानायला पाहिजे. जंत्रींत पहातां शके १५५४ त माघ शुद्ध १० ला गुरुवार येतो. ह्मणजे शके १५५४ तल्या माघ शुद्ध १० ला गुरुवारीं पांहटे भंडाऱ्यावर तुकोबांस स्वप्नांत गुरूपदेश झाला असावा असें सिद्ध होतें. त्या दिवशीं इंग्रजी तारीख १० जानेवारी इ. स. १६३३ ही होती.

१५ गुरूपदेशानंतर तुकोबांना कवित्वस्फूर्ति झाली. 'याति शूद्र वैश्य केला वेवसाय' हा तुकोबांचा आत्मचरित्रपर अभंग पुढें एका प्रकरणांत येणार आहे. त्यांत तुकोबांनीं आपल्या चरित्रांतल्या महत्त्वाच्या गोष्टी क्रमानें सांगितल्या आहेत. आधीं प्रपंचव्यवसाय केला, धंद्यांत बूड आली, दुष्काळांत एक स्त्री अन्नावांचून मेली, वैराग्य उत्पन्न झालें, देवळाचा जीर्णोद्धार केला, ग्रंथाध्ययन केलें, यानंतर स्वप्नांत गुरूपदेश झाला व त्यापुढें कवित्वस्फूर्ती झाली असें तुकोबांनीं स्वतःच सांगितलें आहे:—

**मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश। धरिला विश्वास दृढ नामीं॥१४॥**
**यावरीया जाली कवित्वाची स्फूर्ति। पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५ ॥**

गुरूपदेश शके १५५४ च्या माघांत झाला, आणि 'यावरी या झाली कवित्वाची स्फूर्ति! कवित्वस्फूर्ति शके १५५६ त झाली असें मानिलें तर तुकोबांच्या मुखांतून कवित्वाची गंगा सुमारें १५ वर्षें सतत वाहात होती असें उघड होतें. या पंधरा वर्षांत तुको-

बांच्या तोंडून हजारो अभंग बाहेर पडले. ते सर्व अर्थातच उप- लब्ध नाहींत. तुकोबांना कवित्वस्फूर्ति झाल्यावर त्यांनीं प्रथम बाल- क्रीडेच्या ओव्या रचिल्या व स्वतः बालबोधींत वहीवर लिहिल्या असें महिपतबावांनीं भक्तिलीलामृतांत अ. ३२ मध्यें ( ओवी ५०।५१ ) म्हटलें आहे. व्यासांनीं वेदशास्त्रांचें मथित काढून श्रीभागवत लिहिलें त्यांत 'दशम स्कंधांत हरिलीलामृत ' आहे व त्यांत 'गोकुळीं क्रीडत जगदात्मा ' हा श्रीकृष्णाच्या गोकुळांतील बाळक्रीडेचा प्रसंग आहे—

**ते बाळक्रीडा तुकयानें आपुले मती । प्रथमारंभीं लिहिली ग्रंथीं ।**
**नऊशें ओव्या त्याच्या असती । स्वानुभवें जाणती संतसाधु॥५१॥**

बालक्रीडेच्या ९०० ओव्या तुकोबानीं प्रथमारंभीं लिहिल्या असें बावांचें जें ह्मणणें आहे तें बरोबर आहे. सर्व गाथ्यांतून ह्या ओव्या बालक्रीडेचे अभंग ह्या सदराखालींच छापल्या आहेत. त्यांना ओव्याही ह्मणतां येईल व अभंगही ह्मणतां येईल. अभंग म्हणतां येईल याचें कारण कांहीं कांहीं चरणांनंतर 'तुका ह्मणे ' असें म्हणून तेवढा तुकडाच पाडिला आहे. हे अभंग आहेत असें म्हटलें तरी यांत अभंगाचे चरण ३ पासून ३० पर्यंत लहानमोठे आहेत. बरें रचना पाहतां ओवी थाटाची असून अभंगांचें जें वैशि- ष्ट्य कीं द्वितीय चरणांत ध्रुवपद असायचें ते यांत नसून वर्णन ओवीबद्ध ग्रंथासारखें आद्यंत आहे म्हणून या प्रकरणास ओवीबद्ध म्हणण्यासही हरकत दिसत नाहीं. हे बालक्रीडेचे अभंग १०० असून चरण मोजले तरी ४।५ कमी ९०० इतके भरतात, तेव्हां हे बालक्रीडेचे अभंग १०० आहेत असें म्हणा किंवा ओव्या सुमारें ९०० आहेत ह्मणा, अर्थ एकच आहे. देहूपंढरीच्या गाथ्यां- तून हें बालक्रीडेचें प्रकरण प्रथम दिलें आहे व त्याच्या मागोमाग

' पांडुरंगा करूं प्रथम नमन ' हे २३१ ओव्यांचे तीन अभंग दिले आहेत. इंदुप्रकाश गाथ्यांत हे तीन अभंग प्रथम दिले असून नंतर बालक्रीडेचें प्रकरण दिलें आहे. हे तीन अभंग व बालक्रीडेचे शंभर अभंग मिळून सुमारें ११२५ ओवीचे चरण होतात व कांहीं गाथ्यांतून ह्या ओव्यांची संख्या एकत्र दिली आहे ती ११००। ११२५ इतकीच आहे. हा बाहेरचा विचार झाला. आतां सर्व ११०० ओव्या बारकाईनें पाहिल्या ह्मणजे २३१ ओव्या प्रास्ताविक असून त्या बालक्रीडा--प्रकरणाचीच प्रस्तावना आहे व हें सर्व प्रकरण तुकोबांचें प्रथम लिखित आहे असें दिसतें. तुकोबांचें उपास्य पांडुरंग म्ह. बालकृष्ण, तेव्हां आपल्या उपास्याचें चरित्र[1] प्रथमारंभीं त्यांनीं लिहावें हें स्वाभाविकच आहे. शिवाय त्यांत मंगलाचरणादि प्रकार पाहिले. आपण प्रथमच कवित्व करीत आहोंत असें तुकोबांच्या मनांत होतें असें वाचकांसही वाटतें. वर्ष दोनवर्षांमागेंच गुरूपदेश झाला असल्यामुळें त्यांत साहजिक गुरुवंदनही आलें आहे.

पांडुरंगा करूं प्रथम नमना। दुसरें चरणा संतांचिया ॥ १ ॥
यांच्या कृपादानें कथेचा विस्तारू। बाबाजी सद्गुरुदास तुका २
काय माझी वाणी मानेल संतांसी। रंजवूं चित्तासी आपुलिया ॥३॥
॥ मनासी लागो हरिनामाचा छंद। आवडी गोविंद गावयासी ४

* * * *

गाईन ओविया पंढरीचा देव। आमुचा तो जीव पांडुरंग ॥ १ ॥
लागलें हें चित्त माझें तया पाईं। ह्मणोनियां घेईं हाचि लाहो ॥२॥

* * * *

---

१ ' दीन आणि दुर्बळासी ह्या अभंगांत ' चरित्र तें उच्चारावें। केलें देवें गोकुळीं ॥ ' असा एक चरण आहे.

कृपाळु हा देव अनाथा कोंवसा । आह्मीं त्याच्या आशा लागलोंसें

*　　*　　*　　*

माझी वाणी तुझे वर्णी गुणनाम । ऐसें देई प्रेम कांहीं कळा ॥ १ ॥

असो. ह्या बालक्रीडेच्या ओव्यांनंतर कांहीं काळानें काल्याचे अभंग, व विटीदांडू, चेंडू वगैरे झाले असावे. बाकीच्या एकंदर अभंगांचा कालक्रम ठरविणें कठिण आहे तथापि साधारण दिशा आपणांस दाखवितां येईल. बालक्रीडेनंतर आत्मपरीक्षणाचे अभंग, दर्शनोत्कंठेचे अभंग, लडिवाळपणाच्या सलगीचे अभंग, धन्यतेचे व पूर्णत्वाचे अभंग व उपदेशपर अभंग असा कांहींसा क्रम आपण ह्या पंधरा वर्षांत झालेल्या अभंगांचा बांधला तर तो फार चुकीचा होईल असें वाटत नाहीं. बालक्रीडेचे अभंग तुकोबांनीं स्वहस्तें लिहिले. नंतर कीर्तनप्रसंगानें टाळकरी व श्रोते जसजसे जमूं लागले व त्यांत गंगारामबोवा मवाळ व संताजी जगनाडे हे लेखक मिळाले तेव्हांपासून बहुधा तुकोबांनीं स्वतः लिहिण्याचें सोडून दिलें असावें. या लेखकांनीं तरी महाराजांच्या तोंडून अभंगगंगेचा लोट अखंड वाहूं लागल्यावर जे अभंग निघाले ते सगळेच लिहिले असतील हें शक्य नाहीं. एकदा देहूस एका वृद्ध वारकऱ्याचे तोंडून मीं ऐकलें कीं महाराजांनीं एक लक्ष अभंग भंडाऱ्यावर ठेवले, एक लक्ष अभंग इंद्रायणीला दिले व एक लक्ष लोकांना दिले. याचा अर्थ मी एवढाच समजतों कीं भंडारा डोंगरावर महाराज विठ्ठलध्यानांत व नामस्मरणांत रंगले असतांना लक्ष ह्मणजे असंख्य अभंग देवाला उद्देशून बोलून गेले. ते अर्थातच तेव्हां एकांतात असल्यामुळें देवाशिवाय कोणाला ऐकायला मिळाले नाहींत व तुकोबांनींही आनंदानुभवमग्नतेमुळें टिपून ठेवले नाहींत. इंद्रायणीच्या डोहावरही एकांतांत असेंच होत असे. कीर्तनप्रसंगीं किंवा प्रसंगविशेषानें जे

अभंग त्यांच्या तोंडून निघाले त्यांपैकीं कांहीं—सुमारें साडेचार हजार—अभंग लेखकांना लिहून घ्यायला सांपडले. महाराजांच्या हृदयांत जें स्वानंदाचें कोठार भरलें होतें त्यांपैकीं फार थोडा भाग तुमच्याआमच्या वांट्याला आला आहे. देवाचा-त्यांचा जो एकांत होई त्या वेळची बहार सगळी देवांनीं लुटली व चार दाणे आपल्या भागाला सुदैवानें आले आहेत! ह्या चार दाण्यांवरून मूळ कोठाराची कल्पना ज्याला करितां येईल त्यानें करावी! तुकोबांच्या मुखानें जी अखंड भक्तिज्ञानगंगा सतत १५ वर्षे वाहिली त्यांतून चार घागरी ज्या उदार आत्म्यांच्या कृपेनें आपणांस मिळाल्या आहेत त्यांचे उपकार मानावे तेवढे थोडेच आहेत. ‘ तुका ह्मणे आतां। उरलों उपकारापुरता किंवा ‘ आपण जेवूनि जेववी लोकां। संतर्पण करी तुका ’ या न्यायानें महाराजांनीं स्वतः तृप्त होऊन जीं चार उच्छिष्टाचीं शितें आपल्यांला दिलीं आहेत त्यांच्या परिमळानेंही आपल्या ठिकाणीं वेळोवेळीं कृतार्थतेच्या ऊर्मी उठतात, मग साक्षात् ज्यांना महाराजांच्या हातानें पंधरावीस वर्षे जेवायला मिळालें त्या गंगारामसंताजीरामेश्वरभटादि पुण्यशीलांचें भाग्य काय वानावें? साक्षात् महाराजांचें योगैश्वर्य तर अवर्णनीयच खरें, परमात्म्याचें संपूर्ण ऐश्वर्य त्यांच्या ठिकाणीं प्रगट झालें. कर्मी, ज्ञानी, योगी, भक्त—‘तुका ह्मणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय! ’ ते सर्व होते. ‘ तुका झाला पांडुरंग’ हेंच खरें. असो. त्यांच्या अभंगांतही सर्व रंग भरले आहेत, ज्यानें त्यानें आपल्या ऐपतीप्रमाणें त्या त्या रंगांत दंग होऊन जावें!

१६ वरील सर्व विवेचनावरून तुकोबांच्या आयुष्यक्रमाचा नकाशा तयार होतो तो असा:—

वर्ष शक १५२० तुकोबारायांचा जन्म.

१३ शक १५४३ तुकोबांच्या गळ्यांत बापानें संसार घातला.

१४-१६ शक १५४४-४६ च्या सुमारास तुकोबांचें पहिलें व दुसरें लग्न.

१७ शक १५४७ तुकोबांचे आईबाप व वडील भावजय वारली.

१८ शक १५४८ तुकोबांचा वडील भाऊ सावजी विरक्त होऊन गेला.

२० शक १५५० मनाचें औदासीन्य आवरून तुकोबांनीं पहिला पुत्र संताजी व उभय स्त्रिया यांसह संसार नेटका करण्याची हांव धरिली.

२१ शक १५५१ विपरीत काळ येऊन दिवाळें निघालें. दुष्काळाचा प्रारंभ.

२२ शक १५५२ दुष्काळाचें भयानक स्वरूप. पहिली बायको दुष्काळांत अन्नान्न करून मेली. मुलगा मेला. वैराग्य उत्पन्न होऊन भामनाथ गांठला.

२३ शक १५५३ विठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार, कीर्तनश्रवणाचा सपाटा.

२४ शक १५५४ माघ शुद्ध १० गुरुवार गुरूपदेश.

२६ शक १५५६।५७ सुमार कवित्वस्फूर्ति.

३० शक १५६० सुमार रामेश्वरभटाचा छळ व सगुणसाक्षात्कार.

४१ शक १५७१ फाल्गुन वद्य २ शनिवार सूर्योदयानंतर ४ घटका दिवसास प्रयाण.



# प्रकरण दुसरें.

# पूर्वपीठिका.

माझ्या वडिलांची मिरासी गा देवा ।
तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥ १ ॥
उपवास-पारणीं राखिला दारवंटा ।
केला भोगवटा[1] आह्मांलागीं ॥ ध्रु० ॥
वंशपरंपरा दास मी अंकित ।
तुका मोकालितां लाज कोणा ॥ २ ॥

१ श्रीक्षेत्र देहू. २ तुकोबांची जातकुळी. ३ त्यांच्या घराण्याची प्रतिष्ठा. ४ वंशपरंपरेची पांडुरंगभक्ति. ५ आठवे पूर्वज विश्वंभरबावा. ६ त्यांचे पुत्र हरि आणि मुकुंद. ७ पुढील विस्तार. ८ तुकोबांची वंशावळ.

१ श्री तुकाराम महाराजांच्या सहवासानें पावन व विश्वविख्यात झालेलें देहू हें क्षेत्र पुणेप्रांतांत इंद्रायणीनदीच्या तीरावर वसलेलें एक लहानसें खेडें आहे. हें आळंदीपासून पांच कोश, तळेगांवापासून चार कोस व चिंचवडहून तीनचार कोस दूर आहे. हें पुण्याच्या वायव्येस, तळेगांवच्या पूर्वेस, चिंचवडच्या उत्तरेस व आळंदीच्याही वायव्येसच आहे. देहूच्या सभोवार थोड्याशा अंतरावर लहान मोठे अनेक डोंगर आहेत. सांप्रतच्या भाषेंत बोलावयाचें ह्मणजे हें शेलारवाडी स्टेशनच्या उत्तरेस तीन मैलांवर आहे. असें हें लहानसें खेडें आहे, पण ह्या खेड्याचें नशीब उचकटल्या-

---

१ जी मिळकत अविभाज्य असते ती थोरल्या मुलाकडे राहून तिचा भोगवटा मात्र इतरांनीं घ्यावयाचा असतो.

मुळें तेथें तुकोबांचा अवतार झाला. तुकोबांच्या वेळीं हें नामघोषानें दुमदुमून गेलें होतें व त्या पुण्याईनें हें पुढें लवकरच महाराष्ट्रांतील महाक्षेत्रांच्या मालिकेंत जाऊन बसलें. महाराष्ट्रांतील क्षेत्रराज पंढरपूर होय. तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरमहाराजांमुळें आळंदीचें माहात्म्य वाढलें, सोळाव्यांत नाथांमुळें पैठण सर्वत्र गाजलें व सतराव्यांत तुकोबांमुळें देहू तसेंच प्रसिद्धीस आलें. देहूस तुकोबांच्या पूर्वींपासून चार दोन लहान मंदिरें होतीं व त्यांचे आठवे पूर्वज विश्वंभरबोवा यांनीं तेथें श्रीविठ्ठलरखुमाईचें मंदिर बांधल्यापासून व त्यांच्या घराण्यांत पंढरीची वारी विशेष रूढ झाल्यापासून देहूला क्षेत्रपण आलें होतें, पण तुकोबांमुळें देहूची अत्यंत प्रसिद्धि व लोकप्रियता वाढली व आज तें महाराष्ट्रांतील महाक्षेत्रांपैकीं एक प्रमुख क्षेत्र गणलें जात आहे यांत शंका नाहीं. देहू क्षेत्रावर तुकोबांचा एक अभंग प्रसिद्ध आहे. हा सर्व गाथ्यांत आहेच, पण हा संताजीच्या वहींतही असल्यामुळें याच्या प्रामाण्याविषयीं मुळींच शंका नाहीं. तुकोबांच्या वेळच्या देहूचें यांत वर्णन आलें आहे:—

### अभंग.

धन्य देहू गांव पुण्यभूमी ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥
धन्य क्षेत्रवासी लोक दईवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ ध्रु ॥
कर कटीं उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते माता रखुमाई ॥२॥
गरुडपारीं उभा जोडूनीयां कर । अश्वत्थ समोर उत्तरमुख ॥३॥
दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ४ ॥
लक्ष्मी नारायण बल्लाळाचें वन । तेथ अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ५ ॥
विघ्नराज द्वारीं भैरव बाहेरी । हनुमंत शेजारी साहित दोघे ॥६॥
दास तुका तेथें करितो कीर्तन । हृदईं चरण विठोबाचे ॥ ७ ॥

देहू येथें सांप्रत जें श्रीविठ्ठलमंदिर, व त्याच्या भोंवतालच्या

ओवऱ्या व प्राकार बांधलेले दिसतात ते अर्थात् मागाहून बांधलेले आहेत. विठ्ठलरखुमाईच्या मूर्ति विश्वंभरबुवांनीं स्थापन केलेल्याच आहेत. तुकोबांच्या वेळीं मंदिर मोडकळीस आलें होतें त्याचा त्यांनीं जीर्णोद्धार केला, तथापि त्यांच्या परिस्थितीच्या मानानें मंदिर दगडमातीनें बांधलेलें साधारण स्थितींतच असलें पाहिजे. तुकोबांचे पुत्र नारायणबुवा यांना तीन गांवें इनाम मिळून इनामदारीचा थाट सुरू झाल्यावर व तुकोबांची कीर्ति सर्वत्र पसरल्यावरच मंदिराची विस्तृत उठावणी झाली व देहूचे इंगळे पाटील वगैरे धनिक भाविकांनीं ओवऱ्या वगैरे बांधून मंदिर आजच्या भव्य स्थितीस आणलें आहे. तथापि तुकोबांनीं वरील अभंगांत वर्णन केलेला प्रकार आजही जशाचा तसाच देहूस स्पष्ट दिसतो. पंढरीस श्रीविठ्ठल विटेवर उभे राहिलेले एकटेच आहेत. तेथें रखुमाईचें मंदिर मागाहून झालेलें दिसतें. देहूस विठ्ठलरखुमाई शेजारींशेजारीं उभे आहेत. त्यांच्या मूर्ति उत्तराभिमुख आहेत, अर्थात् मंदिर उत्तराभिमुखच आहे. समोर गरुडपार आहे, गरुड हनुमंत देवासमोर हात जोडून उभे आहेत, पूर्वेकडील दरवाज्याजवळ व दक्षिणेस तोंड असलेले विघ्नराज आहेत, व बाहेर बहिरवाचें छोटेसें मंदिर आहे. मंदिराच्या पश्चिमेस हरेश्वरमंदिर आहे व शेजारींच इनामदारांचा वाडा म्ह० मुख्य घराण्याचें राहतें घर आहे. त्याच्या पलीकडेच तुकोबारायांचें राहतें घर आहे. त्या घरांत ज्या खोलींत तुकोबांचा जन्म झाला व जेथें मागाहून विठ्ठलमूर्तीची नवी स्थापना झाली त्या खोलीचा फोटो अन्यत्र दिला आहे. तुकोबांच्या राहत्या घराच्या व वाड्याच्या पश्चिमेस इंद्रायणीच्या बाजूला आज एक पडकी बखळ आहे, तेथें मंबाजीबोवांचें घर व बाग होती असें सांगतात. विठ्ठलमंदिराला प्रदक्षिणा घालतांना उजवीकडे इनामदारांचा वाडा व तुकोबांचें घर घेऊन त्याला लागून अस-

लेल्या बोळांतून खालीं उतरत व मंबाजीबोवांचें घर व बाग हीं डा उजवीकडे घेत प्रदक्षिणा पुरी होत असते. तुकोबांची म्हैस मंबाजीच्या बागेंत शिरल्यामुळें बागेच्या कुंपणावरील कांट्या बाजूला सारल्याचें निमित्त करून त्या मत्सरमूर्तीनें जेथें तुकोबांस कांट्यांनीं मारलें ती जागा ह्याप्रमाणें तुकोबांच्या घराच्या पश्चिमेस इंद्रायणीसन्मुख येते. ह्या एवढ्या इमारतींच्या गटाच्या पश्चिमेस थोड्या अंतरावर बल्लाळाचें वन व त्यांत मंदिर असून या सिद्धेश्वर मंदिराच्या जरा पूर्वेस लक्ष्मीनारायणाचें मंदिर आहे. हीं मंदिरें लहान पण दगडी असून तुकोबांच्या पूर्वीपासूनचीं आहेत. मंदिरांच्या व तुकोबांच्या घराच्या पूर्वेस व ईशान्येस तेव्हां इतर लोकांचीं घरें होतीं व आजही आहेत. याप्रमाणें देहू क्षेत्राची रचना होती. इंद्रायणी नदी देहूक्षेत्राला लागून उत्तराभिमुख वहात आहे. मंदिराच्या बाहेर व नदीच्या पात्रालगत पुंडलीकाचें देऊळ आहे. तेथून नदीकांठानें उत्तरेस जातांना मैल दीडमैल लांबीचा प्रचंड डोह लागतो. या डोहाच्या कांठीं गोपाळपूर असून तेथें जुनाट पिंपरीचा वृक्ष आहे. त्या वृक्षाशेजारीं महाराजांचें अखेर कीर्तन होऊन प्रयाण झालें. याच्याही खालीं अर्धामैलावर करंजाईचें स्थान आहे. हा डोहाचा मध्य होय. तेथें मुरलीधराचें मंदिर आहे. महाराज डोहावर एकांतांत बसत ते येथेंच होय. येथेंच रामेश्वरभटानें छळ केला तेव्हां महाराज शिलातलावर तेरा दिवस ध्यानरत होऊन पडले होते व त्या शिलेवर पडले असतांच श्रीकृष्णानें बालरूपानें त्यांस दर्शन देऊन वह्या तारल्या. ही शिला अर्थात् भक्तमंडळास अत्यंत प्रिय व पूज्य वाटून त्यांनीं तीं तुकोबांच्या पश्चात् तेथून ढकलीत ढकलीत देहू मंदिरांत आणली व मंदिरालगत तुकोबांची पहिली स्त्री रखुमाबाई इचें वृंदावन आहे त्याला टेंकून उभी ठेवली. त्या वृंदावनाचा व शिलेचा फोटो अन्यत्र दिला आहे. इंद्रायणीच्या कांठावर उभे राहून

पश्चिमेकडे पाहिलें म्हणजे डाव्या बाजूस ६ मैलांवर गोराड्याचा उर्फ घोरवडीचा डोंगर दिसतो. देहूच्या थेट पश्चिमेस दोन मैलांवर भंडाऱ्याचा डोंगर दिसतो व उजव्या बाजूस डोहाच्या पलीकडे पण देहूहून आठ मैलांवर भामगिरी किंवा भामनाथ अथवा भामचंद्र हा डोंगर दिसतो. भंडाऱ्याचा फोटो दिला असून डोहाचाही एक फोटो दिला आहे. श्रीक्षेत्र देहूचें हें संक्षिप्त वर्णन दिलें आहे, व त्याची साधारण कल्पना वाचकांस यावी म्हणून स्वहस्तानें काढलेला एक नकाशाही जोडण्यांत येत आहे.

२ श्रीतुकाराममहाराजांच्या विश्वपावन घराण्याचा प्रथम थोडा-सा विचार करूं. भगवद्भक्ताची जातगोत पाहण्याचें वस्तुतः कारण नाहीं. तो कोणत्याही जातींत व कुळींत कोठेंही जन्मलेला असो, तो विश्वाला वंद्य आहे. नारायणानें ज्याचा अंगीकार केला त्याची जातकुळी धन्य झाली. ज्यांचा देहाभिमान गलित झाला ते वर्णा-श्रमधर्माच्या पार गेले. त्रैलोक्याला पावन करणारे महात्मे ज्या देशांत, ज्या कुळांत, ज्या जातींत जन्म घेतात, तो देश, तें कुळ, व ती जाति अत्यंत पवित्र होय. ' पवित्र तें कुळ पावन तो देश। जेथें हरिचे दास जन्म घेती ' अशी तुकोबांचीच उक्ति आहे. हें खरें आहे, तथापि महात्म्यांच्या चरित्राचा सांगोपांग विचार करीत असतांना लौकिक दृष्टीनें त्यांच्या जातकुळीचा विचार केला पाहिजे. ' तुका वाणी ' अशी त्यांच्या नांवाची प्रसिद्धि असल्या-मुळें ते जातीनें वाणी होते, असें कोणास वाटण्याचा संभव आहे, पण त्यांच्या घराण्यांत वाण्याचा धंदा कित्येक पिढ्या चालत होता व त्यांनींही पूर्ववयांत तो केला म्हणून त्यांना वाणी म्हणत. ' वाणी ' ही कांहीं त्यांची जात नव्हे. अलीकडे कित्येक जात्य-भिमानी विद्वान् त्यांना ' मराठा क्षत्रिय ' ठरविण्याच्या प्रयत्नांत

आहेत, पण आपण तुकोबांनाच त्यांची जातकुळ विचारूं म्हणजे झालें:—

**( १ ) याती शूद्र वैश्य केला वेवसाय ।**
**आदि तो हा देव कुळपूज्य ॥ ९ ॥**

मी जातीचा शूद्र, माझा व्यवसाय वाण्याचा व माझी उपासना आमच्या कुळाला पूज्य असलेल्या विठोबाची.

**( २ ) बरें देवा कुणबी केलों । नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥१॥**

देवा ! मला तूं कुणबी केलेंस हें बरें झालें, नाहीं तर विद्या शिकून ' विद्या विवादाय ' असा जो प्रकार सामान्यत: आढळतो त्याप्रमाणें मीही दंभाच्या सपाट्यांत सांपडून व्यर्थ बुडालों असतों.

**( ३ ) शूद्रवंशीं जन्मलों । म्हणोनि दंभें मोकलिलों ॥ १ ॥**
**अरे तूं माझा आतां । मायबाप पंढरिनाथा ॥ ध्रु० ॥**
**घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥ २ ॥**
**सर्वभावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥ ३ ॥**

शूद्र कुळांत जन्मलों असल्यामुळें मला वेदाक्षर घोकण्याचा अधिकार नाहीं, मी दीन यातिहीन आहें. अध्ययन नाहीं, म्हणून विद्येबरोबर सामान्यत: आढळणारा अभिमानदंभही नाहीं, असा मीं सर्व प्रकारें दीन तुला शरण आलों आहे. या व अशाच त्यांच्या उद्गारांवरून ' मी शूद्र कुणबी ' आहें असें तुकोबा स्वच्छ सांगत आहेत. ते पुढें आपल्या करणीनें नराचे नारायण—'विधीचे जनिते'—झाले ही गोष्ट वेगळी, पण त्यांचा जन्म शूद्र जातींत

---

१ वरील उद्गारांवरून तुकोबांचा ब्राह्मणांवर कटाक्ष आहे असें कोणीं समजूं नये व ही आपली निंदा आहे असें ब्राह्मणांनींही मनांत आणूं नये. तुकोबांनीं वेदाक्षर ' घोकलें ' नाहीं तथापि पुराणादि ग्रंथ व इतर प्राकृत ग्रंथ पाहिल्याचें पुढें स्पष्ट होणारच आहे. तसेंच ब्राह्मणांविषयीं त्यांचा केवढा आदर होता हेंही पुढें कळून येणार आहे. अध्ययनाबरोबर गर्वदंभादि बहुधा उत्पन्न होतात म्हणून येथें केवळ दंभगर्वाचा तिरस्कार दर्शविला आहे.

झाला होता हें त्यांच्याच वचनांवरून ठरत आहे. महिपतबावांनीं 'शूद्र यातीमाजी निश्चित । जन्मला तुकाराम वैष्णवभक्त' ( भक्तलीलामृत अ० २९—१२ ) असें ह्मटलें आहे. मोरोपंत व निबंध-मालाकार यांनीं कौतुकानें तुकोबांचा 'शूद्रकवि' असाच उल्लेख केला आहे. हा तुकोबांच्या जातीचा विचार झाला. आतां कुळीचा बिचार करूं. त्यांचें आडनांव 'मोरे' होतें असें हनुमंत-स्वामींनीं समर्थांच्या बखरींत म्हटलें आहे व महिपतबावांनीं तें 'आंबळे' असें दिलें आहे ( भक्त-विजय अ० ४८—२३ ). यां-पैकीं खरें उपनांव कोणतें मोरे का आंबळे असा प्रश्न कांहीं दिव-सांपूर्वीं कित्येक लोक विचारीत. पण मीं नाशीक व त्र्यंबक येथें देहूकरांच्या क्षेत्रोपाध्यायांच्या मूळ वह्या शोधून पाहिल्या त्यावरून त्यांची 'कुळी' मोरे व 'आडनांव' आंबिले उर्फ आंबळे असा निष्कर्ष निघाला. त्र्यंबक येथें तुकोबा गेले होते याबद्दल खात्री झाली, मात्र दोहीं ठिकाणीं वह्यांवरून त्यांचे चिरंजीव नारायण-बोवापासून त्यांचे जे वंशज गेले त्यांचे लेख आहेत, पण तुकोबांच्या सहीचा कागद फाटून नष्ट झाल्याचें आढळून वाईट वाटलें. नाशीक येथील लेख माझे आधी रा. पां. न. पटवर्धन यांनीं मिळवून छापला होता. पण त्यास नक्कल मिळाली होती व नकलेंतील एक चूक त्यांचे लेखांत आली होती. असो नारायणबावांचा नाशीक येथील अस्सल लेख वे. शा. सं. शंकर गोविंद गायधनी यांचे वहींत ( वही ५ पृ० २८ ) आहे. त्या लेखांत तुकोबांच्या पुत्रांचीं व नातवांचीं नांवें आहेत. तो लेख असा: " ली० नारोबा गोसावी पीते तुकोबा गोसावी अजे बोल्होबा भाऊ विठोबा गोसावी माहादजी ( गोसावी ) वीठोबाचे पुत्र उधोबा रामजी गणेश गोसावी गोविंद गोसावी माहादजीचे पुत्र आबाजी चु० कान्हावा गोसावी त्याचे पुत्र खंडोबा माता अवळिबाई कुणबवाणी अडनाव आंबीले गांव देहु

प्र. पुणें कुळी मोरे " ह्या अस्सल लेखांत नारोबांच्या आईचें नांव ' अवळिबाई ' असें असून रा. प. पटवर्धनांच्या लेखांत ' अवंतीबाई ' आहे पण ती चूक आहे. तुकोबांच्या बायकोचें नांव जिजाबाई उर्फ आवळीबाई असें होतें. नारायणबोवांनीं आपल्या कुळजातीबद्दल ' कुणबवाणी अडनाव आंबीले कुळी मोरे ' असें स्पष्ट ह्मटलें आहे. त्र्यंबक येथील देहुकरांचे क्षेत्रोपाध्याय वे. शा. सं. धोंडभट बापूजी काण्णव यांचे येथील वहींत ( वही ११ पान २१ ) नारायणबोबांचा जो लेख आहे तो असा आहे. " नारोबा पीता तुकोबा गोसावी आजा बोल्होबा भाऊ माहादाबा व वीठोबा पुतने रामा व गणो व गोविंदजी चुलतभाऊ आबाजी माता जीजाईबाई ज्ञा ( त ) कुनबी आब ( ळे ) वास देहु प्र. पुने. " या लेखांत नारोबांनीं आपल्या आईचें नांव ' जीजाईबाई ' असें दिलें असून आपली जात ' कुनबी ' आहे असें म्हटलें आहे. आणखीही कांहीं लेखांत ' कुणंबवाणी अंबळे ' असे उल्लेख सांपडतात ह्या सर्व लेखांवरून तुकोबांची जात शूद्र अगर कुणबवाणी असून त्यांचें कुळ मोरे व आडनांव आंबिले, आंबळे, अंबळे, हें होतें असें निर्विवाद ठरतें. जातकुळ देहाची, देहातीताला जातकुळ नाहीं. साधकावस्थेंत ' आवडे ज्या हरि अंतरापासोनी ' असे हरिभक्त हे ' माझिया जातीचे ' आहेत असें परमार्थदृष्टीनें तुकोबांनीं म्हटलें आहे. असो. तुकोबांच्या देहाची जातकुळ काय होती ती आपण पाहिली, आतां त्यांच्या घराण्याचा विचार करूं.

३ तुकोबांचें कुळ बरेंच सुखसंपन्न व चांगलेंच प्रतिष्ठित होतें. देहू गांवांत त्यांच्या कुळाची प्रतिष्ठा थोर होती असें त्यांच्या घराण्यांत मला मिळालेल्या अनेक कागदपत्रांवरून ठरतें. त्यांच्या घराण्याकडे देहूची महाजनकी चालत होती. महाजनकी चालविण्याची तुकोबांनीं उदासीनवृत्तीमुळें उपेक्षा केली व त्याची दुरुस्ती

त्यांचे पुत्र नारायणबोवा यांनीं पुढें करून घेतली. राजशक ५ कालयुक्त संवत्सर ह्म० शके १६०० मध्यें फाल्गुनांत शिवाजी महाराजांनीं एक आज्ञापत्र लिहिलें आहे त्यांत ह्मटलें आहेः— " तुकोबा गोसावी यांचे पुत्र नारायण गोसावी यांणीं सांगितलें कीं मौजे देहू परगणे मजकुर ( पुणें ) येथील महाजनकी आपले वडिलांची मिरास आहे. वडील गोसावी जाले याकरितां महाजनकी चालवायाची उपेक्षा करीत गेले....आपण न चालवावें तरी वृत्तीचा लोप होतो. याकरितां माहाजनकी आपली मिरास आहे ते चालवूं पाहातों तरी पुरातन चालत आल्याप्रमाणें चालवीन ऐसें आज्ञापत्र करून देविलें पाहिजे " यावर महाराजांनीं ' यांची महाजनकी मिरासी पहिलेपासून चालत आली आहे तेणें प्रमाणें चालविणें ' असी पुणें परगण्याच्या देशाधिकाऱ्यास आज्ञा केली आहे. ह्या लेखावरून महाजनकी चालवायाची तुकोबांनीं उपेक्षा केली असली तरी ती त्यांचे घराण्याकडे पुरातन चालत होती हें उघड आहे. तुकोबांच्या नातवांनीं लिहिलेल्या एका यादींतही " श्रीतुकारामबावा वास्तव्य क्षेत्र देहू यांची वृत्ति मूळची क्षेत्र मजकूरची महाजनकी " अशीं अक्षरें आहेत. तुकोबांचे पुत्र महादेवबोवा, विठ्ठलबोवा व नारायणबोवा यांचें शके १६११ चें एक फारकतपत्र मिळालें आहे. त्यांत महादेवबोवा आपल्या दोघां भावांस लिहितात " आपले मिरासीचीं घरें दोन एक श्रीसंनिध एक पेठेंत महाजनकीचें घर त्यास आपण महाजनकीचा वाडा व महाजनकी घेतली व तुम्हांस उभयेतांस श्रीसंनिधवाडा व श्रीची पूजा तुमचे स्वाधीन केली." आणखी एका पत्रांत " विठ्ठलटिकें ( देहू येथील एका शेताचें नांव ) श्रीस इनाम पुरातन आहे असा पांढरीच्या ( गांवांतील पंचांच्या ) मुखें पंत मुतालिक व पंतप्रधान यांनीं खरें खुरें करून घेतल्याचें लिहिलें आहे. या

लेखाचा शक १६४२ हा आहे. ह्या सर्व लेखांवरून तुकोबांच्या घराण्याकडे देहू येथील महाजनकीची मिरास, बाजार पेठेंतला माहाजनकीचा वाडा, अर्थात् महाजनकीचे अधिकार व उत्पन्न ‘ पुरातन ’ चालले होते, त्याचप्रमाणें श्रीच्या पूजाअर्चेसाठीं ‘ पुरातन इनाम ’ चालत होतें. महाजनकीच्या वाड्याशिवाय त्यांचें खाजगत घर श्रीसंनिध होतें इतक्या गोष्टी स्पष्ट झाल्या. ज्या गांवाला बाजारपेठ असे त्या गांवांत तेव्हां महाजन व शेटे असे दोन अधिकारी असत, व त्यांचा दर्जा मोठा प्रतिष्ठेचा असे. याशिवाय त्यांची दुसरी कांहीं शेतवाडी, सावकारी व वाणिज्यही होतें. एकंदरींत प्रतिष्ठित, मिरासदार व बेताबाताचा व्यापारधंदा करणाऱ्या घराण्यांत तुकोबांचा जन्म झाला. पण या घराण्याकडे देहु येथील महाजनकीची मिरासी होती एवढेंच नव्हे तर दुसरीही एक बडी मिरासी होती. तुकोबांनीं ही पहिली मिरासी चालवायाची उपेक्षा केली, पण दुसरी मिरासी इतक्या उत्कृष्ट रीतीनें चालविली कीं त्यामुळें देहूच्याच काय पण साऱ्या महाराष्ट्राच्या—साऱ्या विश्वाच्या महाजनकीचे अष्टाधिकार सर्व लोकांनीं एकमतानें त्यांना दिले आहेत ! ती महाजनकीची मिरास कोणती हें आपण आतां पाहूं. नवें न करितां पूर्वजांची मिरास राखणें यांत भूषण आहे. ‘ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें त्याणें ॥२॥ मिराशीचा ठाव । राखा करूनि उपाव ॥३॥’ असा त्यांचाच उपदेश आहे.

४ श्रीतुकाराममहाराज हे आपल्या अत्युत्कट विठ्ठलभक्तीनें त्रैलोक्यांत गाजले आहेत, तरी ज्या घराण्यांत त्यांचा जन्म झाला त्या घराण्याच्या इतिहासाकडे पाहिलें म्हणजे त्यांना विठ्ठलभक्तीचें बाळकडू विठ्ठलभक्तांच्या घराण्यांत जन्म मिळाल्यानें आनुवंशिक संस्कारानेंच मिळालें होतें असें म्हणावें लागतें. त्यांच्या घराण्यांत त्यांचे आठवे पूर्वज विश्वंभरबाबा हे विठ्ठलभक्त होऊन

गेले होते. देहूला विश्वंभरबावांच्या वेळेपासूनच क्षेत्रपण आलें होतें. विश्वंभर बावांनीं देहूस विठ्ठलमंदिर बांधलें व त्यांत ज्या विठ्ठल मूर्तीची स्थापना करून पूजाअर्चा केली तीच मूर्ती तुकोबांच्या वेळीं व पांचशें वर्षांनंतर आजही तेथें विराजत आहे. पांडुरंगाची चरणसेवा ही माझ्या वडिलांची मिरास आहे, माझ्या वडिलांनीं एकादशी महाव्रताचीं उपासपारणीं करून विठ्ठलाला भक्तीनें वश केलें व ते त्यांचे द्वारपाल झाले, त्यांनीं चरणसेवेचा वांटा आह्माला भोगण्यासाठीं ठेवला आहे व याप्रमाणें आह्मी वंशपरेनें विठ्ठलाचे दास आहोंत असें तुकोबांनीं मथळ्यावरील अभंगांत जें ह्मटलें आहे त्यांत त्यांच्या पूर्वजांचा संकलित इतिहासच आला आहे असें ह्मटलें तरी चालेल. तुकोबांच्या पूर्वजांनीं त्यांना रहायला घरदार ठेवलें होतें, थोडीफार चीजवस्त व जमीनजुमला ठेवला होता, महाजनकीचें वतन मिळवून ठेवलें होतें व ह्या सर्व वडिलोपार्जित दौलतीचा त्यांच्या संसाराला थोडाफार उपयोगही झाला; पण त्यांना स्वतः ह्या लौकिक व नश्वर दौलतीपेक्षां विठ्ठलाच्या चरण-सेवेची जहागीर वडिलांनीं मिळवून ठेवल्याचा लाभच फार मोठ्या भाग्याचा वाटत होता हें वरील अभंगाचें मर्म आहे; आणि खरो-खरच मुलांबाळांसाठीं धनदौलत मिळवून ठेवणारे आईबाप पुष्कळ सांपडतील, पण भगवद्भक्तीची दौलत ठेवणारे आईबाप दुर्मिळ होत ! तुकोबा, समर्थ[१] अशा कांहीं पुरुषांच्या वांट्याला अशी दौलत

---

१ तुकोबांचा जन्म शके १५३० मध्यें इंद्रायणीतीरीं देहूस झाला. त्याच सालीं रामभक्त रामदासस्वामींचा जन्म गोदातीरीं जांबेस झाला. हे दोन परमभक्त एकाच सालांत जन्मले व दोघांनींही महाराष्ट्रांत भगवद्भक्तीचा प्रसार स्वतःच्या आचरणानें व उपदेशानें उत्तम प्रकारें केला. ' राम विठ्ठल दुजा नाहीं ' हें लक्षांत आणून त्यांच्या चरित्राकडे व उपदेशाकडे पाहिलें ह्मणजे भाविकांना सारखाच आनंद होतो. वडिलांनीं विठ्ठलचरणसेवेची

तेव्हां आली होती ! विठ्ठलभक्तांच्या घराण्यांत मला जन्म मिळाला, व माझ्या वडिलांनीं विठ्ठलोपासनेची दैवीसंपत्ति मला दिली आणि मला विठ्ठलाच्या ओटींत घातलें असें तुकोबांना वारंवार वाटे. आपल्या वडिलांनीं—पूर्वजांनीं—केलेल्या भगवद्भक्तीचे आपण वारस आहोंत, त्यांनीं दाखविलेल्या मार्गानेंच आपण चाललों आहोंत, त्यांच्या सुंदर कित्त्याचेंच आपण वळण गिरवीत आहोंत ही भावना किती चित्तशुद्धकर, निरभिमानाची व कृतज्ञतेची आहे ! मनुष्य बरावाईट निघतो याचीं समजुतींत येणारीं दोन कारणें देतां येतातः एक घराण्याचें वळण व दुसरें ज्याचे त्याचे पूर्वजन्मींचे संस्कार. एखाद्याचे पूर्वसंस्कार शुद्ध असून घराण्याचें वळण वाईट असेल व त्याचे संस्कार बळावतील तर ' भगेंत तुळस ' असा प्रकार होतो, बरें एखाद्याला सत्कुळांत जन्म मिळूनही त्याचे पूर्वजन्मींचे दुष्ट संस्कारच बलवत्तर झाले तर 'तुळशींत कांदा' असें म्हणण्याची पाळी येते ! पूर्वसंस्कार परमशुद्ध असून सत्कुळांत जन्म मिळणें ही परमभाग्याची गोष्ट आहे. असा दुधासाखरेचा संयोग झाला म्हणजेच ' शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ' हा न्याय लागूं पडतो. ' बीजाऐशीं फळें । उत्तम कां अमंगळें ' हा तुकोबांचा सिद्धांत आहे. जीवांचे पूर्वसंस्कार परमशुद्ध असून त्यांच्या विकासास अत्यंत अनुकूल अशा घराण्यांत व परिस्थितींत जन्म मिळणें ही गोष्ट थोर दैवाची आहे. असो. नऊ पिढ्या विठ्ठलोपासनेचें पुण्यव्रत आचरणाऱ्या घराण्यांत तुकोबांचा जन्म झाला.

---

मिरासदारी दिल्याबद्दल तुकोबांनीं जसे कृतज्ञतेचे उद्गार काढले आहेत असेंच समर्थांनींही काढले आहेत. ते म्हणतातः " बापें केली उपासना । आम्ही लाधलों त्या धना ॥ १ ॥ रामदास्य आलें हाता । अवघा वंश धन्य आतां ॥ २ ॥ बंधु अभिलाषा टाकला । वांटा घेऊनि भिन्न झाला ॥ ३ ॥ ' समर्थांचे बंधु श्रेष्ठ हेही रामभक्त होते.

पंढरीची वारी आहे माझे घरीं ।
आणिक न करीं तीर्थव्रत ॥ १ ॥
व्रत एकादशी करीन उपवासी ।
गाईन अहर्निशी मुखीं नाम ॥ २ ॥

याप्रमाणें तुकोबांचें कुलव्रत थोर होतें. ' ऐका वचन हे संत ' या अभंगांत ' सहज वडिलां होती सेवा ! म्हणूनि पूजितों या देवा ' असें त्यांनीं म्हटलें आहे. श्रीविठ्ठल ही आमच्या ' कुळींची कुळदेवी ' आहे, हें ' आमचें कुळींचें दैवत आहे ' व त्याची उपासना हा आमचा कुळधर्म आहे असे त्यांचे अनेकवार उद्गार निघालेले आहेत. ज्याच्या कुळींची जी उपासना आहे ती त्यानें एकनिष्ठपणानें चालविली असतां तो कृतकार्य होतो. तुकोबांनीं 'कुळधर्म ज्ञान ' ह्या अभंगांत ह्मटल्याप्रमाणें कुळधर्माचरणानें साधनमार्ग सांपडतो, ज्ञानप्राप्ति होते, गतिभक्तिविश्रांति सर्व कुळधर्मानेंच मिळतात, दया परोपकार हे कुळधर्माचरणांतच घडतात, तात्पर्य काय तर ' तुका ह्मणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरी होय ॥ ' म्हणजे शुद्धभाव असला म्हणजे कुळधर्माचरणानेंच देवाचें देवत्व प्रतीत होतें, देव हातोपातीं बोलेसा होतो. हा तुकोबांचा व इतरांचाही अनुभव आहे. त्यांना विठ्ठलभक्तीचा कुळधर्म आचरतां आचरतांच ' देवीं देव ' सांपडला, विठ्ठलाची मूर्तिच सच्चिन्मय झाली, त्या मूर्तीचें ध्यान करितां करितां अंतर्बाह्य विठ्ठलच भरून उरला.

ह्या पवित्र घराण्याच्या भगवद्भक्तीचा अरुणोदय जर विश्वंभरबावा मानले तर तिचा मध्यान्ह म्हणजे तुकाराममहाराज हे होत. बहुधा कोणत्याही महात्म्याचें चरित्र पाहिलें तर त्यांत असें दिसतें कीं, ज्या कुळाला तो धन्य करितो त्या कुळांतल्या मागील दहा पांच पिढ्यांत भक्तिज्ञानवैराग्यादि गुण एकसारखे वाढतच असतात.

ज्ञानेश्वरमहाराजांच्या कुळांत त्यांचे पणजे त्र्यंबकपंत हे पहिले भक्त होऊन गेले, नाथांच्या घराण्यांत नाथांचे पणजे भानुदास हे भगवद्भक्त होऊन गेल्याचें प्रसिद्धच आहे, समर्थांच्या घराण्यांत रामाची उपासना नऊ पिढ्या चालत आली होती, त्याप्रमाणेंच तुकाराममहाराजांच्या घराण्यांत पंढरीची वारी नऊ पिढ्यांहून अधिक चालत आलेली असून त्यांत त्यांच्या आजाचे पणजे विश्वंभरबावा हे विख्यात विठ्ठलभक्त होऊन गेले होते. पवित्र कुळांत व पावन देशांतच हरिदास जन्म घेतात. पवित्रपणाचे संस्कार, पवित्र राहणी, पवित्र विचार हे पिढ्यानपिढ्या एखाद्या घराण्यांत जेव्हां मुरत मुरत येतात तेव्हां त्या सर्वांचा परिपाक म्हणून तिहीं लोकीं सत्कीर्तीचा झेंडा फडकवणारा एखादा महात्मा त्यांत जन्मास येतो. ह्यासाठींच कुळपरंपरा शुद्ध राखण्याची पद्धति आपल्या धर्मशास्त्रानें घालून दिली आहे. कुळधर्मकुळाचारांचें माहात्म्य आपल्या समाजांत फार मानतात, त्यांचें बीज तरी हेंच होय. पंढरीच्या वारकऱ्यांना ‘ मद्यमांस ’ वर्ज्य करावे लागतात, त्याशिवाय त्यांच्या गळ्यांत तुळशीची माळ पडतच नाहीं. पंढरीची यात्रा, एकादशीव्रत, मद्यमांसत्याग, हरिपाठादि अभंगांचें पठण व नित्यभजन हे निर्बंध प्रत्येक वारकऱ्याला पाळावे लागतात. ह्याप्रमाणें विचार करितां तुकाराममहाराजांच्या घराण्यांत नऊ किंवा अधिक पिढ्या चालत असलेल्या पंढरीच्या वारीनें किती शुद्धता पिकविली असेल याची थोडीशी तरी कल्पना होईल. सत्कुळांत जन्म मिळाल्याचें व कुळधर्म एकनिष्ठपणानें पाळल्याचें सत्फळ कोणतें मिळतें यास तुकोबांचें चरित्र हें उत्कृष्ट उत्तर आहे.

५ तुकाराममहाराजांपासून त्यांचे आठवे पूर्वज विश्वंभरबावा हे मोठे विठ्ठलभक्त होऊन गेले. बाळपणींच त्यांचा बाप वारल्यामुळें ते व त्यांची आई अशीं दोनच माणसें त्यांच्या कुटुंबांत राहिलीं.

कालांतरानें त्यांचें लग्न झालें. त्यांच्या स्त्रीचें नांव आमाबाई हें होतें. विश्वंभरबावानें बापाचाच वाण्याचा धंदा पुढें चालविला. व्यवहार चोख ठेवणें, असत्य कदापि न बोलणें, प्रारब्धानें जें धन-धान्य मिळेल त्याचा सत्कार्थी व्यय करणें, साधुसंत, ब्राह्मण व अतीतअभ्यागत यांचा सत्कारपूर्वक परामर्ष घेणें, संसारधंदा करीत असतां नामस्मरणांत रंगून जाणें, रात्रीं भाविकजन मिळवून आनंदानें भजन करणें, रामकृष्णांच्या लीला जनांस ऐकविणें व सर्वभूतीं दया ठेवून परोपकारार्थ कायावाचामनानें झटणें, हा विश्वंभरबावांचा नित्यक्रम पाहून त्यांच्या आईस फार संतोष होई. ती माउली फार प्रेमळ होती. तिनें एकदां विश्वंभरबावांस सांगितलें कीं:—

**" तुझ्या वडिलोंवाडिलीं निर्धारीं । चालविली पंढरीची वारी॥**
**त्यासी सर्वथा अंतर न करीं । तरीच संसारीं सफळपण ॥**

हा आईचा सदुपदेश ऐकून त्यांनीं पंढरीस जाण्याची तयारी केली. आधींच उल्हास आणि त्यांत आईची आज्ञा, मग काय विचारतां ! विश्वंभरबावा मोठ्या आनंदानें भजन करीत चार भाविक बरोबर घेऊन पंढरीस गेले. तेथला तो अपूर्व भजनसमारंभ पाहून त्यांचें देहभानही हरपलें. तो भाविक वारकऱ्यांचा मेळा, तें चंद्रभागेचें विस्तीर्ण व शुद्ध जलानें वाहणारें पात्र, ती श्रीविठ्ठलाची साजिरी सगुणमूर्ति, पुंडलिक, नामदेव, चोखामेळा इत्यादि भक्तांच्या अद्भुत लीलाचें स्मरण करविणारीं तीं तीं पावन स्थळें, तो कीर्तनाचा व नामघोषाचा सोहळा वगैरे एकंदर प्रकार पाहून विश्वंभरबावांचें चित्त प्रेमभरानें उचंबळूं लागलें. देवाच्या पुढून त्यांस उठवेना.

**" तें ब्रह्म सनातन । निजभक्तांचें हृदयरत्न । नासिकाग्रीं ठेविलें ध्यान । देखतांचि मन तन्मय ॥ सर्वांगीं बुका उधळला । कंठीं कोमळ तुळशीच्या माळा । विश्वंभरें देखोनि घनसांवळा आनंद**

झाला मानसीं ॥ सगुण रूप देखोनि दृष्टी । तेंचि ठेविलें हृदयसंपुटीं । ब्रह्मानंदसोहळा सृष्टीं । देखोनि पोटीं संतोष ॥ ”

ह्याप्रमाणें दशमीपासून पौर्णिमेच्या काल्यापर्यंत पंढरीस राहून मोठ्या कष्टानें विश्वंभरबोवा परत देहूस आले. त्यांनीं पंढरीचा सर्व वृत्तांत आपल्या आईस सांगितला, व तिच्या आज्ञेनें दर पंधरवड्याची पंढरीची वारी धरली. अहोरात्र विठ्ठलाचें चिंतन करीत त्यांनीं क्रमानें पंढरीच्या सोळा वाऱ्या आठ महिन्यांत केल्या. “दशमीव्रत एकभुक्त साचार । एकादशी उपोषण हरिजागर । रात्रीं ऐकोनि कीर्तनगजर । सप्रेम अंतर तयाचें ॥ ” पंढरीस जातांना उल्हासानें जावें व देवाचा निरोप घेतांना सद्गदित होऊन व अश्रुपूर्ण नयनांनीं देवाची ती मनोहर मूर्ति पाहून जड पायांनीं परत फिरावें अशी विश्वंभरबोवांची तन्मयता झाली. शेवटीं त्यांच्या भक्तीस देव भुलले व प्रत्यक्ष प्रगट होऊन त्यांनीं त्यांस हरिनाममंत्रोपदेश दिला. त्यांचें चित्त हरिचरणीं नित्यरत झाल्यामुळें प्रपंचव्यवसायांत थोडें दुर्लक्ष्य होऊं लागलें व त्यामुळें जनराहाटीप्रमाणें कोणी त्यांस निंदूं लागले व कोणी वंदूं लागले. विश्वंभरबावांची अनन्यता पाहून पंढरिनाथांनीं त्यांस पंढरीस न येण्याविषयीं दृष्टांत दिला व आपण स्वतः तुझ्या घरीं राहण्यास येतों असें सांगितलें. दृष्टांताप्रमाणें विश्वंभरबावा शेंपन्नास गांवकरी घेऊन देहूजवळच्या आंब्याच्या वनांत गेले. तेथें ज्या स्थळीं सुवासिक पुष्पें, बुका, तुळसी पडलेल्या त्यांनीं पाहिल्या, तेथें त्यांनीं स्वहस्तानें उकरलें:—

“ पुढें पाहतां निजदृष्टीनें । तों पांडुरंगमूर्ती सांवळी सगुण ।
वामांगीं ते माता रुक्मिण । सकुमार ठाण साजिरें ॥
कांसेसी दिव्यपीतांबर । गळां तुळसीमंजुळ्यांचे हार ।
ऐसी मूर्ति देखोनि सुंदर । जयजयकार मग करिती ॥ ”

त्या विठ्ठलमूर्तीची विश्वंभरबावांनीं देहूंत स्वगृहासमीप इंद्राय-

णीतीरीं मोठ्या समारंभानें स्थापना केली व देऊळ बांधलें. येथपासून देहूगांवाला क्षेत्रपण आलें.

६ विश्वंभरबावांचें देहावसान झाल्यावर त्यांची स्त्री आमाबाई आपल्या हरि व मुकुंद या दोन पुत्रांसह कालक्रमणा करून राहिली. पतीच्या संगतीनें तिच्या अंतःकरणांत देवाचें प्रेम उगवलें होतें. विठ्ठलाची पूजाअर्चा पतीच्या मागें उत्तम प्रकारें चालविण्याचा तिचा निश्चय होता. अशी व्यवस्था कांहीं दिवस चालली, पण तिच्या पुत्राच्या राजसी प्रकृतीमुळें तिला मध्येंच प्रतिबंध आला. हरि व मुकुंद ह्या उभयतांच्या मनांत 'सेना तुरंग शिबिका आभरण। आपणाकारणें असावीं' असा विचार आला. क्षात्रवृत्ति उत्पन्न झाल्यामुळें आईचें न ऐकतां ते निघून गेले व त्यांनीं राजसेवा पत्करिली. हा राजा कोण व कोठचा हें समजण्यास मार्ग नाहीं. मुलांच्या निकडीच्या बोलावण्यावरून आपल्या दोघी सुना बरोबर घेऊन आमाबाई मुलांच्या नौकरीकडे गेली. आमाबाई शरीरानें गेली खरी, पण तिला मुलांच्या नौकरीचें सुख न वाटतां देहूच्या विठ्ठलमूर्तीकडे तिचें चित्त सारखें लागून राहिलें. वरच्या घरीं राहून मुलांनीं वडिलोपार्जित धंदा करावा व देवाची पूजाअर्चा नीट चालवावी अशी आमाबाईची इच्छा होती, पण तिच्या तरुण मुलांच्या अंगांत तरुणपणाचें ताजें रक्त खेळत असल्यामुळें व धनसंपत्ति व नांवलौकिक मिळविण्याची त्यांची हांव अनावर झाल्यामुळें तिला मुलांकडे जावें लागलें. 'स्नेहवादें दुःख जडलेंसे अंगीं। निष्ठुर हें जगीं प्रेमसुख' हा अनुभव तिला यावयाचा होता. मायापाश कठिण आहे. मन देहूंत देवापाशीं व शरीर मुलांजवळ अशी तिची स्थिति झाली. मुलांची चलती होत चालली. कांहीं काळानें आमाबाईला स्वप्नांत येऊन विठ्ठलानें सांगितलें कीं 'तूं पुत्रमोहाला गुंतून मला देहूस टाकून आलीस, पण तुझे पुत्र युद्धांत मरण पाव-

तील व धनसंपत्तीची वाताहत होऊन जाईल.' आमाबाईनीं आपला दृष्टांत मुलांस सांगितला, पण त्यांचा त्यावर विश्वास बसेना. शेवटीं मुलांच्या स्वामीवर परचक्र आलें असतांना जें घनघोर युद्ध झालें त्यांत हरि व मुकुंद दोघेही धारातीर्थीं[1] पडले. मुकुंदाची स्त्री सती गेली. शोकग्रस्त होऊन आमाबाई थोरल्या सुनेसह देहूस परत आली. मात्राज्ञाभंगाचें फळ मुलांस मिळालें व आईची विरक्तता वाढून तिचें चित्त विठ्ठलाकडे अधिकच लागलें. हरीची बायको गरोदर होती, तिला बाळंतपणासाठीं नवलाख उंबऱ्यास तिच्या माहेरीं पाठविलें. ती बाळंत होऊन तिला मुलगा झाला त्याचें नांव विठ्ठल असें ठेवण्यांत आलें. दुःखशोक व वैराग्यसहित भगवत्प्रेम यांच्या विरुद्ध

---

१ महिपतबावांनीं सामान्यतः इतकेंच लिहिलें आहे कीं यांनीं राजदर्शन घेतलें, रायानें यांना संपत्ति दिली, त्या रायावर पुढें परचक्र आलें, घोरांदर युद्ध झालें, त्या रणीं उभयतां शूर पडले. राजा कोण, काठला, युद्ध कधीं झालें, परचक्र कोणाचें आलें याबद्दल स्पष्ट बोध होईल असें कोठेंही कांहीं एक प्रमाण सांपडत नाहीं. तथापि दोघांनीं अनुमानांवर अनुमानें लढवून कांहीं तर्क काढले आहेत. तुकोबांचा जन्म शक १४९० धरून रा. राजवाडे लिहितात कीं "तुकारामाचे पूर्वज त्याच्यासारखेच शांत व नियमबद्ध असल्यामुळें तेही वयातीत होऊन वारले असावे. तेव्हां तुकारामाच्या घराण्याची दरपिढी ३०।३५ वर्षांची धरली असतां अशास्त्र होणार नाहीं. दर पिढीस ३५ वर्षें धरून १४९० पासून ८ पिढ्या मोजल्या तर विश्वंभर शक १२१० त व त्याचा मुलगा शक १२४५ स हयात होता असें दिसतें. शक १२४० त मुबारिकानें हरपाळास मारून देवगिरीचें राज्य घेतलें अशी इतिहासांतरीं माहिती आहे. तिशीं वरील हकीकतीचा मेळ घालतां असें दिसतें कीं विश्वंभराचा मुलगा मुकुंदराव शक १२४० तील लढाईंत देवगिरीजवळ लढून मेला. !' रा. रा. भिडे यांनीं हे तर्क खोटे ठरवून असा स्वतःचा तर्क काढला आहे कीं "प्रत्येक पिढी २०।२५ वर्षांचीच धरणें युक्त असल्यामुळें विश्वंभराचा काळ शके १३१५ हा येतो व हरि आणि मुकुंद हे विजयानगरच्या कोणातरी राजाच्या पदरीं असावेत !!"

ल्याटांनीं आमाबाईची वृत्ति उदासीन झाली. वृद्धपणीं जराजर्जरित तनु झाली असतांना तिच्या उपास्यानें तिला धीर दिला. तिच्यावर पूर्ण कृपा झाली व लहानग्या नातवाला मागें टाकून तिनें स्वर्गलोकीं[1] प्रयाण केलें.

७ हरीचा मुलगा विठ्ठल. मातापित्यांच्या वियोगदुःखामुळें विठ्ठलास तारुण्यांत वैराग्य उत्पन्न झालें व त्याचें चित्त देवाकडे चांगलें लागलें, त्या विठोबाला पदाजी नामक पुत्र झाला. त्या पदाजीचा शंकर, शंकराचा कान्हया व कान्हयाचा पुत्र बोल्होबा हा तुकाराममहाराजांचा जनक होय.

८ तुकोबांच्या वंशावळीचा एक अभंग देतों:—

मूळ पुरुष विश्वंभर । विठ्ठलाचा भक्त थोर ॥ १ ॥
त्याचे भक्तीनें पंढरी । सांडूनि आले देहू हरी ॥ २ ॥
तया पुत्र हरी जाला । सुत विठ्ठल तयाला ॥ ३ ॥
पुत्र पदाजी तयासी । शंकरनामा त्याचे वंशीं ॥ ४ ॥
शंकराचा तो कान्होबा । पुत्र तयाचा बोल्होबा ॥ ५ ॥
नामा होता वैकुंठासी । देव पाठवी तयासी ॥ ६ ॥
बोल्होबाचा पुत्र होणें । आज्ञा देत नारायण ॥ ७ ॥
नामा सोडूनि वैकुंठा । येत कनकाईच्या पोटा ॥ ८ ॥
देव नाम ठेवी तुका । वीर वैष्णव भक्त निका ॥ ९ ॥
सकळां तारीत जीवांसी । देही घेतला वैकुंठासी ॥ १० ॥
तुकोबाची वंशावळ । दास वर्णितो प्रेमळ ॥ ११ ॥

देहूस ह. भ. प. वासुदेवबुवांच्या एका जुन्या बाडांत मला हा

१ तुकयाबंधु कान्होबा यांनीं तुकोबांच्या प्रयाणानंतर जे दुःखशोकाचे उद्गार काढले व देवांशीं मांडण केलें त्या प्रसंगीं " पूर्वी पूर्वजांची गती । हेचि आइकिली होती । सेवे लावूनी श्रीपती । निश्चिती केली तयांची ॥ १ ॥ असे २१ व्या अभंगांत उद्गार काढले आहेत ते आमाबाईच्या चरित्राला उद्देशूनच असावेत असें मला वाटतें.

वंशावळीचा अभंग मिळाला. हा रचणारा दास कोण तें माहीत नाहीं.

तुकोबांच्या वडील पुत्राचे ( महादेवबोवांचे ) वंशज रामभाऊ देहूकर यांचेकडे पंढरपूर क्षेत्रीं मला पुढील वंशावळ मिळाली:—




महिपतबावांनीं संतलीलामृतांत दिलेली वंशावळ व ही वंशावळ अगदीं जुळतात. तुकोबांच्या देहूकडील वंशजांकडेही हीच वंशावळ आहे. ‘ केशवचैतन्यकल्पतरु ’ ग्रंथांत निरंजनस्वामीनीं दिलेली वंशावळही इच्याशींच जुळते.

देहूचीं दप्तरें चाळीत असतां मला त्यांत पुढील लेख मिळाला. तो तुकोबांचे नातु उद्धवबोवा यांच्या हातचा दिसतो. तो असा:—

श्री

" यादि वंशावळ स्वामीची मूलपुरुष विश्वंभरबावा यास पुत्र दोघे वडील हरि धाकटे मुकुंद हरीबावास पुत्र विठोबा विठोस पुत्र पदाजी पदाजीस पुत्र शंकरबावा शंकरबावा यांचे पुत्र कान्होबा कान्होबा यास पुत्र बोल्होबावा पुत्र वडील सावजीबावा मधवे तुकारामबावा व धाकटे कान्होबा सावजी बावाचे काही नाही तुकोबास पुत्र तिघे वडील महादेव मधवे विठोबा धाकटे नारायणबावा महादेवबावास पुत्र आबाजीबावा आबाजीबावास पुत्र तिघे वडील माहादेवबावा मधवे मुकुंदबावा व धाकटे जयरामबावा विठोबास पुत्र चौघे वडील रामाजीबावा व उधोबा व गणेशबावा व गोविंदबावा रामाजीबावास काही नाहीं उधोबावाचे पुत्र वडील खंडोबा मधवे विठोबा धाकटे नारायणबावा कान्होबा यास गंगाधरबावा गंगाधरबावा याचे खंडोबा खंडोबावाचे गंगाधरबावा "

तुकोबांच्या वंशावळीबद्दल इतकीं प्रमाणें असतांना आतां त्याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं. राजवाडे यांनीं तुकोबांचा जन्मशक १४९० ज्या वंशावळीवरून ठरविला ती वंशावळ चुकीची होय असें मुक्र मानण्यास आतां मुळींच हरकत राहिली नाहीं.

याप्रमाणें तुकोबांची जातकुळी, त्यांचे पूर्वज व त्याची वंशावळ याविषयीं मिळालेली विश्वसनीय माहिती या प्रकरणांत दाखल केली आहे.

---

# प्रकरण तिसरें.



# संसाराचा अनुभव.



देवाची ते खूण आला ज्याच्या घरा ।
त्याच्या पडे चिरा संसारासी ॥ १ ॥

१ तुकोबांच्या अवतारकालीन महाराष्ट्राची धर्मजागृति. २ तुकोबांचे आईबाप. ३ बाळपण. ४ संसारसुखाचा अनुभव. ५ मातृप्रेमाची महती ६ दुःखाचे डोंगर. ७वैराग्योत्पत्ति. ८ खतपत्रें बुडविलीं. ९ एकांतवास व यात्रा.

१ तुकोबांचा जन्म शके १५३० मध्यें झाल्याचें पहिल्या प्रकरणांत सिद्ध केलेंच आहे. आतां महाराष्ट्राच्या क्षितिजावर तुकोबांसारख्या भक्तचूडामणीचा उदय झाला त्या काळच्या महाराष्ट्राचें विहंगमदृष्टीनें थोडक्यांत पर्यालोचन करूं. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या काळीं महाराष्ट्र समग्र ऐश्वर्य पूर्णपणें भोगीत होता. यादव उर्फ जाधव राजे देवगिरी ( दौलताबाद ) येथून महाराष्ट्राचें राज्य उत्तम प्रकारें चालवीत होते. श्रीज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत " तेथ यदुवंशविलास । जो सकळकळानिवास । न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र " याप्रमाणें तत्कालीन महाराष्ट्र भूपतीचें ज्ञानोबारायांनीं गौरव केलें आहे. [तेराव्या शतकांत रामदेवराव जाधवासारखे धर्मशील राजे, हेमाद्रि उर्फ हेमाडपंतासारखे विद्वान् व बुद्धिवंत मुत्सद्दी, बोपदेवासारखे पंडित, श्रीज्ञानेश्वरमहाराजासारखे अवतारी भागवतधर्मप्रवर्तक, नामदेवासारखे सगुणप्रेमी संत, चोखामेळा, गोरा कुंभार, सावतामाळी यांसारखे सर्वजातीय भक्त व मुक्ताबाईजनाबाईसारख्या परमभक्त स्त्रिया—

असलीं नररत्नें ज्या काळांत महाराष्ट्रमंडळांत चमकलीं तो काळ परमधन्य होय! शके १२१२ मध्यें ज्ञानेश्वरीसारखा महाराष्ट्र वाङ्मयांतला कोहिनूर महाराष्ट्राला भाग्यानें मिळाला. या काळानंतर लवकरच उत्तरेकडून यवनांच्या फौजा दक्षिणेवर कोसळल्या व दक्षिण देश यवनांच्या सत्तेखालीं गेला. तीनचारशें वर्षें मुसलमानांचा अंमल दक्षिणेवर चालला, तरी तो सर्वतोमुखी होता असें नव्हे. शिरक्यांसारखीं कित्येक मराठ्यांचीं घराणीं आपापले गड व प्रदेश संभाळून मोठ्या मर्दपणानें स्वतंत्र राहिलीं होतीं. गुलबर्ग्याच्या बाहमनीशाहीचा करडा अंमल चालू असतांच तुंगभद्रेच्या तीरावर विद्यारण्यस्वामी उर्फ माधवाचार्य यांनीं हरिहर व बुक्क हे तरुण राजपुत्र हातीं धरून त्यांजकरवीं विजयानगरच्या राज्याची स्थापना करविली. बाहमनीशाहीचीं पांच शकलें झाल्यापासून मराठे वीर व ब्राम्हण मुत्सद्दी यांनीं हळूहळू पाय पसरण्यास सुरवात केली व शिवाजी महाराजांचा जन्म शके १५४९ मध्यें झाला तत्पूर्वी महाराष्ट्रमंडळांत सजीवतेचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. मधलीं परतंत्रतेचीं तीन शतकें महाराष्ट्रास फार कष्टाचीं गेलीं, तरी मराठामंडळाची तेजस्विता समूळ नष्ट झाली नव्हती, मराठ्यांचा पीळ गेला नव्हता, व हा परधर्मीय राजसत्तेचा काळ धर्मग्लानीचा गेला तरी या काळांत झालेल्या संतकवींनीं धर्मनिष्ठेची ज्योत विझूं न देण्याची पराकाष्ठा केली. तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरनामदेवादि सत्पुरुषांनीं भागवतधर्माची संस्थापना करून त्याची पताका महाराष्ट्रभर नाचविली होती. ते त्यांचे उद्योग निष्फळ झाले नाहींत. त्यांनीं जीं उदार धर्मतत्त्वें पेरून ठेवलीं त्यामुळें यवनी अंमलांतही हिंदूंचें हिंदुत्व कायम राहिलें. या काळांत जे संत व कवि झाले त्यांच्या कामगिरीमुळें धर्माचा पूर्ण ऱ्हास तर झाला नाहींच, पण प्रतिकूळ काळाशीं टक्कर देत महाराष्ट्रसमाज चिकाटीनें दचा

धरून राहिला. स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा या तिहींचा उत्कर्ष म्हणजे राष्ट्राचा उत्कर्ष व या तिहींचा अपकर्ष म्हणजे राष्ट्राचा मृत्यु. महाराष्ट्र पराधीन झाला होता, पण त्यानें आपला धर्म आणि भाषा यांचा बाणा प्रतिकूळ परिस्थितींतही संभाळला. मुसलमानांची नोकरी करणाऱ्या मराठे वीरांतून जसे पुढें शहाजी-राजांसारखे कर्तबगारीचे मुत्सद्दी निघाले, त्याप्रमाणें यवनांची सेवा करणाऱ्यांत दामाजीपंत व जनार्दनस्वामी यांसारखे परम भागवत हे लोकांची धर्मनिष्ठा जागृत ठेवण्यास कारणीभूत होत होते. परधर्मीय अंमलांत आचारविचाराची नेहमीं क्रांती होत असते. जिवंत धर्म आचार आणि विचार या दोहींचा मिळून असतो. बुद्धधर्माची लाट परत फिरवतांना प्रथम आचारधर्म कुमारील भट्टांनीं जागविला व नंतर आचार्यांनीं ज्ञानमार्गाचा डंका गाजविला. तसाच प्रकार महाराष्ट्रांतही झालेला आहे. शके १३०० पासून श्रीपादश्रीवल्लभ व नृसिंहसरस्वति यांनीं जें धर्मजागृतीचें कार्य केलें त्याची ओळख शके १४७० च्या सुमारास झालेल्या ‘ गुरु-चरित्रा’—वरून होणारी आहे. नृसिंहसरस्वति शके १३८० बहुधान्य संवत्सरीं माघ वद्य १ स ‘ निजानंदीं बैसले ’ ( गु. च. अ. ५१ ) शके १३९६ च्या थोरल्या दुष्काळांत दामाजीपंतांनीं उदारपणें आपल्यावर संकट ओढवून घेऊन हजारोंचे प्राण वांचविले. देव भक्तांचा सदैव पाठीराखा आहे हें देवांनीं विठ्या महाराचें रूप घेऊन सर्वांच्या प्रतीतीस आणलें. कान्हुपात्रा वेश्या, पण तिच्या निष्ठेनेंही भक्तिमार्गावरील लोकांचा विश्वास कायम राहिला. मंगळवेढ्याच्या दामाजीपंतांप्रमाणेंच इकडे देवगडीं ( दौलताबाद ) जनार्दनस्वामींच्या तपश्चर्येनें मोठें कार्य केलें. जनार्दन स्वामीचे शिष्य एकाजनार्दन, जनीजनार्दन व रामाजनार्दन हे होत. चांगदेव दासोपंत इ० अनेक भक्त या काळीं झाले. एकनाथ महाराजांच्या

शके १४५०–१५२०) उदार चारित्र्यानें भागवतधर्माचा महाराष्ट्र-
र पुन्हा प्रचंड जयजयकार झाला. एकनाथी भागवत ( शके
४९५ ), रुक्मिणीस्वयंवर ( शके १४९३ ), भावार्थरामायण,
ज़ारो अभंग व भारुडें यांची महाराष्ट्र वर मोठी छाप बसली. सप्त-
ंगीवर त्र्यंबकराय, चिंचवडास मोरया गोसावी, शिंगणापूर येथें
हालिंगदास, इ० सर्व प्रांतांत शके १५०० च्या सुमारास अनेक
गवद्भक्त व ग्रंथकर्ते निर्माण झाले. या सर्वांचें मिळून जें कार्य
ालें तें भागवतधर्माचा प्रचार करण्याचेंच झालें असल्यामुळें उपा-
ना वेगळाल्या झाल्या किंवा संप्रदाय भिन्न झाले तरी स्वधर्म-
ागृतीचें कार्य सर्वांनींच केलें आहे. ज्ञानेश्वरनामदेवानंतर फार
ोठें कार्य नाथांचेंच झालें आहे. नाथांनीं गुरुकृपाबळानें महाप्रा-
ादिक ग्रंथ रचले इतकेंच नव्हे तर त्यांच्या चारित्राचा लोकसमू-
ावर फार मोठा संस्कार घडला. जनार्दनस्वामींप्रमाणेंच नाथांनीं-
ही ज्ञानेश्वरीवर पुराण सांगण्याचा उपक्रम केल्यापासून ह्या अनुपम
ग्रंथाकडे सर्वांचें लक्ष वेधलें. नाथांच्या अवताराचा परिणाम देवगड,
पैठण, पंढरपूर या प्रांतींच झाला असें नसून पुणें प्रांतींही झाला.
शके १५०५ ला नाथांची स्वारी शेंकडो वारकऱ्यांसह आळंदीस
आली होती. तेथें त्यांचा मुक्काम तीन महिने होता. नित्य कीर्तन-
भजनांचा थाट उडून राहिला होता. तेथें कोणांपासून पैसा न घेतां
एका लिंगायत वाण्याच्या मिषानें पांडुरंगानें सर्वांना शिधा पुरविला
व नाथांना ऋणमुक्त केलें. ही गोष्ट पुणें प्रांतीं गाजून राहिली
असून तुकोबांनींही—

प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण। एकोबाचें रीण फेडियेलें ॥ १ ॥

याप्रमाणें ५० वर्षांनंतर एके ठिकाणीं तिचा उल्लेख केला आहे.
नाथ आळंदीहून गेल्यापासून आळंदीची वारी सुरू झाली व १०

१ नारायण कृष्ण गद्रे यांचा 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' हा प्रबंध पहा.

च वर्षांनीं ह्म. शके १५१५ चे सुमारास एका देशपांड्यानें ज्ञानोबारायांच्या समाधीपुढें सभामंडप उभारला—नाथांच्या आगमनापासून आळंदीचें माहात्म्य ज्यास्त वाढलें, यात्रा अधिक जमूं लागली, ज्ञानेश्वरीचीं पारायणें अधिक होऊं लागून भागवतधर्मावरील लोकांची प्रीति अतिशय वाढली. नाथांनीं पैठणास शके १५२० त समाधि घेतली व त्यानंतर १०च वर्षांनीं देहूस तुकोबारायांचा जन्म झाला! तुकोबांचा व रामदासस्वामींचा जन्म एकाच सालांत होऊन त्यांच्या द्वारें महाराष्ट्रांत कृष्णभक्ति व रामभक्ति यांचा प्रसार व्हावयाचा होता. गुरुचरित्राचा दत्तसंप्रदाय, पंढरी वा वारकरीसंप्रदाय, समर्थांचा रामदासीसंप्रदाय हे व इतर सर्व भगवद्भक्ति शिकवणारे संप्रदाय भागवतधर्माचेच होत व त्यांच्या मुख्य सिद्धांतांत कांहींएक भेद नाहीं. सर्वांनीं एकच धर्मजागृतीचें कार्य केलें. तुकोबा व समर्थ हे १९ वर्षांचे असतांना ह्म० शके १५४९ सालीं पुणें प्रांतांतच शिवनेरीवर शिवाजी महाराजांचा जन्म झाला. तुकोबा, समर्थ व शिवराय ह्या तीन महाविभूति आहेत व यांच्या कार्याला पोषक अशा गुणांचे अनेक लोक यावेळीं महाराष्ट्रांत जन्म घेत होते. प्रवृत्ति निवृत्ति परस्परविरोधी नसून एकमेकांच्या पोषक आहेत असें महाराष्ट्रास सिद्ध करून दाखवावयाचें होतें. या महात्म्यांचे अवतार हे 'भवोहि लोकाभ्युदयाय तादृशाम्' ह्या कालिदासोक्तीप्रमाणें लोकांच्या अभ्युदयार्थच झाले. हा अभ्युदय कसा झाला तो इतिहास सर्वांस माहीत आहेच. महाराष्ट्रास भाग्याचे दिवस दाखविण्यासाठीं ह्या थोर पुरुषांचे अवतार झाले. मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवायची ती ही कीं श्रीज्ञानेश्वरनामदेवांनीं ज्या भागवतधर्माची महाराष्ट्रांत स्थापना केली व ज्याचा प्रसार करण्यासाठींच नाथांचा अवतार झाला त्याची नाथांनीं आळंदीस येऊन पुणेंप्रांतांत चांगली जागृति केली. अशा

ुभकाळीं तुकोबारायांचा जन्म देहूस झाला! ज्ञानेश्वरनामदेव-
ाथांचेंच उरलेलें धर्मकार्य पुरें करण्यासाठींच तुकोबाराय देहूस
वतरले. भगवान् श्रीकृष्णाच्या हृदयांत उदय पावून पुंडलीकाच्या
ायमुखानें महाराष्ट्रांत प्रकट झालेली भागवतधर्माची भागीरथी
ानेश्वरनामदेवएकनाथ अशा प्रचंड लाटांनीं वाहत असतां
तिची तशीच नवी प्रचंड लाट तुकोबांच्या रूपानें पुण्यप्रांतीय
नतेच्या भाग्यानें तिच्यावर आली! बहिणाबाईच्या भाषेंत
ोलायचें तर ज्ञानदेवांनीं ज्याचा पाया रचिला, नामदेवांनीं ज्याचा
िस्तार केला, एकनाथांनीं ज्यावर पताका फडकावली त्या भागवतधर्म-
ासादाचा कळस तुकोबाराय झाले!)

२ तुकोबाचे भाग्यशाली जनक बोल्होबा व पुण्यवती जननी
नकाई यांनीं देहूस बरींच वर्षे संसार सुखाचा केला. बोल्होबांनीं
ळदेव श्रीविठ्ठल याची सप्रेम उपासना केली व पंढरीची आषाढी-
ार्तिकीची वारी सतत चाळीस वर्षे चालविली. क्षुधार्ताला अन्न
ावें, तृषाक्रांताला पाणी पाजावें, गोरगरिबांना दयाळुपणानें वेळो-
ळीं साह्य करावें, वैष्णवसाधुसंतांचा मनापासून परामर्ष घ्यावा,
घरच्या विठ्ठलमूर्तीची मनोभावें पूजाअर्चा, भजनपूजन करावें;
शा प्रकारें त्या दंपत्यानें आयुष्याचीं बरींच वर्षे परोपकारांत व
्यकर्माचरणांत घालविलीं. बोल्होबांचा तर 'प्रपंचव्यवहार
रितां। तेथें न बोलें असत्य सर्वथा' असा बाणा होता. बोल्हो-

---

१ शक १५०५ मध्यें नाथरायांची स्वारी आळंदीस असतांना त्यांच्या दर्श-
ास व कीर्तनांस बोल्होबा कनकाईसह अनेकवार गेले असतील व नाथांच्या
ष्टीही पुढें त्यांच्याच तोंडून तुकोबांना बाळपणीं ऐकायला मिळाल्या असतील
सें मला वाटतें. बोल्होबा परंपरेचे वारकरी व स्वतः भाविक आणि त्या
प्रदायाचे सर्वत्र गाजलेले महंत एकनाथ घरापासून तीन कोसांवर आळंदीस
ालेले, तेव्हां त्यांनीं अशी सोन्यासारखी संधी दवडली असेल असें वाटत नाहीं-

वा प्रपंचांतही दक्ष होते. थोडी फार सावसावकारकी, व्यापारधंदा, शेतवाडी हा उद्योग प्रपंचासाठीं त्यांनीं चालविला होता. आपला व्यापार दयाळुपणानें व सचोटीनें ते चालवीत असत. त्यांना प्रथम पुत्र सावजी झाला. दुसऱ्या पुत्राच्या वेळीं कनकाईला वैराग्याचे डोहळे होऊं लागले. एकांतांत बसावें, कोणाशीं फार बोलूं चालूं नये, प्रपंचाकडे लक्ष देऊं नये अशी त्यांची उदासवृत्ति झाली. त्यांचे पोटीं महाविष्णुभक्त जन्म घेणार होता म्हणूनच कीं काय कोण जाणे त्यांना नामदेवरायांचे अभंग ऐकावेत, कीर्तन ऐकावें, विठ्ठल-मंदिरांत एकटेंच विठोबारखुमाईच्या मूर्तींकडे घटकाघटका पाहत बसावें असेंच वाटे. त्यांचे उदरीं तुकोबारायांचा यथाकाल जन्म झाला. महिपतबाबा प्रेमानें ह्मणतात (भक्तलीलामृत अ० २६ ):—

ना ते मुक्तीवरील चौथी भक्ती । तेचि महानक्षत्र स्वाती ।
कनकाईचे उदरीं निश्चिती । अपांपती तोचि कीं ॥ ११८ ॥
त्या उदरशुक्तिकेंत तत्काळ । नामयाचें प्रेम पडलें जळ ।
त्यांत तुका जन्मला मुक्ताफळ । हरिप्रेमळ भक्त त्याचें ॥ ११९ ॥
नवविधा भक्ति केली सायासें । तेचि पूर्ण झाले नवमास ।
कनकाईचें भाग्य विशेष । विष्णुभक्त उदरासी आला कीं॥१२०॥

कनकाईचें भाग्य थोर यांत कोण संशय घेईल ? भगवंताला आपल्या निस्सीम भक्तीनें नाचायला लावणारा व तिहीं लोकीं सत्कीर्तीचा झेंडा फडकावणारा सत्पुत्र प्रसवणाऱ्या या माउलीच्या भाग्याचा कोणत्या पुत्रवतीला हेवा वाटणार नाहीं. ? कनकाईचें एका जन्माचें नव्हे तर अनंत जन्मांचें महत्पुण्य

---

१ कनकाईला नामदेवांच्या अभंगांचें वेड होतें, नामदेवांचे अभंग कीर्तन-भजनांत वारंवार ऐकून त्या सुधामधुरवाणीविषयीं त्यांना अतोनात प्रेम वाटत होतें, व कित्येक त्यांच्या पाठांत होते असा अर्थ केल्यास चूक होईल काय ?

म्हणूनच तुकोबासारख्या पुत्रश्रेष्ठाच्या संभवाचा देवलोकींही दुर्लभ असा थोर मान त्यांच्या पवित्र कुशीला मिळाला. ‘ घोट-वीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं ’ असा कीर्तनभक्तीचा डांगोरा पिट-णारा समर्थ पुत्र जिच्या उदरीं आला ती खरी पुत्रवती होय. वैराग्यलाभास्तव विषयांच्या ठिकाणीं दोषदर्शन व्हावें यासाठीं वेदांतशास्त्रानें व साधुसंतांनींही स्त्रीनिंदा केली आहे. पुढील दोहरा प्रसिद्ध आहेः—

नारीओको निंदो नये नारी नरका खान ।
जिस खानमे पैदा हुवे भीष्म राम हनुमान् ॥

ज्या खाणींत असलीं रत्नें पैदा होतात त्या स्त्रीजातीचीं निंदा कोण जाणता करील ? श्रीकृष्णाला उदरीं वाहणाऱ्या देवकीचें व त्याचें कोडकौतुक भोगणाऱ्या यशोदेचें भाग्य जसें थोर तसेंच तुकोबांसारख्या सत्पुत्रांस प्रसविणाऱ्या मातांचेंही भाग्य खचित थोर होय. असो. तुकोबांच्या पाठीमागून कान्होबा आले. सावजी, तुकोबा व कान्होबा अशा तीन पुत्रांच्या बाललीला अव-लोकन करून बोल्होबा व कनकाई यांना धन्य धन्य वाटत असेल यांत नवल तें काय ?

३ तुकोबांच्या वयाचीं पहिलीं तेरा वर्षें मातापित्यांच्या सुख-शीतल संरक्षक छायेखालीं मोठ्या आनंदांत गेलीं. त्यांना लहान-पणीं बाहेरच्या मुलांशीं खेळण्याचा बराच छंद असावा असें वाटतें. श्रीकृष्णाच्या व त्याच्या सवंगड्यांच्या बाललीला त्यांनीं मोठ्या हौसेनें, आवडीनें वर्णिल्या आहेत. टिपऱ्या, चेंडू, मृदंग, पाख्या, हुतुतू, हमारा, हुंबरी, विटीदांडू, कुरघोडी, इत्यादि विषयांवरचे त्यांचे अभंग, काल्याचे अभंग व देवाशीं प्रेमकलह करितांना घेतलेले खेळांतले मौजेचे दृष्टांत वगैरे सर्व प्रकार पाहतां ते बाळपणीं एखादा एकलकोंड्या मुलासारखे नसून मूलपणाचे खेळ मोठ्या

उमेदीनें खेळणारे उत्साही खेळाडू असावेत असें वाटतें ! देवाशीं मांडतांना त्याला ' लंडी ' म्हणणें, ' रडीला आला म्हणणें, ' डाव अंगावर आला ' डाव जिंकला ' असें म्हणणें, निवाडा करण्यासाठीं त्याला संतांच्या फडावर नेणें इत्यादि अनेक भाषाप्रकार त्यांच्या बाळपणच्या खेळकर स्वभावामुळें त्यांना सुचलेले दिसतात. मनुष्याच्या आयुष्यांतले अनेक प्रसंग, त्याच्या आवडीनिवडी, त्याचे वेगवेगळे अनुभव, त्याच्या संवयी, त्याच्या परिस्थितींत होणारे पालट, त्याचे सोबती, या सर्वांचें वळण त्याच्या विचाराला व भाषेला लागत असतें. उलटपक्षीं त्याच्या भाषेवरून या सर्वांचें ज्ञान होतें. हे प्रकार फार सावधगिरीनेंच समजून घेतले पाहिजेत. एकच मौजेचें उदाहरण देतों. 'युक्ताहारविहार ' म्हणजे काय हें सर्वांना माहीत आहेच. ज्ञानेश्वरमहाराजांनीं युक्ताहार म्हणजे ' युक्तीच्या मापें मितले ' घास घेणें असा केला आहे, नाथांच्या घरीं रोज अन्नसंतर्पण होऊन ब्राह्मणादिकांना यथेच्छ जेवूं घालण्याचा संप्रदाय होता. त्यांनीं युक्ताहार म्ह० 'देवाला नैवेद्य समर्पण करून त्याचा उच्छिष्ट प्रसाद पोटभर घेणें ' असाच केला आहे ! ते असा अर्थ जर न करते तर ब्राह्मण रोज पानांवरून अर्धपोटी उठते ! असो. मुद्द्याची गोष्ट एवढीच आहे कीं, मनुष्याच्या अनुभवाचें, स्वभावाचें, परिस्थितीचें वळण त्याच्या भाषेला लागल्यावांचून सहसा राहत नाहीं. आतां साधुसंतांच्या सर्व उक्ति परमार्थपर असतात तरी त्यांत व्यवहारही असतो; किंबहुना द्राष्टांत म्ह० सिद्धांत परमार्थाचा व दृष्टांत व्यवहाराचा अशी बेमालूम जोड त्यांच्या वाणींत असल्यामुळें साधूंच्या ग्रंथांत परमार्थाप्रमाणेंच प्रपंचव्यवहारही पुष्कळ शिकायला सांपडतो. ते प्रपंचाच्या भाषेंत पुष्कळदां परमार्थ सांगतात. त्यांचे दृष्टांत, रूपकें, उपमा यांत व्यवहाराचा बोध असतो व सिद्धांत अर्थातच परमार्थाचे असतात.

असो. तुकोबांचें बाळपण सारें खेळांतच गेलें असें सांगण्याचा हेतु नाहीं. खेळकरपणाचा रंग त्यांच्या वाणींत दिसतो, एवढाच अभिप्राय आहे. पांडुरंगभजनाचें वळण घरचेंच होतें.

४ बोल्होबांनीं यथाकाल आपल्या तीन ही मुलांचीं लग्नें क्रमानें करून घेतलीं. हीं लग्नें अर्थातच त्यांच्या बाळपणीं झालीं. तुकोबांचें पहिलें लग्न झालें तेव्हां त्याचें वय बारा वर्षांचें असेल. त्यांच्या बायकोचें नांव रखुमाई असें होतें. पण यानंतर १।२ वर्षांतच तिला दम्याची व्यथा आहे असें जाणून तुकोबांच्या आईबापांनींच त्यांचें दुसरें लग्न पुण्याचे आप्पाजी गुळवे ह्मणून एक धनवंत सावकार होते त्यांच्या मुलीशीं करून दिलें. तुकोबांच्या ह्या दुसऱ्या बायकोचें नांव जिजाबाई उर्फ आवळी असें होतें. ह्याप्रमाणें मुलें व सुना यांनीं घर गजबलेले पाहिलें तेव्हां कनकाईला संसारसुखाची धन्यता वाटली असेल! पहिली बायको असतांना दुसरी केल्याचा दोष-असल्यास-पण तोही तुकोबांकडे येत नाहीं. हें यावरून उघडच झालें. पुत्रस्नुषांचें कौतिक पाहत कनकाई आनंदांत होती, महिपतबावांनीं 'पुत्र स्नुषा धन संपत्ती। भ्रतारयुक्त सौभाग्यवती। याहूनि आनंद स्त्रियांचे चित्तीं। नसे निश्चित दुसरा' असें ह्मटलें आहे तें बरोबर आहे. बोल्होबांचें वय झालें होतें, फार नसले तरी ५० चे आंत बाहेर असावें. त्यांचाही हा काळ सुखांत जात होता हें उघड आहे. 'सर्व साहित्य अनुकूळ। उदीम करितां होय सफळ। उणें पडों नेदी अळुमाळ। दीनदयाळ तयाचें॥' आतां बोल्होबांच्या मनांत मुलांच्या गळ्यांत संसार घालून आपण मोकळे व्हावें असें आलें. त्यांनीं वडील पुत्र सावजी यास जवळ बोलावून प्रपंचभार शिरीं घेण्यास सांगितलें व सावजीनें नम्रतेनें पण स्पष्ट सांगितलें कीं 'मला प्रपंचांत गुंतून पडायचें नाहीं. तीर्थाटणास जावें व देहाचें सार्थक करावें असा माझा निश्चय आहे!'

बोल्होबांनीं पुष्कळ सांगून पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सावजीविषयीं त्यांची निराशा झाली व त्यांनीं संसार तुकोबांच्या गळ्यांत घातला. यावेळीं तुकोबांचें वय अवघे तेरा वर्षांचें होतें. वयाच्या तेराव्या वर्षीं संसार गळ्यांत पडला तरी तुकोबांनीं जमाखर्च ठेवणें, टिपणटांचण पहाणें, शेताकडे व सावकारीकडे दक्षतेनें पाहणें, दुकानाची व्यवस्था नीट पहाणें हीं सर्व कामें हळुहळु अंगावर घेऊन तीं फार अक्कलहुषारीनें चालविलीं आणि हा वाण्याचा मुलगा मोठा हुषार, दक्ष, मेहनती व प्रामाणिक आहे असें सर्वांकडून ह्मणवून घेतलें. त्यांनीं प्रथमच खर्डाखतावणी पाहून सर्व ऐवज ध्यानास आणला. बोल्होबांनीं तुकोबांस 'देणें घेणें उदीम हातवटी । तोट्यानफ्यांत असावी दृष्टि । जेणें स्वहित होईल शेवटीं ! तैसी गोष्टी करावी ' अशा प्रकारचा उपदेश केला. तुकोबांनीं आपण असेंच वागूं म्हणून सांगितलें. तुकोबा वैखरीनें असें बोलले खरे, पण त्यांच्या सूक्ष्म अंतरात्म्याला ' बापारे ! प्रपंचांत नफा श्रीहरि व तोटा अशाश्वतसंग्रह ही नफ्यातोट्याची दृष्टि ठेवून स्वहित जें श्रीहरिपदप्राप्ति तें जोड ' असाच या उपदेशाचा अर्थ कोणी तरी अदृश्य शक्तीनें सांगितला ! तुकोबांनीं प्रपंचव्यवसाय उत्तम रीतीनें चालविलेला पाहून त्यांच्या आईबापांस आनंद वाटला. ' ज्येष्ठ कनिष्ठ दोघी भार्या । आणि संसारही आत्मरी तुकया ऐसी स्थिति देखोनियां । मातापितयां संतोष ' असे बावांनीं उद्गार काढले आहेत. तुकोबांचें वैश्यव्यवसायांतील नैपुण्य पाहून त्यांचे सगेसोयरे व शेजारीपाजारीही बोल्होबाजवळ स्तुतिपर उद्गार काढूं लागले. 'मातापिता बंधु सज्जन । घरीं उदंड धनधान्य । शरीर आरोग्य लोकांत मान्य । एकहि उणें असेना ' याप्रमाणें चार वर्षे संसार नेटका करून तुकोबांनीं लोकांकडून भलें म्हणवून घेतलें !

५ ह्या काळांत तुकोबांना आईबापांचें सुख—विशेषतः मातृसुख—

उत्तम प्रकारें भोगायला सांपडलें असावें असें त्यांच्या अभंगांवरून वाटतें. परमात्म्याकडे आईचें व बापाचें अशीं दोन्ही नातीं आहेत तरी त्यांनीं देवाला आई ह्मणूनच बहुधा संबोधिलें आहे. ' माता धाता पितामहः ' ' पितासि लोकस्य चराचरस्य, ' इत्यादि प्रकारें श्रीगीतेनें देवाच्या उभयसंबंधांचा उल्लेख केला आहे व आई आणि बाप या दोघांचे उपकार सारखेच आहेत तरी आईच्या चित्ताचा जिव्हाळा कांहीं वेगळा आहे. श्रुतिमाउलीनेंही ' मातृदेवो भव पितृदेवो भव ' याप्रमाणें उपदेश करितांना आईचाच प्रथम उल्लेख केला आहे. ' आई ' या शब्दांत जी माधुरी आहे, जी जादू आहे, जें प्रेमसर्वस्व आहे तें दुसऱ्या कोणत्याही एका शब्दांत नाहीं ! आईचें हृदय हें केवढ्याही प्रखर उष्णकाळांत न आटणारें व सर्वदा कांठोकांठ भरून वाहणारें अमृताचें सरोवर आहे. आईचें प्रेम हें सर्वजीवांचें जीवन आहे. ईश्वराची ती मूर्तिमंत कृपा आहे. ईश्वराची वत्सलता कोठें पाहावयाची असेल तर आईच्या कोमल हृदयांत पहावी. आई कोणत्याही लोभानें वत्सावर प्रेम करीत नाहीं. तिचें प्रेम निर्निमित्त असतें. आपण वाढतों व जगतों आईच्या दुधावर, पण दूध हें तिच्या रोमरोमांत खेळणाऱ्या प्रेमाचें केवळ बाह्यस्वरूप आहे. ' तुका ह्मणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ' हें अक्षरशः खरेंच आहे, तरी त्यांतल्या त्यांत मातृप्रेमाची गोष्ट कांहीं न्यारी आहे. तुकोबांनीं देवाला ' विठाई ' ' विठोमाउली ' असेंच वारंवार संबोधिलें आहे. मातृप्रेम जसें ईश्वरी आहे तसें मातृप्रेमाची संपूर्ण जाणीव अपत्याच्या ठिकाणीं असणें हाही ईश्वरी प्रसाद समजला पाहिजे. मातृप्रेम सहज आहे तशी मातृभक्ति ही वस्तुतः सहज आहे-असायला पाहिजे;पण पाण्याचा ओघ खालीं धांवतो, पाणी वर चढत नाहीं, त्याप्रमाणें ह्या विचित्र संसारांत आईचें प्रेम मुलांवर जसें सहज असतें तसें तितक्या कोटीचें मुलाचें आईवर

असलेलें प्रेम क्वचित् पाहण्यास सांपडतें ! बाळ स्तनंधय असतें तों-पर्यंत तें अनन्यगतिक असल्यामुळें मातृप्रेमाला प्रत्युत्तर उत्तम प्रकारचें देतें; पण तेंच बाळ मोठें झालें कीं प्रथम खेळगड्यांच्या संगतींत, नंतर तरुणपत्नीच्या लोभांत, त्यापुढें स्वतःच्या अपत्यप्रेमांत, याप्रमाणें त्याच्या प्रेमाला फांटे फुटून तें विभागलें जातें व कित्येक वेळां मूळच्या प्रेमनिर्झराशीं बेईमान सुद्धां झालेलें दिसतें व म्हणून कोठें कोठें मातृप्रेमविमुख कुलांगार दृष्टीस पडतात ! हा प्राकृत जीवांचा नियम असला तरी कांहीं सभाग्य जीवांचें मातृप्रेम आमरण अभंग राहतें. त्यांनाच थोर म्हणतात, तेच थोर पदवीस पावतात. पुंडलीक तरुणवयात मातृप्रेमाला विषयासक्तीमुळें कांहींकाळ विमुख झाले होते, पण मातृभक्तांचें भाग्य कुक्कुटमुक्कुटांच्या आश्रमांत दृष्टीस पडतांच त्यांचे डोळे उघडले व पुढें मातृपितृभक्तीची त्यांनीं एवढी सीमा आचरून दाखविली कीं या भक्तीला भुलूनच भगवान् त्यांच्या दर्शनास आले व अठ्ठावीस युगें विटेवर उभे राहिले आहेत. 'पुंडलीकें काय केलें ? ' मायबापें देवाचीं स्वरूपें भाविलीं ! याचें फळ त्यांना काय मिळालें ? 'परब्रह्म उभें ठेलें ' हेंच पुंडलीकराय मातृपितृभक्तीमुळें संतांचे अग्रणी व महाराष्ट्रांत भागवतधर्माचे आद्य प्रवर्तक झाले लौकिकांतही शिवाजी महाराज, नेपोलियन, शिकंदर वगैरे राजे, मातृभक्तीच्या पुण्यबलावर दिग्विजयी झाले. मातृपितृभक्ति ही सर्व सद्गुणांची खाण आहे. हा आद्य सद्गुण ज्याच्या हृदयांत वसत नाहीं त्याच्या हृदयांत कोणताही सद्गुण उद्भवणार नाहीं, व तो केव्हांही विजयी होणार नाहीं असें खास समजावें. तुकोबांचें हृदय निसर्गतः प्रेमपूर्ण होतें. त्यांना देवानें जन्मतःच प्रेमानें पाझरणारें हृदय दिलें होतें. त्यांच्या वयाच्या १७ व्या वर्षापर्यंत आईबापांचें प्रेम त्यांनीं अनुभवलें व त्यांनींही त्यांच्यावर निरुपम प्रेम केलें. पुढें आईबाप वारले, वडिल भावजय वारली, भाऊ उठून गेला, पहिली बायको अन्नावां-

चून मेली, पहिला पुत्र संताजी मेला, दिवाळें निघालें, नापत झाली—व या संकटपरंपरेनें त्यांचें चित्त उदास झालें, त्यांच्या ठायीं वैराग्य उत्पन्न झालें. त्यांचें प्रेम जसें तीव्र होतें तसेंच त्यांना वैराग्यही जळजळित उत्पन्न झालें. कांहीं काळ सरस्वतीनदीप्रमाणें त्यांची प्रेमवृत्ति गुप्त झाली. तिला प्रकट व्हायला लावण्यासारखी त्यांच्या दुसऱ्या बायकोची वृत्ति नव्हती. ती रागीट, त्रासिक व कर्कश होती. तिचा स्वभाव त्यांची वैराग्यवृत्ति वाढविण्यासच कारण झाला असावा. वैराग्यवृत्ति बळावत असतांना त्यांना देव आवडूं लागला. 'देव!' देव पुढें येतांच त्यांची प्रेम—सरस्वती पुन्हां प्रगट झाली. प्रेमाला उत्तम विषय मिळाला. वैराग्यसंगतीनें दिव्य व पावन झालेल्या ह्या ओघानें देवाला पूर्णपणें व्यापलें. ग्रंथाध्ययन केलें, वाऱ्या केल्या, भजनपूजन केलें, पण देवाच्या सगुणदर्शनाचा ध्यास लागून भयंकर आग पेटली. देहगेहादि सकळ उपाधींचा समूळ वीट आला व साधुसंतांना साक्षात् भेटणारा परमात्मा मला प्रत्यक्ष कधीं भेटेल या एकाच वृत्तीनें त्यांच्या अन्य सर्व वृत्ति पार बुडवून टाकल्या. अग्नीची आंच लागतांच दुधाला ऊत येतो त्याप्रमाणें दृढतम वैराग्याचा उन्हाळा अत्यंत प्रखर होतांच तो करुणामेघश्याम विरघळला. त्यानें त्यांना दर्शन दिलें व तुकोबांचें समाधान झालें. मातृपितृभक्तीचें हें ईश्वरी प्रेमांत रूपांतर झालें. तो सांवळ्या रूपानें भेटणारा परमात्माच हळूहळू सर्व भूतांतर्यामीं वास करीत आहे असा प्रत्यय येऊं लागला. भूतांच्या हृदयांत परमात्मा असून हे जीव व्यर्थ मोहांत पडून दुःख भोगीत आहेत असें दृष्टीस पडतांच त्यांच्या उद्धाराचा कळवळा चित्तांत उत्पन्न होऊन त्यांना जागृत करणारी अभंगवाणी मुखांतून प्रगट झाली. परमेश्वरी प्रेमाचा याप्रमाणें भूतदयेंत विस्तार झाला. मातृपितृप्रेमाचें भगवद्भक्तींत व भगवद्भक्तीचें भूतदयेंत पर्यवसान झालें. ह्याप्रमाणें तुकोबांचें

चरित्र म्हणजे सारा प्रेमाचा इतिहास आहे. त्यांचें हृदय प्रथम स्वोद्धारासाठीं विरघळलें व नंतर भूतदयेनें विरघळलें. संतांच्या हृदयाचें मृदुत्व कुसुमांत नाहीं, चंद्रिकेंत नाहीं, नवनीतांत नाहीं, तें दुसरें कोठेंही नाहीं. प्रेमकला हें त्यांचें स्वरूप आहे. अखंड समत्वानें वाहणारें प्रेम यांतच ते अखेर विरघळून मिळून जातात. भूतांच्या कळवळ्यानें केलेल्या उपदेशप्रसंगीं लौकिक भाषेंत कठोर वाटणारे शब्द त्यांच्या मुखांतून आले तरी त्या शब्दांच्या पाठीपोटीं प्रेम असल्यामुळेंच त्यांचे शब्द सुष्टदुष्ट सर्व जीवांच्या कानांत पडतां पडतांच त्यांनाही सुखाच्या गुदगुल्याच होत असतात. हें तुकोबांच्या सर्व चरित्रांत ओतप्रोत भरलेलें जें दिव्य प्रेम तेंच सतरावर्षांच्या वयापर्यंत त्यांच्या आईबापांना उपभोगायला सांपडलें. असो. हें वाहवत गेलेलें वर्णन जरा आवरून तुकोबांच्या अभंगांत त्यांच्या निःसंशय वांट्याला आलेल्या मातृप्रेमाचे उल्लेख कसे काय आलेले आहेत ते आतां पाहूं. हे अभंग ‘ विठोमाउलीला ’ उद्देशून त्यांनीं पुढें केले आहेत तरी त्यांत दृष्टांतरूपानें जें मातृप्रेमाचें वर्णन अत्यंत रसभरित व अनुभवपूर्ण आलें आहे त्यावरून मातृप्रेमाचें सुख त्यांच्याही वांट्याला उत्तमापैकीं आल्याचें दिसतें.

**नलगे मायेसी बाळें निरवावें । आपलया स्वभावें ओढे त्यासी ॥१॥**
**मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥धृ०**
**ओढधड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥२॥**
**खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥ ३ ॥**
**त्याच्या दुःखें पडे आपण खापरीं । लाही तळीवरी होय जैसी ॥४॥**
**तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥५**

  

**आळविती बाळें । माते तें सुख आगळें ॥ १ ॥**
**द्यावें आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥ धृ० ॥**
**लेववूनि अळंकार । दृष्टी करावी सादर ॥ २ ॥**

आपुलिये पदीं । बैसवूनि कोडें वंदी ॥ ३ ॥
नेदी लागो दिठी । उचलोनि लावी कंठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे लाभा-। वारी ध्यावो पद्मनाभा ॥ ५ ॥

❀ ❀ ❀

प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ॥ १ ॥
बहु नेदी रडों माता । दुश्चित होतां धीर नव्हे ॥ २ ॥

❀ ❀ ❀

लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माउली ॥ १ ॥
उभयतां आवडी लाडें । कोडें कोडें पुरतसे ॥ ध्रु० ॥
मेळवितां अंगें अंग । प्रेमरंग वाढतो ॥ २ ॥
तुका म्हणे जडभारी । अवघें शिरीं जननीचे ॥ ३ ॥

❀ ❀ ❀

मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥ १ ॥
देह विसरे आपुला । जवळीं घेतां शीण गेला ॥ ध्रु० ॥

❀ ❀ ❀

संतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळ ॥ १ ॥
तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥ २ ॥

❀ * ❀

धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥ १ ॥
तैसें करीं वो माझे आई । ठाव देउनि राखे पायीं ॥ २ ॥

* * *

माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हाइली ॥ १ ॥
कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दूरी जवळूनी ॥ ध्रु० ॥
केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ २ ॥
तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

* * *

असे आणखीही पुष्कळ उतारे देतां येतील, पण येथें एवढे-च पुरेत.

६ पहिलीं चार वर्षे सुखांत गेलीं, पण देवाच्या मनांत तुकोबांना

संसारपाशांतून मोकळे करून लोकोद्धाराच्या कार्यास लावावयाचें होतें. ह्मणून त्यानें त्यांच्यावर एकामागून एक दुर्धर संकटें आणलीं व संसाराविषयीं उत्पन्न होणारा स्नेहबंध पार तोडून टाकला. वयाच्या सतराव्या वर्षी त्यांचे आईबाप निवर्तले व सावजीची बायकोही मृत्युमुखीं पडली; त्यामुळें त्यांना फार दुःख झालें व त्यांनीं बहुत शोक केला. पुढील वर्षीं सावजीही तीर्थयात्रेला निघून गेले. सावजी आधींच उदास होते, त्यांत स्त्रीच्या पाशांतून मोकळे झाल्यामुळें ते अधिकच विरक्त झाले. सावजीचेंही वय फारसें नव्हतें. विशीच्या आंतबाहेरच होतें, तथापि दुसरें लग्न करून प्रपंचाची दुसरी आवृत्ति काढण्याइतका कोडगेपणा त्यांच्यांत नसल्यामुळें 'झालें तें पुरें झालें, आतां आयुष्य हरिभजनांत घालवावें,' असा विचार करून त्यांनीं देहु गांव सोडला व ते तीर्थाटणाला निघून गेले. सप्तपुऱ्या, बारा ज्योतिर्लिंगें, पुष्करादि तीर्थें करीत करीत ते काशीस गेले व तेथें सत्संगांत व आत्मचिंतनांत त्यांनीं आपलें उर्वरित आयुष्य घालविलें. इकडे तुकोबांस त्यांच्या वियोगानें अधिकच उदासीनता वाटली. आईबाप निवर्तले, बंधु निसटून गेले यामुळें ते फार खिन्न झाले व संसारांत त्यांचें लक्ष्य नीट लागेनासें झालें. त्यांच्या उदासीनतेचा फायदा घेऊन घेणेकऱ्यांनीं त्यांचे पैसे बुडविलें व देणेकऱ्यांनीं तगादे लावले. वडिलोपार्जित धनाची वाताहत झाली. दोन बायका, एक मूल, धाकटा भाऊ बहिणी वगैरे परिवार पोसावयाला द्रव्य मिळविलें पाहिजे म्हणून तुकोबांनीं चव्हाट्यावर एक वाणसवद्याचें दुकान चालविलें. तोंडानें 'विठ्ठल विठ्ठल' ह्मणून भजन करावें, खोटें बोलूं नये, लबाडीचा व्यापार करूं नये, सर्वांवर दया ठेवून सढळ हातानें माल द्यावा व पैशाची जिकीर करूं नये असा क्रम चार वर्षें चालला. पण या वागणुकीमुळें दुकानावर चार पैसे मिळायचे ते जाऊन हा आंतबट्ट्याचा

व्यापार झाला. शीत, उष्ण, निद्रा, आळस कांहींएक न म्हणतां रात्रं-दिवस दुकानांत खपूनही पैसा मिळेना./तेव्हां कर्ज उपसण्यास आरंभ केला. सावकार घरांत शिरले. घरांतली वस्तभाव मोडली. दिवाळें निघावयाची वेळ आली. एकदां आप्तेष्टांनीं बाजू राखली, एकदों-नदां सासऱ्यानें कांहीं मदत केली, तथापि जम बसेना. पहिली बायको गरीब होती, पण दुसरी जिजाबाई महातिखट होती. तिनें घरांत कुरकूर, आदळआपट आरंभिली. ' कर्क-शसंगती । दुःख उदंड फजीती ॥ १ ॥ नाहीं इह ना पर-लोक । मजूर दिसे जैसे रंक ॥ २ ॥ ' अशी तुकोबांची स्थिति १
झाली. संसाराचा ताप तुकोबांच्या चित्तास अनिवार होऊं लागला. घरांत बायकोची कटकट, व बाहेर सावकारांचे तगादे यामुळें त्यांची स्वस्थता नाहींशी झाली. मन वैतागलें. जें करावें त्यांत आंत पाय असा प्रकार झाला. एकदां रात्रीं बैलावर धान्य घेऊन येत असतां एक गोणीच पडून गेली. घरांत चार ढोरें होतीं त्यांतील तीन कांहीं रोगानें अकस्मात् मरून गेलीं. जो प्रसंग टाळायची ते धड-पड करीत होते तोही प्राप्त झाला. त्यांचें दिवाळें निघालें ! मग तर काय—गांवकुटाळांनीं तुकोबांचा छळच मांडला. ' तूं विठोबाचें नाम उच्चारतोस त्याचें हें फळ बरें !' असें म्हणून ते त्यांस हिणवूं लागले. गांवांत कोणी बरें पाहीना. दोन पैसे कोणी कर्जाऊ किंवा उसनवार देईना. त्यांनीं मोठा हिय्या करून मिरच्या विकत घेतल्या व गोण्या भरून एकदां ते कोंकणांत गेले. तेथें यांचा भोळवटपणा पाहून त्यांना लुच्च्यांनीं लुटलें व सफा बुडविलें. देवाच्या दयेनें कांहीं पैसे वसूल झाले. ते घेऊन परत येतांना वाटेंत एका भामटयानें पित-ळेचीं कडीं सोन्याचा मुलामा दिलेलीं यांच्या हातीं दिलीं व यांचे रुपये उपटून तो निघून गेला ! गांवांत आल्यावर हीं कडीं सोन्या-चीं नसून पितळेचीं आहेत असें दृष्टोत्पत्तीस आल्यावर लोकांनीं

फजिती केली व बायकोनें लाखोली वाहिली. याप्रमाणें पैसे जाऊन लोकनिंदा मोबदल्यांत मिळाली. तरी आणखी एकवार जिजाईनें आपल्या नांवाचें खत लिहून दिलें व दोनशें रुपये तुकोबांस दिले. तुकोबांनीं त्याचें मीठ भरून दूर देशीं नेलें व दोनशेंचे अडीचशें केले, पण परत येतांना वाटेंत एक दीन व दारिद्र्यानें त्रस्त झालेला ब्राह्मण फार गयावया करूं लागला, तेव्हां चित्तास द्रव येऊन त्यास सर्व द्रव्य देऊन टाकले ! घरीं आल्यावर जिजाईनीं शब्दसुमनांनीं यथेच्छ पूजा केली ! अशांत पुणें प्रांतांत भयंकर दुष्काळ पडला. ह्या दुष्काळाचें वर्णन मागें पृ० ३३।३४ वर आलेंच आहे. मुलें माणसें खाण्यावांचून हैराण झालीं. पाऊस पडला नाहीं. प्यायला पाणी मिळेनासें झालें. चाऱ्यावांचून बैल मेले. वडील बायको होती, तिनें कित्येक दिवस पोटांत अन्नाचा गोळा न गेल्यामुळें हजारों लोकांबरोबर प्राण सोडला ! तुकोबांची पत पार उडाली होती व घरांत दाणा बिलकुल नव्हता. त्यांना कोणी दारांत उभें करीना. त्या महाकाळांत शेराची धारण झाली. अन्नावांचून बायको मेली, या गोष्टीची त्यांच्या जिवाला अतिशय लज्जा वाटली. बायकोच्या पाठोपाठ त्यांचा पहिला व लाडका पुत्र संतोबा होता तोही मेला. याप्रमाणें दुःखाची सीमा झाली. आईबाप वारल्यापासून चार वर्षांत तुकोबांच्या संसाराची पार दाणादाण होऊन धन, गुरेंढोरें, बायको, मूल, अब्रू पार जाऊन सर्वांचा सत्यानाश झाला. दुःखाचा कडेलोट झाला. प्रपंचदुःखाच्या नांग्यांनीं त्यांचें अंतःकरण फाटून गेलें. देहूगांवांत पाय घरेना. आभाळ फाटलें. याप्रमाणें प्रपंचाची धूळधाण झाली.

७ संसार म्हटला म्हणजे आपत्ति आल्याच. जन्ममृत्यु ह्या महाघोर आपत्तींच्या रूपुस्तांत सांपडलेल्या यच्चावत् जीवांना आपत्तींची भेट घेतल्यावांचून गत्यंतर नाहीं. संसार दुःखरूप आहे असा शास्त्र-

सिद्धांत आहे व सर्व जीवांचा अखेर अनुभव हाच आहे. तुकोबांनीं चारवर्षें संसारांत बऱ्यांपैकीं काढलीं तोंच द्रव्यहानि, अपमान, दुष्काळ, प्रियजनवियोग या आपत्ती त्यांच्यावर एकदम् कोसळल्या व त्यामुळें संसाराचें भयाण स्वरूप प्रगट झालें. या आघातांमुळें प्रपंचांतून त्यांचें मन उठलें. त्यांची पहिल्या बायकोवर फार ममता होती ती त्यांच्या डोळ्यांदेखत दुष्काळांत अन्नावांचून मृत्युमुखीं पडली व त्यांच्या प्रेमाचें प्रथम पुष्प–संताजीबाळ–तेंही गळून पडलें. आई, बाप, भावजय, स्त्री, पुत्र हे सर्व कालवश झाले व कडुका-ळांतील सर्व दुःखें अंगावर एकदाच येऊन आदळलीं–त्यामुळें त्यांच्या मनास प्रथम मोठा धक्का बसला. त्यांची वृत्ति उदास झाली. अशावेळीं जिजाई जर सौम्यप्रकृतीची असती तर तिनें पतीचें चित्त प्रेमानें हातीं घेतलें असतें, त्यांच्या मनोगताप्रमाणें वागून संसारावरून पक्ष्याप्रमाणें उडून जाणारें त्यांचें मन मंजुभाषणांनीं व प्रेमळ कथालापांनीं संसाराला कदाचित् तिला जखडून ठेवतां आलें असतें. पण हे आपले तर्क काय कामाचे? भगवत्संकल्पाप्रमाणें सृष्टीं-तले सर्व व्यापार होत असतात. सामान्य जीव आपत्तींच्या जात्यां-त किड्यांसारखे रगडले जातात, पण त्याच आपत्ति सभाग्य जीवांच्या उद्धाराला कारण होतात. श्रीरामरायाचा आजा राजा अज याची तरुण लाडकी स्त्री अशीच तारुण्यांत मेली तेव्हां त्यानें विलाप केला तो कविशेखर कालिदासानें ( रघुवंश सर्ग ८ ) वर्णिला आहे. अज म्हणाला: “ माझें धैर्य अस्तास गेलें, आतां सुखविलास संपलें, वसंतादि ऋतु उत्सवशून्य झाले, गायन बंद झालें, अलंकारांचें प्रयोजन सरलें, सर्व गृह शून्य झालें. प्रिये ! तूं माझी गृहस्वामिनी ( घरधणीण ) होतीस, सल्लामसलत देणारी सचिव होतीस, एकांतांत सुखालापानें रिझवणारी मैत्रीण होतीस, ललितकलांत माझी प्रियशिष्या होतीस. अशा तुला ह्या मृत्यूनें

हरण करून माझें काय काय नेलें नाहीं ? मला त्यानें सर्वतोपरी नागविलें ! ” अज पडला विलासी राजा, आणि त्याचें वर्णन करणारा कविकुलमणि कालिदास ! तथापि अशा प्रकारचे शोकदायक विचार प्रियपत्नीवियोगानंतर कांहीं काळ तरी प्रत्येक विधुराच्या चित्तास दुखवीत असले पाहिजेत यांत संशय नाहीं. पण या दुनियेंत खरें प्रेम आहे कोठें? असलें तर फारच विरळ. खरें प्रेम द्वितीय विवाहाच्या नुसत्या कल्पनेलाही अग्निस्पर्शासारखें भिऊन जाईल मृत्यूही शुद्ध प्रेमाचा नाश करूं शकत नाहीं. निष्फळ अश्रुधारांनीं शयनीय भिजविणारे, ‘ अशी गुणवती व प्रेमळ बायको जगांत मिळायची नाहीं ’ म्हणून रडतांनाच दुसरीसाठीं पत्रिका धुंडणारे, व विलापाचीं कवनें रचीत द्वितीयसंबंधाची योजना करणारे चंचल जीव दुनियेंत काय थोडे आहेत! त्यांचें प्रेम कसलें तें ? क्षुद्र विषयवासनेला प्रेमाचें गोड नांव देऊन जगाला तें भुलविणें होय. निर्विषय प्रेमाला पात्र एक परमात्मा आहे व प्रेमाचें सर्वस्व फक्त भक्तांच्याच वांट्याला आलेलें असतें. त्यांच्यांत खरेपणा असतो. वैराग्यानें डोळे उघडतांच नश्वर वस्तुजातांवर विभागलें गेलेलें प्रेम ते निग्रहानें एकवटून एका परमात्म्यालाच वाहतात. ‘ प्रेम अमृताची धार । वाहे देवा ही समोर. ’ अजाचें सांत्वन करितांना वसिष्ठ म्हणाले:—

**अवगच्छति मूढचेतनः प्रियनाशं हृदि शल्यमर्पितम् ।**
**स्थिरधीस्तु तदेव मन्यते कुशलद्वारतया समुद्धृतम् ॥८॥**

अर्थ:—“ मोहानें ज्याचें ज्ञान आवृत झालें आहे तो प्रियवस्तु गमावली कीं आपल्या हृदयांत हें शल्य खुपसलें गेलें असें मानतो; पण स्थिरबुद्धि पुरुष जो आहे तो विषयलाभ म्ह० स्वहित व विषयहानि म्ह० अहित असें न मानतां इष्टवस्तुवियोगानें आपला मोह तितकाच दूर झाला व आपल्या मोक्षरूप खऱ्या स्वहिताचें दार उघडलें गेलें असें समजतो. ” वसिष्ठासारख्यांचा

हा बोध महात्म्यांच्या ठिकाणीं सहजसिद्धसा उद्भूत होतो. नारदांची प्रिय माता त्यांच्या बाळपणींच वारली तेव्हां त्या स्थितप्रज्ञ मुनीला असाच दिव्य विचार स्फुरला. ते म्हणतात ( श्रीभागवत-स्कंध १ अ० ६ ):—

**तदा तदहमीशस्य भक्तानां शमभीप्सतः ।**
**अनुग्रहं मन्यमानः प्रातिष्ठं दिशमुत्तरम् ॥ १० ॥**

भक्तांचें कल्याण इच्छिणाऱ्या भगवंताचा हा मजवर अनुग्रहच झाला असें मानून मी उत्तर दिशेची वाट धरिली. तुकोबाही नारदांच्याच कोटींतले असल्यामुळें त्यांनींही या प्रसंगीं आपली अलौकिक स्थिरप्रज्ञता व्यक्त केली. आपत्तींचे प्रसंग हीं आपल्या कल्याणाचीं द्वारें आहेत. जगद्गुरु परमात्मा हा आपण शहाणे व्हावे म्हणून नानाविध भल्याबुऱ्या प्रसंगांतून नेऊन आपणांस शहाणपणाचे चांगले धडे देत असतो, पण ते न गिरवितां आह्मी मूढजन उनाड पोरांप्रमाणें पुनः पुन्हां त्याच्या हातच्या छड्यांचा कोडगेपणानें मार खात असतों. पुण्यात्मे मात्र विविध प्रसंगांतून ईश्वराचें मनोगत ओळखून अधिकाधिक शहाणे होतात. सर्वज्ञ देव जें जें करितो तें तें आपल्या हिताचें करितो असा त्यांचा देवावर अढळ विश्वास असतो. 'जें कांहीं करिसी तें माझें स्वहित' हें शमसुख देणारें निर्मल तत्त्व ते जिव्हारीं बाळगतात, व ह्मणून महदापत्तींत निष्कंप राहतात. वाऱ्यानें झाडें उन्मळून पडतात, पण पर्वत स्थिर राहतात. सामान्य जीवांत व महात्म्यांत हाच मोठा फरक आहे. आपत्तींत वीराला अधिक अवसान चढतें तशीच भाविकाची निष्ठा दृढतर होत जाते. तुकोबांवर मागें सांगितलेल्या आपत्ती येऊन कोसळल्या व दुष्काळांत हजारों माणसें पटापट मरतांना त्यांनीं पाहिलीं, तेव्हां ही मृत्युलोकचीं राहाटी समजून येऊन त्यांच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें आणि या भवसागरांतून पांडुरंगावांचून तारणारा कोणीही नाहीं असा त्यांचा

निर्धार झाला. त्यांची या वेळची मनःस्थिति कशी होती ती पहाः—

१

बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥ १ ॥
विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ ध्रु० ॥
बाइल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥ २ ॥
पोर मेलें बरें झालें । देवें मायेविरहित केलें ॥ ३ ॥
माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥ ४ ॥

२

बरें झालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥१॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ ध्रु० ॥
बरें झालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनांमध्यें ॥ २ ॥
बरें झालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ३ ॥
बरें झालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥४॥

* * * *

३

देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वाराबार करोनि ठेवी॥१॥
भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा । ह्मणोनि करंटा करोनि ठेवी॥ध्रु०॥
स्त्री द्यावी गुणवंती तीपें गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठीं लावी॥२
तुका ह्मणे साक्ष मज आली देखा । आणिक या लोकां काय सांगों॥३

४

संसाराच्या तापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची॥१॥
म्हणऊनी तुझे आठवले पाये । ये वो माझे माये पांडुरंगे ॥ ध्रु० ॥
बहुता जन्मींचा झालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ २ ॥
वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥३॥
बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दीस झालों कासावीस ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां धांव घाली वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीननाथा ॥५॥

५

पंचमहाभूतांचिये सांपडलों संधीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥ १ ॥

आपुल्या आपण बांधाविला गळा । नेणेचि निराळा असतांही ॥ध्रु०॥
कासया हा सत्य मानिला संसार । कां हे केले चार माझे माझे २
कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवारिली॥ ३॥
किंचित सुखाचा धरिला अभिलाष । तेणें बहू नाश केला पुढें ॥४॥
तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करोनि सांडूं होळी सांचिताची५

यांपैकीं पहिल्या अभंगावरून लहानपणीं प्रथम बोल्होबा वारले व नंतर दुष्काळांत रखुमाई स्त्री, संताजी प्रथमपुत्र व शेवटीं तुकोबांची माता कनकाई या क्रमानें हीं माणसें वारलीं असें वाटतें. बाप 'न कळतां' मेला म्ह० अकस्मात् मरण पावला, किंवा मला कळत नव्हतें अशा अज्ञानपणांत वारला किंवा तुकोबा कोठें कामानिमित्त बाहेर गांवीं गेले असतां ते मरणसमयीं हजर नसतांना वारला यांपैकीं काय खरें होतें हें आज कोण सांगू शकेल ! खरा प्रकार कांहींही असो, आईबाप व स्त्रीपुत्र मरण पावले तरी या धीर पुरुषानें ' विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज' याप्रमाणें भजनसुखाला निर्बंधपणा मिळाल्याचेंच त्यांत समाधान मानलें एवढें खरें. दिवाळें निघालें, दुष्काळानें पीडा केली, बाईल कर्कशा मिळाली, अपमान झाले, धन व गुरेंढोरें गेलीं, लोकलाज सोडून देवाला शरण गेलों—हें सगळें बरें झालें; कारण कीं—' अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार '—ह्या सर्व आपत्तींमुळें संसाराचा वीट येऊन त्यांतून चित्त निघालें व अनुतापपूर्वक देवाचेंच चिंतन करीत राहिलों, असें दुसऱ्या अभंगांत म्हटलें आहे.

**फळकट हा संसार । येथें सार भगवंत ॥ १ ॥**

संसार मृत्युग्रस्त, नश्वर व दुःखरूप आहे, त्याची आटाटी सर्व वृथा आहे, देव जोडावा हेंच जन्मा आलियाचें फळ आहे असें तुकोबांच्या मनावर पुरें बिंबलें.

**तुका ह्मणे नाशिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंचि हित ॥**

*　　*　　*　　*

**सुख पाहतां जवापाडे । दुःख पर्वताएवढें ॥**

*　　*　　*　　*

**दुःखबांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें**

*　　*　　*　　*

देह नाशिवंत आहे, देह मृत्यूचें भातुकें आहे, संसार सर्वथा दुःखरूप आहे, अवघीं सोयरीं सुखाचीं आहेत ह्मणून तुकोबांचें चित्त प्रपंचाला विटलें व अविनाशी सुख शोधण्याची त्याला भूक लागली. हा मृत्युलोक अनित्य व असुख आहे व येथें येऊन मला भजा—' अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ' असें स्वतः देव गीतेंतच ( अ० ९—३३ ) बोलले आहेत. देव बोलले, शास्त्रांनीं सांगितलें आणि संतांनीं उपदेश केला, तरी ज्याचा त्याला पूर्ण अनुभव येऊन सत्य पटावें लागतें ! तें पटण्याइतकी अनंतजन्मांच्या पुण्याईनें मनोभूमि भाजून तयार व्हावी लागते. आपत्तीनें भूमि भाजून निघाली कीं तेथें परमार्थाचें पीक उत्तम येतें. चवथ्या अभंगांत तुकोबांनीं हेंच सांगितलें आहे. संसारतापानें तापलों ह्मणून देवाचे पाय आठविले. वर्तमान जन्मांतलीं दुःखें प्रत्यक्ष दिसलीं त्याबरोबर मागचे सर्व जन्म आठवले. अनंत जन्म असेंच दुःखांत गेले असून सुखाचे सांगाती, आंतले बाहेरले सर्व चोर आहेत, हे कोणी कामाचे नाहींत म्हणून काकुळतीस येऊन त्यांनीं देवाचे पाय धरिले हे चवथ्या अभंगाचें वर्म आहे. पण दुसऱ्यांनीं मला बुडविलें असें म्हणण्यापेक्षां अहंकारानेंच माझा नाश केला, अहंवृत्तीमुळें संसार सत्य मानून माझा मीच फसलों, इतके अनंत जन्म व चालू जन्माचीं इतकीं वर्षें व्यर्थ घातलीं—असो. आतां हा देह देवाच्या पायीं दिला हें पांचव्या अभंगाचें वर्म आहे. दिग्दर्शनार्थ हे चारच अभंग पुरेत.

' आतां बरें झालें ' हा अभंग पहा. काय बरें झालें ? संसार

खोटा आहे हें कळून ' डोळे उघडले. ' आपत्तीनें डोळे उघडले म्हणजे आपत्तीच अनुग्रह वाटूं लागते. संसारांत सुख असतें तर शुकादि कडेकपाटें धुंडीत गेले नसते, ढेकणाच्या बाजेवर निवांत झोंप लागणें जसें शक्य नाहीं तसें संसाराच्या नित्यसंगतींत सुख मिळणें शक्य नाहीं इ० विचार तुकोबांच्या अभंगांत वेळोवेळीं आले आहेत. तुकोबांचें अंतःकरण ह्याप्रमाणें वैराग्यानें अनुतापानें भरून गेलें. वैराग्य हा परमार्थाचा पाया आहे. देहासगट सर्व दृश्य-सृष्टीच्या नश्वरत्वाचा पूर्ण ठसा चित्तावर उमटल्यावांचून तेथें ज्ञान ठरत नाहीं. ' विरक्तीवांचूनि कहीं । ज्ञानासी तगणें नाहीं ' ( ज्ञाने० १५।३६ ) हा सिद्धांतच आहे आणि असें वैराग्य अंगीं बाणण्यास जीव संसाराला आंतून विटलाच पाहिजे. ' संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ।। ' ( ३९ ) असें दृढतर वैराग्य उत्पन्न होणें हीच परमात्म्याची कृपा होय. वैराग्य सोपें नाहीं, भगवंताच्या प्रसादावांचून तें कोणास मिळत नाहीं. देवाच्या मनांत ज्याच्यावर कृपा करावयाची आहे त्याला तो वैराग्य हें पहिलें दान देतो. असें परम शुद्ध वैराग्य तुकोबांना प्राप्त झालें आणि त्यांच्या परमार्थास आरंभ झाला.

८ वैराग्याबरोबर चित्तवृत्ति निवळण्यासाठीं त्यांनीं एकांत धरिला. ते प्रथम भामनाथाच्या डोंगरावर गेले व तेथें ते पंधरा दिवस राहिले. तेथें त्यांनीं देवाच्या ध्यानांत व नामस्मरणांत काळ घालविला. इकडे तुकोबा घरांतून गेल्याचा बोभाटा होऊन जिजाबाईस चैन पडेना. जिजाबाईचा स्वभाव तापट असला तरी ती माउली थोर पतिव्रता होती. तुकोबावांचून तिला कांहीं सुचेना. तिनें कान्होबास त्यांच्या शोधार्थ पाठविलें. अखेर भामनाथावर त्यास तुकोबा आढळले. तेव्हां त्यांनीं आग्रह करून तुकोबांस घरीं नेलें. जिजाबाईस त्यांना पाहून आनंद झाला. वडिलांपासून ज्यांच्याकडे येणें

होतें त्यांचीं तुकोबांनीं खतपत्रें आणविलीं व तीं सर्व ते इंद्रायणीच्या डोहांत बुडवून टाकूं लागले. तेव्हां कान्होबानें नम्रपणानें सांगितलें कीं, ' तुम्हीं आतां साधु झालांत, पण मला बायकापोरांचा प्रपंच चालवायचा आहे, तेव्हां एवढे पैसे बुडवून माझें कसें चालेल ?' हें ऐकून तुकोबा म्हणाले. " ठीक आहे. यांतलीं निम्मीं खतपत्रें घेऊन तूं वेगळा हो व आपला संसार चालीव. आमचा सर्व भार विठोबावर आहे, हा आतां आम्हीं आपला क्रम ठरविला आहे. भुकेची वेळ पांडुरंग राखील. तुला मी तोशीद लागूं देणार नाहीं. तूं आपला भाग घेऊन वेगळा हो. आमची काळजी करूं नकोस." असें म्हणून निम्मीं खतपत्रें त्यांनीं कान्होबाच्या स्वाधीन केलीं व आपल्या वांट्याचीं तत्काळ इंद्रायणीला अर्पण केलीं ! खतपत्रें बुडविण्याचें कारण महिपतबावांनीं मार्मिकपणानें दिलें आहे. ते म्हणतात:—

> अनुभव नसतांचि जाण । व्यर्थ पुस्तकींचें ज्ञान ।
> तैसेंचि परहस्तींचें धन । दुश्चित मन सर्वदा ॥
> आमुचें देईल किंवा नाहीं । ऐसी दुराशा आठवे जीवीं ।
> यास्तव इंद्रायणीच्या डोहीं । खतें स्वयें बुडाविलीं ॥

तुकोबांनीं आपली चित्तवृत्ति पांडुरंगाला वाहिली. या वृत्तीला मागें खेंचणारी, पायबंद घालणारी, दुष्ट दुराशा त्यांना नको होती. मागें ' देह जड झालें ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ' हा कर्जाचा अनुभव त्यांना आलाच होता. आतां देण्याघेण्याच्या कटकटींतून कायमचें सुटावें व निर्वेधपणानें हरिभजनांत रमावें यासाठीं त्यांनीं खतपत्रें इंद्रायणीच्या डोहांत टाकलीं. यापुढें त्यांनीं द्रव्याला स्पर्श केला नाहीं. दारिद्र्याचे हाल सोसले, प्रसंगीं भिक्षेवरही राहिले, पण धनस्पर्श यावज्जन्म न करण्याचा निश्चय करून कांचनाच्या पाशांतून ते कायमचे मुक्त झाले.

९ तुकोबांचा कांहीं काळ नित्यक्रम असा होता. प्रातःकाळीं प्रातर्विधी आटपून विठोबाच्या देवळांत जावें, पूजाअर्चा करावी व इंद्रायणीच्या पार होऊन भामनाथ, भंडारा, किंवा गोराडा यापैकीं कोणत्या तरी डोंगरावर जाऊन ज्ञानेश्वरी किंवा नाथभागवत या ग्रंथाच्या पारायणांत, नामस्मरणांत सारा दिवस एकांतांत घालवावा. रात्र पडली कीं गांवांत येऊन मंदिरांत कीर्तनश्रवणांत किंवा पुढेंपुढें कीर्तन करण्यांत अर्धी रात्र घालवून उत्तररात्रीं थोडीशी निद्रा घ्यावी. याप्रमाणें विरक्तस्थितीनें राहतां राहतां त्यांनीं क्षुधातृषा हे प्राणधर्म जिंकलें, निद्रालस्य गेलें, युक्ताहारविहार सहजच होत असल्यामुळें इंद्रियजय झाला. हें सर्व हळुहळु साध्य झालें. सद्ग्रंथसेवन, नामस्मरण, कीर्तन, ध्यानधारणादिकांचा अभ्यास यांत काळ जाऊं लागला. त्यांनीं यात्रा वगैरे फारशा केलेल्या दिसत नाहींत. आषाढीकार्तिकीची वारी घराण्याचीच होती ती त्यांनीं यावज्जन्म चालविली. आळंदी क्षेत्र जवळच चार कोसांवर आहे व त्यांची ज्ञानेश्वर माउलीच्या चरणीं निष्ठाही मोठी होती यामुळें आळंदीस ते वारंवार जात. निवृत्तिनाथांची समाधी त्र्यंबकेश्वरीं आहे, चांगदेवांची पुणतांब्यास आहे व पैठण नाथांचें क्षेत्र प्रसिद्धच आहे आणि हीं तीनही क्षेत्रें गोदातीरीं आहेत. तेव्हां वारकऱ्यांच्या मेळ्याबरोबर हे या क्षेत्रीं जाऊन आले यांत शंका नाहीं. 'गोदातटें निर्मळें । दिवस जाय सुखाचा' असा एका अभंगांत त्यांचा उद्गार आहे. काशी, गया व द्वारका पाहिल्याचें त्यांनीं एकदा लिहिलें आहे. हा यात्राप्रसंग शके १५५३।५४ या सालांत गुरूपदेशापूर्वी झाला असावा. वैराग्य उत्पन्न

---

१ 'वाराणसी गया पाहिली द्वारका । परि नये तुका पंढरीच्या॥' हा अभंग पहा. 'तारूं लागलें बंदरीं' ह्या अभंगावरून व विशेषतः 'सीड लागलें फरारा' या वर्णनावरून तुकोबा द्वारकेला तारवांत बसून गेले असावेत असें वाटतें.

झाल्यावरच्या एकदोन वर्षांत ते काशीद्वारकादि क्षेत्रीं जाऊन आले असावेत. असो. याप्रमाणें संसाराचा थोडा अनुभव घेऊन व त्याची निःसारता मनाला पटून तुकोबांनीं परमार्थाची आवड धरिली. परमार्थप्राप्तीचे उपाय व सिद्धि याचें आपण पुढील खंडांत सविस्तर समीक्षण करूं.



# प्रकरण चवथें,



# आत्मचरित्र.



यालागीं सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदक अनन्यगती ।
यें गा गौप्यही परी तयाप्रती । चावळिजे सुखें ॥

ज्ञानेश्वरी अ. ९-४०

१ संतचरित्रश्रवणाची आवड. २ तुकोबांचा आत्मचरित्रपर अभंग. ३ अभंगाचें विवरण व त्यांतील तीन मुद्दे. ४ वैराग्य. ५ साधनमार्ग. ६ निषे-धाचा आघात. ७ दुसऱ्या अभंगाचा विचार. ८ प्रस्तुत खंड.

१ थोर पुरुष पाहिला कीं याला हा थोरपणा कसा प्राप्त झाला, हा कोणत्या मार्गानें कसा वागत आला, कोणते गुण यानें कसे संपादिले व वाढविले, हें समजण्याची मनुष्यमात्रास स्वाभाविक इच्छा असते. ही जिज्ञासा सात्विक असते, कारण आपल्यास असें वागतां यावें हा निर्मळ भाव तिच्या पोटांत असतो. सत्पुरुषाचें दर्शन झालें किंवा त्याचें चरित्र ऐकिलें म्हणजे याच्या अंगचे गुण आप-ल्याला कळावेत व हा कोणत्या मार्गानें प्रस्तुतच्या महत्पदास पों-चला हें लक्ष्यांत घेऊन आपणही त्याच मार्गाला लागावें असें आप-णांस वाटतें. महत्पदप्राप्ति सुलभ नाहीं, त्यासाठीं त्यानें सोसलेले कष्ट सोसण्याची ताकद व पुण्याई सर्वांच्या वांट्यास येत नसून ही जिज्ञासा तृप्त झाली तरीही बहुतेकांच्या हातून थोरांचें अनुकरण होत नाहीं. बहुधा कळूनही वळत नाहीं, तथापि कळणें जरूर असतें. वेदशास्त्रांत ब्रह्मनिष्ठांच्या अंगचे अनेक गुण सांगितले आहेत. ते महत्प्रयासानें ज्यांनीं आपल्या अंगीं आणले अशा महात्म्यांचा

आचारच सामान्य जनांस मार्गदर्शक होतो व सात्विक श्रद्धा ज्यांच्या अंगीं उत्पन्न झाली आहे ते त्यांचा आचार ह्म० वर्तनक्रम पाहून त्याप्रमाणें चालत असतात ' परी श्रुतिस्मृतीचे अर्थ। जे आपणाचि होऊनि मूर्त। अनुष्ठानें गाजत। वडिल जे हे ॥ ८६॥ तयांचीं आचार तीं पाउलें। पाऊनि सात्विकी श्रद्धा चाले। तो तोंचि फळ ठेविलें। ऐसें लाहे ॥ ८७॥' (ज्ञानेश्वरी अ० १७) महात्मा जेवतो कसा, बोलतो कसा, चालतो कसा, व्यवहारांत वागतो कसा हें समजण्यांत सुद्धां मोठें शिक्षण असतें. सामान्य जनांना प्रिय असलेले विषय त्यानें कसे सोडले, विषयवासना कशी जिंकली, त्याला वैराग्य कसें प्राप्त झालें, प्रवृत्ति जिंकून तो निवृत्त कसा झाला, त्यानें कोणत्या ग्रंथांचें कसें अध्ययन केलें, त्यानें एकांत कसा धरिला, एकांतांत त्यानें कोणतें साधन केलें, सत्संगाची आवड त्याला कशी उत्पन्न झाली, सत्संगापासून त्यानें आत्मलाभ कोणता व कसा जोडला, त्यावर गुरुकृपा केव्हां कशी झाली, त्यानें निश्चय कोणता केला व तो आजन्म आघातांना न जुमानतां कसा पाळला, त्यावर भगवत्कृपा कशी झाली इत्यादि गोष्टी मुमुक्षूस नीट समजल्या म्हणजे त्याला आपला निश्चित कार्यक्रम ठरवितां येतो.

२ या प्रकारचे विचार तुकाराममहाराजांभोंवतीं नित्य जमणाऱ्या व त्यांच्या कीर्तनसुखाचा आनंद भोगणाऱ्या प्रेमळ भाविकांच्या मनांत येत असावेत. एकदां प्रसन्नवेळीं त्यांनीं महाराजांस प्रश्न केला कीं, " महाराज! आपणांस वैराग्य कसें प्राप्त झालें? भगवत्कृपा कशी झाली? हें कृपेनें आम्हांस ऐकवावें." हा प्रश्न ऐकून व श्रोत्यांची शुभेच्छा जाणून महाराजांनीं दोन अभंगांत त्यांस उत्तर दिलें. हे अभंग अत्यंत महत्त्वाचे आहेत. त्यांतील 'याती शूद्र वैश्य' हा अभंग तर महाराजांच्या चारित्र्याचा पूर्वार्ध स्पष्ट

ांगणारा आहे. आपलें चरित्र आपल्याच तोंडानें आपण सांगूं
ये हा शिष्टाचार खरा, पण ' तुह्मी संत प्रेमानें विचारतां तर
ुमची ही आज्ञा मला पाळायला पाहिजे ' असें म्हणून महारा-
ांनीं सांगण्यास प्रारंभ केला. ' नये बोलों परी पाळिलें वचन '
ा चरण ह्या अभंगाचें ध्रुवपद आहे, यावरून आत्मचरित्र स्वमु-
ानें सांगणें अनुचितं[1] आहे हा भाव पोटांत ठेवून त्यांनीं केवळ
क्तानुग्रहार्थ आपल्या चरित्रांतल्या ठळक गोष्टी त्यांस सांगितल्या
सें स्पष्ट होतें. आपण प्रथम त्यांच्या तोंडूनच त्यांचें पूर्वचरित्र
क्ष्यपूर्वक ऐकूं.

## अभंग.

ाती शूद्र वैश्य केला वेवसाय । आदि तो हा देव कुळपूज्य ॥१॥
ये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुह्मीं संतीं ॥ध्रु०॥
ंवसारें जालों अतिदुःखें दुःखी । मायबाप सेखीं क्रमिलिया ॥२॥
ुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान। स्त्री एकी अन्नअन्न करितां मेली ३
ज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखे तुटी येतां॥४॥
ेवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावें तें ॥ ५ ॥
ारंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं॥६॥
ाांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥७॥
ाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ८ ॥
ंतांचें सेविलें तीर्थपायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ ९ ॥
ाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी ॥ १० ॥

---

१ स्वात्मवृत्तं मयेत्थं ते सुगुप्तमपि वर्णितम्।
व्यपेतं लोकशास्त्राभ्यां भवान्हि भगवत्प्रियः ॥

श्रीमद्भागवत ७–१३–४५

अजगरमुनि प्रन्हादास म्हणतातः ' माझें चरित्र लोकव्यवहार व शास्त्र-
मर्यादा यांना सोडून आहे ( असें जडांना वाटतें ) ह्मणून तें न सांगण्यासारखें
असलें तरी तूं भगवद्भक्त आहेस म्हणून तुला सांगतों !

वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ ११ ॥
सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १२ ॥
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं॥१३॥
यावरीया जाली कवित्वाची स्फूर्ती।पाय धरिले चित्तीं विठोबाचे १४
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखवलें ॥१५॥
बुडविल्या वह्यां बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १७ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १८॥
भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें ॥ १९ ॥
तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २० ॥

३ ( १ ) मी जातीचा शूद्र खरा पण व्यवसाय केला वैश्याचा.

( २ ) आमचा कुळस्वामी पांडुरंग असून त्याचीच उपासना आमच्या घराण्यांत पूर्वापार चालत आहे.

( ३ ) आईबाप थोड्या अंतरानें वारल्यापासून संसाराचीं दुःखें मीं फार अनुभविलीं. दुष्काळ पडल्यामुळें घरांतलें होतें नव्हतें तें सर्व द्रव्य संपलें, द्रव्य संपल्याबरोबर मानप्रतिष्ठाही गेली. एक स्त्री ' अन्न अन्न ' करतां अन्नावांचून मेली, जो व्यवसाय करावा त्यांत पाय आंत, असा आंतबट्ट्याचा व्यापार होऊं लागल्यामुळें दुःखानें त्रासलों व माझी मलाच लाज वाटूं लागली. याप्रमाणें संतारतापानें फार दुःखी झालों.

( ४ ) अशा स्थितींत जीवाला कांहीं विरंगुळा वाटावा म्हणून (विश्वंभरबावांनीं बांधलेलें) पांडुरंगाचें देऊळ मोडकळीस आलें होतें त्याचा जीर्णोद्धार करण्याचें मनानें घेतलें ( अहोरात्र शरीरकष्ट सोसून हें काम पुरें केलें. )

( ५ ) प्रथम एकादशी करूं लागलों, कीर्तन व० नामसंकीर्तन—नामस्मरण करूं लागलों. प्रथम अभ्यासाकडे चित्त लागेना; मग संतांचे ग्रंथ पाहिले व त्यांचीं कांहीं उत्तरें (वचनें) पाठ

केलीं. संतवचनांवर पूर्ण विश्वास ठेवून व त्यांविषयीं आदर बाळगून तीं पाठ केली (व अर्थमननद्वारां चित्त अभ्यासाकडे लाविलें.)

( ६ ) कीर्तनभजन कोणी हरिदास करीत तेव्हां मागें उभा राहून ध्रुपद धरूं लागलों व 'भावें चित्त शुद्ध करून' अर्थपर होऊन हरिप्रेम चित्तांत जमवूं लागलों.

( ७ ) कीर्तनकार, भजनकार, हरीचें नाम गाणारे जे जे कोणी संत भेटत त्यांच्या पायां पडून त्यांच्या पायाचें तीर्थ घेऊं लागलों. याची लाज बाळगिली नाहीं.

( ८ ) शरीर कष्टवून घडेल तेवढा परोपकार करूं लागलों, दुसऱ्याच्या कार्यांत देह झिजवूं लागलों.

( ९ ) ह्याप्रमाणें मी परमार्थाचा अभ्यास करूं लागलों, कथाकीर्तनांत व संतसंगांत रमूं लागलों, परकार्यांत देह झिजवूं लागलों, तेव्हां हा प्रपंचाकडे नीट लक्ष देत नाहीं असें वाटून स्त्रीबंधुआप्तेष्ट हे मला उपदेश करून परत प्रपंचाकडे वळवूं लागले, तेव्हां मन घट्ट करून मीं त्यांचे ऐकिलें नाहीं. कारण मला 'समूळ प्रपंचाचा वीट आला' होता. सुहृद्गण मला प्रपंचाकडे खेचूं पहात होता व मन परमार्थाकडे वळलें होतें, लोक प्रवृत्तीकडे ओढीत होते व चित्ताला निवृत्ति आवडूं लागली होती; अशा प्रवृत्तिनिवृत्तींच्या झगड्यांत —'सत्य असत्याला मन ग्वाही' ह्य० साक्षी करून सत्य जो श्रीहरि त्याचा मार्ग मीं धरिला व असत्य—मिथ्या—नाशिवंत जो प्रपंच त्याचा मार्ग सोडला व येणेंप्रमाणें 'मानियेलें नाहीं बहुमतां.' नित्यानित्यविवेक करून श्रीहरीचा मार्ग निश्चित केला.

( १० ) याप्रमाणें श्रीहरिच पाहिजे असा माझा माझ्या ठिकाणीं निश्चय झाल्यावर श्रीगुरु बाबाजी चैतन्य यांनीं स्वप्नांत उपदेश करून आवडीचाच 'राम कृष्ण हरी' हा मंत्र दिला व मीं 'चरिला विश्वास दृढ नामीं' म्हणजे हरिनामच मला तारील, नामच

नामी जो हरि त्याची भेट करवील असा बळकट विश्वास धरिला व नामस्मरणाची दृढ कांस धरिली.

( ११ ) अखंड नामस्मरणांत रंगून जाऊं लागलों तेव्हां मला कवित्वाची स्फूर्ति झाली. कीर्तनप्रसंगीं मुखावाटे प्रासादिक अभंग येऊं लागले. ही माझ्या बुद्धीची प्रभा नसून देव मला बोलवतो असें समजून मी विठोबाचे पाय चित्तीं धरिले.

( १२ ) पण असा क्रम चालला असतां ( रामेश्वरभटांच्या द्वारें ) निषेधाचा आघात पडला. देवाच्या प्रेरणेनें मी कवित्व करीत असून कांहीं लोकांनीं त्यास अडथळा केला, तेव्हां मीं अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या डोहांत बुडविल्या व ( तेरा अहोरात्र ) धरणें धरून देवाच्या द्वारीं त्याचें ध्यान करीत पडून राहिलों. तेव्हां दया येऊन नारायणानें ( स्वतः दर्शन देऊन ) माझें समाधान केलें, आघातापासून माझें व वह्यांचें स्वतः रक्षण केलें.

४ ह्या अभंगांत तुकोबांच्या गळ्यांत संसार पडल्यापासून तों वानें त्यांच्या अभंगांच्या वह्या उदकांत राखिल्या व त्यांना सगुणसाक्षात्कार झाला, येथपर्यंतच्या सर्व ठळक गोष्टी त्यांच्याच मुखानें आपणांस ऐकावयास मिळाल्या आहेत. प्रथम त्यांनीं वैश्यव्यवसाय केला म्हणजे वाण्याचें दुकान चालविलें. कांहीं वर्षे धंदा नीट चालला, पण पुढें एकामागें एक आपत्ति येऊन त्यांचें मन संसाराला विटलें. आईबाप वारले, दुष्काळानें सर्व द्रव्य गेलें, द्रव्यनाशाबरोबर प्रतिष्ठा जाऊन दिवाळें निघालें, एक स्त्री अन्नावांचून तडफडून मेली, जो उद्योग करावा त्यांत आंत पाय असें होऊन ते प्रपंचदुःखानें होरपळून गेले तेव्हां वैराग्य उत्पन्न झालें. मनुष्य प्रपंचांत होरपळून निघाला म्हणजे परमार्थाकडे वळतो. संसारदुःखानें दुखवला व त्रिविधतापानें पोळला म्हणजेच प्राणी परमार्थाचा अधिकारी होतो. संसारदुःखानें आपण सगळेच गांजलें जातों, दुःखें असह्य झालीं

ह्मणजे संसाराचा तेवढ्यापुरता वीटही येतो; पण शेंबडांतल्या माशीप्रमाणें त्यांतच पुन्हां गुरफटून जातों! संसाराच्या लाथा खाऊन आपण कोडगे होतों. तुकोबांनाही प्रपंचाचा वीट आला, पण यांत त्यांत फरक आहे. त्यांना ' समूळ प्रपंचाचा ' वीट आला, प्रपंचाला मूलाधार जी वासना तीही त्यांची नष्ट झाली. स्मशानवैराग्य आपणांस नेहमीं येत असतें, पण तें वैराग्य स्मशानाच्याबाहेर पाऊल टाकलें कीं संपून पुन्हां आपण पहिल्यासारखे लोचट बनतों. याचें कारण—तें वैराग्य वरवर असतें. डोळ्यांतून चार थेंब गेले कीं वैराग्य संपलें ! तुकाराममहाराजांना प्रपंचाचा वीट आला एवढेंच नव्हे तर प्रपंचाचें मूळ जी वासना तीही त्यांच्या ठिकाणची दग्ध झाली. संसार नश्वर आहे, संसारसुख ही भ्रांति आहे व शहाण्यानें प्रपंचविषयक सर्व वासनांपासून दूर झटकलें पाहिजे असा त्यांचा ठाम निश्चय झाला. ह्याप्रमाणें परमार्थाला मूलाधारभूत जें वैराग्य तें त्यांच्या अंगीं उत्पन्न झालें.

५ संसाराला जशी पाठ फिरली तसा परमार्थ सन्मुख होऊं लागला. परमार्थसिद्धीसाठीं काय साधनें केलीं हें त्यांनीं पुढें सांगितलें आहे. विठोबाच्या देवळाचा त्यांनीं जीर्णोद्धार केला, एकादशीव्रत व हरिजागर ते करूं लागले, कीर्तनभजनकारांच्या मागें शुद्धभावानें टाळ धरून ते उभे राहूं लागले, साधुसंतांचे कित्येक ग्रंथ त्यांनीं पाहिले व मननसुखाला उपकारक अशीं त्यांचीं वचनें पाठ केलीं, लाजलज्जा सोडून साधुसंतांच्या पायीं ते नम्र झाले, होईल तितका देहाकडून परोपकार केला—ह्या साधनमार्गाचें त्यांनीं आक्रमण केलें. स्त्रीबंधुआप्तइष्ट यांनीं त्यांना परमार्थापासून निवृत्त करून प्रपंचाकडे पुन्हां खेंचण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. ह्या योगानें त्यांचा निश्चय कसाला लागला व अंतर्यामींची शुभ प्रेरणा प्रमाणभूत मानून त्यांनीं कोणाचेंही न ऐकतां आपली एकनिष्ठ

उपासना कायम राखिली. त्यांचा निश्चय दृढ आहे असें जाणून सद्गुरू बाबाजी चैतन्य ह्यांनीं त्यांच्यावर अनुग्रह केला व स्वप्नांत उपदेश देऊन ' राम कृष्ण हरी ' हा आवडीचा मंत्र दिला. ह्याप्रमाणें तुकाराममहाराजांनीं आपला साधनमार्ग सांगितला आहे. विठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धारापासून तों गुरुकृपेपर्यंत सर्व साधनांचा अवलंब त्यांनीं ' भावें चित्त शुद्ध ' करून केला. ह्यांत नामस्मरण हें अखेरचें मुख्य साधन त्यांनीं आजन्म चालविलें तरी पूर्वींच्या साधनांचें महत्त्व कमी आहे असें कोणीं समजूं नये. पहिलेंच साधन विठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धाराचें आहे. विश्वंभरबावांच्या वेळेपासून विठ्ठलमंदिर देहूंत होतें. त्यांच्या वेळेपर्यंत देवाची पूजाअर्चा, आरतीधूपारती वगैरे प्रकार चालतच आले होते. मंदिर तुकोबांच्या पूर्वींही होतें, व नंतरही आहे. त्यांनीं जीर्णोद्धार कसला केला असें कोणास वाटेल, तर तसें नाहीं. त्यांनीं दगड गोळा केले, माती व पाणी एक करून चिखल केला, भिंती उभारल्या व हें स्वतः शरीरकष्टानें केलें—ही देवाची केवळ कायिक सेवा झाली. पण त्यांनीं देवळाचा जीर्णोद्धार करण्याच्या मिषानें आपलाच जीर्णोद्धार केला, आपल्या भावाचा उद्धार केला, भक्तिभाव जिवंत केला व भावानेंच पुढें त्यांना देव सांपडून दिला. ' तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ' ज्या भावापाशीं देव राहतो, ज्या भावानें देव सांपडतो, तो भाव देवळाच्या जीर्णोद्धाराच्या निमित्तानें त्यांनीं खडा उभा केला. भावाचा उदय चित्तांत झाल्यामुळें चिखलमातीचें काम करण्यांतही भगवत्सेवा कशी झाली हें भाविकच जाणतील. मला तर वाटतें कीं, ज्या विश्वात्मक पांडुरंगाच्या नांवाचा झेंडा त्यांनीं पुढें जगभर नाचविला, तो विश्वात्मा महाराजांच्या ह्या प्रथम सेवेपासूनच त्यांजकडे प्रेमानें पाहूं लागला! गंध, धूप, दीप, पूजाअर्चा, नमस्कार, आरती, भूपाळी, भजन,

कीर्तन, ही सर्व उपासनेचीं बाह्य उपांगें आहेत व चित्तांत भाव नसला तर ही कवाईत होते, पण भावाचा उदय होतांच हींच त्या दीनदयाळ विठोमाउलीच्या प्राप्तीचीं साधनें होतात ! तेव्हां महाराजांच्या चित्तांत शुद्ध भावाचा उदय होऊन त्यांनीं मंदिराचा जीर्णोद्धार केला, एकादशी व्रत चालविलें, साधुसंतांचे ग्रंथही ' विश्वासें आदरें ' वाचले व त्यांतील निवडक वचनें आत्माभ्यासार्थ पाठ केलीं, कीर्तनकाराच्या मागें ते टाळ धरून उभे राहिले तेंही ' भावें चित्त शुद्ध ' करून राहिले. ह्या सर्वांत भाव मुख्य होता, व त्यामुळेंच भावाचा भोक्ता जगदीश संतुष्ट झाला व त्यांना बाबाजी महात्म्यांचा उपदेश होऊन साधनांचें परमसार जें नामस्मरण त्याचा टकळा लागला. **देवाची पूजाअर्चा, सद्ग्रंथसेवन, सत्संग, एकादशीव्रत, कीर्तन व नामस्मरण हा तुकोबारायांचा साधनमार्ग** लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ह्या साधनांनीं व गुरुकृपाबलानें ते अखेर भगवंताच्या पूर्णकृपेस पात्र झाले.

६ वैराग्य व साधनक्रम सांगितल्यावर महाराजांनीं पुढील चरणांत भगवत्कृपा झाल्याचें सांगितलें आहे. कृपेचें पाहिलें चिन्ह म्हणजे त्यांना कवित्वस्फूर्ति झाली हें होय. ' ट ' ला ' ट ' आणि ' फ ' ला ' फ ' करणारे आणि आम्हांला स्फूर्ति झाली म्हणून सांगत फिरणारें धीटपाठ कवि गल्लोगल्लीं पडले होते व आहेत. तुकोबा अशांतले नव्हत हें सांगायलाही नको आहे. भगवस्फूर्तीवांचून त्यांनीं कधींही अभंग केले नसते. त्यांनीं अभंग केलें तेंही भगवत्संतोषार्थंच केले; त्यांनीं केले म्हणण्यापेक्षां ते त्यांच्या प्रेमानें भरलेल्या हृदयांतून प्रकट झाले असेंच म्हणणें योग्य आहे. त्यांचे अभंग हे त्यांच्या हरिप्रेमाचे उद्गार आहेत. तो सखा भगवंत त्याची वाचा आहे. ह्या त्यांच्या कवित्वाला रामेश्वरभटाकडून निषेध झाला, तेव्हां चित्त दुखवलें जाऊन त्यांनीं अभंगांच्या वह्या इंद्राय-

र्गीच्या डोहांत बुडाविल्या. तेव्हां ‘ केलें नारायणें समाधान ’—देवानें तुकोबांना प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यांना आलिंगन दिलें व त्यांच्या वह्या उदकांत रक्षिल्या. ह्याप्रमाणें महाराजांना फार दिवसांची ‘ देव प्रत्यक्ष भेटावा ’ ही जी तळमळ होती ती शांत झाली; त्यांना सगुणसाक्षात्कार झाला; त्यांचे डोळे, अंग व मन निवालें. देवाच्या नुसत्या परस्पर गोष्टी सांगावयाचा प्रसंग राहिला नाहीं. ‘ मीं देव पाहिला आहे ’ असें बोलण्याचें सामर्थ्य त्यांना आलें. ‘ भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें ॥ ’ असें त्यांनीं ह्या अभंगाच्या शेवटीं ह्मटलें आहे. देवाच्या कृपेचा प्रत्यक्ष अनुभव आला. भक्तांची नारायण उपेक्षा करीत नाहीं हें त्यांना अनुभवानें ह्मणतां येऊं लागलें. ह्याप्रमाणें सगुणसाक्षात्काराचा वृत्तांत त्यांनीं येथें थोडक्यांत सुचविला आहे. ह्यासंबंधानें महाराजांचे स्वतःचे अभंग आहेत त्यांचा पुढें एका प्रकरणांत स्वतंत्र विचार होणारच आहे.

७ ह्या पाहिल्या अभंगांतच ‘ नये बोलों परी पाळिलें वचन ’ असें म्हणत म्हणत महाराजांनीं आपल्या चरित्रांतल्या ज्या ठळक गोष्टी सांगितल्या, त्यांत स्वस्तुतीचें एक अक्षरही नाहीं, तथापि स्वचरित्र बोललों हेंच फार झालें असें वाटूनच कीं काय कोण जाणे, दुसऱ्या अभंगात त्यांनीं आपल्याकडे अत्यंत लघुत्व घेऊन ‘ मी तरलों नाहीं. तुह्मां चार चौघांपैकींच मी एक आहे. एकाचें पाहून दुसरा ह्याप्रमाणें तुह्मी उगीच मला मानीत आलांत, माझा संसार धड चालेना, भाग्यहीन करंटा झालों म्हणून घरादाराचा त्याग करून लज्जेनें तोंड लपवण्यासाठीं रानांत जाऊन बसलों! सहज वाडवडील या विठोबाची पूजाअर्चा करीत होते त्याप्रमाणें कुलक्रम चालविण्यासाठीं मीही करीत आहें, पण तीहि भावपूर्वक करितों असें समजूं नका. ” याप्रमाणें आपल्या श्रोत्यांस पुष्कळ

सांगितलें! याचा परिणाम त्यांच्या मनावर काय झाला असेल तें अजमावणें कांहीं फारसें कठीण नाहीं. उगीच साधु साधु म्हणून लोक मागें लागतील, पण हा पसारा न वाढतां प्राप्त झालेलें गुज दडवण्यासाठीं एकांतच पत्करावा अशा हेतूनें महाराज हें बोलले, असाच त्यांनीं आपल्या मनाशीं कयास बांधला असेल! आणि हेंच बरोबर आहे. महाराजांचें चरित्र त्यांच्या डोळ्यांपुढें होतें. ते रोज त्यांची कीर्तनप्रसंगीं होणारी तन्मयता पहात होते. हरीसाठीं त्यांनीं प्रपंचाची होळी केलेली त्यांना दिसत होती. 'रामकृष्ण हरी 'च्या गर्जनेनें सारा देहू गांव, भंडारा, गोराडा व भामगिरि डों हे दणाणून जात होते. देवानें त्यांना प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यांच्य अभंगांच्या वह्या उदकांत रक्षिल्याचा दुदुंभी चोहोंकडे वाजून राहिला होता, अशा स्थितींत 'मी भावानें देवाची पूजा करीत नाहीं व मी तरलों नाहीं ' हे त्यांचे उद्गार कोणत्या भावानें भाविकांनीं घेतले असतील हें कांहीं सांगायला नकोच.

८ असो. ह्याप्रमाणें 'याति शूद्र ' ह्या अभंगांत तुकोबांनीं १ वैराग्यप्राप्ति २ साधनमार्ग व ३ रामेश्वरभटांनीं निषेधाचा आघात केला व तो पांडुरंगानें स्वतः निवारिला ही मनोरम कथा ह्या तीन मुद्द्यांच्या गोष्टी सांगितल्या आहेत. महाराजांनीं जन्मापासून सगुणसाक्षात्कारापर्यंतचें म्हणजे आपलें तीस वर्षांपर्यंतचें चरित्र स्वमुखानेंच येथें सांगितलें आहे. हाच क्रम धरून आपण त्यांच्या चरित्राचा विचार केला पाहिजे. आपण त्यांच्या जन्मापासून २३ व्या व वैराग्य उत्पन्न झालें येथपर्यंतचा विचार मागील प्रकरणांत आहे. पुढील सात वर्षें हीं महाराजांच्या चरित्रांतलीं अत्यंत महत्त्वाचीं वर्षें होत, म्हणून त्यांचा सविस्तर इतिहास प्रस्तुत खंडांत आपणांस वाचावयास मिळेल. त्यांच्या उपासनेचा मुख्य विषय श्रीपांडुरंग, त्यांच्या उपासनेचा पूर्वींच्या साधुसंतांनीं चोखाळलेला

मार्ग, तुकोबांनीं आचरिलेला साधनक्रम, गुरूपदेश, कवित्वस्फूर्ति, कवित्वास रामेश्वरभटांनीं केलेला निषेध, तन्निमित्त तुकोबांनीं केलेला निग्रह, वह्या बुडवणें व तरणें व श्रीपांडुरंगानें सगुणरूपानें दिलेलें दर्शन इ० महत्त्वाचे विषय प्रस्तुत खंडांत येणार असल्यामुळें हा खंड तुकोबांच्या चरित्राचा केवळ गाभा आहे. तुकोबांच्या चरित्राचें रहस्य आपणांस ह्या खंडांत समजून येईल. मुमुक्षूंना हा खंड कित्त्यादाखल होईल. तुकोबांच्या चरित्राचें हृदय म्हणजे हा मध्यखंडच आहे. तुकोबांच्या चरणांचें स्मरण करून आपण आतां त्यांच्या उपासनेचा विषय काय होता तें पाहूं.



# प्रकरण पांचवें.



# वारकरी संप्रदायाचा साधनमार्ग.



पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणिक न करी तीर्थव्रत ॥१॥
व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशीं हरिनाम ॥ध्रु०
नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचें तुका म्हणे ॥२॥

१ सत्संग, सच्छास्त्र. गुरुकृपा व साक्षात्कार हे चार टप्पे. २ वारकऱ्यांची सिद्धांतपंचदशी. ३ भागवतधर्म. ४ तुकोबांचा अभ्यास. ५ एकादशीव्रत. ६ संप्रदायांत मिळून जाण्याचें वर्म. ७ वारकरीसंतांचा सहवास. ८ कीर्तनसुख. ९ कीर्तनाचें नियम. १० साधनांचा प्राण सद्भाव. ११ परोपकारव्रत. १२ परोपकाराचे प्रकार. १३ तुकोबांची साक्ष.

१ तुकोबांचें चित्त प्रपंचाला विटल्यावर तें सहजच परमार्थाकडे वळलें. चित्तांतून प्रपंच निःशेष गळून गेल्याशिवाय मनुष्याला परमार्थ आठवत नाहीं व आवडत नाहीं, रुचत नाहीं व पचत नाहीं. मनोभूमि वैराग्यानें शुद्ध झाल्यावर त्यांत ज्ञानबीजाची पेरणी झाली कीं तें उगवतें. तुकोबा मूळचेच मुक्त होते तेव्हां हा सामान्य नियम त्यांना लागू नाहीं असें कोणी म्हणेल तर तें खरें आहे, पण मुक्ताचें चरित्र एकदां लिहावयास घेतल्यावर मानवीदृष्टीनेंच तें लिहिलें पाहिजे. जीवन्मुक्ताला साधनें कशाला हवींत, तो सदाच साधनातीत असतो, पण मनुष्यदृष्टीनें मुक्तचरित्र वर्णिल्याशिवाय मुमुक्षुसाधकांना त्यापासून आपण काय बोध घ्यावा हें समजत नाहीं. म्हणून वैराग्यप्राप्तीनंतर तुकोबांनीं कोणत्या साधनांचें आचरण करून भगवत्प्रसाद जोडला हें आपणांस पहावयाचें

आहे. तुकोबाचें घराणें वारकऱ्यांचें, तेव्हां परंपराप्राप्त वारकरीपद्धतीचें शिक्षण त्यांना बाळपणापासून घरींच मिळत होतें. पंढरीची आषाढीकार्तिकीची वारी घरांत सुरू होती. वैराग्य होण्यापूर्वीं बराच वेळ ते पंढरीस जाऊन आले होते. ज्ञानेश्वरी व नाथांचें भागवत, नामदेवांचे व नाथांचे अभंग त्यांनीं बाळपणापासून घरीं दारीं ऐकले होते. नाथमहाराज आळंदीहून गेल्यापासून आळंदीची यात्रा वाढली व वारकरीसंप्रदायाचा प्रसार पुणेंप्रांतीं जारीनें होऊं लागला होता. आळंदीस, पुण्यास, देहूस व आसपासच्या खेड्यापाड्यांतून एकादशीचे उपास, भजनें, कीर्तनें यांचा प्रघात बराच पडला होता. अशा परिस्थितींत तुकोबांच्या मनावर साहजीकच वारकरीपंथाचा पगडा बसला, त्या पंथाचाच क्रम त्यांनीं स्वीकारला व अखेर आपल्या तपोबळानें ते त्या पंथाचे अध्वर्यु झाले. कामक्रोधलोभरूप संसारांतून जीव निसटला ह्मणजे तो प्रथम मोक्षमार्गीं सज्जनांचा संग धरितो. “ मग सत्संगें प्रबळें। सच्छास्त्राचेनि बळें। जन्ममृत्यूंचीं निमाळें। निस्तरे रानें ॥ ४४१ ॥ ते वेळीं आत्मानंदें आघवें। जें सदा वसतें बरवें। तें तैसेंचि पाटण पावे। गुरुकृपेचें ॥ ४४२ ॥ तेथ प्रियाची परम सीमा। तो भेटे माउली आत्मा। तये खेवीं आटे डिंडिमा। सांसारिक हे ॥ ४४३ ॥” ( ज्ञाने०अ. १६ ). सतत सत्संग, सच्छास्त्राचें अध्ययन, गुरुकृपा व आत्मारामाची भेट या क्रमानें जीव संसाराच्या गलबल्यांतून मुक्त होतो. अगदीं याच क्रमानें तुकोबा साक्षात्काराच्या अखेरच्या पायरीपर्यंत क्रमानेंच मोक्षपर्वतावर चढत गेले. हाच दिव्य इतिहास आपणांस या मध्यखंडांत पाहावयाचा आहे. सज्जनांचा संग व त्या संगतींत सहज अंगीं जडणाऱ्या साधनांचा अवलंब हा त्यांचा पहिला टप्पा; सच्छास्त्रांचें ह्म० साधुसंतांचे ग्रंथाध्ययन हा दुसरा टप्पा; गुरूपदेशाचा तिसरा टप्पा व शेवटचा टप्पा म्हणजे साक्षात्कार. हे चार

मुख्य टप्पे व मधली सांखळी जुळविणारें दुय्यम टप्पे घेत घेत आपणही तुकोबांचा त्यांच्याच वचनाधारें माग काढीत व त्यांच्या पावलावर पाऊल ठेवीत संथपणानें अखेरचा मुक्काम गांठूं!

२ मोक्षमार्गी सज्जनांचा संग हा पहिला टप्पा आहे. मोक्षाच्या मार्गाला लागलेले जे मुमुक्षु व साधक यांचा सहवास शुभेच्छा वाढविण्यास कारण होतो. मुमुक्षूला बद्धाची संगति रुचायचीच नाहीं. सजातीयाची संगति प्रीतीला व गुणवर्धनाला उपयोगी पडते. प्रपंचाचा वीट येऊन तुकोबांना देव पाहिजे असें वाटूं लागल्याबरोबर 'देव वसे ज्याचे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥' अशी स्वाभाविक इच्छा झाली. पूर्ण बनलेल्या सिद्धाची किंवा सद्गुरूची भेट एकदम होत नाहीं, व झाली तरी ती पचत नाहीं; म्हणून प्रथम आपल्याचसारख्या समानधर्मीयांची संगति लागते, व त्या संगतींतले आचारविचार प्रिय वाटून त्यांचाच मार्ग अनुसरावासा वाटतो. याप्रमाणें विचार करून पाहतां तुकोबांना वारकऱ्यांची संगति प्रथम झाली, ती प्रिय वाटली, व वारकऱ्यांच्या साधनांचाच त्यांनीं अवलंब केला. वारकरीसंप्रदायाचा साग्र इतिहास येथें सांगायला अवकाश नाहीं, ह्मणून थोडक्यांत या संप्रदायाचे जे मूलभूत सिद्धांत आहेत ते सांगतों. हा संप्रदाय फार जुना आहे, श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्याही पूर्वीचा आहे. वारकरीसंप्रदाय ह्म० महाराष्ट्रीयांचा भागवतधर्म. याची सिद्धांतपंचदशी आज सर्व वारकऱ्यांना मान्य अशी आहे:—

( १ ) उपास्यः—श्रीपंढरपूरनिवासी पांडुरंग. सगुणनिर्गुण एक हा सिद्धांत. महाविष्णूचे सर्व अवतार मान्य, पण दशावतारांपैकीं राम व कृष्ण हे विशेष मान्य. विठ्ठल म्हणजे गोपालकृष्ण हें उपास्य.

(२)सच्छास्त्रग्रंथः—मुख्य उपासनाग्रंथ गीता आणि भागवतः गीता

ज्ञानेश्वरीभाष्यानुसार व भागवत-एकादशस्कंध नाथभागवतानुसार. सनातनधर्मप्रतिपादक वेदशास्त्रपुराणें मान्य, वाल्मीकिरामायण व महाभारत मान्य, संप्रदायप्रवर्तक संतांचीं वचनेंही मान्य. ‘ हरिपाठ ’ प्रशस्त.

( ३ ) **ध्येयः**—अभेदभक्ति, अद्वैतभक्ति किंवा ‘ मुक्तीवरील भक्ति’ हें ध्येय. अद्वैतसिद्धांत मान्य, पण‘अभेदूनि भेद राखियेला अंगीं। वाढावया जगीं प्रेमसुख ॥ ’ या हातोटीनें वरील ध्येयाची सिद्धि करायची. ‘ तेंचि भक्ति तेंचि ज्ञान । एक विठ्ठलाचि जाण ॥ ’ याप्रमाणें ज्ञानभक्तींची एकरूपता. द्वैताद्वैतभावानें एका नारायणाचीच सर्व व्याप्ति आहे या अनुभवाला पोंचणें हें ध्येय.

( ४ ) **मुख्यसाधनः**—नवविधाभक्ति मान्य, त्यांतही अखंड नामस्मरण व निरपेक्ष कीर्तन हें मुख्य साधन.

( ५ ) **मुख्य मंत्रः**—‘रामकृष्णहरी’. श्रीहरीचीं अनंत नामें सर्व स्मरणीय, विष्णुसहस्रनामपाठ प्रशस्त.

( ६ ) **भक्तराजः**—गरुड, हनुमंत व पुंडलीक.

( ७ ) **आदिगुरुः**—शंकर. हरिहरांत पूर्ण अभेद.

( ८ ) **मुख्यमहंतः**—नारदप्रल्हादध्रुवार्जुनोद्धवांप्रमाणेंच ‘ निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई । एकनाथ नामदेव तुकाराम ’ हे मुख्य महंत. यांनीं मान्य केलेले संतही मान्य.

( ९ ) **संतस्मरणः**—‘ जयजय रामकृष्ण हरी’ ‘ जय विठ्ठल’ ‘ विठोबा रखुमाई ’ या देवाच्या नाममंत्रांप्रमाणेंच ‘ ज्ञानेश्वर माउली तुकाराम ’ ‘ ज्ञानदेवनामदेवएकातुका ’ ‘ भानुदास एकनाथ ’ ‘ दत्तजनार्दन एकनाथ ’ हे संतांचे नाममंत्रही तारक. ‘देव ते संत संत ते देव ’ हा सिद्धांत.

( १० ) **पूज्यः**—संत, गो, विप्र व अतिथि हे पूज्य. भगवान् श्रीकृष्णांनीं यांना पूज्य मानायचा घालून दिलेला कित्ता अनुलंघ-

नीय. तुळशी पूज्य: दारीं तुळशीवृंदावन, गळ्यांत तुळशीमाळ, व देवाला तुळशीहार अवश्य.

( ११ ) **महाव्रतें**:—एकादशी व सोमवार. आषाढी व कार्तिकी दोन्ही वेळ पंढरीची वारी अवश्य, किमानपक्षीं एक नियमित करून ती चुकूं न देणें. महाशिवरात्र अवश्य.

( १२ ) **महातीर्थ**:—महातीर्थ चंद्रभागा व महाक्षेत्र पंढरपूर. त्र्यंबकेश्वर, आळंदी, पैठण, सासवड, देहू हीं संतस्थानें ही महाक्षेत्रेंच होत. गंगागोदायमुनादि तीर्थें व काशीद्वारकाजगन्नाथादि क्षेत्रें मान्य.

( १३ ) **वर्ज्य**:—परस्त्री, परधन, परनिंदा व मद्यमांस सर्वथा वर्ज्य. हिंसा सर्वकाळीं सर्वस्थळीं सर्वांना सर्वथा वर्ज्य. कायेनें, वाचेनें व मनानें अहिंसाव्रत पाळणें अवश्य.

( १४ ) **आचार**:—वर्णधर्म, आश्रमधर्म, जातिधर्म, व कुळधर्म ज्याचे त्यानें अवश्य पाळले पाहिजेत. 'कुळधर्म चाळी, विधिनिषेध पाळी ' पण सर्व विहितकर्मे भगवत्प्रीत्यर्थ करी हा शास्त्रसंतांचा उपदेश सर्ववंद्य. " यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें।कर्मबंधातें।।"(ज्ञाने.१८-९३३).

( १५ ) **परोपकारव्रत**:—'सर्वं विष्णुमयं जगत् ' म्ह० विष्णुमय जग ( हाच ) वैष्णवाचा धर्म (तुका) ' सर्वांभूतीं भगवद्भाव ' ( नाथ ), " जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥ " ( ज्ञाने० अ० १०–११८ ) हें उदार तत्त्व चित्तांत ठेवून व समतेनें, दयेनें, सर्वांशीं वागून कायावाचामनानें सर्वभूतांच्या उपयोगीं पडावें ही भूतपतीची सेवा होय.

३ वारकरीसंप्रदायाचीं हीं मुख्य तत्त्वें आहेत. भागवतधर्माचीं हीं तत्त्वें मान्य करून व मान्य करीत वारकरी पांडुरंगाची उपासना करितो. तुकोबांच्या पूर्वीं हींच तत्त्वें वारकऱ्यांत प्रचलित होतीं

व त्यांनीं आपल्या चारित्र्यानें व उपदेशानें ह्याच तत्वांचा प्रसार केला. भागवतधर्म म्हणजे कांहीं वेगळा क्रांतिकारक धर्म आहे असें नाहीं, वेदधर्माचेंच हें सर्वसंग्राहक, अत्यंत मनोहर व लोकप्रिय असें स्वरूप आहे. वारकरीसंप्रदाय म्ह० महाराष्ट्राचा भागवतधर्म. हा एक वेदविरुद्ध बंड आहे असें म्हणणारे पुराणे कर्मठ व आमच्यासारखाच सुधारणेचा हा एक प्रकार आहे असें म्हणणारे अर्वाचीन सुधारक हे दोघेही चुकले आहेत. ‘ उभौ तौ न विजानीतो ! ’ हा संप्रदाय सनातनधर्माचाच आहे. भागवतधर्माला वर्णाश्रमधर्म मान्य आहेत, विहितकर्म अत्याज्य आहे अशी त्याची शिकवण आहे. खरा वारकरी जातीचा अभिमान वाहत नाहीं व कोणाचा हेवादेवाही करीत नाहीं. प्रारब्धवशात् जेथें आपणांस नारायणानें जन्म दिला ज्या जातींत राहून व त्या जातीचीं कर्मे करीत असतांही नारायणाचें सप्रेम भजन करावें व भवसागरांतून तरून जावें एवढेंच त्याला कर्तव्य असतें. पांडुरंगाचें भजन हेंच जीविताचें साफल्य आहे अशी संप्रदायाची शिकवण असल्यामुळें सर्व जातींचें, सर्व धंद्यांचे भाविक लोक प्रेमानें एके ठिकाणीं जमतात व नामसंकीर्तनाचा आनंद देतात घेतात. खरा श्रेष्ठपणा देवाचा भक्त होण्यांत आहे. सदाचार व निष्काम हरिभजन या गोष्टी संभाळल्या म्हणजे झालें. अशा प्रेमळ वारकऱ्यांचा म्हणजे मोक्षमार्गी सज्जनांचा संग तुकोबांना पाहिलाच होता तो त्यांनीं दृढ धरिला. संप्रदाय घरचा खरा, पण वैराग्य झाल्यापासून तो त्यांनीं मनापासून पत्करला.

४ अनुताप होऊन संप्रदाय पत्करला म्हणजे त्याची सजीवता प्रत्ययास येऊं लागते. पंढरीची वारी बिनचूक करणें, एकादशी महाव्रताचा अंगीकार करणें, दिवसारात्रीं हरिजागरांत—कीर्तनभजनांत व नामस्मरणांत रमणें, एरवीं सुद्धां मांजर दुधाला टपून

बसतें त्याप्रमाणें कीर्तनाला टपून बसणें, कीर्तनभजनपुराणश्रवणांचे प्रसंग साधणें, कोणी भजनाला किंवा कीर्तनाला उभे राहिले म्हणजे ' भावें चित्त शुद्ध करोनियां ' त्यांचे मागें टाळ घेऊन उभें राहणें, ध्रुपद धरणें, हळु हळु वीणा गळ्यांत घालून स्वतः कीर्तन करणें व कीर्तनास अवश्य असें पाठपाठांतर करणें, ग्रंथांची चालना करणें, अर्थ मनास आणून अर्थरूप होऊन रंगून जाणें व या आनंदांत अहोरात्र राहणें हा अभ्यास इतर वारकऱ्यांच्या संगतीनें तुकोबांनीं यथाक्रम केला.

९ वारकरी संप्रदायांत एकादशी या महाव्रताचें फार माहात्म्य आहे. पंधरा दिवसांनीं एक दिवस उपोषित राहून दिवस आणि विशेषतः रात्र हरिभजनांत घालविणें हा उपवासाचा हेतु असतो. जगांतील सर्व धर्मांत[1] उपवासाचें मनोवाक्कायशुद्धीच्या दृष्टीनें महत्व मानलें आहे. आपल्या धर्मांत प्रथम श्रुतिमाउलीनेंच उपवास हें परमात्मप्राप्तीचें साधन म्हणून सांगितलें आहे. बृहदारण्योपानिषदांत ' तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिशन्ति यज्ञेन दानेन तपसानाशकेन ' असें वचन आहे. यांत वेदाभ्यास ह्म० स्वाध्याय, यज्ञ, दान, तप व अनाशक म्ह० अशनरहित—अन्नपाण्यावांचून राहणें—

१ यहूदी लोकांत तिश्री महिन्याच्या १० व्या तारखेस सर्वांनीं उपवास केलाच पाहिजे अशी त्या धर्माची सक्त आज्ञा आहे. उपवास न केल्यास शिरोवध केला जाईल असाही त्या धर्माचा कडक निर्बंध आहे. मुसलमान लोकांत रमजान महिन्यांत नक्षत्रांचा उदय होईपर्यंत किती निकरानें उपवास करितात हें सर्वांस माहीत आहेच. जैन व बुद्धधर्मांतही उपवासाची पद्धती सांगितली आहे. ख्रिस्ती धर्मांत स्वतः येशू ख्रिस्तानें ४० अहोरात्र उपवास केल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे. अलीकडे अमेरिकेंत नवीन कल्पनांचा प्रसार होत असून उपवासानें रोग बरे करण्याची प्रक्रिया डॉक्तर लोकही शिकवूं लागले आहेत. आरोग्याच्या दृष्टीनें तिकडे ' लंघन ' बहुतांस मान्य होऊं लागलें आहे.

हे पांच भगवत्प्राप्तीचें मार्ग आहेत म्हणून सांगितलें आहे. महाभारतांत अनुशासनपर्व अ० १०५।१०६ मध्यें एक दिवसाचा, दोन दिवसांचे, तीन दिवसांचे, पंधरवड्याचे, आणि वर्षाचे असे उपवासाचे अनेक दिवस सांगितले आहेत. अनाशक, अनशन, निरशन, उपवास ह्या शब्दांवरून अन्नपाणी वर्ज्य करून भगवंताचें सान्निध्य करणें (उप–समीप, वास–वस्ती ) ह्म० भगवच्चिंतनांत काळ घालविणें हा उपवासाचा मुख्य हेतु आहे हें उघड आहे. भागवतांत एकादशीचें माहात्म्य सांगितलें असून नवमस्कंधांत ( अ० ४–६ ) अंबरीष राजाचें सुंदर आख्यानही दिलें आहे. द्वादशीच्या दिवशीं दुर्वासऋषि अतिथि आले. त्यांना भोजनास येण्यास उशीर होऊन व्रतभंग होऊं नये म्हणून या भगवद्भक्त राजानें द्वादशीला देवाचें तीर्थ घेतलें या निमित्तानें दुर्वास क्रुद्ध झाले. त्यांनीं जटेंतून एक कृत्या निर्माण करून अंबरीषावर सोडली. राजा विष्णुभक्त. भगवंताचें सुदर्शन दुर्वासाच्या मागें लागलें. दुर्वास घाबरून अखेर राजाकडे परत आले. एक वर्षाच्या उपवासानंतर दुर्वासासह राजानें भोजन केलें व पारणा फेडिली. हा अंबरीषराजा पंढरपूरकडील दाक्षिणात्य राजा होता. द्वादशी–बारस, बार्शी हें त्याचें राजधानीचें शहर होतें. बार्शी येथें अद्याप भगवानाचें रम्य मंदिर असून पंढरीची यात्रा संपल्यावर पुष्कळ वारकरी बार्शीच्या भगवानाचें दर्शन घेऊन आपापल्या गांवीं जातात. अंबरीष राजा परम धार्मिक, उदार व पराक्रमी होता ( भारत. शांतिपर्व अ० १२४ ). याप्रमाणें उपवासाचें सामान्यतः व एकादशीचें विशेषतः माहात्म्य आपल्या धर्मांत प्राचीन कालापासून चाललें असून भागवतधर्मीयांचें तर तें महाव्रतच आहे. शरीर, वाचा व मन यांच्या पवित्रतेसाठी, ध्यानधारणेंच्या सौकर्यासाठीं, आत्मचिंतनासाठीं उपवास करण्याचा जो प्रघात पूर्वीपासून पडला होता व ज्याचें वारकरीमंडळांत

विशेष महत्व आहे तें एकादशीचें महाव्रत तुकोबांनीं जन्मभर चालविलें इतकेंच नव्हे तर पुढें उपदेशप्रसंगीं एकादशी करण्याबद्दल वारंवार लोकांस सांगून पिंडपोषी आळशी लोकांचा तीव्र शब्दांनीं निषेधही केला आहे !

एकादशीस अन्नपान । जे नर करिती भोजन।
श्वानविष्ठेसमान । अधम जन ते एक ॥ १ ॥
ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन ।
गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ ध्रु०॥
शेज बाज विलास भोग । करिती कामिनीचा संग ।
तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधि बळिवंत ॥ २ ॥

* * * *

विडाभक्षणापासून सर्व विलासांचा त्याग सांगितला आहे. उपवासानें शरीर हलकें, मन तरतरित व बुद्धि सूक्ष्म होते आणि ईश्वरभजनाचें कार्य उत्तम होतें हा सर्वांप्रमाणें तुकोबांना अनुभव आल्यामुळें कळकळीनेंच ते अशी कडक भाषा वापरीत आहेत.

एकादशीव्रत सोमवार न करिती।कोण त्यांची गति होईल नेणों।१।
काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥ २ ॥

एकादशीला रोजचें अन्न न घेतां दहा वेगवेगळे चमचमित पदार्थ करून खाणें याचाही तुकोबांनीं धिक्कार केला आहे.

पंधरा दिवसा एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥ १ ॥
काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥

हरिकथाश्रवण व वैष्णवांचें पूजन ज्यानें घडतें अशी एकादशी कां रे करीत नाहींस ? संसारकामासाठीं जागरणें काय थोडीं होतात ? रात्रीं कीर्तनसुख भोगायला देवळांत कां जात नाहींस ? ‘ देउळासी कां रे मरसी जातां ?’ उपवास सोसत नाहीं होय ?

तुका ह्मणे कां रे सकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ! ॥४

एकादशीव्रत करा, पोटभर खाऊं नका, हरिजागर करा, एवढें अट्टहासानें सांगायचें तुकोबा ! तुह्मांला काय कारण ?—

काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥१॥

असो. एकादशी महाव्रत तुकोबांनीं चालविलें एवढेंच नव्हे तर त्याबद्दल त्यांनीं कळवळ्यानें जनांस बोधही[२] केला आहे.

६ अर्वाचीनांस वाटेल कीं 'एकादशीचें एवढें काय महत्त्व यांनीं वर्णन केलें आहे? कोणी 'भोजन करील, फराळ करील, नाहीं तर निरशन करील! त्याचें एवढें प्रस्थ कशाला माजविलें पाहिजे?' तर तसें नाहीं. धर्मशास्त्राची आज्ञा ही तर गोष्ट आहेच, पण ज्या समाजांत किंवा संप्रदायांत मनुष्य वाढतो त्याचे मुख्य मुख्य नियम पाळल्याशिवाय त्यांतील बांधवांशीं त्याला एकरूप होतां येत नाहीं. हा आपला समानधर्मीय खरा आहे, हंसांच्या मेळ्यांत शिरलेला डोमकावळा नाहीं, असा सांप्रदायिकांचा त्यावर विश्वास बसल्याखेरीज त्यांच्यांत तो मिळून जात नाहीं व मिळून गेल्याशिवाय संप्रदायाचें अंतरंग व खरें रहस्य त्याला उमगत नाहीं. उपास करणें हें जर चित्तशुद्धीला कारण आहे तर तृतीयेला नाहीं तर सप्तमीलाच उपवास केला म्हणून काय बिघडतें असल्या वितंडवादांत शिरण्यापासून कोणासही स्वहित साधायचें नाहीं. संप्रदाय म्हटला कीं नियम आलेच. संप्रदायाचें अनुष्ठान केल्याशिवाय ज्ञानाची सिद्धि नाहीं, व नियमावांचून संप्रदाय नाहीं असें जगाचा इतिहास पाहिला असतां कोणाही सुज्ञ मनुष्यास कळून

---

२ नामदेवनाथांनींही तुकोबाप्रमाणेंच या व्रताबद्दल जनांस बोध केला आहे. रामदासस्वामींनीं हरिदिनपंचकांत 'ज्यासी हरिची प्राप्ती व्हावी । तेणें हरिदिनी करावी ॥,' 'एकादशी नव्हे व्रत । वैकुंठीचा महापंथ ॥' असें ह्मटलें आहे.

येईल. शिवाय परंपरेचे नियम हजारो लाखो माणसें पाळीत असतां त्या नियमांच्या दाढर्यामुळें नियमांस एक प्रकारची स्थिरता व पूज्यता प्राप्त होते. एकादशी करणारे सर्व भाविक हरिमंदिरांत कीर्तनास जमले व त्यांत यथेच्छ जेऊन विडा चघळीत एकादा पंडित जाऊन बसला तर समाजास त्यामुळें बरें वाटणार नाहीं. सतारीच्या सर्व तारा एका सूरांत आल्यानें जी मजा येते ते न येतां लोकांच्या एकीभूत अंतःप्रवाहांत मिळून जाण्याच्या आनंदाला तो मुकेल व यांत त्याचीच हानि आहे. समाजाचे नियम समाजांत मिळून जाण्याच्या आनंदासाठीं म्ह० स्वहितासाठींच पाळायचे असतात. असो. एकादशीव्रत हें केवळ लंघनानें शरीर सुडसुडीत राहतें या आरोग्याच्या दृष्टीनें पाळायचें नसतें. ही पिंडपोषकांची दृष्टि झाली. हें महाव्रत भगवत्प्रसाद जोडण्यासाठीं परमार्थदृष्टीनें पाळायचें असतें. आज हरिदिन आहे, मला उपवास आहे, रात्रीं कीर्तनाचा आनंद भोगायचा आहे, आज कांहीं तरी विशेष आहे या कल्पनेपासूनच चित्तशुद्धीला आरंभ होतो. गंगास्नान, निराहार किंवा निदान अल्पाहार, भाविकांच्या भेटी, प्रेमळांचा समागम, मृदंगटाळवीणांचें मधुरध्वनि, नामघोष, भगवत्कथालाप हे सारे लाभ एकादशीव्रताचा अंगीकार केल्यापासून होऊं लागतात. तेवढ्यापुरता तरी संसाराचा विसर पडतो, कांहीं काळ तरी चित्त हरिस्वरूपीं रमतें. हा एक दिवसाचा अनुभव दृढ करण्यासाठीं नित्यनेम पाळण्याची बुद्धि होते व अखेर नित्याभ्यास अंगवळणी पडून खरा परमार्थलाभ होतो. हा अनेकांचा अनुभव आहे. 'आरंभीं कीर्तन करी एकादशी' हा जो तुकोबांनीं पहिला अभ्यास केला म्हणून म्हटलें आहे त्याचें बीज हें आहे.

७ एकादशी आणि कीर्तन यांचा वसंत आणि आम्रमंजरीचा बहर याप्रमाणें नित्यसंबंध आहे. कीर्तन आणि नामस्मरण या

संबंधानें पुढें एक स्वतंत्र प्रकरण येणार आहे. येथें एवढेंच सांगतों कीं नामसंकीर्तनाचा आनंदानुभव संप्रदाय पत्करल्यानेंच खरा खरा येणारा आहे. तुकोबा या अनुभवांत पुरे मुरले.

माझें आराधन । पंढरपुरींचें निधान ॥ १ ॥
तया एकावीण दुजें । कांहीं नेणें पंढरिराजें ॥ २ ॥

* * * *

होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥ १ ॥
हाचि माझा नेमधर्म । मुखीं विठोबाचें नाम ॥ २ ॥
जिवींचा जिव्हाळा । पाहूं आपुलिये डोळां ॥ १ ॥
आतां विठ्ठल एक देव । येर अवघेंचि वाव ॥ २ ॥

* * * *

भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥ १ ॥
तारूं भला पांडुरंग । पाय भिजों नेदी अंग ॥ ध्रु० ॥
मागें उतरले बहुत । पैलतीरीं साधुसंत ॥ २ ॥
तुका म्हणे लागवेगें । जाऊं तयाचिये मागें ॥ ३ ॥

ही सांप्रदायिक एकनिष्ठ उपास्यप्रीति त्यांचे हृदयांत भरून गेली. ‘ सुखरूप ’ असा माझ्या पांडुरंगासारखा कोण आहे ? त्याच्या भेटीला कांहीं अडदर नाहीं. ‘ नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं.’ पंढरीस अन्यविधी नाहीं. ‘ चंद्रभागे स्नान विध तो हरि-कथा ’ एवढ्यानेंच ‘ समाधान चित्ता सर्वकाळ ’ मिळतें. सवंगडी वारकरी यांचें ‘ आम्हां विठ्ठल जीवन । टाळ चिपुळिया धन ॥ ’ एवढेंच धन असतें, पण ‘भक्तिसुखें लांचावलें असें तें विटेवरचें रूप’ पाहिलें कीं त्यांना त्यावरून आपला जीवभाव ओवाळून टाकावा-सा वाटतो. अशा प्रेमळ वारकरीमित्रांच्या संगतीनें देहूस, पंढरीस, किंवा वारीस जातां येतां जो आनंद होतो तो अनिर्वचनीय आहे. ‘ तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों. ’

संसार तो कोण देखे । आम्हां सखे हरिजन ॥ १ ॥

काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥ २ ॥

विठ्ठलाचे गाढे वीर कसे असतात पहा:—

झुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्या ॥ १ ॥
गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्या मनीं बैसलासे ॥ ध्रु०
ऊर्ध्व पुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें२
तुका म्हणे शंखचक्राचे शृंगार । नामामृत सार मुखामाजी ॥ ३ ॥

आषाढी कार्तिकीची वारी जवळ आली कीं तुकोबांच्या मनाला अधिकच उल्हास वाटे:—

आतां जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ॥ १ ॥
चंद्रभागेचिया तीरीं । आम्हीं नाचों पंढरपुरीं ॥ ध्रु० ॥
जेथें संताची दाटणी । तेथें घेईन पायवणी ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही बळी । जीव दिला पायांतळीं ॥ ३ ॥

वारकरी तुकोबांबरोबर पंढरीस जाण्यास तयार झाले म्हणजे तुकोबांनीं त्यांना म्हणावें:—

स्वल्प वाटे चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥
तुम्ही आम्ही खेळीमेळी । गदारोळी आनंदें ॥ ध्रु० ॥
ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनी ॥ २ ॥
तुका म्हणे हेचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥ ३ ॥

पंढरीस देवदर्शन व संतमेळ्यांत कीर्तनसुख भोगून त्यांनीं म्हणावें:—

पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्य उदयाचा ठसा ।
जालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥
आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें ।
कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥ ध्रु० ॥
आलिंगनें संतांचिया । दिव्य झाली माझी काया ।
मस्तक हें पायां—। वरी त्यांच्या ठेविलें ॥ २ ॥

* * * *

ज्या संगतींत भगवत्प्रेम उत्पन्न होतें त्या संगतीची आवड सहजच

उत्पन्न होते. 'संतसंगतीं सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥' हा लाभ होत असल्यामुळें 'साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥' किंवा 'तुका म्हणे संतमेळीं । पायधुळी वंदीन' असा वारकऱ्यांविषयीं चित्तांत प्रेमादर वाटणें सहज आहे. संतांच्या दारीं श्वान होऊन पडावें हेंही भाग्याचें आहे, कारण तेथें उच्छिष्ट प्रसाद मिळून देवाचे गुणानुवाद ऐकायला मिळतात असेंही तुकोबांनीं म्हटलें आहे.

त्यांचे हे समानधर्मी बांधवांविषयीं कृतज्ञ प्रेमाचे उद्गार आहेत. एका उपास्याचे उपासक बंधुप्रेमानें बद्ध होतात. त्यांचे आचारविचार, त्यांचें उपास्य, त्यांच्या उपासनापद्धती, त्यांचे नित्यनेम, खाणेंपिणें, आवडी—निवडी, स्वभावही एका विशिष्ट प्रकारचे बनतात आणि त्यांच्यांत सहज ' भाऊपण ' उत्पन्न होतें. वारकऱ्यांविषयीं असाच प्रकार आहे. वारकऱ्यांचीं गांवोगांव जीं मंडळें आहेत तीं पाहिलीं म्हणजे वारकरी बहुधा रोज रात्रीं व विशेषतः दर एकादशीस आणि गुरुवारीं किंवा सोमवारीं एकत्र जमून भजन करीत आहेत असें आढळून येईल. शिवाय आषाढीकार्तिकीला ते मेळयामेळ्यानेंच कीर्तनभजन करीत आनंदानें गातनाचत पंढरीस जातात. पंढरीच्या वाऱ्या दरमहा करणारे कांहीं नेमनिष्ठ वारकरी असतात. बहुतेक आषाढीकार्तिकीच्या मुख्य वाऱ्या करितात, कित्येक माही किंवा चैत्री वाऱ्याही करितात. कोणत्याही महिन्याची शुद्ध एकादशी देवाची व वद्य संतांची, यामुळें साऱ्या शुद्धपक्षांतल्या वाऱ्या पंढरीच्या असतात. अशा कमीअधिक नेमाच्या वारकऱ्यांच्या मेळ्यांत तुकोबांचें आयुष्य गेल्यामुळें वारकऱ्यांच्या पद्धतीनें तुकोबा गेले. वारकऱ्यांचें मुख्य साधन भजन व कीर्तन. उंचनीच, ब्राह्मणमहार, पुण्यवंतपापी सर्वच संसाराचे किंकर असल्यामुळें देवापुढें ते सर्वच दीनदुबळे आहेत. सर्वांना कीर्तनाचा अधिकार आहे.

दीन आणि दुर्बळांशीं । सुखराशी हरिकथा ॥

*　　*　　*　　*

कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥
प्रेमछंदें नाचे डोलें । हारपला देहभाव ॥ २ ॥

असा तुकोबांप्रमाणें कोणाही भाविकाला कीर्तनानंदाचा अनुभव येतो. कीर्तन करणारा स्वतः तरतो व इतरांनाही तारतो. भक्त हरिकीर्ति गातो म्हणून भक्तवत्सल देव त्याच्या मागेंपुढें त्याचीं सांकडीं वारीत संचार करितो. कीर्तनाचे वर्म तुकोबांनीं पुढील अभंगांत उत्कृष्ट प्रकारें सांगितलें आहे:—

कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम ।
तेथींच उत्तम । चरणरज वांदितां ॥ १ ॥
जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारीनर ।
गाती ऐकती सादर । ले पवित्र हरिकथा ॥ २ ॥

*　　*　　*　　*

हरिकीर्तनांत देव, भक्त आणि नाम यांचा त्रिवेणी संगम होतो. कथेंत देवाचे गुणानुवाद गायिले जातात, नामाचा जयघोष होतो आणि आयता भक्तभाविकांचा समागम घडतो. कथाप्रयागांत हे तीनहीं लाभ होतात. यांतला एकेक लाभहि बहुमोल आहे, मग तीनहीं लाभ जेथें एकदम् अनायासें मिळतात त्या कीर्तनाला जाऊन पवित्र हरिकथा सादर ऐकणारे नारीनर सहज उद्धरून जातात यांत नवल काय? हरिकथा पवित्र आहे, ती गाणारे पवित्रपणें गातात व ऐकणारे सादर ऐकतात—अशा कीर्तनाइतकें स्वोद्धाराचें व लोकशिक्षणाचें उत्कृष्ट दुसरें कोणतें साधन आहे? प्रेमळ भक्त जेथें हरिगुण अत्यंत आवडीनें गातात तेथें हरि उभाच असतो. देव सांगतात:—

नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ ।
मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥ १ ॥

ज्ञानेश्वर महाराजांनीं कीर्तनभक्तीच्या सुखाचें वर्णन (ज्ञाने०

१९७–२११ ) फार बहारीचें केलें आहे. 'कीर्तनाच्या नटनाचां
प्रायश्चित्तांचे ( किंवा प्रायः चित्तांचे ) व्यवसाय सर्व खुंटतात, यम
दमादि योगसाधनें किंवा तीर्थ–यात्रा जीवांचें पाप उडवितात खरें
पण कीर्तनसुखांत रंगलेल्या प्रेमळांच्या ठिकाणीं पापच उरत नाहीं
कीर्तनानें जगाचें दुःख दूर होतें, कीर्तन जगाला आनंदाचें आवा
( तटाची भिंत ) घालून अवघें जगच महासुखानें दुमदुमून सोडतें
कीर्तनानें विश्व धवळित होऊन वैकुंठच पृथ्वीवर येतें.' असें सांगू
महाराज देवाचें वरील हृद्गत आपल्या वाणीनें सांगतातः—

**तो मी वैकुंठीं नसे । वेळ एक भानुबिंबींही न दिसे ।**
**वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय ॥ २०७ ॥**
**परी तयांपाशीं पांडवा । मी हरपला गिंवसावा ।**
**जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ २०८ ॥**

देव सांगतात 'मी नित्य वैकुंठांत, सूर्यमंडळांत किंवा योगिजन-
मनोकुंजांत राहणारा, आणि एकवेळ या तीनही ठिकाणीं मी सांप-
डायचा नाहीं पण माझे भक्त जेथें परमोल्हासानें माझें नामसंकी-
र्तन करितात, तेथें मात्र मी हटकून सांपडायचा !' ज्ञानोबारा-
यांनीं या मधुर ओव्यांत वरील श्लोकाचें भाषांतरच दिलें आहे
तुकोबारायांनींहीः—

**माझे भक्त गाती जेथें । नारदा मी उभा तेथें ॥ १ ॥**

असेंच म्हटलें आहे. तात्पर्य कीर्तनांत देवभक्तनामांचा संगम
असतो व ह्मणून ब्रह्मदेवानेंही लाळ घोटावी असें अपार भक्तिसुख
कीर्तनांत लहानथोर सर्वांना आयतें मिळतें. तुकोबांना प्रथम कीर्तन-
श्रवणाची, नंतर कीर्तन करण्याची आवडी लागली व अखेर कीर्तनभ-
क्तीचा त्यांचे ठायीं उत्कर्ष झाला. 'सांडूनी कीर्तन न करी आणिक
काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥'. कीर्तनांत किंबहुना परमा-

र्थांत प्रथमप्रवेश करतेवेळीं लज्जा आडवी येते, पण स्वतः कीर्तनांत रंगून गेल्यावर ‘ निर्लज्ज ’ कीर्तन अपाप अंगवळणी पडतें.

९ कीर्तन हें अशा प्रकारें श्रोत्यावक्त्यांना हरिमार्गाला लावण्याचें मुख्य साधन असल्यामुळें तेथें त्यांचें वर्तन शिस्तीचें असलें पाहिजे हें ओघानेंच आलें. ही शिस्त पूर्वीपासूनच चालू होती, तथापि त्या शिस्तीचे मुख्य नियम आपण तुकोबांच्या मुखानें एकूं. ‘ कथाकाळींची मर्यादा ’ या अभंगांत त्यांनीं कीर्तनाचे मुख्य नियम सांगितले आहेत. ( १ ) सप्रेम अंतःकरणानें जो कोणी ‘ टाळवाद्यगीतनृत्यांच्या ’ साह्यानें भगवंताचे गुणनाम गातो तो भगवद्रूप लेखावा, त्याला नम्रपणें वदावें. ( २ ) कथेंत मर्यादेनें बसावें. कथेंत बसून आळसें अंग मोडूं नये, ढुंग कानवडें इ० वांकडें करून बसूं नये, विडा चघळीत कीर्तनाला जाऊं नये, तोंडीं विडा ठेवून कथेला बसूं नये इ० तोंड स्वच्छ धुवून बसावें, नामपाठाला चित्त द्यावें, कीर्तन चाललें असतां अन्यकथा—गप्पासप्पा बोलूं नयेत, कथेंत मानाची इच्छा करूं नये, तेथें थोरपणा दाखवूं नये, उंची वस्त्रें नेसून मग त्यांना धूळ लागेल म्हणून तीं सावरून बसूं नये, श्रेष्ठांना कनिष्ठांनीं खेटून बसूं नये, आपण बाजेवर इ० उंच जागीं बसून हरिदासाकडे हेळणेनें पाहूं नये, हे नियम अवश्य पाळावेत. ( ३ ) कोणाचेही अवगुण मनांत आणूं नयेत.याप्रमाणें कीर्तनाची व हरिदासाची मर्यादा पाळून देहबुद्धीचे ढंग चित्तावर उठूं देऊं नयेत. तुकोबांनीं श्रोत्यांचे हे नियम सांगितले तसे वक्त्यांचेही नियम सांगितले आहेत. वक्त्याचा मान मोठा आहे. ‘ वक्त्या आधीं मान ’ इ० श्रोत्यांत यति असले तरी गंधाक्षतापूजन त्यांच्याआधीं वक्त्याचेंच झालें पाहिजे. वक्त्याचा मान मोठा आहे तर जबाबदारीही मोठी आहे. पहिली गोष्ट म्हणजे हरिदासानें निरपेक्ष कीर्तन केलें पाहिजे. त्यानें धन आणि मान दोहोंची इच्छा करूं नये, कीर्तनाचें मोल

घेऊं नये. त्यानें तट्टावृषभासी दाणाही घेतां उपयोगी नाहीं. हरिकथेवर पोट भरणाऱ्यांस त्यांनीं चांडाळ म्हटलें आहे. आशाबद्ध कीर्तन करूं नये इतकेंच नव्हे, 'कीर्तनाचा विकरा तें मातेचें गमन' आहे. 'कन्या गो करी कथेचा विकरा। चांडाळ तो खरा तया नांव,' म्ह० कन्या, गाय, व कथा यांचा विक्रय करील तो चांडाळ होय. हरिगुणकीर्ति ही हरिदासांची माय आहे, तिचा विक्रय करणें लाजिरवाणें व नरकाला नेणारें आहे. 'कथा करोनियां द्रव्य देती घेती। तयां अधोगति नरकवास' आहे. कीर्तनकाराची वाणी मधुर नसली तरी चालेल. 'मधुरावाणीच्या नको पडों भरीं.' स्वभावतः ती मधुर असली तर 'हें तों तुमचें देणें देवा' असें समजून देवाचे गुण गाण्यांत ती वेंचावी. देवाला उंच आलाप व वांकडेतिकडे तान यांची आवड नाहीं. देव भावाचा भुकेला आहे.

**नाइकावे कानीं तयाचे ते बोल। भक्तीवीण फोल ज्ञान सांगे ॥१॥**
**वाखाणी अद्वैत भक्तिभावेवीण। दुःख पावे शीण श्रोतावक्ता॥ २॥**

ज्ञानभक्ति बोलावी पण देवभक्तपण मोडणारें ज्ञान कोणीं बोलूं नये. 'सगुणचरित्रें परमपवित्रें हरिचीं वर्णावीं' या पदांत नाथांनींही हेंच सांगितलें आहे. हरिमूर्ति व हरिप्रेम चित्तीं ठसेल तें बोलावें, वैराग्याच्या युक्ति विवराव्यात, भक्तिप्रेमावांचून इतर बाष्कळ गोष्टी कथेंत काढूं नयेत, अद्वयभजनें अखंडस्मरणें करताळी वाजवावी, असें नाथांनीं या गोड पदांत सांगितलें आहे. कथेंत कुचरपणा करूं नये. 'कथे उभा अंग राखेल जो कोणी' त्याच्या पापाचें माप कोणीं द्यावें! कथेचा जो उल्लंघ करील, मधून उठून जाईल, 'निद्रेचा आदर जागरणीं वीट' मानील तो अधम होय. तात्पर्य श्रोत्यावक्त्यांनीं कथेची मर्यादा पाळावी व हरिप्रेमानंद मनमुराद लुटावा.

१० पंढरीची वारी, एकादशीव्रत, सत्समागम, नामसंकीर्तन, ह्या सर्व साधनांना गोडी देणारी, यांना सर्वथा प्राणभूत अशी मुख्य गोष्ट म्हणजे शुभेच्छा किंवा सद्भावाची जोड ही होय. शुद्धभाव पोटीं असेल तरच साधनांची सफलता होते, नाहींतर हीं व इतर साधनें मानदंभाला कारण होतात. श्रद्धावान् असेल त्यालाच ज्ञान मिळेल असें गीतेंत देव बोलले आहेत. भाव असेल तरच देव मिळेल, भाव तोच देव असें संतांनींही ठायींठायीं सांगितलें आहे. भावावीण साधनें फोल आहेत. मूळचा झरा, आंतला जिव्हाळा असेल तरच साधनें फलदायक होतात. पंढरी, चंद्रभागा, पुंडलीक, साधुसंत, देवप्रतिमा, टाळवीणा, व्रतजपतपादि कोणत्याही पवित्र गोष्टींविषयीं पवित्रपणाची निर्मळ बुद्धि पाहिजे तरच साधनें साध्य गांठून देतात, फार काय पण पराकाष्ठेचा सद्भाव असला तर साधनें हींच साध्यरूप होतात, साध्यसाधनांची एकात्मताच प्रतीतीस येते. बाह्योपचारांनीं भगवान् प्रसन्न होत नाहींत. ' मी उपचारें कवणाही. नाकळे गा ' ( ज्ञाने० ९–३६७ ) हेंच खरें आहे. उसना भाव, टिकत नाहीं, तें केवळ थोतांड आहे. 'नटनाट्य अवघें संपादिलें सोंग' पण त्या वरपंग सोंगानें हृदयस्थ नारायण केव्हांही फसत नाहीं भाव जितका अस्सल तितका देव उघडा. साधनें व्यर्थ नाहींत साधनांनीं भाव वाढीस लागतो हें खरें आहे, पण साधनवनाचा वसंत निर्मळ भाव हा आहे. भाव ही देवाची देणगी आहे, हें पूर्वसुकृतांचें फळ आहे, ही पूर्वजांची पुण्याई आहे. भावाचा डोळा उघडला कीं सारें विश्व न्यारेंच दिसूं लागतें. ' सांपडे हा देव भाविकांचे हातीं । शाहणे मरती तरी नाहीं ॥ ' ज्ञानाचे डोळे उघडले म्हणजे ग्रंथ समजेल, त्याचें रहस्य उमगेल, पण भावावांचून तें आपलेंसें होणार नाहीं. ज्ञानाचें विज्ञान होण्यास, ज्ञानरहस्य

हस्तगत होण्यास, देव जोडण्यास भावच पाहिजे. चित्त रंगलें तर तें चित्तच चैतन्य होतें. पण चित्त शुद्धभावानें रंगलें मात्र पाहिजे.

भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥

*         *         *         *

भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ १ ॥
करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनी परता ॥ २ ॥

*         *         *         *

'पाषाण देव पाषाण पायरी' पण एकावर आपण पाय देतों व एकाची पूजा करितों. तोटीचें पाणी आणि गंगेचेंही पाणीच, पण 'गंगा गोड—येरा काय चवी नाहीं ?' तात्पर्य भावानेंच प्रतिमेला देवत्व येतें, भावानेंच गंगोदकाला तीर्थपण येतें. हा भाव ज्यापाशीं आहे त्यापाशींच देव आहे. भाव तोच भगवंत. 'विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची' यांत संशय कसला ! संशय, कुतर्कविकल्प हें महत्पाप आणि भाव हें महत्पुण्य आहे. असा निर्मळभाव मनीं उपजल्यामुळेंच तुकोबांचीं सर्व साधनें सफळ झालीं. 'लागला झरा अखंड आहे । तुका ह्मणे साहे (साह्य) झालें अंतर' असें त्यांनींच नाटाच्या अभंगांत म्हटलें आहे. 'आहा आहारे भाई' या गोड अभंगांत त्यांनीं भाविकाची दृष्टि कशी सोज्ज्वळ असते तें विस्तारानें सांगितलें आहे. 'गंगा[1] नव्हे जळ । वृक्ष नव्हे वडपिंपळ[2] । तुळशी रुद्राक्ष नव्हे माळ । श्रेष्ठ तनू देवाचिया ॥ १ ॥' त्याचप्रमाणें संत सामान्य माणसें नव्हत, लिंगादि देव-प्रतिमा पाषाण नव्हत, गरुड नुस्तें पांखरूं नव्हे, नंदिकेश्वर ढोर नव्हे, वराह डुक्कर नव्हे, लक्ष्मी स्त्री नव्हे, मीठ रेती नव्हे, हिरे खडे नव्हत, द्वारावती गांव नव्हे, कारण यांच्या दर्शनसेवनानें

---

१ 'स्रोतसामस्मि जान्हवी' (गीता १०—३१). २ 'अश्वत्थःसर्व वृक्षाणाम्' (गीता १०-२६) 'कल्पद्रुम हन पारिजात । गुणें चंदनही वाड-विख्यात । तऱ्ही यया वृक्षजातां आंत । अश्वत्थ तो मी ॥' (ज्ञानेश्वरी १०-२३५).

मोक्ष मिळतो. 'कृष्ण नव्हे भोगी । शंकर नव्हे जोगी'—पण तुकोबा ! एवढा विमलभाव तुह्मांला कोठून मिळाला ?—'तुका पांडुरंगीं । हा प्रसाद लाधला ॥ ११ ॥,' पांडुरंगाच्या कृपाप्रसादानें हा शुद्धभाव तुकोबांना मिळाला व म्हणून त्यांचीं सर्वसाधनें त्यांना फलद्रूप झालीं—या भावानें भगवंत जोडला. 'तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला' म्ह० माझ्या स्वरूपाची या भावानें मला ओळख करून दिली. भाव नसेल तर साधनें वाव आहेत. 'तीर्थें-जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमां माणसां ऐसे ।' म्ह० तीर्थांना हें नुस्तें जळ आहे, देवमूर्तीला ह्या काय साध्या पाषाणाच्या मूर्ति आहेत, संतांना हे काय असेच आहेत असें म्हणून जो हेळसील त्याचीं सर्व साधनें 'वांझेच्या मैथुनापरी गेलीं वायां' असें तुकोबानीं स्पष्ट सांगितलें आहे. तात्पर्य, साधनांतलें साधन ह्मणजे साध्यसाधनाविषयींचा सद्भाव हें होय. आतां येथपर्यंतचीं सर्व साधनें तुकोबांनीं अंगीकारिलीं व त्याबरोबरच त्यांनीं परोपकाराचें व्रत चालविलें. 'ठाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी' असें त्यांनीं आत्मचरित्रांत ह्मटलेंच आहे; परोपकार कसा केला तें आपण आतां पाहूं.

११ शरीर कष्टवून ठाकेल तो परोपकार करण्यांत तुकोबांची तत्परता असे. कोणी शेत राखायला सांगितलें कीं शेत राखावें, ओझें घेऊन जा म्हटलें कीं केवढेंही मोठें ओझें असलें तरी तें घेऊन जावें, घोडयाची चाकरी कर म्हटलें कीं घोडयाची चाकरी करावी, जो जें काम सांगेल तें त्याचें काम करावें. असा फुकटचा चाकर मिळाला तर कोणाला नको असतो? तुकोबा सर्वांना हवे हवेसे झाले ! तुकोबा मात्र ह्या सर्व नारायणाच्या मूर्ति आहेत व त्याची सेवा ती नारायणाची सेवा ह्या बुद्धीनें ती करीत. मनुष्याच्या नामरूपाची ओळख बुजत जाऊन काम करायला सांगणारा ध्वनि आ-

तल्या नारायणाचा आहे एवढेंच त्यांना कळूं लागलें. ध्वनि ऐकल्याबरोबर जेथून ध्वनि प्रसृत होतो त्या उगमस्थानावर त्यांची दृष्टि स्थिर होऊं लागली. नामरूप पाहिल्याबरोबर नामरूपातीताची ओळख होऊं लागली. ही सातवी दास्यभक्तीच होय. ह्या दास्यभक्तीचें मर्म देहूंतल्या लोकांना अगर जिजाबाईला नसलें कळलें तरी जेथून कळतेपण प्रगट होतें तेथें कळलें ! ही भूतांची सेवा भूतांना जाणवत नसली तरी भूतेशाला कळली. तुकोबा फुकटचा कामाला उपयोगी पडतो ह्मणून त्याला यथेच्छ राबवून घेऊं नये इतका सुविचारही कित्येकांच्या डोक्यांत येत नसला तरी विषमभाव सांडण्याचें, निष्काम कर्म करण्याचें भूतसेवा हें अलौकिक साधन आहे हें तुकोबा जाणून होते. भूतसेवा 'भूतमात्रीं हरि' पाहण्यास शिकविते, किंबहुना भूतमात्रीं हरि दिसूं लागला म्हणजेच निष्काम खरी भूतसेवा होते. असो. जिजाईला मात्र तुकोबा घराकडे पाहत नाहींत आणि साऱ्या गांवांतल्या लोकांचीं हलकींसलकीं वाटेल तसलीं कामें करितात याबद्दल फार अवघड वाटे. जिजाईच्या तर्फेनें कोणी ह्मणेल कीं "खरेंच ! गांवांतल्या लोकांचीं कामें तुकोबा करीत मग घरच्या माणसांचीं कामें करायला त्यांचें काय जात होतें ?" यावर उत्तर असें आहे कीं, घरच्या माणसांचीं कामें आपण सर्वच सर्वकाळ करीत असतों; पण आपल्या प्रेमाचा, ममतेचाच तो प्रकार असल्यामुळें ती खरोखर शेवटीं स्वसेवाच होते. परोपकार ह्मणजे देहाच्या बाजूनें ज्यांचा आपला यत्किंचितही संबंध नाहीं अशा परांवर उपकार करणें होय; व उपकार करणें म्हणजे प्रतिफळाची—बुक्की स्तुतीची किंवा आशीर्वादाचीही—अपेक्षा न करितां भगवत्प्रीत्यर्थ कायावाचामनानें चंदनाप्रमाणें झिजणें होय. या परोपकारांत किंवा लोकसेवेंत अनेक लाभ होतात; एक तर निष्काम कर्म करण्याची संवय लागते, दुसरें आ-

स्वभावाचा विकास होऊन आत्मराज ह्या साडेतीन हातांच्या देहां-
तच कोंडलेला आहे हा वृत्तीचा संकोच जाऊन त्याची व्यापकता
प्रतीतीस येते, तिसरें शरीराचें ममत्व झडत जातें व चवथें सर्वांत-
र्यामी नारायण प्रसन्न होतो ! हे लाभ घरच्या मंडळींची सेवा
करण्यापेक्षां घरचीं नव्हत असें समजल्या गेलेल्यांची सेवा करण्यानेंच
अधिक प्राप्त होणारे आहेत; ह्मणून तुकोबांनीं ' ठाकला तो कांहीं
केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ' हा आपल्या साधनमार्गां-
तला एक अभ्यास म्हणून सांगितला आहे. ' भावें गावें गीत '
ह्या अभंगांत ' जरि व्हावा तुज देव । तरि हा सुलभ उपाव ' ह्मणून
जो तुकोबांनीं सांगितला आहे त्या देवप्राप्तीच्या उपायांत ' तुका
ह्मणे फार । थोडा करी परउपकार ।' ह्याप्रमाणें परोपकाराचाही
त्यांनीं अंतर्भाव केला आहे. ह्या सुंदर अभंगांत चित्त शुद्ध ह्मणजे
निर्विषय करून देवाचें भावानें गीत गावें, आणिकांचे गुणदोष
कानांनीं ऐकूं नयेत व मनांत आणूं नयेत, संतांच्या चरणीं लागावें,
भूतमात्रीं नम्रता धरावी व थोडा फार होईल तितका परोपकार करावा
हाच देवप्राप्तीचा सुलभ उपाय तुकोबांनीं लोकांस स्वतः कृतार्थ झाल्या-
वर सांगितला आहे. त्याचें त्यांनीं अर्थातच आपल्या अभ्यासकाळीं
अवलंबन केलें होतें. परोपकार करतांना देहभावाचा संकोच होऊन
सर्वांभूतीं भगवद्भाव उदित होतो, मन विशाळ होऊन आपपरभाव
लुप्त होतो, व ' आंत हरि बाहेर हरि ' ह्या अनुभवाचा दिव्य
आनंद प्राप्त होतो. ' भूतीं भगवंत । हा तों जाणतों संकेत. ' 'भूतीं-
भगवद्भाव ' ठेवला म्हणजे माझें तुझें हा विकार निरसतो व 'अद्वैत
तो ठाव । निरंजन एकला ' हा अनुभव प्राप्त होतो. ' भूतांचिये नांदे
जीवीं । गोसावीच सकळां ।' ह्म० गोसावी (गोस्वामी) जो पांडुरंग
सकळ भूतांच्या जीवीं नांदतो त्याचीच परोपकारानें उत्कृष्ट सेवा
होते. भूतांवर परोपकार ह्मणजेच भूतात्म्याची पूजा होय. तुकोबांनीं

देह कष्टवून जो परोपकार केला तो भूतपतीची सेवा म्हणूनच केला आणि परोपकाराच्या थोरवीचें बीज हेंच होय.

**भूतीं देव म्हणोनि भेटतो या जना । नाहीं हें भावना नरनारी॥१॥**
**जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥ २ ॥**

१२ आतां तुकोबांच्या परोपकाराचे प्रकार पाहूं. महिपतबावांनीं ( भक्तलीलामृत अ. ३१ ) यांतले कांहीं वर्णन केले आहेत. एखादा पांथस्थ वाटेंत अकस्मात् भेटला कीं तुकोबांनीं त्याचें ओझें आपल्या डोक्यावर घ्यावें व त्याला कांहीं काळ विसावा द्यावा; कोणी पावसांत भिजला तर त्याला कोरडें वस्त्र देऊन निवाऱ्याची जागा द्यावी; यात्रेकरूंचे पाय सुजले असले तर कढत पाण्यानें ते स्वतः शेकावेत; गाय बैल निर्बल निरुपयोगी झाल्यामुळें निर्दय धन्यानें घरांतून हाकून लावले तर त्यांना चारापाणी द्यावे; मुंग्यांच्या वारुळावर जाऊन साखर घालावी; हिंसा मनानेंही करूं नये; चालतांना पायांतळीं जीव रगडतील म्हणून ‘कारुण्यामार्जी पाउलें लपवून’ चालावें; कीर्तनांत फार उकाडा झाला तर स्वतः श्रोत्यांस वारा घालावा; नदीचें पाणी आणतांना कोणी थकलें भागलें तर त्याची घागर स्वतः घरीं पोंचवावी; एखादा पांथस्थ आजारी पडला तर त्याला देवळांत नेऊन त्याच्या पथ्यपाण्याची व्यवस्था लावावी; मनुष्य व पशुपक्षी यांत भेदभाव न पाहतां जीव तेथून सारखा मानून लहानांपासून मोठ्यांपर्यंत सर्व देह नारायणाचेच भावावे व कायावाचामनानें—व जवळ असेल तर धनानेंही—सर्वांच्या उपयोगीं पडावें असा तुकोबांचा क्रम सुरू झाला. भागवतांतील जडभरताप्रमाणें कसलेही काबाडकष्ट करण्यास त्यांनीं मागें घेऊं नये. अशा वर्तनानें तुकोबा सर्वांसच अत्यंत प्रिय झाले, तुकोबा कोणास नको असें राहिलें नाहीं. तुकोबांचें हें अजातशत्रुत्व पाहून मंबाजीबोवासारख्यास वाईट वाटून त्यानें त्यांचा अनन्वित छळ केला तरी त्याचेंही अंग

रगडण्यास त्यांनीं कसूर केली नाहीं. परोपकाराच्या उज्ज्वल भावनेंत स्वत:च्या बायकोचें लुगडेंही अनाथास देऊन टाकलें ! पण ह्या दोन्ही गोष्टी पुढें यथाप्रसंग सांगण्यांत येणार असल्यामुळें येथें त्यांचा विस्तार नको. एकदा एका ह्मातान्या बाईनें सांगितल्यावरून तिचें तेल आणून तुकोबानें तिच्या घरीं पोंचतें केलें. तें नेहमींपेक्षां ज्यास्त दिवस गेलें. ही गोष्ट गांवांत सर्वत्र पसरतांच भराभर लोकांनीं आपापले तेलाचे नळे आणून तुकोबांच्या गळ्यांत बांधले ! तुकोबांनीं सर्वांचे नळे वाण्याच्या दुकानीं जाऊन तेलानें भरून ज्याचें त्यास आणून दिले. तुकोबांच्या पाठीवर एका बैलाचें हें जड ओझें पाहून सती जिजाईला मात्र राग आला. एकदा एका शेतकऱ्यानें तुकोबांस आपल्या शेतावर रस प्यायला नेलें. त्याचें आमंत्रण जिजाईनें घरांतून ऐकलें होतें म्हणून तिनें जातांना तुकोबांस बजावलें कीं 'तो शेतकरी येतांना उसाची मोळी देईल ती माझ्या पोरांसाठीं घरीं आणा.' ठरल्याप्रमाणें तुकोबा शेतावर गेले, त्या शेतकऱ्यानें मोठ्या भक्तिभावानें तुकोबांस रस पाजला व उसांची भली मोठी मोळी त्यांच्या डोक्यावर देऊन त्यांना घरीं पाठविलें. तुकोबा ऊस घेऊन गांवांत शिरले मात्र, तों गावांतलीं सर्व मुलें त्यांच्याभोंवती जमा झालीं व ऊस मागूं लागलीं. तेव्हां तुकोबांनीं ती मोळी डोक्यावरून खालीं टाकली व त्याचीं कांडीं करून तीं एकेक मुलास एक याप्रमाणें वांटून टाकलीं. राहतां राहिलीं तीन कांडीं. तीं घेऊन ते घरीं आले. त्यांच्या हातांत तीनच कांडीं पाहतांच जिजाईनें ताडलें कीं यांनीं बहुधा ऊस गांवच्या पोरांस वांटून टाकला असावा. तुकोबांनीं खरी गोष्ट तिला सांगितली व म्हणाले "हें पहा. सगळीं मुलें आपलींच आहेत. तुला तीन मुलें आहेत त्यांच्यासाठीं तीनच कांडीं पांडुरंगानें शिल्लक ठेवलीं, बाकीचीं ज्याची त्याला त्यानें दिलीं."

अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम् ।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ॥ १ ॥

तुकोबा असे उदारचरित होते. आपपरभाव त्यांचा नाहींसा होत होता, किंबहुना ' माझें तुझें ' हा जीवभाव जाऊन त्यांच्या ठिकाणीं ' सर्वच श्रीहरि ' हा भाव उदित व्हावा म्हणूनच त्यांनीं नश्वर शरीर कष्टवून ' ठाकला तो कांहीं उपकार ' करण्याचा साधनमार्ग अंगिकारला. तुकोबांचें सर्वच आयुष्य परोपकारांत गेलें. त्यांनीं कीर्तनें व अभंग प्रथम श्रीहरिप्राप्तीसाठीं व नंतर लोकोपकारासाठीं केलीं हें कांहीं सांगावयास नको. ' विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ' या सिद्धांताप्रमाणें ते वागत असल्यामुळें परोपकार हा त्यांचा स्वभावच बनून गेला. ' भूतांची दया ' हें त्यांचें भांडवल झालें, ' रंजले गांजलेल्यांना ' ते आपले म्हणूं लागले. ' तुका म्हणे आतां उरलों उपकारापुरता ॥ ' याप्रमाणें भगवत्प्रसाद झाल्यानंतरचें त्यांचें आयुष्यही परोपकारांत गेलें. तुकोबांच्या आयुष्यांतला प्रत्येक क्षण विठ्ठलभजनांत व परोपकारांत गेला. त्यांचे अभंग त्यांच्या प्रयाणानंतरही जडजीवांच्या उद्धाराचें कार्य करीत आहेत. तुकोबांची अभंगवाणी हें त्यांच्या परोपकारबुद्धीचें चिरंतनचें स्मारक होय.

१३ वारकरीसंप्रदायाचा जो साधनमार्ग त्याच मार्गानें तुकोबा गेले हें उघड आहे. तो मार्ग आपण आतांपर्यंत पाहिलाच आहे, पण निश्चयदार्ढ्यासाठीं आपण तो तुकोबांसच एकवार विचारूं आणि हें प्रकरण संपवूं. आपण कोणतीं साधनें केलीं हें त्यांनीं आपल्या अभंगांत स्पष्ट सांगितलें आहे. अभंगांत कोठें स्वतः आचरिलेला साधनमार्ग सांगितला आहे, व कोठें दुसऱ्यांस उपदेश करण्याच्या प्रसंगानें तो सांगितला आहे. ' बोले तैसा चाले ' या कोटींतले तुकोबा असल्यामुळें त्यांतही त्यांचींच साधनें स्पष्ट होतात. शिवाजी राजे यांस, जिजाबाईस, घरणेकरी ब्राह्मणास उपदेश करितांना सांगितलेलीं

साधनें हीं आपण विचारांत घेऊं. अशा सर्व साधनपर अभंगांचा एकदम विचार केला म्हणजे तुकोबांनीं आचरिलेला साधनमार्ग कोणता हें निश्चित समजण्यास कांहींच अडचण उरणार नाहीं.

(१) एक धरिला चित्तीं । आह्मी रखुमाईचा पती ॥ १॥
तेणें झालें अवघें काम । निवारिला भवभ्रम ॥ ध्रु० ॥
परद्रव्य परनारी । झाली विषाचिये परी ॥ २ ॥
तुका ह्मणे फार । नाहीं लागला व्यवहार ॥ ३ ॥

आह्मीं चित्तांत रुक्मिणीकांत धरिला आणि परधन व परनारी विषतुल्य वाटलीं—'तेणें झालें अवघें काम' कोणतें काम झालें ? 'निवारिला भवभ्रम' हें. पांडुरंग चित्तीं धरिला व त्याच्याच प्रसादानें परधन व परस्त्री त्याज्य वाटली—एवढ्यानें भवभ्रम दूर झाला; त्यासाठीं मला कांहीं ज्यास्त आटाटी करावी लागली नाहीं. हरिचिंतन व सदाचार हीं संसारनिवृत्तीचीं साधनें आहेत.

(२) कुळींचें दैवत ज्याचें पंढरिनाथ—त्याच्या घरीं मी दासीपुत्र होईन, पंढरीची वारी ज्याच्या घरीं त्याच्या दारचा पशु होईन, अहोरात्र विठ्ठलचिंतन करील त्याच्या पायींचें पायतन होईन, तुळशीवृंदावन ज्याच्या अंगणीं त्याच्या घरची केरसुणी होईन—या उत्कटभक्तीच्या उद्गारांवरून पंढरीनाथ, पंढरीची वारी, पंढरीनाथाचें चिंतन व पंढरिनाथास प्रिय अशा तुळशीचें पूजन या गोष्टी तुकोबांना किती प्रिय होत्या हें समजतें. उपास्याविषयींची परमप्रीति यानें व्यक्त होते.

(३) सुख वाटे परि वर्म—सांगतों. मला देवाचें वर्म समजत नाहीं. 'गायनाचें एवढें जाणें । विठ्ठल ह्मणे निर्लज्ज' ह्म० लाज सांडून विठोबाचें गुणनाम गातों. दुसरें कांहीं करितां काय ? 'अवघें माझें हेंचि धन । साधनही सकळ.' निर्लज्ज नामस्मरण हेंच एक साधन मी जाणतों.

(४) विठ्ठल आमुचें जीवन—आमचा विठ्ठल आगमनि-

गमांचें ह्म० वेदशास्त्रांचें स्थान(रहस्य)आहे, विठ्ठल हा माझा ध्यान विसावा आहे, माझें चित्त वित्त पुण्य पुरुषार्थ सर्व विठ्ठल आहे माझा विठ्ठल कृपेचा व प्रेमाचा पुतळा आहे,

**विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तहि पाताळें भरुनी ।**
**विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥**

माझी मायबाप, बंधुभागिनी सर्व विठ्ठल आहे, विठ्ठलेविण मल गोताची चाड नाहीं, विठ्ठलावांचून 'तुका म्हणे आतां नाहि दुसरें—' विठ्ठल माझें सर्वस्व आहे त्यावांचून माझें ब्रह्मांडांत कोण नाहीं. उपास्याची एकांतभक्ति हेंच उपासकाचें सर्वस्व होय.

( ५ ) **पांडुरंगा करूं प्रथम नमन**—तुकोबांचे ओव्यारूपी दो अभंग आहेत. हे फार मोठे पण गोड आहेत. प्रत्येक अभंग शंभ चरणांचा आहे. पहिला अभंग पाहूं:—

**क्षीण झाला मज संसारसंभ्रमें ।**

मग क्षीण जाऊन समाधान झालें ? कशानें झालें ?

**शीतळ या नामें झाली काया ॥ ५ ॥**

तांतडीनें हरिगुण गावे, 'आणिक उपाय दुःखमूळ' आहे मी स्वतः हरिकीर्तनानेंच तरलों. लोकांना अनुभवाचा मार्ग सांगतो

**हे वाट गोमटी वैकुंठासी जातां । रामकृष्णकथा दिंडीध्वजा ॥१**
**जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥ १**

आम्ही पतित कसेचे तरतों असें म्हणून बिलकुल निराश होऊं नक मजसारखा 'नसेल पतित ऐसा कोणी.' कोणी कांहीं साध करीत असतील पण 'मज या कीर्तनवीण नाहीं—' मीं मात्र कीर्तन वांचून कोणतेंच साधन केलें नाहीं आणि तरलों !

**माझिया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळू हा**
**हाचि माझा नेम हाचि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें**
**कोठें नका पाहूं करा हरिकथा । तेथें अवचिता सांपडेल ॥ ६७**
**सांपडे हा देव भाविकांचे हातीं । शाहणे मरती तरी नाहीं ॥**

होय हा सगुण निर्गुण आवडी । भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥८६॥
चित्त रंगलियां चैतन्यचि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥९३॥
सुखाचा सागरु आहे विटेवरी । कृपादान करी तोचि एक ॥९४॥
आम्हांसी विश्वास त्याचिया नामाचा । म्हणउनी वाचा घोष करूं
शिकाविलें मज मूढां संतजनीं । दृढ या वचनीं राहिलोंसें ॥ ९९ ॥
राहिलोंसें दृढ विठोबाचे पायीं । तुका म्हणे कांहीं न लगे आतां

हे लोक संसाराला डिंकून कां राहिले आहेत याचेंच मला आश्चर्य वाटतें ! ' हरिकथा सुखाची समाधि ' हा माझा अनुभव आहे, हें परमामृत भोगणें यांच्या प्रारब्धांत नाहीं काय ?

(६) **गाईन ओविया पंढरीचा देव**—हा दुसरा अभंग पाहूं:—

रंगलें हें चित्त माझें तयापायीं । म्हणउनि घेई हाचि लाहो ॥ २ ॥
लाहो करीन मी हाचि संवसारीं । रामकृष्ण हरी नारायणा ॥ ३ ॥

देवाचा आनंद हा असा सुलभ असून हे जीव संसारजालांत मत्स्यांप्रमाणें कां तळमळत आहेत, संतसंगति धरून हे हरिगुणगायनाचें परम सुख कां भोगीत नाहींत ? ' विषयीं गुंतलीं विसरलीं तुज । कन्यापुत्रभाजधनलोभें ' पण नारायणा ! तूंच मीपणाचा यांना चाळा लावून आपण वेगळा राहून विश्वाच्या लीला कवतिकानें पाहत आहेस ! जनहो ! पुण्यमार्गानें जा म्हणजे हा विठ्ठल कृपा करील. पुण्यकर्म कोणतें म्हणाल तर ऐका ! 'पूजावे अतीत—देवद्विज'

करा जप तप अनुष्ठान याग । संतीं जे मारग स्थापियेले ॥ २० ॥

हीं सत्कर्में पोटीं काम ठेवून मात्र करूं नका.

वासनेचें मूळ छेदिल्यावांचूनी । तरलोंसें कोणीं न ह्मणावें ॥२३॥

निष्कर्म सत्कर्माचरणानें हरिप्रेम उत्पन्न होईल. मी तर नामसंकीर्तनाला अपार भुललों आहे:—

अमृताचें सार निजतत्वबीज । गुह्याचें तें गुज रामनाम ॥ ३२ ॥
हेंचि सुख आह्मीं घेऊं सर्वकाळ । करूं हे निर्मळ हरिकथा ॥ ३४ ॥
कथाकाळीं लागे सकळां समाधि । तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ३५

नासे लोभ मोह आशा तृष्णा माया । गातां गुण तया विठोबाचे।
येणें अंगिकार केला पांडुरंगें । रंगाविलें रंगें आपुलिया ॥ ४२ ॥
विठोबाचे आह्मी लाडिके डिंगर । कांपती असुर काळ धाकें ॥४६॥
सत्य मानूनियां संतांच्या वचना । जा रे नारायणा शरण तुह्मी ॥

प्रेमळांचा संग करा. धन वित्त लोभ माया मोहपाश हे यमाचे फांस आहेत. आपला गळा सोडवून घ्या. जाणत्यांच्या नादीं लागूं नका, कारण ' निंदा अहंकार वादभेद ' यांत ते व्यर्थ गुंतून देवाला दुरावले आहेत ! साधूंचा संग करा. ' प्रेमसुख घ्यावें संतसंगें !'

संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें साधन रामनाम ॥९३॥

हें साधें सप्रचीत बोलणें किती मनोहर आहे ! वरील दोन्ही शतकें मुखोद्गत करावींत. या गंगाप्रवाहांत नित्य निमज्जन करावें.

(७) ' साधकाची दशा उदास असावी. ' उदास ह्म० काय? ' उपाधि नसावी अंतर्बाह्य !' त्याला जिव्हेचें लोलुप्य नसावें, त्यानें भोजन व निद्रा परिमित ठेवावी ह्म० तो युक्ताहारविहार असावा, तो स्त्रीसंबंधांत ढिसूळ नसावा:—

एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये ॥

याप्रमाणें नीतीची बळकटी संभाळून त्यानें—

संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशी ॥

असें हरिभजनीं रमावें. वर्तनाचा ढिला राहून भगवद्भक्तांच्या मेळ्यांत नुस्तें भजन करील तर तें फुकट आहे, नीतीचा दृढ असून भजन सांडील तर तेंही व्यर्थ आहे. सदाचारानें वागून हरील भजेल अशा साधकालाच गुरुकृपेनें ज्ञान मिळेल.

(८) काळ सारावा चिंतनें—एकांतवास, गंगास्नान, देवाचें पूजा व तुळशीच्या प्रदक्षिणा नेमानें करून हरिचिंतनांत काळ सारावा इंद्रियांसी नेम करून आहार, विहार, निद्रा व भाषण यांत प

ीत असावें. देह देवाला अर्पावा. प्रपंचाचा भार शिरीं घेऊन कुंथत
सूं नये. परमार्थलाभ हेंच महाधन मानून देवाचे चरण जोडावें.

(९) धिक् जिणें तो बाइले आधीन—स्त्रैण असल्यानें पर-
ोकीं साधन व इहलोकीं मान मिळत नाहीं. आतिथिपूजन करावें,
आलिया अतीता हा अभंग पहा. तो विन्मुख गेला तर ' सत्व '
ऊन जातो. ' दारीं हाका कैसें करवतें भोजन । रुचीं तरी अन्न
ैसें देतें ! ' ) काम, क्रोध, लोभ, निद्रा, आहार व आळस हे
जिंकावेत. मानालागीं झुरूं नये. विवेक वैराग्य बळकट असावें.
निंदा आणि वाद सर्वथा त्यागावा.

(१०) युक्ताहार नलगे आणीक साधन—
न लगे सांडावा लौकिक वेव्हार । घ्यावें वनांतर भस्मदंड ॥
कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥

(११) नेम नाहीं जया एकादशीव्रत । जाणावें तें प्रेत इहलोकीं॥
जयाचिये द्वारीं तुळशीवृंदावन । नाहीं तें स्मशान गृह जाणा २

(१२) पराविया नारी माउलीसमान—मानावी, परधन व
परनिंदा वर्ज्य करावी, रामनामाचें चिंतन करावें, संतवचनीं
विश्वास ठेवावा, सत्य बोलावें—
तुका म्हणे देव जोडे याजसाठीं । आणिक ते आटी न लगे कांहीं॥

(१३) भावें गावें गीत । शुद्ध करोनियां चित्त ॥ १ ॥
जरि व्हावा तुज देव । तरि हा सुलभ उपाव ॥ ध्रु० ॥
करी मस्तक ठेंगणा । लागे संतांच्या चरणा ॥ २ ॥
आणिकांचे कांनीं । गुणदोष मना नाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे फार । थोडा करी परउपकार ॥ ४ ॥

(१४) साधनें तरी हींच दोन्ही—साधा ह्मणजे देव कृपा
करील. कोणतीं तीं दोन साधनें !—
परद्रव्य परनारी । यांचा धरी विटाळ ॥ २ ॥

(१५) येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥ ध्रु०
देवाची भेट घेण्यास दुसऱ्या साधनांचे सायास नकोत—

**तोचि एक ध्यावा चित्तें । करुनी रितें कलेवर ॥**

इ० देहांतून देहसंबंधीं विकारांचें विसर्जन करून देवाचें चिंतन करा, ' नाठवूनि देह पायांचें चिंतन' करा.

**( १६ ) तुका म्हणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥ १ ॥**

ज्या हृदयांतून आशा समूळ गेल्या आहेत, नैराश्य मूर्तिमं आहे, तेथें देव राहतो. ' आशा ही समूळ खणोनि टाकावी '

**( १७ ) नावडावे जन नावडावा मान**—देहसंबंधीं व्यसनें, संबंधी खोडी, संकल्प यांत मन गोवूं नये.

**नावडावें रूप नावडावे रस । अवघी राहो आस पायांपाशीं ॥**

**( १८ ) हित व्हावें तरी दंभ दूरी ठेवा**—लोकांसाठी, लोकांनीं बरें म्हणावें म्हणून परमार्थ करूं नका. देवासांठीं देवाला आळवा. ' देवाचिये चाडें आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ' जन आणि मन या दोघांच्या फंदांत पडूं नका, यांना चोरून नारायणाचें चिंतनसुख भोगा.

**( १९ ) निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें**—साधन बरवें हेंचि एक,

**( २० ) नरस्तुति आणि कथेचा विकारा**—हीं दोन पापें देवा माझ्या हातून कधींही होऊं देऊं नकोस. आणखी—

**भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडो देऊं ॥**

**( २१ ) कळे न कळे ज्या धर्मः**—जाणत्या नेणत्यांना एक सांगतों कीं ' माझ्या विठोबाचें नाम । अट्टहासें उच्चारा. '

**तो या दाखवील वाटा । जया पाहिजे त्या नीटा ।**
**कृपावंत मोठा । पाहिजे तो कळवळा । २ ॥**

देवाचें प्रेम चित्तांत ठेवा, विठ्ठलाचा मनाला व वाचेला लावून घ्या, त्याचा जिव्हाळा असों द्या म्हणजे तो सरळमार्ग दाखवी

( २२ ) ' **हेंचि भवरोगाचें औषधः**—' त्या औषधाची फलश्रु आधीं सांगा. ऐका:—' जन्म जरा तुटे व्याध । **आणिक कांहीं**

बाध । करील वध षड्वर्गा. " म्हणजे हें औषध घेतलें असतांना जन्म-मृत्यूपासून सुटका होते, भवरोग जातो आणि शरीररोगही जातो. त्यांत अवगुण कोणताच नाहीं, म्ह० मध्येंच सुटणें, कमीअधिक होणें असा कांहीं प्रमाद झाला तरी त्यापासून कांहींएक अपाय होणार नाहीं. जितकें घ्याल तितका तें गुणच करील. शिवाय हें औषध घेतलें असतांना बाह्य साधनांनीं दुराराध्य असा हा षड्रिपूंचा मेळा सहज जिंकला जातो. वा ! फार बरें झालें तर मग, हें दिव्य औषध तुकोबा ! आम्हांला सांगाच. ऐका तरः—

**सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा मेळा ॥**
**पदर लागो नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥२॥**

चार वेद, सहा शास्त्रें व अठरा पुराणें यांचा गोळाच असा हा सांवळा विठ्ठल डोळ्यांत सांठवा व विष्णुसहस्रनामांचे पाठावर पाठ करा।

ह्या दिव्यौषधाचें ' अनुपान चुकूं नका तरच घेतल्याचा गुण ' होईल. तें अनुपान ऐका.

**नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नेदी वारा ॥**
**बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥ ४ ॥**

आपल्या चित्तांत हरि सांठवावा, बाह्य उपाधीचा वारा लागूं देऊं नये, कीर्तनावांचून अन्यत्र बोलूं नये व हरीवांचून दुसरा कोणाचाच संग करूं नये चित्त हरीला द्यावें. तें तर जवळ आहे ना ? तें हरीला दिलें असतां त्याच्या चिंतनानें लोण्यासारखें मऊ होईल.

आणखी थोडें अनुपान सांगायचें आहे. अनुतापतीर्थांत नित्य स्नान करीत जा, व दशदिशांची घोंगडी अंगावर घट्ट घ्या म्हणजे आशारूपी घाम बाहेर निघून जाईल व वैराग्यदशा भोगून आपल्या पहिल्या शुद्धस्वरूपाप्रत पावालः—

**न्हाये अनुतापीं पांघरे दिशा । स्वेद निघो दे अवघी आशा ।**
**होसील आधीं होतासी तैसा । तुका म्हणे दशा भोगी वैराग्य ॥६॥**

(२३) अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति ।
प्रगटे हृद्यींची मूर्ति । भावशुद्धि जाणोनियां ।। १ ।।

श्रीहरीच्या सगुणरूपाची भक्ति करणें हीच जीवांची मुख्यउपासना आहे. मुमुक्षूंच्या चित्ताची शुद्धि झाली असतांना त्यांच्या हृदयांतली—त्यांच्या नित्यध्यानाची मूर्ति—साक्षात् प्रकट होऊन त्यांच्यापुढें उभी राहते. ह्या सगुणसाक्षात्काराला बीज म्ह० मुख्य साधन हरीचें नामस्मरण हेंच आहे व फळ म्ह० तो झाल्यावरही तेंच म्ह० नामस्मरणच करायचें आहे. अर्थात् नामस्मरणानेंच हरि जोडायचा व हरि जोडल्यावरही नामस्मरणच करायचें. बीज आणि फळ हरिनामच आहे. ह्या सगुणभक्तीनें अवघ्या दशा साधतात, भवबंधाचे पाश तुटतात, जन्ममृत्यु निवारतात. योगी ज्याला ब्रह्म मानतात, मुक्त ज्याला परिपूर्ण आत्मा म्हणतात, तोच आमचा सगुण श्रीहरि आहे. त्याचें नामसंकीर्तन हेंच आमचें साधन व साध्य आहे.

त्या नारायणालाच “ अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगज्जीवना । वसुदेवदेवकीनंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ॥ ” असें आह्मी भक्त आळवितों.

(२४) धरणेकरी ब्राह्मणासः—तुकोबांनीं ११ अभंगांत जो बोध केला आहे त्यांतही ‘ नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोडें ’ असें सांगून इंद्रियांचा जय साधून मन निर्विषय करा व देवाला शरण जा, असाच उपदेश आहे. शरण कसें जावें म्हणाल तर “देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥” ह्म० देवाच्या प्रेमासाठींच देहभाव सांडून देवाला आळवित जा.

(२५) शिवबायाला पाठविलेल्या पत्रांतहीः—

आम्हीं तेणें सुखीं । ह्मणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥
कंठीं मिरवा तुळशी । व्रत करा एकादशी ॥ २ ॥

हाच मुख्य उपदेशाचा भाग आहे.

( २६ ) प्रयाणाच्या पूर्वी जिजाबाईला जो पूर्णबोध ११ अभंगांत केला आहे त्यांतही मुलाबाळांच्या लोभांत न पडतां 'आपला तूं गळा घेई उगवूनि ' असें प्रथम सांगितलें आहे व—

१ आस निरसून मन कठिण कर, येथील क्षणभंगुर सुख थुंकून टाक व पांडुरंगावर सर्व भार ठेवून त्याचें चिंतन कर म्हणजे परमानंद पावशील:—

देव पहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत ॥ १ ॥
सडासंमार्जन तुळशीवृंदावन । अतीतपूजन ब्राह्मणांचें ॥ २ ॥
वैष्णवांची दासी होई सर्वभावें। मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥ ३ ॥

( २७ ) 'ऐका पंडितजन':—विद्वान् लोक प्रायः विद्या संपादून कोणा तरी राजाची, श्रीमंताची अगर धनिकाची अतिरिक्त स्तुति करून आपली विद्या त्याच्या पायांवर वाहतात. तुकोबा अशांना सांगतात कीं 'नका करूं नरस्तुति!' मग पोट कसें भरेल ? ' अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धाआधीन ' संसार प्रारब्धाच्या माथीं मारा व प्रयत्न हरीचा करा. तो कोणता व कसा करावा ? ' तुका म्हणे वाणी । सुखें वेंचा नारायणीं '

तुकोबा पंडिताची व्याख्या गीतेच्या अनुरोधानेंच समदर्शी व भगवद्भक्त अशी करितातः—

पंडित तो भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥ १ ॥
अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वांभूतीं विठ्ठल आहे ॥ २ ॥

( २८ ) आतां सर्वांस बोधप्रद असा शेवटचा एकच गोड अभंग देतों. ह्यांत उपासनेची शपथ घेऊन तुकोबांनीं परमसाधन नामसंकीर्तन हेंच होय असें सांगितलें आहे. उपास्याची आण घेऊन सांगणें हें किती निकराचें, कळकळीचें व महत्त्वाचें आहे याची उपासकांनाच यथार्थ कल्पना होणार आहे:—

नामसंकीर्तन साधन पै सोपें । जळतील पापें जन्मांतरिचीं ॥ १ ॥
न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ ध्रु० ॥
ठायींच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ २ ॥
रामकृष्णहरी विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ३ ॥
याविण आणिक नाहीं पै साधन । वाहतसे आण विठोबाची ॥ ४ ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनी । शाहणा तो धणी घेतो येथें ॥ ५ ॥

हें प्रकरण येथें संपलें. सत्संग, सच्छास्त्र, गुरुकृपा व साक्षात्कार असे परमार्थमार्गाचे जे चार टप्पे त्यांपैकीं पहिला जो सत्संगाचा टप्पा तो आपण गांठला ! तुकोबा वारकरी घराण्यांत जन्मले, वारकरीसंप्रदायांत प्रविष्ट झाले, व तोच संप्रदाय त्यांनीं वाढविला, यामुळें त्यांना वारकऱ्यांचाच सत्संग मिळाला. हा संप्रदाय म्हणजे चिमुटभर लोकांचा नव्हे, साऱ्या महाराष्ट्रांतील लोकांचा हा धर्म होय. तेव्हां वारकरीसंप्रदायाचीं मुख्य तत्त्वें 'सिद्धांतपंचदशी' रूपानें प्रथम संकलित करण्यांत आलीं. नंतर एकादशीव्रत, वारकऱ्यांचे भजनी मेळे, कीर्तनप्रकार या तीन मुख्य गोष्टींचा आपण विचार पाहिला. तुकोबा या मार्गानें भावबळानें गेले व या मार्गाचाच त्यांनीं लोकांस उपदेश केला म्हणून आपणही त्यांच्या संगतींत त्यांचींच प्रासादिक वचनें ऐकत ऐकत येथवर आलों. शेवटीं त्यांनीं स्वतःच्या मनास, व जनांस, नेणत्यांस व पंडितांस, राजास व स्वभार्येस जो उपदेश केला त्यावरून त्यांनीं कोणता साधनमार्ग स्वतःसाठीं आंखला होता हें पाहिलें. संप्रदायाच्या पूर्वीपासून चालत आलेल्या मार्गानेंच तुकोबा गेले व म्हणून संप्रदायाचा व त्यांचा मार्ग अगदीं एकरूप आहे हें आपणांस कळून आलें. प्रपंच उदासवृत्तीनें करावा व तनमन देवाला वहावें; परस्त्री, परधन, परनिंदा व परहिंसा हीं सर्वथा वर्ज्य करून नीतीनें चालावें; काम, क्रोध, लोभ, मोह, लज्जा, आशा,

दंभ, व वाद यांचा त्याग करून चित्त अत्यंत शुद्ध करावें; संतवचनांवर विश्वास ठेवून सर्वांभूतीं नम्र असावें; एकादशीचें महाव्रत, पंढरीची वारी, व कीर्तन या संप्रदायाच्या मार्गानें पूर्ण श्रद्धेनें जाऊन पांडुरंगा-विषयीं परम प्रेम ठेवावें, हा मुख्य साधनमार्ग आपण पाहिला. आतां सच्छास्त्राकडे वळूं.

---

# प्रकरण सहावें.

# तुकोबांचें ग्रंथाध्ययन.

केली आटाआटी । अक्षरांची देवासाठीं ॥ १ ॥
नव्हे विनोद उत्तर । केले रंजवाया चार ॥ २ ॥

* * * *

कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनीयां ॥ १ ॥

* * * *

१ विषयप्रवेश. २ ' शब्दादेवापरोक्षधीः ' ३ शब्द ह्मणजे वेद, तसेंच व्यापक अर्थानें वेदशास्त्रपुराणें व संतवचनें. ४ पुराणें व संतवचनें–तुकोबांच्या अध्ययनाचे विषय. ५ त्यांच्या अध्ययनाची दिशा. ६ महिपतबावांचे उद्गार. ७ भागवतधर्माचे मुख्य ग्रंथ–गीता आणि भागवत. ८ गीताध्ययन. ९ भागवताशीं दृढपरिचय. १० पुराणांविषयीं प्रीति. ११ विष्णुसहस्रनामपाठ. १२ महिम्नादि स्तोत्रपाठ. १३ तुकोबांना संस्कृत येत होतें काय? १४ ज्ञानेश्वरीशीं समरसता. १५ देहूच्या वाडांतील बारावा अध्याय. १६ नाथांच्या ग्रंथांचा अभ्यास. १७ नामदेव. १८ कबीर. १९ ' या चौघांचि तरि धरि सोई रे ! २० भक्तकथा व त्यांचें वर्मः–अध्ययनाचें सार. २१ समारोप.

१ ' तुकोबांचें ग्रंथाध्ययन ' हा मथळा पाहूनच आमचे कित्येक वाचक बुचकळ्यांत पडतील ! ते म्हणतीलः " अहो ! तुकोबांसारख्यांना ग्रंथाध्ययनाची काय गरज होती ! त्यांना ग्रंथ कशाला पाहिजे होते ! त्यांनीं कधीं कोणत्या शाळेंत कोणत्या पंतोजीच्या हाताखालीं अध्ययन केलें ! देवाची कृपा झाली आणि भगवत्स्फूर्तीबरोबर अभंगवाणी त्यांच्या मुखांतून प्रगट झाली. " हें शेवटचें वाक्य बरोबर आहे. भगवत्स्फूर्ति झाली व अभंगवाणी त्यांच्या मुखांतून प्रगट झाली हें शेवटचें वाक्य अगदीं खरें आहे, तथापि भग-

वत्स्फूर्ति होण्यापूर्वी तुकोबांनीं कांहीं अभ्यास केला होता कीं नाहीं? भगवत्स्फूर्ति तुकोबांनाच कां झाली? देहूस व इतरत्र तेव्हां दुसरे काय थोडे तरुण होते? पेरल्यावांचून उगवत नाहीं व कष्टावीण कांहीं प्राप्त होत नाहीं हा कर्माचा मुख्य सिद्धांत आहे. तुकोबांनींही देवाच्या भेटीसाठीं अनेक साधनें केलीं त्यांतच ग्रंथाध्ययन हें एक महत्वाचें साधन केलें. तुकोबा शाळेंत शिकले व त्यांना परमार्थ शिकविणारे पंतोजीही पण मिळाले होते. त्यांची शाळा ह्मणजे पंढरीचा भागवतसंप्रदाय व त्यांचे पंतोजी म्हणजे त्यांच्या पूर्वीं होऊन गेलेलें भक्तमंडळ! पुंडलीकानें महाराष्ट्रांत भागवतधर्माचें विश्व-विद्यालय काढल्यापासून या पंढरीच्या विद्यालयाला जोडूनच आळंदी, सासवड, त्र्यंबकेश्वर, पैठण ह्या ठिकाणीं अनेक विद्यालयें निघालीं होतीं. त्या विद्यालयांतून अनेक भक्त तयार होऊन बाहेर पडले होते आणि त्यांनीं भागवतधर्माचा महाराष्ट्रभर जयजयकार केला होता. तुकोबांच्या हातून देहूचें विद्यालय निघायचें होतें, पण तत्पूर्वीं त्यांनीं पंढरीच्या, आळंदीच्या व पैठणच्या विद्यालयांत योग्य गुरूं-च्या हाताखालीं स्वतः अध्ययन केलें होतें. तुकोबा वारकरीसंप्रदा-याच्या शाळेंत तयार झाले व या संप्रदायांत प्रचलित असलेल्या मुख्य ग्रंथांचें त्यांनीं भक्तिपूर्वक अध्ययन केलें. तुकोबांनीं कोणते ग्रंथ पाहिले, कोणत्या संतांचीं वचनें पाठ केलीं, त्यांचे आवडते ग्रंथकार कोणते होते, त्यांच्या ग्रंथांचें अध्ययन त्यांनीं कसें केलें व त्यांतून सार काय घेतलें हें आपणांस ह्या प्रकरणांत पाहावयाचें आहे;पण तत्पूर्वीं ग्रंथाध्ययनाचें सामान्यतः महत्व काय आहे तें आपण थोडक्यांत पाहूं.

२ गुरुकृपा होण्यापूर्वीं आणि कांहीं काळ नंतरही ग्रंथाध्यय-नाची सर्वांसच जरूर आहे. शास्त्राध्ययनाचें महत्व सर्वकाळीं सर्वां-नीं कबूल केलें आहे. आधीं अपरा विद्या आणि मग परा विद्या,

आधीं परोक्ष आणि मग अपरोक्ष, आधीं शास्त्राध्ययन आणि मग अनुभव, असा हा मार्ग अनादि आहे. मुण्डकोपनिषदांत 'द्वे विद्ये वेदितव्ये' असें प्रथम सांगून मग 'ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति' ही अपरा विद्या व 'यया तदक्षरमधिगम्यते' ही पराविद्या असें ह्मटलें आहे. अपरा विद्या हस्तगत केल्यावरच पराविद्या प्राप्त होत असते. 'शब्दादेवापरोक्षधीः' ह्म० वेदशास्त्रांच्या अध्ययनानेंच अपरोक्षानुभव प्राप्त होतो असा सिद्धांत आहे. जसें ज्ञान मुरत जातें तसा विज्ञानाचा आनंद प्राप्त होत असतो. ज्ञानोबांनीं अमृतानुभवांत प्रथम शब्दाचें मण्डण करून पुढें अपरोक्षानुभवानंतर त्याचें खंडण कसें होतें हेंही दाखविलें आहे. पण शब्दाचें मंडण करितांना प्रथम त्यांनीं ह्मटलें आहे कीं 'शब्द ही फार मोठी उपयोगाची वस्तु आहे. 'तत्वमसि' ह्या शब्दानेंच जीवाला स्वरूपाचें स्मरण होतें अशी याची प्रसिद्धि आहे. शब्द हा जीवाला स्वरूपस्थितीवर आणणारा आरसा आहे.' ( अमृता. प्र० ६–१ ) तसेंच 'शब्द हा विहिताचा राजमार्ग कोणता व निषिद्धाची आडवाट कोणती हें दाखविणारा मशालजी आहे. बंध व मोक्ष यांच्या हद्दी ठरविणारा—यांचा कलह मिटविणारा—शिष्ट ह्म० न्यायाधीश शब्द हाच आहे.' ( अमृता० प्र० ६–५ ) येथें 'शब्द' येणेंकरून 'वेद' समजावयाचें आहे. शब्दाचाच पर्याय वेद आहे. शब्दानेंच जीवात्म्याची शिवात्म्याशीं भेट होते. जीवाची परमात्म्याशीं गांठ पडल्यानंतर शब्द जरी मागें सरतो ( यतो वाचो निवर्तन्ते ) तरी आत्मारामाच्या मंदिरांत नेऊन सोडणारा 'शब्द' हा वाटाड्या असल्यामुळें जीवाला त्याची कास धरल्यावांचून गत्यंतरच नाहीं.

२ आतां 'शब्द' ह्म० 'वेद' असा जरी विवक्षित अर्थ असला तरी वेदाचें रहस्य जीवांना सांगणारीं शास्त्रें, पुराणें व

संतवचनें यांचाही त्यांत अंतर्भाव होण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. शब्द हीं० वेद, शास्त्रें, पुराणें व संतवचनें अर्थात् सर्व भवबंधमोचक पवित्र वाङ्मय असा अर्थ घेऊन पाहिलें म्हणजे शब्दाचा आश्रय केल्यावांचून जीवांस आपल्या हिताचा मार्ग सांपडणें दुर्घट आहे असाच निष्कर्ष निघतो. ह्या पवित्र वाङ्मयानें जीवाला प्रवृत्तिनिवृत्ति, विधिनिषेध, बंधमोक्ष, यांचा बरोबर अर्थ समजतो व आपल्या उगमाचा शोध लागतो. तुकोबांनीं वेद, शास्त्रें, पुराणें व संतवचनें ही चौकडीच धर्मवाङ्मय ह्या अर्थीं पुष्कळ ठिकाणीं घेतली आहे:—

विश्वीं[1] विश्वंभर। बोले वेदांतींचा सार ॥ १ ॥
जगीं जगदीश। शास्त्रें वदती सावकाश ॥ २ ॥
व्यापिलें हें नारायणें। ऐसीं गर्जती पुराणें ॥ ३ ॥
जनीं जनार्दन। संत बोलती वचन ॥ ४ ॥
सूर्याचिया परी। तुका लोकीं क्रीडा करी ॥ ५ ॥

वेद, शास्त्रें, पुराणें व संतवचनें या सर्वांचें रहस्य एकच आहे आणि तें हें कीं विश्वांत विश्वंभर भरून उरला आहे. तें वेदांनीं स्वयंस्फूर्तीनें सांगितलें, शास्त्रांनीं सावकाश ह्म० खंडणमंडणपूर्वक चर्चा करून सांगितलें, पुराणांनीं आबालवृद्धांस व आचांडाल सर्वांस कळेल असें ह्म० मोठ्यानें गर्जून सांगितलें व संतांनीं अनुभव घेऊन सांगितलें. चौघांच्या सांगण्याच्या तऱ्हेंत फरक असेल, भाषेंत फरक असेल, मांडणींत फरक असेल, पण चौघांचाही सिद्धांत एक आहे. सिद्धांताच्या दृष्टीनें पाहतां त्यांच्यांत पूर्ण एकवाक्यता आहे,

---

१ ऐतिहासिक दृष्टीनें पाहणारास या अभंगांत हिंदुस्थानच्या इतिहासाचे तुकोबांनीं चार ‘ काळ ’ पाडले आहेत असें दिसून येईल. १ वेदोपनिषदांचा काळ. २ शास्त्रांचा किंवा षड्दर्शनांचा काळ. ३ पुराणांचा काळ व ४ साधुसंतांचा काळ. ह्या चारही काळांत वैदिक धर्माची परंपरा अविछिन्न चालली असून ‘ विश्वीं विश्वंभर ’ हेंच आपल्या धर्माचें सार आहे.

त्यांचा समन्वय आहे. वेदशास्त्रें ज्याला आत्मा म्हणतात, पुराणें ज्याचें रामकृष्णशिवादिरूपानें वर्णन करितात त्यालाच आमचे संत विठ्ठल नांवानें संबोधितात. नांवांत भेद झाला तरी परमात्मवस्तु अभिन्नच आहे. नांवरूपांच्या भिन्नत्वामुळें वस्तुभेद होत नाहीं. श्रुतीनें ज्याला ओळखायची खूण ॐशब्दानें केली त्याला संतांनीं 'विठ्ठल' म्हटलें, श्रुतीनें ज्याचें निर्गुणनिराकारत्व वानिलें त्याचेंच संतांनीं सगुणसाकारपणही वानिलें म्हणून दोघांत भेद कोठें झाला? लक्ष्य जोंवर भिन्न नाहीं तोंवर वर्णन करावयाच्या पद्धतींत भेद दिसला तरी एकवाक्यता मोडूं शकत नाहीं. वेदांचा अर्थ, शास्त्रांचा निर्धार व पुराणांचा सिद्धांत एकच आहे आणि तो हाच कीं सर्वभावानें परमात्म्याला शरण जावें व निजनिष्ठेनें त्याचें नाम गावें.

**वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधिला ॥ १ ॥**
**विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ॥ ध्रु० ॥**
**सकळ शास्त्रांचा विचार । अंतीं इतुकाचि निर्धार ॥ २ ॥**
**अठरा पुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हाचि हेत ॥ ३ ॥**

वेद, शास्त्रें व पुराणें हीं सिद्धांतासंबंधानें विसंवादी किंवा परस्परविरोधी नसून एकच रहस्य प्रगटविणारीं आहेत आणि म्हणूनच आपला सनातन धर्म वेदशास्त्रपुराणोक्त आहे असें आपण म्हणतों, व आपला नित्यकर्मांतला संकल्पही 'वेदशास्त्रपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं' असाच आहे. जो परमात्मा वेदप्रतिपाद्य आहे त्याचेंच—

**सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा गोळा ॥**

असें भक्त वर्णन करितात. सहा शास्त्रें, चार वेद व अठरा पुराणें यांचा गोळा म्हणजे अर्क, सारसर्वस्व, प्रतिपाद्यविषय आमचा हा सांवळा श्रीहरि आहे असें भक्त म्हणतात. तुकोबा सांगतातः—

**ऐके रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा ।**
**पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥ १ ॥**
**सकळ शास्त्रांचें हें सार । हें वेदांचें गव्हर ।**

पाहतां विचार । हाचि करिती पुराणें ॥ २ ॥

तात्पर्य काय कीं वेद, शास्त्रें, पुराणें व संतवचनें हीं सर्व नारायण-पर असल्यामुळें वाङ्मयाच्या यांपैकीं कोणत्याही प्रकाराचें अध्ययन केलें तरी वैदिक धर्मच उक्त आहे. वेद पहा, शास्त्रें पहा, पुराणें पहा, नाहीं तर साधूंच्या उक्ति पहा, सर्वांचें सार एकच आहे. जन्म-मृत्यूंच्या फेऱ्यांतून सुटावें, जगाची नश्वरता ओळखून स्वकर्म करावें, परमात्मबोध होऊन निःसंदेहता प्राप्त करून घ्यावी, मरणास मारून उरावें, सहज सच्चिदानंदरूप होऊन जावें, ह्याचसाठीं हें सर्व पवित्र वाङ्मय निर्माण झालें आहे. उदक एकच आहे, वापीकूपतडागादि केवळ बाह्य उपाधि आहे. कोणी नदीतीरीं वस्ती करून नदीच्या उदकानें आपलें कार्य करून घ्यावें, कोणीं सरोवराच्या उदकाचें सेवन करावें, कोणी कूपाच्या उदकावर तृषा भागवावी. ज्ञान हें उदक आहे; तृषा लागेल त्यानें सहजप्राप्त साधनांचा उपयोग करून घेऊन तृप्त होऊन जावें हा या वाङ्मयाचा मुख्य हेतु आहे. सागराचा, नदीचा, सरोवराचा किंवा कूपाचा सर्वांचा उद्देश एकच आहे आणि तो तृषाक्रांत जीवांनीं तृप्त होऊन जावें हाच होय. उपाधी-चा अभिमान घेऊन किंवा उपहास करून भांडत बसणें हें खरी तृषा लागल्याचें लक्षण नाहीं! चोखामेळा, रोहिदासचांभार, सजन-कसाई, कान्हूपात्रा, यांसारखे कनिष्ठ जातींत जन्मलेले जीवही खरी तहान लागल्यामुळें सत्संगतींत मिळालेलें ब्रह्मानंदरूप जीवन आकंठ पिऊन तरून गेले. परमार्थाची खरी तहान लागल्यावर मग जातिरूपधनविद्या इत्यादि आगंतुक कारणांची मीमांसा करीत बसण्याचें सुचत नाहीं. नाथांसारखे ब्राम्हण ब्राह्मणत्वाचा अभिमान-ही ठेवीत नाहींत व चोखामेळ्यासारख्यांना आपल्या हीन जातीची लाजही वाटत नाहीं. ज्ञानेश्वरनाथांनीं 'ब्राम्हणसमाज' स्थापन केले नाहींत, नामदेवतुकारामांनीं 'मागासलेल्या जातींचे वर्ग' काढले

नाहींत व रोहिदासचोखामेळा यांनीं 'अस्पर्शजातीच्या उद्धाराचीं मंडळें स्थापिलीं नाहींत! 'यारे यारे लहान थोर। भलते याती-नारी अथवा नर' म्हणून ज्यांना ज्यांना म्हणून हरिकृपेची खरी तहान लागली आहे अशा सर्व जातींतल्या सर्व मुमुक्षुजीवांसाठीं सर्व संतांनीं कीर्तनांत, ग्रंथांत, अभंगांत घरींदारीं आपली वाणी खर्चिली आहे. तात्पर्य काय तर वेद,शास्त्रें, पुराणें व संतवचनें हें सर्व वाङ्मय जीवांच्या उद्धारासाठीं निर्माण झालें आहे व ज्याला ज्याला भगवत्प्राप्तीची तळमळव्यथा लागली असेल त्यानें त्यानें ह्यांपैकीं कोणत्याही एका किंवा अधिक प्रकारांचा अवलंब केल्यावांचून त्याला परोक्षज्ञान प्राप्त होत नाहीं. तुकोबांनीं ह्यांपैकीं 'पुराणें व संतवचनें' यांचा अवलंब केला व त्यांचें वर्म मनांत सांठवून घेतलें.

४ तुकोबांनीं वेदांचें अध्ययन केलें नाहीं. 'घोकाया अक्षर। मज नाहीं अधिकार' असें त्यांनींच तीन वेळ म्हटलें आहे. ब्राह्मणांनीं तेवढें वेदाध्ययन करावें आणि आह्मां शूद्रांना हा अधिकार नसावा असें मनांत आणून त्यांनीं कधीं ब्राह्मणांशीं भांडण केलें नाहीं. असले कोरडे वाद उपस्थित करायाला त्यांना नको होते. त्यांना माहीत होतें कीं ब्राह्मणांना वेदाधिकार होता म्हणून कांहीं सर्वच ब्राह्मण वेदाध्ययन करीत नव्हते व करणारे सगळेच कांहीं मोक्षाला जात नव्हते व गेलेच तर 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परां गतिम्' ह्या भगवदुक्तीप्रमाणें इतरांना मोक्षाचे दरवाजे उघडेच होते. ज्यांना वेदाचा अधिकार होता त्यांपैकीं फार थोडे अध्ययन करणारे होते, व त्यांतही वेदार्थ समजून व अर्थरूप होऊन जाणारे फारच विरळ! शिवाय वेदार्थ फार गहन, शास्त्रें अपार व आयुष्य थोडें असें असून वेदाचें वर्म जर सुलभ पुराणग्रंथांतून व प्राकृत ग्रंथांतून प्रगट झालेलें आहे तर हा सोपा मार्ग टाकून व आयतें वाढून आलेलें अन्न टाकून नसती दगदग करण्याचें तरी कारण

काय ? शिवाय ज्याच्या चित्ताला खरी आंच लागली आहे तो साधनांच्या भांडणांत न पडतां सहजसुलभ साधनांचा अवलंब करून आपलें कार्य करून घेतो. याप्रमाणें तुकोबांनीं पुराणें व संतवचनें हीं आपल्या अध्ययनासाठीं पसंत केलीं व तींच त्यांच्या प्रेमळ प्रकृतीला मानवणारीं होतीं. त्यांचें तेवढ्यानेंही पूर्ण कार्य झालें. वेदाचीं अक्षरें घोकायचा अधिकार त्यांना नव्हता तरी वेदाचा अर्थ—अक्षर परब्रह्म—त्यांच्या हस्तगत झालें. वेदाचें शब्दतः नाहीं तरी अर्थतः अध्ययन झालें व हेंच व्हावयास पाहिजे.

५ ' तुकोबानीं आपल्या आयुष्याचीं कांहीं वर्षें ग्रंथाध्ययनांत घालविलीं यांत शंका नाहीं. ' कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करूनीयां ॥ ' असें त्यांनीं आपल्या आत्मचारित्रपर अभंगांत म्हटल्याचें आपणांस माहीत झालेंच आहे. ' शिकल्या शब्दाचें व्युत्पादितो ज्ञान, ' ' शिकविला तैसा पढो जाणे पुंसा ' इत्यादि अभंगांतून हीच गोष्ट त्यांनीं सांगितली आहे. दुसऱ्यांस उपदेश करितांना सुद्धां ' पढोनियां वेद हरिगुण गावें, ' ' पाहूनि-यां ग्रंथ करावें कीर्तन ' अशाच प्रकारचे उद्गार त्यांनीं काढले आहेत. त्यांनीं जे ग्रंथ पाहिले ते ' विश्वासें व आदरें ' पाहिले. ग्रंथकर्त्यांविषयीं पोटांत आदरभाव ठेवून आणि त्यांनीं जे सिद्धांत व ज्या संतकथा वर्णिल्या त्यांवर पूर्ण विश्वास ठेवून मीं ते वाचले असें तुकोबा स्वतःच सांगतात. वडिलांनीं त्यांना हिशेब ठिशेब पाहतां येण्यापुरतें जमाखर्ची शिक्षण दिलें होतें, पण तुको-बांना परमार्थाची भूक लागल्यावर त्यांनीं परमार्थग्रंथ अत्यंत आ-स्थेनें पाहिले. संसारोपयोगी विद्या कांहीं जन्मसार्थकाची विद्या नाहीं असें कळूं लागतांच ते परमार्थाचे ग्रंथ पाहूं लागले. ' केली आटाआटी । अक्षरांची देवासाठीं ॥ ' प्रपंचाचें मिथ्यात्व जाण-ल्यावर वैराग्य बाणलें व मग भगवत्प्राप्तीची तळमळ लागून:—

मागील भक्त कोणे रीती । जाणोनि पावले भगवद्भक्ती ।
जीवें भावें त्या विवरी युक्ती । जिज्ञासु निश्चिती या नांव ॥

—नाथभागवत १९–२७४

याप्रमाणें आपल्यापूर्वी होऊन गेलेले भक्त कोणत्या साधनांनीं देवास प्रिय झाले याचा ते विचार करूं लागले व हा विचार ग्रंथांतरींच केलेला असल्यामुळें ग्रंथ पाहणें अवश्य झालें. मागील भक्तांच्या कथा समजून घेऊन त्यांचें अनुकरण करितां यावें म्हणून त्यांनीं पुराणांसीं व संतांच्या उक्तींशीं परिचय केला. संतांच्या उक्ति पाहतां पहातां त्यांचें मनन सुरूं झालें, मननानें सहज पाठांतर झालें. मनन करितां करितां मुखांत अक्षरें बसून गेलीं. पाठांतर व मनन यांच्या योगानें अर्थरूप होऊन जातां आलें. तेच ह्मणतात कीं नुस्तें पाठांतर काय कामाचें ? ‘ घोकोनियां काय वेगीं अर्थ पाहे । अर्थरूप राहे होवोनियां ॥ ” नाथांनींही ह्मटलेंच आहे—

शब्द सांडूनिया मागें । शब्दार्थामाजी रिगे ।
जें जें परिसतु तें तें होय अंगें । विकल्पत्यागें विनीतु।

—नाथभागवत ७–३५९.

ज्याला जें पाहिजे असतें तें त्याला जिथें दिसेल तेथून तो संग्रहीत असतो, या न्यायानें तुकोबांना देवाचा ध्यास लागल्यावर देवाच्या व देवाची ओळख करविणाऱ्या देवतुल्य संतांच्या कथा ज्या ग्रंथांत होत्या तेच ग्रंथ त्यांना प्रिय झाले व त्या ग्रंथांतूनही हरिप्रेम वाढविणाऱ्या उक्ति त्यांच्या पाठांत बसून गेल्या.

करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण ॥ १ ॥
जिहीं केला मूर्तिमंत । ऐसा संतप्रसाद ॥ ध्रु० ॥
सोज्ज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागिल्या ॥ २ ॥
तुका म्हणे घेऊं धांवा । करूं हांवा ते जोडी ॥ ३ ॥

या अभंगाचा अर्थ असा दिसतो:—“ज्यांत देवाची करुणा भाकलेली आहे अशीं संतांचीं वचनें आम्ही पाठ करूं. ज्या संतांनीं

निर्गुण निराकार देवाला सगुण साकार व्हायला लावलें, प्रेम-बळानें त्याला व्यक्तीस आणलें अशा संतांच्या उक्ति हा त्यांचा प्रसादच होय. संतांच्या उक्ति हीं त्यांच्या कृपेचीं वचनें आहेत. त्यांनीं मागील संतांचे मार्ग झाडून साफ केले आहेत. हे मार्ग पूर्वीचेच खरे, पण मध्यें बुजले होते ते यांनीं धोपट केले. आम्ही आतां त्वरा करूं व त्यांनीं देवाचे चरण जोडले ते आम्हीही जोडूं. ”

वरील अभंगाचा जास्त विचार केला म्हणजे तुकोबांचें मनोगत काय होतें तें स्पष्टपणें कळून येतें. परमार्थाचे हजारो ग्रंथ संस्कृत व प्राकृत भाषांतून होते, पण त्या सर्वांत ‘ ज्यांत करुणाकर भाषण ’ आहे तेवढेंच त्यांना प्रिय होतें. देवाची ज्यांत करुणा भाकली आहे, देवभक्तांचें प्रेम ज्यांत व्यक्त झालें आहे, देवाला प्रेमभावानें आळवायला जी साहाय्यक आहे अशीच वाणी त्यांना प्रिय होती; नुस्ती शास्त्रांची प्रक्रिया ज्यांत सांगितली आहे असे शास्त्रीय ग्रंथ त्यांना नको होते, त्यांची त्यांना आवड नव्हती. आतां ‘ करुणा-कर भाषण ’ हीं नव्या जुन्या अनेक कवींनीं काव्यांत ग्रथित केले-लें आढळेल, पण ‘ जिहीं केला मूर्तिमंत ’ ह्म० सगुणसाक्षात्कारा-चें सुख भोगलेल्या, देवाला प्रत्यक्ष पाहिलेल्या, देवाशीं प्रेमसंवाद करणाऱ्या सगुणभक्तांच्या तोंडून निघालेलें करुणाकर भाषणच त्यांना पाठांतरांत ठेवायचें होतें. ह्या सगुणभक्तांच्या करुणापर उक्तींचें पाठांतर करण्यांतला हेतुही तुकोबांनीं चवथ्या चरणांत सांगितला आहे. त्यांना जी जोड, जो लाभ झाला ह्मणजे देवाला ‘ मूर्तिमंत ’ करून त्यांनीं जें प्रेमसुख भोगलें तेंच तुकोबांना पाहि-जे होतें व त्यांचें उत्साहबल इतकें दिव्य होतें कीं मीं तें ‘ धांवा घेऊन ’ मिळवीन असें त्यांना वाटत होतें. ज्या संतांनीं देवाला प्रत्यक्ष केलें त्यांच्याच उक्ति पाठ करण्याचा आपला मनो-दय तुकोबांनीं येथें याप्रमाणें व्यक्त केला आहेच, पण ते संतही पूर्व-

परंपरेला धरून चालणारे त्यांना पाहिजे होते. कोणी नवा धर्मपंथ काढणारे, नवा संप्रदाय रूढ करणारे, कांहीं तरी नवीन चळवळे धर्मक्रांती करणारे व नवीन बंडे त्यांना नको होतीं. मागेंपासून जे मार्ग चालत आले आहेत पण मध्यंतरीं परंपराप्राप्त मार्गही लुप्त झाल्यामुळें ज्यांनीं ते सोज्ज्वळ केले अशा शुद्ध वेदपरंपरेनें आलेल्या संतांच्या उक्तिच त्यांना प्रिय होत्या. ' आम्ही वैकुंठवासी ' ह्या अभंगांत तुकोबांनीं आपल्या अवताराचें प्रयोजन सांगितलें आहे, त्यांतही प्राचीनकाळीं ' बोलिले जें ऋषि ' तें 'साच भावें वर्ताया' आह्मी आलों असून आम्हीं ' झाडूं संतांचे मारग ' असेंच म्हटलें आहे.

**पुढिलांचे सोयी माझ्या मना चाली । मताची आणिली नाहीं बुद्धि**

पूर्वीं झालेल्या संतांच्या मार्गानें चालावें अशी माझ्या मनाची प्रवृत्ति आहे, मीं आपल्या स्वतंत्र बुद्धीनें कांहीं नवीन मत स्वीकारिलें नाहीं. असा ' तुका ह्मणे माझा साक्षीचा व्यवहार ' आहे. तुकोबांनीं प्रथम ' बाळक्रीडेचे अभंग ' रचिले त्यांत ' गाईन ओविया शिष्टांच्या आधारें ' असेंच त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. दुसऱ्या एका वेळीं ' आरुष माझी वाणी बोबडी उत्तरें ' याप्रमाणें आपल्या कवित्वाकडे लीनता घेतांनाही ' आधारें वदली प्रसादाची वाणी। उच्छिष्ट सेवनीं तुमचिया ॥ '—माझी वाणी प्रासादिक खरी पण तुम्हां संतांच्या वचनांचें सेवन करून तुमच्याच आधारानें ती या किंमतीला चढली आहे असें ह्मटलें आहे. ' संत गेले तया ठाया । देवराया पाववी । ' पूर्वील संत ज्या ठिकाणीं विश्राम पावले त्या ठिकाणीं त्यांच्याच मार्गानें मला घेऊन जा अशी तुकोबांची देवास प्रार्थना आहे.

तात्पर्य काय कीं पूर्वपरंपरेच्या ओघानें चालणारे व देवाला मूर्तिमंत करणारे जे साक्षात्कारी संत त्यांचीं करुणाकर भाषणेंच आह्मीं पाठांत ठेवूं व त्यांना जो देवाचा लाभ झाला तोच करून घेऊं असें तुको-

बांनीं आपल्या पाठांतराबद्दल स्वतःच सांगितलें आहे. आतां असे कोणते संत व कोणते ग्रंथ तुकोबांना प्रिय झाले होते याचा विचार पुढें ओघानें होणारच आहे. पुराण ग्रंथ व साधुसंतांचें ग्रंथ यां-चाच तुकोबांनीं अवलंब केला, आणि त्यांतील रहस्य मनांत सांठविलें. ' बहुत शब्दांचें अध्ययन करूं नये कारण तो वाचेचा केवळ शीण आहे ' असें बृहदारण्यकांत म्हटलें आहे. ग्रंथांतले सिद्धांत एकदां नीट लक्षांत आल्यानंतर ग्रंथांचें प्रयोजनच उरत नाहीं. ग्रंथांतले सिद्धांत कळल्यावर ते पचनीं कसे पडतील, महात्म्यांचा तो अनु-भव मला केव्हां येईल व मी आत्यंतिक सुख कधीं पावेन अशी तळमळ सुरू झाली कीं ग्रंथाध्ययन हळुहळु संपुष्टांत येतें व अंत-रंग अभ्यासास मग सुरुवात होते.

> पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं ।
> नाहीं ऐसी मती अर्थ कळे ॥ १ ॥
> होईल तें हो या विठोबाच्या नांवें ।
> अर्जिलें तें भावें जीवीं धरूं ॥ २ ॥

असें तुकोबांनीं पुढच्या अवस्थेंत म्हटलें आहे. ग्रंथांतील सार-भूत हरि चित्तानें निवडून घेतला म्हणजे ग्रंथांचें कार्य झालें. 'अक्ष-रांचा श्रम केला । फळा आला तेणें तो' तें असो. तुकोबांनीं कोणते ग्रंथ पाहिले, कोणत्या संतांचीं वचनें पाठ केलीं, वाचलेल्या ग्रंथांतून काय सार ते घेत हें आपण आतां पाहूं.

६ तुकोबांनीं कोणत्या ग्रंथांचें अध्ययन केलें होतें हें महिपत-बावांनीं आपल्या प्रेमळ वाणीनें ( भक्तलीलामृत अ. ३० ) सांगितलें आहे:—

> नामयाचे अभंग निश्चित । पाठ करूनि गात नाचत ।
> हरिदिनीसी उपास करित । संतांसमवेत जागरण ॥ १० ॥
> आणीक संतांचे पाहिले ग्रंथ । कबीरभक्त यवन विख्यात ।
> तयाचें जें वचनामृत । तें पठण करी प्रीतीनें ॥ ४२ ॥

आणीक अध्यात्मग्रंथ थोर । स्वमुखें वदले ज्ञानेश्वर ।
त्याची शुद्ध प्रती साचार । वैष्णववीरें मिळविली ॥ ४३ ॥
श्रीविष्णुअवतार एकनाथ देखा । त्यांनीं भागवतावरी केली टीका ।
त्याचा प्रयत्न करूनि निका । ग्रंथ नेटका मेळविला ॥ ४४ ॥
त्या ग्रंथाचें करावया मनन । एकांत स्थळ योजिलें कोण ।
रमणीय भांडारपर्वत जाण । ते स्थळीं जाऊन बैसतसे ॥४५॥
ग्रंथाचें पारायण करूनी । अर्थान्वय ध्यानासि आणी ।
पूर्वाभ्यासी जो शिरोमणी । कैवल्यदानी साह्य जया ॥ ४६ ॥
ग्रंथ व्हावया पाठांतर । तुकयासी श्रम न लागती फार ।
मनन करितां अहोरात्र । मुखीं अक्षरें बैसती ॥ ४७ ॥
प्रासादिक एकनाथाचीं वचनें । जें कां भावार्थ रामायण ।
त्याचेंही पाठांतर पूर्ण । निजप्रीतीनें करीतसे ॥ ४८ ॥
श्रीभागवतींच्या कथा सुरस । स्वमुखें वदले महापुरुष ।
त्याही पाहिल्या सायासें । लीला विशेष श्रीहरीची ॥ ४९ ॥
योगवासिष्ठ अमृतानुभव पूर्ण । श्रीज्ञानेश्वर बोलिले वचन ।
त्याही ग्रंथाचें करूनि मनन । अर्थ शोधून ठेविला ॥ ५० ॥
आणीक पुराणें ऐकती फार ...........................

महिपतबावांनीं येथें उल्लेखिलेले ग्रंथ तुकोबांनीं 'जाऊनि एकांत संधीं । अर्थ शोधी ग्रंथांचा ' ह्या तऱ्हेनें मननपूर्वक पाहिले यांत शंका नाहीं. नामदेवांचे अभंग ते ' पाठ करूनि नाचत ' हें उघड-च आहे. तुकोबांनीं प्रथम नाथनामदेवांच्या अभंगांचेंच पाठांतर मनन केलें, व कबीरांचे दोहरे त्यांनीं ' प्रीतीनें पठण ' केले, हें तुको-बांनीं स्वतः केलेल्या दोहऱ्यांवरूनही कळणारें आहे. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांच्या त्यांनीं ' शुद्ध प्रती ' मिळविल्या हे बावांचे उद्गार मन-नीय आहेत. ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व योगवासिष्ठ(?) हे तीन अध्यात्मग्रंथ त्यांनीं ' मनन करून अर्थ शोधून ' ठेवले. याच ग्रंथांत महिपतबावांनीं पुढें एके ठिकाणीं ( अ० १६—१६२ ) ' हरिपाठाचे अभंग थोर । स्वमुखें वदले ज्ञानेश्वर । तेचि तुका

वैष्णववीर । सप्रेमादरें गातसे ॥ ' असें म्हटलें आहे. ह्मणजे ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, योगवासिष्ठ व हरिपाठाचे अभंग हे ज्ञानेश्वरांचे चार ग्रंथ तुकोबांनीं मननपूर्वक पाहिले होते. आतां राहिले नाथ. नाथभागवत हा ग्रंथ त्यांनीं फार ' प्रयत्न करून नेटका ग्रंथ ' मिळविला व ह्या ग्रंथाचीं भंडारा डोंगरावर एकांतस्थळीं जाऊन पारायणें करून अर्थान्वय मनास आणला. नाथांच्या भावार्थ रामायणाचेंही त्यांनीं ' निजप्रीतीनें पारायण ' केलें. भागवतांतील सुरस कथा आणखी कोणीं महापुरुषांनीं वर्णिलेल्याही त्यांनीं कृष्णलीलाप्रेमार्थ ' सायासानें ' पाहिल्या. त्यांनीं ' आणीक पुराणें फार ऐकिलीं. ' महिपतबावांनीं तुकोबांच्या अध्ययनाचें हें जें वर्णन केलें आहे तें अगदीं बरोबर आहे. बावांचा शोधकपणा व मार्मिकपणा पाहून मला सानंदाश्चर्य वाटतें. बावांनीं तुकोबांच्या ग्रंथाध्ययनाबद्दल जें लिहिलें आहे त्यालाच आणखी पुष्टि द्यावी व अर्वाचीन पद्धतीप्रमाणें तुकोबांनीं हेच ग्रंथ पाहिले होते याबद्दल तुकोबांच्या अभंगांतच काय अंतःप्रमाणें सांपडतात याची विशेष चर्चा करावी या हेतूनें पुढील भाग मीं लिहित आहे. नामदेव, कबीर, ज्ञानेश्वर व एकनाथ यांचे ग्रंथ तुकोबांनीं आस्थापूर्वक पाहिले होतेच, पण याशिवाय आणखी कांहीं पाहिले होते कीं काय याचाही आपण क्रमानें विचार करूं. तुकोबांना मूळ संस्कृत गीताभागवत सुद्धां स्वतंत्रपणें ह्म० प्राकृत टीकांच्या साह्यावांचून चांगलें समजत होतें व कित्येक संस्कृत स्तोत्रें, सुभाषितें, भर्तृहरीचीं नीति व वैराग्य हीं दोन शतकें वगैरे त्यांनीं पाहिलीं होतीं असें मला वाटतें. तात्पर्य, तुकोबा व्युत्पन्न नव्हते तरी बहुश्रुत होते व कामापुरतें संस्कृतही त्यांना येत असावें असा त्यांच्या अभंगांवरून माझा ग्रह झाला आहे.

७ तुकोबा भागवतधर्माच्या विद्यालयांत प्रविष्ट झाल्याचें मागें सांगितलेंच आहे. भागवतधर्माचा आचारधर्म त्यांनीं उचल-

त्याचें मागील प्रकरणीं लिहिलें आहे. भागवतधर्माचीं तत्त्वें ज्यांत विशद केलीं आहेत अशा ग्रंथांचें अध्ययन हें संप्रदायाबरोबर ओघानेंच आलें. भागवतधर्माचे मुख्य ग्रंथ दोन, गीता आणि भागवत. वेदशास्त्रांचें रहस्य गीता ग्रंथांत सांठवलें आहे, व गीतावक्ता जो श्रीकृष्णनाथ त्याचें चरित्र भागवतांत सांगितलें आहे. श्रीकृष्णाचे ज्ञानाधिकारी भक्त दोन. एक अर्जुन व दुसरा उद्धव. श्रीकृष्णांनीं अर्जुनास गीतेंत व उद्धवास भागवताच्या एकादशस्कंधांत भागवतधर्माचें रहस्य सांगितलें असून त्याचेंच मराठींत विशदीकरण अनुक्रमें ज्ञानेश्वर व एकनाथ यांनीं केलें आहे. तात्पर्य, भागवतधर्माचे गीता आणि भागवत हे मुख्य आधारस्तंभ असून त्यांत पूर्ण एकवाक्यता आहे. दोन्ही ग्रंथांची शिकवण अगदीं एक आहे. सर्व कर्में कृष्णार्पणबुद्धीनें करून हरिभक्तीनें स्वतः तरावें व इतरांस तारावें असाच दोन्ही ग्रंथांचा उपदेश आहे. गीता प्रवृत्तिपर आहे व भागवत निवृत्तिपर आहे असें कित्येक विद्वानांचें म्हणणें आहे पण दोन्ही ग्रंथ प्रवृत्तिनिवृत्तींतला पडदा काढून टाकणारे आहेत. ज्ञानभक्तीचा गोड मिलाफ दोन्ही ग्रंथांत झालेला आहे.

गीता भागवत करिती श्रवण । आणिक चिंतन विठोबाचे ॥
तुका म्हणे मज घडो त्यांची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥

भागवताचा आणखी स्वतंत्र उल्लेख तुकोबांनीं 'पांडुरंगा करूं प्रथम नमना' ह्या ओंव्यारूपी शंभरचरणी अभंगांत केला आहेः—

त्यांचींच उच्छिष्टें बोलतों उत्तरें । सांगितलें खरें व्यासादिकीं ।५१।
व्यासें सांगितलें भक्ति हेंचि सार । भवसिंधुपार तरावया ।५२।
तरावया जना केलें भागवत । गोवळे गोपी भक्त मातापिता ।५३।

व्यासांनीं गीताभागवतांत 'भक्ति हेंचि सार' सांगितल्याचें तुकोबा लिहितात. गीताभागवताशीं तुकोबांचा किती दृढ परिचय होता तें आतां आपण पाहूं.

८ मूळगीता तुकोबांच्या नित्य पाठांत होती व त्यामुळेंच गीतेची छाया त्यांच्या अभंगांवर जागोजाग पडलेली स्पष्ट दिसते. ‘अणोरणीयान्महतो महीयान्’ याचेंच रूपांतर ‘अणुरेणुया थोकडा। तुका आकाशाएवढा।’ हें होय. ‘निर्दोषं हि समं ब्रह्म’ याचेंच अन्यरूप ‘ब्रह्म सर्वगत सदा सम। जेथें आन नाहीं विषम।’ हें होय. ‘अंतकालेच मामेव स्मरन्’ ह्या गीतावचनाचेंच ‘अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा। तुका म्हणे सुखा पार नाहीं।’ हें भाषांतर होय. ‘पद्मपत्रमिवाम्भसा’ ह्याच दृष्टांत ‘मग मी व्यवहारीं असेन वर्तत। जैसें जळाआंत पद्मपत्र’। या अभंगपादांत आला आहे ‘द्वाविमौ पुरुषौ लोके’ व ‘उत्तमः पुरुषस्त्वन्यः’ ह्या १५ व्या अध्यायांतील श्लोकांचेंच तात्पर्य ‘क्षरा अक्षरावेगळा। तुका राहिला सोवळा।’ ह्या चरणांत आलें आहे. ‘ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति’ (गीता ९–२१) हीच गोष्टः—

**जरी मागों पद इंद्राचें। तरी शाश्वत नाहीं त्याचें।२।**
**स्वर्गभोग मागूं पूर्ण। पुण्य सरल्या मागुती येणें।३।**

याप्रमाणें तुकोबांनीं सांगितली आहे. ‘यावानर्थ उदपाने (गीता २–४६) या श्लोकाचाच भावार्थ ज्ञानेश्वरीच्या अनुरोधानें (२–२६२) ‘त्यानीं गंगेचिया अंतावीण काय चाड। आपलें तें कोड तृषेपाशीं।’ असा सांगितला आहे ‘ॐतत्सदिति-निर्देशो’ (गीता १७–२३) ह्या श्लोकाकडेचः—

**ॐतत्सदिति सूत्राचें सार। कृपेचा सागर पांडुरंग॥१॥**

ह्या अभंगपादाचा संदर्भ आहे. कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्’ (गीता ३–६) याला देवानीं ‘मिथ्याचार’ म्हटलें आहे. या श्लोकाची छायाः—

**त्यागें भोग माझ्या येतील अंतरा। मग मी दातारा काय करूं॥**

या अभंगपादावर पडली आहे. 'उद्धरेदात्मनात्मानं' (गीता ६–५) म्हणजेच 'आपणाचि तारी आपणाचि मारी । आपण उद्धरी आपणया ॥' त्याचप्रमाणें 'जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण ॥' ह्म० वासांसि जीर्णानि' हाच गीताश्लोक ( अ. २-२२ ) होय. 'अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्' ( ९–३० ) याचा अर्थ 'न व्हावीं तीं जालीं कर्में नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त' हा होय. हाही ज्ञानेश्वरीच्या अनुरोधानें झाला आहे. ( ज्ञाने. ४२०।२१ ) 'अनन्याश्चिंतयन्तो मां....योगक्षेमं वहाम्यहम्' ( गीता ९-२२ ) हा सुप्रसिद्ध श्लोकच पुढील अभंगाच्या पहिल्या दोन पादांत प्रतिबिंबित झाला आहे:—

**संसारींचें वोझें वाहता वाहाविता । तुजाविण अनंता नाहीं कोणी ।१।**
**गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे । योगक्षेम काज करणें त्याचें ।२॥**
**चतुर्भुजां करीं वारु श्रृंगारावे । सारथ्यें करावें अर्जुनाचें ॥ ३ ॥**
**श्वपच अंत्यत भाक्तस्नेहें झाला । अचळपदीं केला ध्रुव तुका ॥४॥**

असो. एवढ्याच उदाहरणांवरून तुकोबांचा मूळ गीतेशीं किती दृढपरिचय होता हें लक्ष्यांत येईल. तुकोबांकडे जे कोणी परमार्थाचा मार्ग विचारायला जात त्यांना ते गीतेची पोथी देत व गीता आणि विष्णुसहस्रनामाचे पाठ करायला सांगत. तुकोबांनीं आपला जावई व शिष्य मालजी गाडे येलवाडीकर याला गीतेचे पाठ करायला सांगितले होते. बहिणाबाईना त्यांनीं स्वप्नांत अनुग्रह दिला त्याप्रसंगीं त्यांनीं त्यांना रामकृष्ण हरी हा मंत्र जपावयास सांगितला व गीतेचें पुस्तक पाठासाठीं त्यांच्या हातीं दिलें. बहिणाबाई स्वतःच 'दिधलें पुस्तक मंत्र गीता' असें सांगतात ( बहिणाबाई कवितासंग्रह पृ. १३ अभंग २४ पहा ). यावरून तुकोबांच्या नित्यपाठांत गीता असून शिवाय गीतेच्या हस्तलिखित प्रतीही

कोणा योग्य पुरुषाला देण्यासाठीं त्यांच्या संग्रहीं असत असें दिसतें. मग या प्रती त्यांनीं स्वतः लिहिलेल्या असोत किंवा कांहीं शिष्यांकडून लिहून घेतलेल्या अगर कोणी त्यांस अर्पण केलेल्या असोत. एकंदरींत तुकोबा स्वतः गीतेचे पाठ करीत व इतरांकडूनही करवीत असें दिसतें.

९ तुकोबांचे मूळगीतेचे पाठ चालत त्याप्रमाणें त्यांनीं मूळ भागवतही चांगलें पाहिलें होतें. गीतेचा अभ्यास म्हणजे ज्ञानेश्वरीचा अभ्यास व भागवताचा अभ्यास म्ह० नाथभागवताचा अभ्यास असा जरी प्रकार आहे तरी तुकोबांनीं मूळ गीता व मूळ भागवत ( सर्व बाराही स्कंध ) नीट पाहिलें होतें यांत शंका नाहीं. तुकोबांच्या अभंगांत किंबहुना बहुतेक संतांच्या कवितेंत ज्यांचा वारंवार उल्लेख येतो अशा प्रल्हाद, ध्रुव, गजेंद्र, अजामेळ, अंबरीष, उद्धव, सुदामा, गौळणी, ऋषिपत्न्या इत्यादि भक्तांच्या कथा भागवतपुराणांतच आहेत. ध्रुवाख्यान भागवताच्या चतुर्थ स्कंधांत ( अ. ८।९ ) आहे. जडभरताची गोष्ट पंचम स्कंधांत ( अ. ९।१०।११) सांगितली आहे. अजामिळाची कथा षष्ठस्कंधांत ( अ. १।२।३ ) वर्णिली आहे. प्रल्हादाचें चरित्र सप्तम स्कंधांत ( अ. ५ ते १० ) दिलें आहे. गजेंद्रमोक्षाचा प्रकार अष्टमस्कंधांत ( अ. २।३ ) आला आहे. अंबरीषाचें आख्यान नवमस्कंधांत ( अ. ४।५ ) सांगितलें आहे. दशमांत संपूर्ण कृष्णचारित्र वर्णिलें आहे. जगांतील सर्व ग्रंथांत भक्तिसुखार्णव असा भागवतग्रंथ अत्यंत मधुर आहे. त्यांतही दशमस्कंध मधुरतर व त्यांत पुन्हा श्रीकृष्णाच्या बाललीला मधुरतम आहेत. श्रीकृष्णाच्या बाललीलांबद्दल पुढें विस्तृत वर्णन येणार असल्यामुळें लेखणी येथें आवरतों. इतर संतांप्रमाणें भागवत ग्रंथ तुकोबांना स्फूर्तिदायक झाला आहे. एकादशावर नाथांनीं भाष्य केलें असून द्वादशांत कलिसंतारक अशा नामसंकीर्तनाचें श्रेष्ठत्व

वर्णिलें आहे. भागवत ग्रंथ हा भागवतधर्माचा वेद आहे. ज्ञानोबांनीं ' व्यासाचा मागोवा घेत । भाष्यकारांतें वाट पुसत ' गीतारहस्य विशद केलें आहे, तथापि ज्ञानेश्वरीवर भागवताचीच छाप अधिक पडली आहे. भरतखंडांत श्रीकृष्णभक्तीचा प्रसार मुख्यत्वें भागवतामुळें झाला आहे. भागवत ग्रंथ तुकोबांनीं अनेकवार समग्र ऐकिला, पाहिला, अनुवादिला आहे. भागवतांतले अनेक श्लोक त्यांच्या पाठांत बसून गेले, त्यांतले सिद्धांत त्यांच्या हृदयांत उतरले, त्यांतील भक्तकथा त्यांच्या भक्तिप्रवणतेस उद्दीपक झाल्या. या विषयीं तिळमात्र शंका राहू नये यास्तव अंत:प्रमाणांवरून भागवताची छाप तुकोबांच्या विचारांवर व वाणीवर केवढी जबरदस्त पडली होती हें आपण थोडक्यांत पाहूं:—

( १ ) चतुर्थस्कंधांत ( अ० ८ ) नारदांनीं ध्रुवाला भगवत्स्वरूपाचें ध्यान करावयास दिलें आहे, व तसेंच महाविष्णूचें वर्णन भागवतांत अन्यत्र आहे. दशमांत श्रीकृष्णाचें रूपवर्णन अगदीं तसेंच आहे. श्रीपंढरपूरनिवासी विठ्ठलाचें रूप व तुकोबांनीं केलेलें त्याचें वर्णन त्याशीं अगदीं मिळतें आहे हें पाहण्यासारखें आहे:—

श्रीवत्सांकं घनश्यामं पुरुषं वनमालिनम् ।
शंखचक्रगदापद्मैरभिव्यक्तचतुर्भुजम् ॥ ४७ ॥
किरीटिनं कुंडलिनं केयूरवलयान्वितम् ।
कौस्तुभाभरणग्रीवं पीतकौशेयवाससम् ॥ ४८ ॥

वनमालिनम्=तुळशीहार गळां, रुळे माळ कंठीं वैजयन्ती.
मेघश्यामं पीतकौशेयवाससम्=कासे सोनसळा पांघरे पाटोळा ।
घननीळ सावळा बाइयानो ॥ १ ॥
किरीटिनं कुंडलिनं=मकरकुंडलें तळपती श्रवणीं ।,
मुकुटकुंडलें श्रीमुख शोभलें, इ०
कौस्तुभाभरणग्रीवं= कंठीं कौस्तुभमणि विराजीत ।.

( २ ) ' भक्तिं हरौ भगवति प्रवहन् ' असा ध्रुव ( प्रवहन् हें पद ध्यानीं धरा )=प्रेम अमृताची धार । वाहे देवा ही समोर ॥

( ३ ) नायं देहो देहभाजां नृलोके
कष्टान्कामानर्हते विड्भुजां ये ।
तपो दिव्यं पुत्रका येन सत्वं
शुद्धयेद्यस्माद्ब्रह्मसौख्यं त्वनंतम् ॥ ५-५-१ ॥

विट्भुज म्ह० विष्टाभक्षण करणारे श्वानसूकर. यांच्या तुच्छ योनींतही मिळणारे जे कष्टदायक विषयभोग तेच नरदेहांत येऊनही भोगीत राहणें योग्य नव्हे म्हणून पुत्रहो ! ( ऋषभदेव म्हणतात ) दिव्य तप करून शुद्धचित्त व्हा म्ह० अनंत ब्रह्मसुख भोगाल. या श्लोकाशीं पुढील अभंग ताडून पहा:—

तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचे व्हावें ॥ १ ॥
नाहीं तरी काय थोडीं । श्वान सूकरें बापुडीं ॥ ध्रु० ॥
जाल्याचें तें फळ । अंगीं लागो नेदी मळ ॥ २ ॥
तुका म्हणे भले । ज्याच्या नांवें मानवले ॥ ३ ॥

विट्भुजः=श्वानसूकरें. सत्वं शुद्धयेत्=अंगीं लागो नेदी मळ ।

( ४ ) संसारांत द्रव्यगृहादिकांच्या मागें धांवणाऱ्या मनुष्याला या भवारण्यांत वाळटळीनें उडणाऱ्या धुळीनें भरलेल्या दिशा दिसत नाहींत. ' क्वचिच्चवात्योत्थितपांसुधूम्रा । दिशो न जानाति रजस्वलाक्षः ' ( ५-१३-४ ). रजस्वलाक्ष म्ह० धुळीनें डोळे भरलेला. ' क्षणक्षणा हाचि ' या अभंगांतः—

तुका म्हणे इहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरूनि राहो ॥ ४ ॥

( ५ ) षष्ठस्कंधांतील अजामीळाच्या कथेला व मुख्यतः

न वै स नरकं याति नेक्षितो यमकिंकरैः ॥ २-४८ ॥
तांश्चोपसीदत हरेर्गदयाऽभिगुप्तान् ॥ ३-२७ ॥

या दोन चरणांला अगदीं धरून पुढील अभंग झाला आहेः—

यम सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता ।

जेथें होय हरिकथा । सदा घोष नामाचा ॥ १ ॥
नका जाऊं तया गांवां । नामधारकाच्या शिवा ।
सुदर्शन यावा । घरटी फिरे भोंवतीं ॥ ध्रु० ॥
चक्रगदा घेऊनि हरी । उभा असे त्यांचे द्वारीं....

* * * *

( ६ ) मन्ये धनाभिजनरूपतपः श्रुतौज—
स्तेजः प्रभावबलपौरुषबुद्धियोगाः ।
नाराधनाय हि भवन्ति परस्य पुंसो
भक्त्या तुतोष भगवान्गजयूथपाय ॥ ७–९–९ ॥
विप्रात् द्विषड्गुणयुतात् अरविंदनाभ—
पादारविंदविमुखात् श्वपचं वरिष्ठम् ।
मन्ये तदर्पितमनोवचनेहितार्थ—
प्राणं पुनाति स्वकुलं न तु भूरिमानः ॥ ७–९–१० ॥

प्रल्हाद म्हणतात: “धन, सत्कुलजता ( अभिजन ), रूप, तप, पांडित्य ( श्रुत ), इंद्रियपटुत्व ( ओज ), कांति ( तेज ), प्रताप (प्रभाव), बल, उद्योगरता ( पौरुष ), प्रज्ञा (बुद्धि) व अष्टांग योग हे गुण कांहीं पुरुषोत्तमाच्या संतोषाला कारण होत नाहींत ! गजेंद्र पशु—पण त्यापाशीं यांतला एकही गुण नसून भगवंत केवळ त्याच्या भक्तीनें त्यावर प्रसन्न झालें.”आतां भक्तीवांचून देवाच्या संतोषाला कांहींही लागत नाहीं. हें दुसऱ्या श्लोकांत सांगतात: “वर सांगितलेले बाराही गुण एखाद्या ब्राह्मणाच्या अंगांत आहेत, पण जर तो कमलनाभ प्रभूच्या सेवेला विन्मुख असेल तर त्यापेक्षां ज्यानें आपलें मन, वाचा, कर्म, अर्थ व प्राण भगवंताला अर्पिले आहेत असा चांडालही वरिष्ठ होय ! कारण हरिभक्त चांडालही स्वकुलाला पावन करितो, पण गर्वाचा पुतळा ( भूरिमानः ) असा नास्तिक ब्राह्मण स्वत:सही तारीत नाहीं. ”

वरील दोनही श्लोक तुकोबांच्या दोन अभंगांत अवतरले आहे-

त. पहिल्या श्लोकावर ' नव्हती ते संत करितां कवित्व ' हा अभंग सुचलेला दिसतो:—

नव्हती ते संत करितां कवित्व ।=पांडित्य.
संतांचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥=अभिजन.
नव्हती ते संत वेदाच्या पठणें ।=श्रुत,
नव्हती ते संत करितां तपतीर्थाटण । =तप. इ० इ०

आतां यापुढें दुसरा अभंग पहा:—

अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १
वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥ध्रु०
ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची॥२
तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी॥३

दुसऱ्या श्लोकाचा अर्थ या अभंगांत स्पष्ट आला असून 'पुराणीं निवाडा' झाल्याचें तुकोबा सांगतही आहेत. कोणत्या पुराणांत कोठें हा निवाडा झाला आहे हें कांहीं आतां सांगायला नको! भागवत पुराणाच्या वरील दुसऱ्या श्लोकांत हा निवाडा झाल्याचें आपण पाहतच आहोंत. 'शुद्ध उभयता कुळयाती' म्ह० 'पुनाति सकुलं ' व थोरपणा म्ह० ' भूरिमानः ' हें उघडच आहे.

( ७ ) प्ऱ्हाद दैत्यपुत्रांना उपदेश करितांना ( स्कंध ७—६) म्हणतो:—

पुंसो वर्षशतं ह्यायुस्तदर्धं चाजितात्मनः ।
निष्फलं यदसौ रात्र्यां शेतेऽधं प्रापितस्तमः । ६ ।
मुग्धस्य बाल्ये कौमारे क्रीडतो याति विंशतिः । इ०

तुकोबांचा ' गातों वासुदेव ' हा अभंग पहा. ' अल्प आयुष्य मानवी देह । शत गणिले तें अर्ध रात्र खाय । पुढें बालत्व पीडा रोग क्षय । ' इ० हाच अर्थ दुसऱ्या अभंगांतूनही आला आहे.

(८) अष्टम स्कंधांत गजेंद्राचें आख्यान आहे. ( अ०२—३ )

तें व तुकोबांनीं गजेंद्राचे केलेले उल्लेख पहावेत. गजेंद्राची कथा व तिचें मर्म तुकोबा सांगतात:—

> **गजेंद्र तो हस्ती सहस्रवरुषें । जळामाजीं नक्रें पीडिलासे ॥ १ ॥**
> **सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी॥२**
> **कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तयां दोघांजणां तारियेलें॥३**
> **तुका ह्मणे नेले वाहूनि विमानीं । मीही आइकोनी विश्वासलों॥४**

गजेंद्र जळांत नक्राशीं सहस्रवर्षे झगडत होता असें तुकोबांनीं म्हटलें आहे व भागवतांतही 'तयोर्नियुद्ध्यतोः समाः सहस्रं व्यगमन्' असेंच आहे. 'सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे' हा 'अपरे गजास्तं तारयितुं न चाशकन्' याचा भावार्थ आहे. नक्र व गज या दोघांनाही नारायणानें तारल्याचें भागवतांतही सांगितलें आहे. गजेंद्राला 'विमानीं वाहून' नेल्याचें तुकोबांनीं लिहिलें आहे तेंही भागवतांत भगवंत 'तेन युक्तः अद्भुतं स्वभवनं गरुडासनोऽगात्' असेंच सांगितलें आहे. याप्रमाणें तुकोबांनीं भागवतांतील ज्या ज्या भक्तकथांचा उल्लेख आपल्या अभंगांतून केला आहे त्या त्या कथा मूळांत नीट ताडून पाहिल्या म्हणजे तुकोबांचा भागवताशीं साक्षात् दृढ परिचय होता असेंच कोणाच्याही लक्ष्यांत येणार आहे. गजेंद्राला 'देवानें विमानीं वाहून नेलें' ही गोष्ट 'मीही आइकोनी विश्वासलों' असें तुकोबा म्हणतात तेंही मननीय आहे. देव भक्ताला विमानांत घालून वैकुंठाला नेतात हें गजेंद्र अंबरीष इत्यादि भक्तांच्या चरित्रांत ऐकून 'मीही विश्वासलों' हा तुकोबांचा उद्गार त्यांच्या वैकुंठगमनाच्या कथेशीं मिळवून पहाण्यासारखा आहे.

**(९) तैरेव सद्भवाति यत्क्रियतेऽपृथक्त्वात्**
**सर्वस्य तद्भवाति मूलनिषेचनं यत् ॥ ८-१०-२९ ॥**
**यथाहि स्कंधशाखानां तरोर्मूलावसेचनम् ।**

एवमाराधनं विष्णोः सर्वेषामात्मनश्चहि ॥ ८-५-४९

ह्या भागवतांत दोनवेळ आलेला मूलसिंचनाचा दृष्टांत याच अर्थानें तुकोबांनींही योजिला आहे:—

सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ॥ १ ॥
नको पृथकाचे भरीं । पडो एक सार धरी ॥ २ ॥

हा दृष्टांत ज्ञानेश्वरींतही आला आहे. 'जैसे मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ।' ( १-२५ ) पण ' अपृथक्त्वात्=नको पृथकाचे भरीं,' यावरून हा तुकोबांना भागवतावरूनच सुचला हें उघड आहे.

( १० ) अहं भक्तपराधीनो ( भागवत ९-४-६३ )

अरे भक्तपराधीना । तुका ह्मणे नारायणा ॥ १ ॥

(११) वशीकुर्वन्ति मां भक्त्या सत्स्त्रियः सत्पतिं यथा ॥ ९-४-६६
पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आह्मां नारायणा तैशापरी ॥

( १२ ) भर्जिताः क्वथिता धानाः प्रायो बीजाय नेष्यते ॥ १०-२२-२६
बीज भाजुनि केली लाही । आह्मां जन्ममरण नाहीं ॥

( १३ ) एकादशाच्या दुसऱ्या अध्यायांत ' कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा ' ( ३६ ) या श्लोकापासून ' विसृजति हृदयं न यस्य साक्षात्....प्रणयरशनया धृताङ्घ्रिपद्मः' ( ५६ ) या श्लोकापर्यंत भागवतधर्माचें वर्णन आहे. त्यांतील आद्य व अंत्य दोन्ही पदांचा अर्थ तुकोबांच्या अभंगांत पहा:—

प्रेमसूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥ १ ॥
मनेसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरिराया ॥ २ ॥

प्रणयरशना म्ह० प्रेमसूत्रदोरी.

( १४ ) पुढील भागवती श्लोकाचें तर तुकोबांनीं एका अभंगांत पदशः भाषांतरच केलें आहे:—

न पारमेष्ठ्यं न महेंद्रधिष्ण्यं । न सार्वभौमं न रसाधिपत्यं ॥
न योगसिद्धीरपुनर्भवंवा । मय्यार्पितात्मेच्छति मद्विनान्यत् ॥

हा श्लोक ११ व्या स्कंधांत ( अ० १४–१४ ) आला असून थोड्या फरकानें ६ व्या स्कंधांतही ( अ० ११–२५ ) सांपडतो. याचा अर्थ: मला ज्यानें आत्मार्पण केलें आहे असा माझा भक्त माझ्यावांचून दुसरी कशाचीही इच्छा करीत नाहीं. पारमेष्ठ्य ह्म० परमेष्ठीपद अथवा सत्यलोक, महेंद्रधिष्ण्य म्ह० इंद्रपद, सार्वभौमपद, रसाधिपत्य म्ह० पातालाचें आधिपत्य, योगासिद्धी, अपुनर्भव ह्म० मोक्ष, ह्यांपैकीं तो कशाचीही इच्छा करीत नाहीं. आतां ह्या श्लोकांतील पारमेष्ठ्य इत्यादि सहा पदें अशींच पुढें ठेवून तुकोबांनीं ह्या श्लोकाचें पदशः कसें भाषांतर केलें आहे पहा:—

परमेष्ठीपदा । तुच्छ करीती सर्वदा ॥ १ ॥
होंचि ज्यांचें धन । सदा हरीचें चिंतन ॥ ध्रु० ॥
इंद्रादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ २ ॥
सार्वभौमराज्य । त्यासी कांहीं नाहीं काज ॥ ३ ॥
पाताळींचें आधिपत्य । ते तों मानिती विपत्य ॥ ४ ॥
योगसिद्धिसार । त्यांसि वाटे तें असार ॥ ५ ॥
मोक्षायेवढें सुख । सुख नव्हे तेंचि दुःख ॥ ६ ॥
तुका ह्मणे हरीवीण । त्यांसि अवघा वाटे शीण ॥ ७ ॥

एवढ्या प्रमाणांवरूनही तुकोबांचा भागवताशीं दृढ परिचय होता हें सर्वांस कबूल होईल.

१० तुकोबांनीं भागवताशिवाय इतर पुराणें फार आवडीनें पाहिलीं व त्यांतील भक्तकथांचा त्यांच्या मनावर फार परिणाम झाला असें त्यांनीं पुराणांबद्दल अनेकवार जे प्रेमोल्लेख केले आहेत त्यावरून दिसतें:—

( १ ) पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ।
ऐसा न देखे मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥

भीं पुराणें पाहिलीं व षड्दर्शनेंही धुंडाळलीं, पण नारायणा-

वांचून त्रैलोक्यांत दुसरा कोणी समर्थ नाहीं हेंच मला त्यांत आढ-ळून आलें. कोणतीं दर्शनें धांडोळलीं असावींत बरें ?

(२) पुराणींचा इतिहास । गोडरस सेविला ।
नव्हती हे अहाच बोल । मोकळे फोल कवित्व ॥ १ ॥

पुराणांतील अनेक भक्तांचे इतिहास पाहिले, त्यांतील अमृत-रसाचें सेवन केलें व त्या आधारानें मीं हें माझें कवित्व करीत आहें. मी कांहीं निराधार मनःकल्पित वायफळ गोष्टी सांगत नाहीं.

(३) आतां मी अनन्य येथें अधिकारी । होईन कोणेपरी नेणो देवा
पुराणींचे अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा २

देवा ! मी तुझ्या पायांपाशीं सरता केव्हां होईन, अनन्य भक्त केव्हां कसा होईन हें मला कळत नाहीं ! पुराणांतील ध्रुव, प्र्हाद, बळी, भरत, सुदामदेव, इत्यादि भक्तांच्या कथा पाहतां त्यांच्या-सारखी विमल भक्ति मला केव्हां मिळेल, माझा उद्धार कधी होई-ल, देव कधीं भेटेल, या विचारांनीं माझा जीव कासावीस होतो !

(४) भावेवीण नाहीं तयाचिये प्राप्ती । पुराणें बोलती ऐसी मात॥
(५) नामें असंख्यात तारिले अपार । पुराणीं हें सार प्रसिद्ध हो॥
(६) कृपाळु ह्मणोनी बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥

याप्रकारें अनेक ठिकाणीं तुकोबांनीं पुराणांविषयींचें आपलें प्रेम व्यक्त केलें आहे. पुराणांतील भक्तकथा वाचून तुकोबांनीं तन्मय व्हावें, यांच्यासारखी उत्कट भक्ति माझ्या चित्तांत कधीं बाणेल म्हणून तळमळावें, पुराणींचा अमृतरस सेवन करीत प्रेमा-श्रूंनीं भिजून जावें, ध्रुवाची ध्याननिष्ठा पाहून विठ्ठलरूपीं रंगून जावें, नामस्मरणानें किती भक्त तरले हें पाहून अधिक उल्हासानें नामरंगीं भरावें, देवाची भक्तवत्सलता आठवून त्याच्या प्रेमानंदांत विरून जावें, असा भागवतादि पुराणांच्या परिशीलनाचा कोमल

संस्कार तुकोबांच्या शुद्धचित्तावर झाला. ‘ नामाचे पवाडे गर्जती पुराणें ’ ह्या अभंगांत आदिनाथ शंकर, नारद, परीक्षिती, वाल्मीकि इ० महात्म्यांनीं नामस्मरणाचा अलौकिक छंद घेतला व आम्हां-सारख्यांस मार्ग दाखविला असें म्हटलें आहे. असो. गीता व भागवतादि पुराणें तुकोबांच्या अध्ययनांतील केवढें महत्वाचें अंग आहे हें आपण पाहिलें.

१६ भागवतधर्मीयांना विष्णुसहस्रनाम पूर्वींपासून प्रिय आहे व त्याच्या नित्यपाठाची परंपरा फार जुनी आहे. मूळ महाभारता-च्या अनुशासनपर्वाचा ४९ वा अध्याय म्हणजे हें विष्णुसहस्रनाम होय. भगवंताचें ध्यानपूर्वक नामसंकीर्तन हा चित्तशुद्धीचा सर्वो-त्कृष्ट उपाय आहे. नामस्मरण वेदालाही संमत आहे. ‘ मर्ता अमर्त्यस्य ते भूरि नाम मनामहे । विप्रासो जातवेदसः ’ असें ऋग्वे-दाच्या शेवटच्या अध्यायांत म्हटलें आहे. भागवतांत पुष्कळ प्रसं-गीं, विशेषतः अजामिळकथाप्रसंगीं ( स्कंध ६ अ. २ ) नाममा-हात्म्य फार प्रेमानें गायिलें आहे. नामस्मरणाचें विष्णुसहस्रनाम हें उत्कृष्ट साधन आहे. “ नामाचेया सहस्रवरी । नावा इया अवधारी । सजूनियां संसारीं तारूं जाहलों ” ( ज्ञाने. अ. १२-९० ) असा ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे. ‘ सहस्रनामाचे वाटगे । खांदीं घेतलें नेटगे । ’ याप्रमाणें नामदेव-

---

१ पुराणपठणाचा असा उत्कृष्ट परिणाम तुकोबांसारख्या भगवद्भक्तांच्या मनावर होत असून, व पुराणें भक्तिसुख देणारीं अमृताचीं सरोवरें आहेत असा त्यांच्यासारख्यांचा अनुभव ते स्वतः सांगत असून जे कित्येक आधु-निक पुराणांची हेटाळणी करितात व चिकित्सेच्या मिषानें नास्तिक्याच्या गो-त्यांत पडतात त्यांची कींव करावी तेवढी थोडीच आहे ! तुकोबांच्या अभं-गांची तारीफ पण त्यांना पूज्य व आधारभूत-अशा पुराणांची निंदा करणाऱ्या-नीं वरील अवतरणांचा व ‘ तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरिची ’ असल्या उद्गाराचा आपल्या मनाशींच विचार करावा!!

रायांच्या अभंगांत त्यांचा उल्लेख सांपडतो. गीताविष्णुसहस्र-नामाच्या नित्यपाठाचा परिपाठ आपल्याकडे फार जुना आहे. नाम-स्मरण हें भवांतून तरून जाण्याचें मुख्य साधन आहे असा भागवतधर्माचा उपदेश आहे, भागवतांत तो सहस्रशः केला आहे. गीतेंतही 'सततं कीर्तयन्तो मां' (अ. ९-१४) 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि' (अ. १०-२५ ' ओमित्येकाक्षरं ब्रह्म ' ( अ. १८-१३ ) याप्रमाणें नामस्मरणाचा मार्ग सुचविला आहे. विष्णुसहस्रनाममाला ही आयतीच उपयोगी पडल्यामुळें लोकांनीं ती प्रचारांत आणली होती. तुकोबांच्याहि पाठांत विष्णुसहस्रनाम होतें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तुकोबांनीं त्याचे एक लक्ष पाठ केले असें वारकरी मंडळांत मी ऐकलें आहे ! तुकोबांच्या अभंगांत विष्णुसहस्रनामाचा उल्लेख ७।८ वेळां केलेला मला आढळला:—

(१) नांव धड करा सहस्रनामाची । जे भवसिंधूची थडी ढाके१

(२) सांवळें रूप ल्यावें डोळा । साचा अढरांचा गोळा ।
पदर लागो नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥

(३) सहस्रनामाची आरोळी । एक एकाहुनि बळी रे ॥

(४) सहस्रनामांच रूपडें । भक्तकैवारी चोखडें ॥

(५) भांडवल माझें मिरविसी जनीं । सहस्रवोवणी नाममाळा ॥

(६) एक नामा नाहीं ताळ । केली सहस्रांची माळ ॥

(७) जया रूप ना आकार । धरी नाना अवतार ॥
घेतलीं हजार । नांवें ठेऊनि आपणा ॥ ५ ॥

(८) कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करी ॥

---

१ हे उल्लेख ज्या अभंगांत सांपडले त्यांचे अनुक्रमारंभ पुढें देतों:—१ २ होंचे भवरोगाचें औषध. ३ भक्तिसुखें जे मातले. ४ माझें मज द्यावें. ५ आमुचा तूं ऋणी. ६ व्यवहार तो खोटा. ७ न राहे क्षण एक.

विष्णुसहस्रनामनौकेचा मीं आश्रय केला व तुम्हीही करा म्हणजे भवसिंधूच्या पैल पार जाल असें तुकोबा म्हणतात. या नामावळींतील श्रीकृष्णाची केशव, पुरुषोत्तम, गोविंद, माधव, अच्युत, देवकीनंदन, वासुदेव, गरुडध्वज, नारायण, दामोदर, मुकुंद, हरी, भक्तवत्सल, पापनाशन इत्यादि नांवेंच तुकोबांच्या अभंगांतून वारंवार येतात ही गोष्टही थोडीशी विचारणीय आहे. कित्येक नामांवरून तुकोबांना कांहीं अभंग सुचले असावेसें वाटतेः—

( १ ) ' धर्मो धर्मविदुत्तमः—'

**धर्माची तूं मूर्ति । पापपुण्य तुझे हातीं ॥ १ ॥**

( २ ) ' गुप्तश्चक्रगदाधरः ':—

**घेऊनियां चक्रगदा । हाची धंदा करीतो ॥ १ ॥**
**भक्तां राखे पायांपाशीं । दुर्जनांसी संहारी ॥ २ ॥**

' चक्रगदाधरः ' ह्मा पदाचें विवरणच तुकोबांनीं वरील दोन चरणांत केलें आहे. सुदर्शनचक्रानें तो अंबरीषासारख्या भक्तांला पायांपाशीं राखतो व गदेनें तो कंसासारख्या दुर्जनांचा संहार करितो.

( ३ ) ' अमृतांशोऽमृतवपुः'—

**जीवाचें जीवन । अमृताची तनु । ब्रह्मांडभूषणु । नारायण ॥ १ ॥**

१२ तुकोबांच्या अभंगांत कोठें कोठें प्रसिद्ध संस्कृत श्लोकांचीं प्रतीकें व भाषांतरें येतात त्यावरूनही त्यांच्या बहुश्रुतपणाचें व पाठशक्तीचें अनुमान होतेंः—

**( १ ) सर्वं विष्णुमयं जगत्=विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म ।**
**( २ ) मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ।**
**माझे भक्त गाती जेथें । नारदा मी उभा तेथें ॥ १ ॥**
**( ३ ) कामातुराणां न भयं न लज्जा ।**
**कामातुरा भय लाज ना विचार**

( ४ ) क्षमाशस्त्रं करे यस्य दुर्जनः किं करिष्यति ।
अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति ॥=

क्षमाशस्त्र जया नराचिये हातीं । दुष्ट तयाप्रती काय करी ॥ १ ॥
तृण नाहीं तेथें पडला दावाग्नी । जाय तो विझोनी आपसया ॥२॥

( ५ ) मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।=
उल्लंघितें पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥

( ६ ) प्रतिष्ठा सूकरी विष्ठा गौरवं न तु रौरवम् ॥=
मानदंभचेष्टा । हे तों सूकराची विष्ठा ॥ १ ॥

( ७ ) परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥=

पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी

( ८ ) मृगमीनसज्जनानां तृणजलसंतोषविहितवृत्तीनाम् ।
लुब्धकधीवरपिशुना निष्कारणवैरिणो जगति ॥ २ ॥

काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ १ ॥
हा तों दायीचा विचार । आहे यातिवैराकार ॥ ध्रु० ॥
श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥ २ ॥
तुका म्हणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ३ ॥

हा शेवटचा अभंग भर्तृहरीच्या श्लोकाचें सुरेख भाषांतरच आहे. लुब्धक, धीवर, पिशुन ऊ० खळ हीं तीनही उदाहरणें तुकोबांनीं जशींच्या तशींच उचललीं आहेत.

भर्तृहरीचीं नीतिवैराग्यशतकें व आचार्यांचें पांडुरंगाष्टक, षट्‌पदी आणि महिम्नादि स्तोत्रें तुकोबांच्या अवलोकनांत व पाठांत असावींत. पांडुरंगाष्टकांत 'भक्तांना भवसागर कंबरेखालींच आहे हें सांगण्यासाठीं देवानें कटीवर कर ठेवले आहेत' असें एका श्लोकांत म्हटलें आहेः—

प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां । नितंबः कराभ्यां धृतो येन तस्मात् ।
विधातुर्वसत्यै धृतो नाभिकोशः । परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥ ३ ॥

करा विठ्ठल स्मरण । नामीं रूपीं अनुसंधान ।
जाणोनि भक्तां भवलक्षण । जघानप्रमाण दावीतसे ॥

कटीवरी ठेवुनि हात । जना दावित संकेत ।
भवजलाब्धीचा अंत । इतुलाचि ॥
( ९ ) असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिंधुपात्रे
सुरतरुवरशाखालेखनीपत्रमुर्वी ।
लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्वकालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥ ३२ ॥

हा महिम्नस्तोत्रांतला श्लोक प्रसिद्धच आहे. या श्लोकाची छाया पुढील अभंगावर व विशेषतः त्याच्या चतुर्थचरणावर कशी पडली आहे तें पहाः—

ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन पडे ॥ १ ॥
तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुती ॥ ध्रु० ॥
शिणला सहस्रतोंडें । शेष फणीऐसे धेंडे ॥ २ ॥
तुका म्हणे मही । सिंधुपात्र न पुरे शाही ॥ ३ ॥

तुझी कीर्ती सांगों तुजपुढें जरी । ब्रह्मांडाहीवरी माईना ते ॥ १ ॥
मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरेचि ॥ २ ॥

१३ तात्पर्य गीता, भागवत, इतर कित्येक पुराणें व महिम्नादि स्तोत्रें हीं तुकोबानीं मूळांतच चांगलीं पाहिलीं होतीं. तुकोबांना लिहितांवाचतां येत नव्हतें अशी ज्यांची समजूत असेल त्यांना हें वाचून आश्चर्य वाटेल, पण तुकोबांनीं भंडारा डोंगरावर ज्ञानेश्वरी-नाथभागवतादि ग्रंथांचीं अनेक पारायणें केलीं व बाललीलेचे अभंग स्वहस्तें लिहिले यावरून त्यांना मराठी उत्तम लिहितां वाचतां येत होतें यांत बिलकूल संशय नाहीं. आतां त्यांना संस्कृत येत होतें कीं नाहीं व येत असल्यास कितपत येत होतें हा प्रश्न राहिला. गीताभागवतांतील वर जीं समानार्थक अवतरणें दिलीं आहेत, त्यावरून हा प्रश्न सुटण्यास बरीच मदत व्हावी असें वाटतें. मी केवळ समानार्थक अवतरणें दिलीं नाहींत, तशीं तर शेंकडो देतां येतील; पण ज्यांवरून तुकोबांचा मूळ संस्कृत ग्रंथांशीं चांगल

परिचय होता व जीं मनांत खेळत असतांना तुकोबांना ते ते अभंग स्फुरले असें निर्विवाद म्हणतां येईल, अशींच अवतरणें दिलीं आहेत. मीं अक्षरांची आटाटी केली, 'पुराणें पाहिलीं व दर्शनें धांडोळलीं' असें तुकोबा सांगतात, यावरून संस्कृत ग्रंथ त्यांनीं स्वतः पाहिले ( नुस्ते दुसऱ्याच्या तोंडून ऐकले नाहीत ), असें स्पष्ट दिसतें. पाहण्यापाहण्यांत फरक असेल. ते व्याकरण पायाशुद्ध शिकले नसतील,त्यांना त्याची गरज नव्हती;पण ते भागवतादि पुराणग्रंथ स्वतः पाहत असत,व भावार्थ कळायला त्यांना अडचण पडत नसे असें मला वाटतें. आतां इतपत कळण्यापूर्वीं त्यांना चांगल्याच्या तोंडून श्रवण झालें असलें पाहिजे हें उघड आहे.कोणी म्हणतात कीं वैराग्य झाल्यावर तुकोबा कांहीं महिने पैठणास जाऊन राहिले व तेथें कोणा विद्वान् भाविक शास्त्र्याच्या तोंडून त्यांनीं सार्थ व साग्र भागवत ऐकिलें व नंतर भंडाऱ्यावर परत आल्यावर स्वबुद्धीनें भागवताचीं अर्थबोध होण्यासाठीं कित्येक पारायणें केलीं. भागवत संप्रदायांतलें भागवतसंहितेचे सप्ताह पुष्कळांनीं पाहिले असतील, किंवा चतुर्मास भागवतावर पुराणेंही ऐकलीं असतील. हा प्रघात फार पुरातन आहे. तुकोबांनींही सप्ताह किंवा पुराणें ऐकलीं असतील. सप्ताह चालला असतां कांहीं आस्थेवाईक श्रोते भागवताची पोथी पुढें ठेवून संथा किंवा शुद्ध पाठ घेत असतात, व नित्य पुराण श्रवण होतां होतां पुराणिकाच्या तोंडून महत्त्वाचे श्लोक वारंवार निघत असल्यामुळें ते ऐकून ऐकून बुद्धिवंत पुरुषांना काय पण स्त्रियांना सुद्धां ते पाठ होऊन जातात. असे केवळ श्रवणामुळें तुकोबांच्या पाठांत कांहीं श्लोक बसून गेले; यापेक्षा त्यांना अधिक संस्कृत येत नसावें असें कित्येकांचें मत आहे. तुकोबांना भावार्थ सहज समजण्याइतकें संस्कृत चांगलें येत होतें अशी माझी समजूत आहे. 'पाहिलीं पुराणें धांडोळलीं दरुशनें' असें ते स्वतः जर सांगत

आहेत तर आपणास त्याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. पुराणें पाहिलीं म्हणजे भावार्थ समजण्यासाठीं मी स्वतः वाचलीं व दर्शनें धांडोळलीं ह्म० शास्त्रग्रंथ शोधले, आणि त्यांचा तात्पर्यार्थ 'विठो-बासी शरण जावें, निजानिष्ठा नाम गावें' एवढा समजून गेलों असें तुकोबाच्या वाक्याचें तात्पर्य आहे. 'वेदाचें अक्षर घोक-ण्याचा मला अधिकार नाहीं' असें त्यांनीं चार दोन वेळ जें म्हटलें आहे तेंही विचार करण्यासारखें आहे. कांहीं संतांचीं वचनें मीं पाठ केलीं, कांहीं निवडक भागवती श्लोक किंवा स्तोत्रें जशीं मीं घोकलीं तशीं मला वेदवचनें पाठ करण्याचा अधिकार असता तर—उपनिषदेंही पाहून धांडोळून त्यांतील निवडक वचनें मीं पाठांत ठेवलीं असतीं असें त्यांचें म्हणणें आहे. याचा मतलब वेदाक्षराशिवाय पण तेथपर्यंत शास्त्रेंपुराणें मीं स्वतः पाहिलीं असाच दिसतो आणि ह्मणूनच तुकोबांना संस्कृत भाषेंतील शास्त्रपु-राणग्रंथ स्वतः वाचून त्यांचा भावार्थ समजण्यापुरतें संस्कृत येत असावें असा माझा समज आहे. त्यांची आस्था, प्रज्ञा व साक्षेप अलौकिक असल्यामुळें, व शास्त्रपुराणांच्या भावार्थग्रहणाला अनु-कूल अशी त्यांची अंतःकरणप्रवृत्ति असल्यामुळें हे ग्रंथ पाहतां पाहतां त्यांना अर्थबोध होण्याइतकें संस्कृत येत असलें पा-हिजे. शास्त्रपुराणग्रंथांचें रहस्य प्राकृतग्रंथांत विशद केलेलें होतें व ते ग्रंथही त्यांच्या पाहण्यांत होते म्हणून भावार्थ आकलन होणें त्यांच्यासारख्या प्रज्ञाप्रतिभावान् अधिकारी पुरुषाला अशक्य होतें असें मानण्याचें कारण नाहीं. वेदशास्त्रपुराणांचें रहस्य ज्ञानेश्वरी व नाथभागवत ह्या ग्रंथांत व्यक्त झालें होतें व हे ग्रंथ तुकोबांनीं रात्रं-दिवस जिव्हारीं धरिले होते. तुकोबांचा आचार चांगला ब्राह्मणा-लाही कित्ता घेण्यासारखा असल्यामुळें देवपूजानैवेद्यसमयांचे मंत्रही त्यांना मुखोद्गत होते. पूजासमाप्तीचे वेळीं 'मंत्रहीनं

क्रियाहीनं ' अशी प्रार्थना आपण करितों. तुकोबा ह्मणतातः—

**असो मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥ १ ॥**
**सेवेमध्यें जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ २ ॥**

भोजनसमयीं ' हरिर्दाता हरिर्भोक्ता ' हा श्लोक आपण म्हणतों. त्याचाच अर्थ ' दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ' असा आहे. आचार्यांच्या ' परापूजा ' नामक प्रकरणाला धरूनच ' कासयानें पूजा करूं केशीराजा ' हा उत्कृष्ट अभंग त्यांच्या तोंडून आला आहे. एके प्रसंगीं पूजासाहित्य जवळ घेऊन देवपूजेला नित्याप्रमाणें प्रारंभ करणार तोंच तुकोबांची तन्मयता झाली व देव, पूजक व साहित्य हा त्रिपुटीभेद मावळून एकाकारता झाली त्यावेळचा हा अभंग आहे. पण त्यावरून गंध, पुष्प, धूपदीप, अक्षता, दक्षिणा, आरतीभजन, नैवेद्य यांसह ते देवाची पूजा रोज सशास्त्र करीत असत हेंच सिद्ध होतें. नित्यकर्मांत तुकोबा ढिले नव्हते. ' कांहीं नित्यनेमावीण । अन्न खाय तोचि श्वान ' असें जर त्यांचें सक्त सांगणें आहे तर केवळ भंडाऱ्यावर ग्रंथ वाचले, एकाकार देवाची शाब्दिक प्रार्थना केली व रात्रीं गांवांतील देवळांत दोन प्रहर कीर्तन करून गेले एवढ्यावरच तुकोबा राहत नसत. कुळपरंपरागत आलेली श्रीपांडुरंगाची पूजा त्यांनीं कधींही टाळली नाहीं, व तीही कवाइतीची नव्हती. तुकोबा मूर्तिपूजक नव्हते हें म्हणणें पळभरही टिकणारें नाहीं. मात्र पूजा करणाऱ्या बहुतेक अज्ञजीवांप्रमाणें त्यांची पूजा टाळाटाळीची नव्हती. अत्यंत आस्थाप्रेमानें भरलेलें अंतःकरण सर्व कर्मांत तसेंच असतें. देवाची मूर्ति चैतन्यघन आहे, देव साक्षात् आपल्यासमोर उभा आहे, पूजाद्रव्यांनीं त्याची सश्रद्ध पूजा करणें हा परमानंददायक जीवधर्म आहे अशा सप्रेम भावानें त्यांची देवपूजा होत असे. पूजेंत सर्व मंत्र पुराणोक्तच आहेत. देवाची पूजा करण्याचा सर्व जीवांचा अधि-

कार आहे. तुकोबांची सश्रद्ध व समंत्र देवपूजा, त्यांची निर्मल राहणी, त्यांचें संस्कृत व प्राकृत भाषेंतील अध्यात्मग्रंथांचें अवलोकन, पाठांतर व कीर्तन हें सर्व इतक्या कळकळीचें होतें कीं, त्यांच्या आचाराचे ब्राह्मणही थोडेच सांपडावयाचे. या सर्वांचा परिणाम बहुजनसमाजावर चांगला होऊन तुकोबांच्या भगवद्भक्तीचा सर्वत्र डंका गाजला, व यामुळें पुराणमताभिमान्यांच्या तर्फे रामेश्वरभट तंटा करावयास सरसावले. तो कथाभाग पुढें येणारच आहे. तुकोबांच्या संस्कृत ग्रंथाध्ययनाचा प्रकार आपण पाहिला, आतां त्यांच्या प्राकृतग्रंथाध्ययनाकडे वळूं.

१४ आतां ज्ञानेश्वरीशीं तुकोबांचा दृढपरिचय होता असें निर्विवाद सिद्ध करणारीं कांहीं अंत:प्रमाणें—पहिला उद्गार ज्ञानोबांचा व दुसरा तुकोबांचा—या क्रमानें सादर करितों.

( १ ) राम हृदयांत असून भ्रांतजीव बाह्य विषयांवर लुब्ध होतात याला गोचिड व दर्दुर यांचे दृष्टांत ज्ञानेश्वरी अ० ९ मध्यें दिलेले आहेत—

**पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पाशीं त्वचेचिया पदराआड ।**
**परि तें अव्हेरूनि गोचीड । अशुद्धचि सेवी ॥ ५७ ॥**
**कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं...**

तुकोबांनींही ‘ कथापुराण ऐकतां ’ ज्यांना निद्रा ग्रासते त्यांना ‘ जवळी गोचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा ’ हेच दृष्टांत दिले आहेत. शंभरचरणी अभंगांतही ‘ दूरी अंतरला नामनिंदकांसी । जैसें गोचिडासी क्षीर राहे ’ असा चरण आहे.

**(२) नामाचेया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।**
**सजूनियां संसारीं । तारूं जाहलों ॥ १२–९० ॥**
**नांव धड करा सहस्रनामांची । जे भवसिंधूची थडी ठाके**

**(३) बीज मोडे झाड होये। झाड मोडे बीजीं सामाये** ॥ज्ञा.१७-५९

तरुवर बीजापोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥ १ ॥

(४) हे बहु असो पंडित । धरूनि बाळाचा हात ।
वोळी लिही सुव्यक्त । आपणाचि ॥ ज्ञाने० १३-३०८ ॥
अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥

(५) काय भानुतेजीं खद्योता । शोभा आथी? ज्ञा० १-६७ ॥
खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग ।

(६) अवघें जगाचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ज्ञा० ९-२००॥
तुका म्हणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हेंचि आतां॥

(७) येथ एकाचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तया ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥ ज्ञाने० ७-९७ ॥
मग कैचें रे भवबंधन । वाचे गातां नारायण ।
भवसिंधु तो जाण । येच तीरीं सरेल ॥ २ ॥

(८) जे ज्ञानाचा कुरुठा । तेथें सेवा हा दारवंटा ॥
तो स्वाधीन करी सुभटा । वोळवोनी ॥ ज्ञा० ४-१६६ ॥
पडोनियां राहीं । उगाच संतांचिये पायीं ॥ १ ॥

(९) अमरीं भाट होइजे । मग मृत्युलोकातें वानिजे ॥ ज्ञा.६-४३६
स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां

(१०)'इंद्रिया लागे कळंभा । एकमेका ' ( ज्ञा०अ०६ओवी १६ते१९)
व तुकोबांचा ' माझ्या इंद्रियांसी लागलें भांडण ' हा अभंग परस्पर ताडून पहा.

(११) आंगींचिया रोमा किती । जयाचिया तयासी न गणवती॥
तैसिया माझिया विभूती । असंख्य मज ॥ ज्ञा० १०-२१०।
'उंबरांतील कीटका' या अभंगांतील ' विराटाचे अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥ ' हा चरण पहा.

(१२) मातें जेणें पाविजे । तें शुद्धपुण्य ॥ ज्ञाने० ९-३१६
जयामाजी नारायण । शुद्धपुण्य तें एक ॥ १ ॥

(१३) मज तया अनन्यगतीची चाड ॥ ज्ञाने० १०-१३७
चाड अनन्याची धरी नारायण ( बालक्रीडा १५ )

(१४) जेव्हां सगर्भा वाढिले । तेव्हांचि पोटींचें घालें॥ ज्ञा० १३-८४८
मायवणी घाल्या घायें । गर्भा आवंतन न पाहे ॥ १ ॥

( १५ ) आपली स्वतंत्र इच्छा न ठेवतां देवाच्या इच्छेला अनुकूल असावें हें सांगतांना ज्ञानोबाराय पाण्याचा दृष्टांत देतातः-

माळिये जेउतें नेलें । तेउतें निवांताचि गेलें ।
तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ ज्ञाने० अ० १२-१२०॥

'इच्छा चाड नाहीं' या अभंगांत तुकोबा ह्मणतातः--

उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ २ ॥
मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥ ३ ॥

येथें त्यांनीं ज्ञानोबांचा दृष्टांत अधिक विशद व गोड केला आहे. उपाधिभेदानें मोहरी ( तामस ) कांदा ( राजस ) व ऊंस (सात्विक) यायोगें जळ त्रिविध भासलें तरी उदक एकच आहे. पाण्याचा जसा आग्रह नाहीं तसें निराग्रही होऊन जावें.

( १६ ) नवव्या अध्यायांतील गुह्यज्ञान सांगतांना संजयाची सुखावस्था वर्णितांना ज्ञानोबा ह्मणतातः—

चित्त चाकाटलें आटु घेत । वाचा पांगुळली जेथिंची तेथ।
आपादकंचुकित । रोमांच आले ॥ ५२७ ॥
अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें ।
आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ ५२८ ॥
ऐसा महासुखाचेनि अतिरसें।जेथ आटणी हो पाहे जीवदशे।

* * * *

स्थिरावली वृत्ती पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावुनियां ॥१॥
पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीलित।कंठ सद्गदित रोमांच आले॥धु०॥
चित्त चाकाटलें स्वरूपामाझारी । न निघेचि बाहेरी सुखावलें २
तुका ह्मणे सुखें प्रेमेसी डुल्लत । विरालों निश्चित निश्चितीनें ॥३॥

( १७ ) संसारांत राहून आपलें अक्रियत्व कसें ओळखावें हें सांगतांना ज्ञानोबांनीं बहुरूप्याचा (अ० ३—१७६) व स्फटिकाचा

(अ० १५–२४९) हे दृष्टांत दिले आहेत, ते तुकोबांनीं 'नटनाट्य अवघें संपादिलें सोंग' या अभंगांत दोन्ही एकत्र आणले आहेत.

(१८) जैशी सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळाच्या ॥ ज्ञाने० ॥
ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । (तुका०)

(१९) अद्वैतानुभवानें देहांतून वेगळे निघाल्यावर मग देह-कर्मांचा बाध होत नाहीं. ताक घुसळून लोणी काढल्यावर लोणी पाण्यांत टाकलें तरी वेगळेंच राहतें:—

**मग ताकौनियां काढिलें । लोणी मागौतें ताकीं घातलें ।**
**परि न घेपेचि कांहीं केलें । तेणें जेविं ॥** ज्ञाने० १८–१४०६

तुकोबाही 'पडिलों बाहेरी आपुल्या कर्तव्यें' या अभंगांत—

**एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडलिया ॥**

(२०) **ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी ॥** ज्ञा० १२-६३
**तान्हे तहान प्याली । भूक भुकेनें खादली ॥ १ ॥**

(२१) **तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव ।**
**परी मायायोगें जीव– । दशे आले ॥** ज्ञाने० ७–६६ ॥

**तुका ह्मणे एका देहींचे अवयव । सुखदुःख-भोगशीण पावे ॥**

(२२) गीतेंतील 'अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्' (अ. ९–३३) ह्या श्लोकावरील ज्ञानोबारायांची टीका (४९१-५०७) आणि तुकोबांचा 'वांट या जनाचें थोर वा आश्चर्य' हा व नाटाच्या अभंगांतील 'विषयवोढी भुलले जीव' हा असे दोन अभंग एकदम वाचून पहावे म्हणजे ज्ञानेश्वरीच्या पठणाचा तुकोबांच्या विचारांवर केवढा परिणाम झाला आहे तें दिसून येईल. बापडे जीव देवाला कां भजत नाहींत, कसल्या बळावर उन्मत्त होऊन विषय भोगीत पडले आहेत याची दोघांनाही कींव आली आहे.

(ज्ञा०) **अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पा आपुलिये अंगीं**
**काई घरीं कीं भोगीं । निश्चिती केली ॥ ४९३ ॥**

( तु० ) कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं ।येईल शेवटीं कोण कामा ।
काय मानूनियां राहिले निश्चिंती । काय जाब देती यमदूता ॥
( ज्ञा० ) नातरी विद्या कीं वयसा । यया प्राणियांसि हा ऐसा ।
मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ? ॥ ४९४ ॥
तरी भोग्यजात जेतुलें । तें एका देहाच्या निकिया लागलें ।
आणि देह तंव असे पडिलें । काळाचिये तोंडीं ॥ ४९५ ॥
( तु० ) कोण सुख धरलें संसारीं । पडोनि काळाचे आहारीं ।
( ज्ञा० ) जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केवि पांडवा ।
तेविं लोकां येऊनि सोपद्रवा । केविं न भजिजे मातें॥४९२॥
कां ही विसरलीं मरण बापुडीं ।काय यांसी गोडी लागलीसे ।
कां ही नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ।
(२३) साखरेचा माधौता । बुद्धिमंतपणेंही कारितां ।
परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ।
तेविं पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ज्ञाने० ८–२०२॥
साखरेचा नव्हे ऊंस । आह्मां कैंचा गर्भवास ? ॥ १ ॥

(२४) देवाचे गुण गातां वेद मुके झाले व शेषही थकला—

पाहें पां जाणिवेचेनि बळें।कोण्ही वेदांपासूनि असे आगळे ।
कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथी ? ॥ ३७० ॥
तोही आंथरुणातळवटी दडे।येरु नेति नेति ह्मणोनि बहुडे
एथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ॥ ३७१ ॥ ( ज्ञाने० ९)
त्याचा पार नाहीं कळला वेदांसी ।आणिकही ऋषी विचारितां ।
सहस्रमुखें शेष शिणला बापुडा।चिरलिया धडा जिव्हा त्याच्या
(आणि)शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग झाला ॥ १ ॥

( २५ ) ज्ञानेश्वरींत ( अ० ६ ओवी ७० ते ७८ ) शुक-नळिकान्यायानें देहाभिमानी जीव ‘ आपणाचि आपणयां पायाचा चवडा गोवून कसा घात ’ करून घेतो तें सांगितलें आहे. तुकोबांचे पुढील चरण पहा:—

आपणाचि तारी आपणाचि मारी । आपण उद्धरी आपणयां ।

शुकनळिकान्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहे मोकळिया॥

(२६)समर्थांचिया पंक्तिभोजनें।तळिल्यावरिल्या एक पक्वान्नें १८–४८

समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सिद्ध सर्व घरीं ॥१॥

न म्हणे सुहृदसोयरा आवश्यकाराजा आणि रंक सारिखेचि॥२॥

१५ वरील सर्व प्रकरण लिहून गेल्यावर देहु येथें एका जुन्या बाडांत ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायांतील ओव्या व त्यांतील कित्येक ओव्यांच्या खालीं तत्सदृश तुकोबांचे अभंग दिलेले माझ्या पाहण्यांत आले. वारकरीमंडळींत बारावा अध्याय–त्यांत सगुण भक्तीचें प्रतिपादन आद्यंत उत्कृष्ट असल्यामुळें–अधिक प्रिय आहे. सदर बाड तुकोबांच्या घराण्यांतीलच त्यांच्या कोणा नातवापणत्वानें लिहिलेलें असावें असें दिसलें. तें सर्व बाड येथें स्थलसंकोचास्तव उतरून देणें अशक्य आहे तथापि त्याची वाचकांस थोडीशी कल्पना व्हावी म्हणून २।४ नमुने दाखवितों.

१ (ज्ञा०) तरि व्यक्त आणि अव्यक्त । तूंचि एक निभ्रांत ।
भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ।। २३ ॥
(तु०) ज्यानें ज्यानें जैसें घ्यावें । तैसें व्हावें कृपाळें।।
सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धारियेले ॥ २ ॥

* * * *

२ लक्षूनियां योगी पाहाती आभास ।
तें दिसे आह्मांस दृष्टीपुढें ॥१ ॥
२ (ज्ञा०) एकदेशीया व्यापका । सरिसा पाड ॥ २५ ॥
(तु०) ह्मणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाईकावे ।। १ ॥
३ (ज्ञा०) आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरियेसि जें कानडें ॥३१॥
(तु०) स्तुती करूं तरी नव्होचि या वेदा ।
तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥
परी हे वैखरी गोडावली सुखें ।
रसना रस मुखें इच्छितसे ॥ २ ॥
४ (ज्ञा०) कर्मोद्रियें सुखें । करिती कर्मे अशोखें ।

जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥ ७८ ॥
आणिकही जे जे सर्व।कायिक वाचिक मानासिक भाव।
तयां मी वांचूनि ठाव । आनौती नाहीं ॥ ७९ ॥
(तु०) आला भागासी तो करी वेवसाव ।
परी राहो भाव तुझ्यापाशीं ॥ १ ॥
शरीर तें करी शरीराचे धर्म ।
नको देऊं वर्म चुकों मना ॥ ३ ॥

*       *       *       *

कवणाचें कारण न लगेचि कांहीं ।
सर्वा सर्वाठायीं तूं मज एक ॥ १ ॥
कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं ।
आतां उरलें काई न दिसे देवा ॥ २ ॥
५ (ज्ञा०) पै अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें ।
व्याघ्रसर्प प्रांजळे । केले एकीं ॥ १११ ॥
विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे ।
एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ ११२ ॥
ह्मणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ।
यालागीं माझियाठायीं । अभ्यासें मिळ ॥ ११३ ॥
(तु०) साधूनी बचनाग खाती तोळातोळा ।
आणिकांतें डोळां न पाहावे ॥ १ ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं ।
आणिकें कांपती देखोनियां ॥ २ ॥
असाध्य तें साध्य करितां सायास ।
कारण अभ्यास तुका ह्मणे ॥ ३ ॥

१६ आतां एकनाथ महाराजांच्या ग्रंथांशीं तुकोबांचा किती गाढ परिचय होता तें पाहूं. नाथांचें भागवत, भावार्थरामायण, स्फुट अभंग वगैरे अफाट वाङ्मय असून त्यापैकीं नाथभागवत व अभंग यांशीं तुकोबांचा विशेष दाट स्नेह होता असें दिसतें. या

संबंधानें हवे तितके उतारे देतां येतील, पण लेखणी आवरती धरून थोडीं अंत:प्रमाणें देतों:—

(१) जें माझे भक्त आले घरा
तें सर्व पर्वकाळ आले द्वारां।
वैष्णवां तो दिवाळी दसरा
तीर्थें घरां पै येती ॥ ना. भा. ११—१२६६ ॥

संत घरां आलें ह्म० दिवाळीदसऱ्याचा आनंद होतो हा अनुभव सर्वांचा आहे; पण ह्या अनुभवाला हें मूर्तस्वरूप नाथांनीं दिलें. त्यांच्या अभंगांतही—

आजी दिवाळीदसरा। श्रीसाधुसंत आले घरा ॥ १ ॥

हेच तुकोबा आपल्या लोकप्रिय झालेल्या चरणांत सांगतात:—

साधुसंत येती घरा। तोची दिवाळी दसरा ॥ १ ॥

(२) जैशी जीवनावेगळी मासोळी। तैसा बोधालागी तळमळी।
(ना. भा. ७—२३).

जीवनावेगळी मासोळी। तुका तैसा तळमळी।

(३) सिद्ध करूनि पूजासंभार। माझे पुजेचा अत्यादर।
पूजा करितां एकाग्र। जें साधुनर घरा येती ॥
त्या साधूंची पूजा न करितां। ना. भा. अ. ११—११९४।९५.

ह्या ओव्या व 'संत आधी देव मग' हा नाथांचा अभंग—

देव सारावे परते। संत पूजावे आरते ॥ १ ॥

ह्या तुकोबांच्या अल्पाक्षररमणीय पण स्पष्ट ठसठशीत अभंगपादांत परिणत झाले आहेत.

(४) रांडवा केले काजळकुंकू। देखोनि जग लागे थुंकूं ॥ ११।९६७
कुंकवाची उठाठेव। बोडकाबाई कशाला? ॥ (तुका०)

(५) 'लब्ध्वा जन्मामरप्रार्थ्यं मानुष्यं' (भा. ११—२३—२२) ही मूळ भागवती कल्पना घेऊन नाथांनीं (अ. ९.) तिचा विस्तार केला आहे:—

यालागीं नरदेह निधान । जेणें ब्रह्मसायुज्यीं घडे गमन ।
देव वांछिती मनुष्यपण । देवाचें स्तवन नरदेहा ॥ २५९ ॥
मनुष्यदेहींचेनि ज्ञानें । सच्चिदानंदपदवी घेणें ।
एवढा अधिकार नारायणें । कृपावलोकनें दीधला ॥ ३३ ॥
इहलोकींचा हा देह । देव इच्छिताती पाहे ॥ १ ॥
धन्य आह्मी जन्मा आलों । दास विठोबाचे झालों ॥ ध्रु० ॥
आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंदपदवी घेणें ॥ २ ॥
तुका ह्मणे पाठवणी । करूं स्वर्गीची निशाणी ॥ ३ ॥
( ६ ) केवळ जीं अपवित्रें । रिसें आणि वानरें ।
त्यां पूजिलीं गौळियांचीं पोरें । ताकपिरें रानटीं १४।२९०
गौळियांचीं ताकपिरें । कोण पोरें चांगलीं ? ॥ ( तुका० )

( ७ ) सोंगट्याच्या खेळातली सोंगटी ( सारी ) मेली व झाली ( जिवंत झाली, घरांत बसली ) ह्या दोन्ही कल्पनांप्रमाणें पूर्ण ज्ञान्याच्या दृष्टीनें बंधमोक्षही मिथ्या आहेत:—

सारी निमालियापाठीं । कोण पुण्यात्मा चढे वैकुंठीं ।
कोण पडे नरकसंकटीं । बद्धमुक्तगोष्टी समूळ मिथ्या ॥२९-७६८॥
सारी जाली मेली लटिकें वचन । बद्धमुक्तशीण तुका ह्मणे ॥४॥

( ८ ) काय गृहाश्रमीं देव नसे । मग वना धांवताति पिसें ।
साचचि देव वनीं वसे । तरी कां मृगसेसे न तरती व्याघ्र ॥
घालोनियां आसनें । देवो भेटता जरी ध्यानें ।
तरी बकांचीं पालिंगणें । कां पां तत्क्षणें नुद्धरती ॥ ११६ ॥
एकांतरहिवास विवरीं । तेथेंचि भेटतां श्रीहरी ।
तरी न तरोनियां उंदरीं । कां पा घरोघरीं चिवताती ॥११७॥
नाथभागवत अ० ५

काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बकाचें ? ॥ १ ॥
अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ ध्रु० ॥
काय उंदीर नाहीं धांवीं । राख लावी गाढव ! ॥ २ ॥
तुका म्हणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ३ ॥

अंतरींची बुद्धि खोटी आहे तोंपर्यंत बाह्य साधनें निष्फळ आ-

हेत. सर्प वायु भक्षण करून राहतो, बक ध्यानस्थ दिसतो, उंदीर बिळांत राहतो, गाढव राखेंत लोळतो, सुसर जळांतच निरंतर राहतो व कावळा पुष्कळ बुचकळ्या मारतो—पण यानें कांहीं त्यांना कोणी साधु म्हणत नाहीं. वायुभक्षण, ध्यान, एकांतवास, विभूतिचर्चन, जलांत अनुष्ठान किंवा स्नान हीं ईश्वरप्राप्तीचीं साधनें नाहींत असें नाहीं; पण हीं करूनही बुद्धींतले दोष गेले नाहींत तर हीं आचरूनही व्यर्थ होतें एवढाच भावार्थ आहे.

( ९ ) अद्वैतभक्ति, अभेदभक्ति हा विचार व हे शब्द ज्ञानेश्वरींत आहेत. यालाच नाथांनीं 'मुक्तीवरील भक्ति' म्हटलें आहे, नाथभागवतांत हे शब्द दहापांच वेळ आले आहेत. (अ. २९ ओवी ७१० ते ८१० पहा ). तुकोबांचा चरण—

मुक्तीवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥

( १० ) देह वोखटें म्हणोनि त्यागावें । तैं मोक्षसुखासी नागवावें ।
का गोमटें म्हणोनि भोगावें । तैं अवश्य जावें नरकासी २५२
तरी हें त्यागावें ना भोगावें । मध्यभागें विभागावें ।
आत्मसाधनीं राखावें । निजस्वभावें हितालागीं ॥ २५३ ॥

—नाथभागवत अ० ९

शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करीं त्याग ।
शरीर वोखटें ना चांग । तुका म्हणे वेग करीं हरिभजनीं ६

तुकोबांचे नाटाचे अभंग.

नाथांचें भावार्थरामायणही तुकोबांनीं पाहिलें होतें यांत संशय नाहीं. त्यांतून दोन उतारे देतों:—

( ११ ) तंवचि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता न देखे दृष्टी

( भा. रा. अरण्यकांड अ. ३ )

तोंवरी तोंवरी वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं ॥ ( तु० )

( १२ ) श्रीरामनामेवीण जें तोंड । तें केवळ जाण चर्मकुंड ।

भीतरीं जिव्हा चामखंड । कवित्वकांटे कांटली ॥ अर० १-९ ॥
नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ॥ ५ ॥

नाथांच्या व तुकोबांच्या दोघांच्याही अभंगांचे गाथे प्रसिद्ध आहेत. आतां नाथांचे अभंगही तुकोबांच्या पाठपाठांतरांत होते. नाथांच्या अभंगाचाही तुकोबांच्या अध्ययनावर केवढा परिणाम झाला तें आपण पाहूं. पहिला उतारा नाथांचा व दुसरा तुकोबांचा हें लक्षांत ठेवावें:—

(१) वर्णावी ते थोरी एका सद्गुरूची । येरा मानवाची कामा नये

---

वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची बोलूं नये ॥१॥

(२) चिंतनासी न लगे वेळ । कांहीं तया न लगे मोल ।
वाचे सदा सर्वकाळ । रामकृष्ण हरी गोविंद ॥ १ ॥
चिंतनासी न लगे वेळ । सर्व काळ करावें ॥

(३) चिंतन तें करीं सदा । रामकृष्ण हरिगोविंद ॥ १ ॥
हेंचि एक सत्य सार । वायां व्युत्पत्तीचा भार ॥ २ ॥

---

हेंचि एक सत्य सार । वाउगा व्युत्पत्तीचा भार ॥ १ ॥

(४) द्रव्य घेऊनियां कथा जे करिती । उभयता जाती नरकामध्यें

---

कथा करोनियां द्रव्य देती घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ॥१॥

(५) गीताभागवतावर दोघांचेंही अनिवार प्रेम, नामस्मरणाचा दोघांचाही उपदेश, हरिहरांचें ऐक्य दोघांच्याही ठिकाणीं:—

आयुष्यअंतवरी नामस्मरण । गीताभागवताचें श्रवण ।
विष्णुशिवमूर्तीचें ध्यान ॥ हेंचि देणें सर्वथा ॥

---

गीता भागवत करिती श्रवण । आणीक चिंतन विठोबाचें ॥

(६) तुमच्या सेवेचा महिमा । मज न कळे पुरुषोत्तमा ॥

---

तुमच्या नामाचा महिमा । मज न कळे पुरुषोत्तमा ॥

(७) नका करूं कर्माकर्म । तुम्हां सांगतों मी वर्म ।
श्रीरामाचें नाम । अट्टहासें उच्चारा ॥ १ ॥ (नाथ)

**कळे न कळे ज्या धर्म । ऐकां सांगतों रे वर्म ।**
**माझ्या विठोबाचें नाम । अट्टहासें उच्चारा ॥ १ ॥** (तुका०)

(८) बायकोच्या आधीन पुरुषानें राहून बाइल्या होऊं नये, तिच्या छंदानें नांचून आपला परमार्थ बुडवूं नये असा दोघांचाही उपदेश आहेः—

**बाइलेच्या आधीन होय ज्याचें जिणें । तया अधमा नरकीं येणें॥१**
**बाईलमनोगतें ऐसा चाले । नाम इती कोणाचे तया बोल २** (नाथ)
**बाइले आधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या अवलोकनें पडिजे द्वाड**
**कासया ते जंत जितातीं संसारीं । माकडाच्या परी गारोड्याच्या**
**बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेचें ॥३॥** (तुका)

यांतील ' माकडाच्या परी गारोड्याच्या ' ह्या चरणानें ज्ञानेश्वरींतील ' चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेंचि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ॥ ' ( अ. १३–७९३ ) ह्या ओवीचें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं !

(९) हरिहरांच्या अभेदाबद्दल दोघांचेही अभंग पाहण्यासारखे आहेत. नाथांच्या तीन अभंगांतलें एकेक चरण घेतलें म्हणजे तुकोबांचा एक अभंग होतो !

**हरिहरा भेद । नका करूं अनुवाद । धरितां रे भेद । अधम तो जाणिजे ॥ १ ॥**

हा एका अभंगाचा प्रथम चरण असून दुसऱ्या एका अभंगाचा तिसरा चरणः—

**गोडीसी साखर साखरेसी गोडी । निवाडितां अर्थघडी दुजी नव्हे**
असा आहे. तिसऱ्या एका अभंगाचा प्रथम चरण असा आहेः—
**एका वेलांटीची आढी । मूर्ख नेणती बापुडीं ॥ १ ॥**

---

आतां ह्या तीनही चरणांतल्या कल्पना ज्यांत एकवटल्या आहेत असा तुकोबांचा अभंग पहाः—

हरिहरां भेद । नाहीं नका करूं वाद ॥ १ ॥
एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेचे ठायीं ॥ ध्रु० ॥
भेदकासी नाड । एक वेलांटीच आड ॥ २ ॥
उजवा वाम भाग । तुका म्हणे एकचि अंग ॥ ३ ॥

( १० ) ' जो विनटला ' ह्या नाथांच्या अभंगांतला—

देव उभा मागें पुढें । वारी सांकडें भक्तांचें ॥ २ ॥

हा चरणच तुकोबांच्या ' आह्मां हरिच्या दासा ' या अभंगांतील पुढील चरणांत पुनर्जन्म पावला आहे:—

देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥ ३ ॥

( ११ ) सद्गुरुमहिम्यांत नाथ म्हणतात ' उपकारा त्यांच्या नोहे उतराई । ठेवीं जीव पायीं थोडा पहा ॥' तुकोबा संतस्तवनांत:—

काय द्यावें यांसी व्हावें उतराई। ठेवितां हा पायीं जीव थोडा

( १२ ) वारकरी पंढरीचा । धन्य धन्य जन्म त्याचा ॥ १ ॥
जाय नेमें पंढरीसी । चुकों नेदी तो वारीसी ॥ २ ॥ (नाथ)
पंढरीच्या वारकरी । वारी चुकों नेदी हरी ॥ १ ॥—(तुका०)

( १३ ) दोंचि अक्षरांचें काम । वाचे म्हणा रामनाम । ( एकनाथ )
दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावा रामराम ॥ ( तुकाराम )

( १४ ) वेळोवेळां सांगे जना । मागे दाना सर्वांसीं । ( एकनाथ )
वेळोवेळां हेंचि सांगे । दान मागे जगासी ॥ ( तुकाराम )

( १५ ) भागवतसंप्रदायांत हरिहरांचें समान प्रेम असून एकादशी व सामवार हीं दोन्हीं व्रतें करण्याचा प्रघात आहे.

सोमवार व्रत एकादशी करी । त्याचे चरण शिरीं वंदीन मी ।
शिवाविष्णु दोन्ही एकचि प्रतिमा । ऐसा जया प्रेमा वंदीन त्यासी।
एकादशी सोमवार न करिती। कोण त्यांची गति होईल नेणों ।तु०
हरिहरा भेद । नाहीं नका करूं वाद ॥ १ ॥

( १६ ) मज आणिलें नामरूपा । त्यांचो मजवर कृपा ।
दाविला हा सोपा । मार्ग मज उद्धवा ॥ १ ॥ (एक०)

———

आला नांवारूपा । तुका म्हणे जाला सोपा॥१॥ (तुका०)

( १७ ) कोठें कोठें नाथांचा अभंग मनांत आणून तुकोबांनीं त्याच्या पूरणार्थ किंवा त्याला प्रेमानें उत्तर देण्यासाठींच जणुंकाय आपला अभंग लिहिला आहे असें वाटतें. ' देवाचे ते आप्त जाणावे ते संत ' या नाथांच्या अभंगपादपूरणार्थच जणु तुकोबांनीं ' नव्हती ते संत करितां कवित्व ' हा अभंग लिहिला आहे. बहिणाबाईचा मूळ सर्वसंग्रहगाथा मला शिऊर येथें त्यांच्या वंशजाकडून मिळा-ला. त्यांत मध्येंच एका पृष्ठावर ' ब्रह्म सर्वगत सदा सम ' हा ना-थांचा अभंग दिला आहे. या अभंगाचें ध्रुवपद ' ऐसे कासयानें भेटती ते साधु ' असें आहे. या अभंगाचे खालींच ' ऐसे ऐसियानें भेटती ते साधु ' हा तुकोबांचा अभंग दिला आहे !

( १८ ) ज्ञानेश्वरीचा नाथभागवतावर आणि दोन्ही ग्रंथांचा तुकोबांच्या अभंगांवर विलक्षण परिणाम घडून आलेला आहे. अर्जुन मोहानें कवळला तेव्हां स्नेहाचें कठिणपण सांगतांना ज्ञानोबा म्हणतातः—

जैसें भ्रमर भेदी कोडें । मलतैसें काष्ठ कोरडें ।
पारि काळिकेमाजि सांपडे । कोंवळिये ॥ २०१ ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । पारि तें कमळदळ चिरूं नेणे ।
तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह देखा ॥ २०२ ॥ ( अ. २ )

यांतील भ्रमराचा दृष्टांत नाथांनीं घेतला असून शिवाय त्यांच्या गृहस्थाश्रमाला नित्य परिचयाचा असा बाळाचा गोड दृष्टांत अधिक घातला आहेः—

जो शुष्क काष्ठ स्वयें कोरी । तो कोंवळ्या कमळामाझारी ।
भ्रमर गुंतला प्रीतीवरी । केसर माझारीं कुचंबो नेदी ७२
बाळ पालवीं घाली पिळा । तेणें बापु राहे थोकला ।
तरी काय तो निर्बळ जाहला । ना तो स्नेहें भुलला ढळेना ॥७८३॥

—नाथ भागवत अ २

तुकोबांनीं हे दोन्हीं दृष्टांत पुढील अभंगांत योजले आहेत!—

नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥
प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ ध्रु० ॥
पद्रीं घाली पिळा । बाप निर्बळ सार्टी बाळा ॥ २ ॥
तुका ह्मणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ३ ॥

बाळाचाच तेवढा दृष्टांत पुन्हां एकदा आला आहे.

प्रीतीचा कळह । पद्रासी घाली पीळ । सरों नेदीं बाळ । मागेंपुढें पित्यासी ॥ १ ॥
काय लागे त्यासी बळ । हेडाविता कोण काळ । गोविती सबळ । जाळीं स्नेहसूत्राची ॥

( १९ ) नाथांचें लिहिणें थोडें ऐसपैस प्रशस्त असतें, तुकोबांचें सूत्रप्राय खणखणित असतें. ज्ञानेश्वरी व नाथभागवत हे ग्रंथ तुकोबांनीं सूक्ष्मपणें अभ्यासिले, त्यांचें हार्द हृदयांत ठेवलें, त्यांचें मनन पठण परम आस्थेनें केलें. ज्ञानेश्वरीचें स्पष्टीकरण नाथ भागवतानें होतें. दोन्हीं ग्रंथ ज्यानें उत्तम अभ्यासिले असतील त्यालाच तुकोबांचीं सूत्ररूप वचनें उलगडतां येतात ! उदाहरणसाठीं एकच अभंग देतों:—

गोदेकाठीं होता आड । करुनी कोडकवतुक ॥ १ ॥
देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेलें जिवनांप ॥ ध्रु० ॥

---

१ आणखी पुष्कळ उतारे देतां येतील. 'ओळखिला हरी सांठविला पोटीं' ( नाथ ) 'सांठविला हरी' जेणें हृदयमंदिरीं ' ( तुका ), 'पवित्र तें कुळ धन्य त्याची माय ' ( नाथ ) ' पवित्र तें कुळ पावन तो देश ' ( तुका ); ' रावरंक होका उंच निंच याती । भक्तीवीण माती मुखीं त्याच्या ' ( नाथ ) उंच निंच कांहीं नेणें भगवंत ' ( तुका ); ' ऐसा संतांचा महिमा ' नाहीं आणिक उपमा । ( नाथ ) ऐसा संतांचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ ( तुका ); ' काय वानूं मी पामर ' ( दोघे ); ' उजळले भाग्य आतां ' ( दोघे ); ' थकले सहा अठरा चार ' ( दोघे ) इ० इ०

राखोनियां होतो ठाव । अल्प जीव लावूनी ॥ २ ॥
तुका म्हणे फिटे धणी । हे सज्जनीं विश्रांती ॥ ३ ॥

आतां या अभंगांतील गोदा, आड, देखणें, इ० पदांचा अर्थ काय लावावा ? ज्याला परंपरा ठाऊक नाहीं, परंपरेचें अध्ययन नाहीं तो या अभंगाचा अर्थ तर्कानें वाटेल तसा लावील; पण तुकोबांना हा अभंग कोठून स्फुरला, तेथला कोणता त्यांना अभिप्रेत असा अर्थ त्यांच्या मनांत यावेळीं घोळत होता हें परंपराप्राप्त मार्गानें जाणाऱ्यांशिवाय इतरांस सहसा कळणार नाहीं ! या अभंगाचा गोलार्थ असा आहे; " गोदावरीच्या काठीं एक आड होता. तो सांचवणीच्या पाण्यानें तुडुंब भरला होता व आपल्याच ठिकाणीं आपलें कोडकौतुक करून होता. मीही तेथें अल्पजीव लावून ठाव राखून होतों. पण देखण्यांनीं एक उपकार केला. त्यांनीं मला आइत्या जीवनापें नेलें. ह्म० मूळ सरितेच्या वाहत्या उदकीं नेलें. तेथें माझी धणी फिटली ह्म० तृप्ती झाली ही विश्रांति सत्संगती-नेंच मिळाली." पण एवढ्या अर्थानें कोणाचेंही समाधान होणार नाहीं. देखण्यांनीं म्ह० संतांनीं आइत्या जिवनापें नेलें म्हणून त्यांचे उपकार मानण्यासाठीं ह्या अभंगाची प्रवृत्ति आहे. हा संतपर आहे. संसार तरून जाण्याचे बहुत उपाय आहेत. त्यांत मुख्य ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग. त्यांत भक्तिमार्ग प्रांजळ, निर्विघ्न व नित्यनिर्मळ आहे, ज्ञानमार्ग मध्यम व विकळ आहे. भक्तिमार्ग ही गोदा ह्म० अखंड घडघडाटानें वाहणारी सरिता व ज्ञानमार्ग हा आड. नाथ-भागवतांत ११व्या अध्यायांतल्या ४८ श्लोकावर नाथांचें जें भाष्य आहे त्यांत वरील अभंगाचें मूळ आहे ! ' प्रायेण भक्तियोगेन सत्संगेन विनोद्धव । नोपायो विद्यते सम्यक् प्रायणं हि सतामहम् ' ह्या श्लोकावर तें भाष्य आहे. ' सत्संगीं लाभणाऱ्या भक्तियोगावांचून प्रायः हरिप्राप्तीचा अन्य उत्कृष्ट मार्ग नाहींच, कारण संतांचा उत्तम

आश्रय ( प्रायणं ) मीच आहें ' असें भगवान् सदर श्लोकांत म्हणतात. यावरील भाष्यांत नाथ म्हणतात:—

**मळा शिंपावया लागूनी । मोट पाट उपाय दोन्ही ।**
**मोटा काढिजे विहिरवणी । बहुत कष्टोनी आति अल्प ॥१५३१॥**
**मोट नाडा बैलजोडी । अखंड झोडितां असुडी ।**
**येतां जातां वोढावोढी । भोय भिजे थोडी भाग एक ॥ १५३२॥**
**तैसा नव्हे सारितेचा पाट । एक वेळ केल्या वाट ।**
**अहर्निशीं घडघडाट । चालती लोट जीवनाचे ॥ १५३४ ॥**

मळा भिजवायला पाणी पाहिजे तें मोट किंवा पाट या दोन उपायांनी आणतात. मोटेच्या पाण्यानें भुई थोडी भिजते व मोट, नाडा, बैलजोडी इ० जमवून फार कष्ट करावे लागतात. सरितेच्या पाटाचें तसें नाहीं, एकदा वाट पाडली कीं पाण्याचे लोट अखंड घडघडाट चालून हवी तेवढी जमीन अल्पायासानें भिजते.

हा दृष्टांत कशासाठीं घेतला आहे ?—

**मोटेचें पाणी तैसें ज्ञान । करूनि वेदशास्त्रपठण ।**
**नित्यानित्यविवेकासी जाण । पंडित विचक्षण बैसती ॥१५३५॥**

पण त्या पंडितांत मतांचा गलबला किती ?—

**एक कर्माकडे ओढी । एक संन्यासाकडे ओढी ।**

कोणी तप, कोणी पुरश्चरण, कोणी वेदाध्ययन, कोणी दान कोणी योग, इ० आपापल्या मतीनें हे सर्व ज्ञानाचें सार सांगतात:–

**ऐसी ज्ञानमार्गाची गती । नानापरीचीं विघ्नें येती ।**
**विकल्पें नासल्या व्युत्पत्ती । माझी निजप्राप्ती तेथ नाहीं ॥१५४२॥**
**तैसी नव्हे माझी भक्ती । नाममात्रें मज पावती ।**

* * * *

गंगेच्या ओघासारखा हरिनामाचा घडघडाड चालतां विघ्नें बापुडीं होऊन जातात.

**एवं निर्विघ्न मजमाजी सरता । मार्ग नाहीं भक्तीपरता ।**
**हें सत्य सत्य गा सर्वथा । भक्ति तत्वता मज पाढियें ॥ १५४७ ॥**

हें जर खरें तर ' अवघेचि भक्ति कां न करिती ? ' उत्तर—

**कोटी जन्मांची पुण्यसंपत्ती । जरी गांठीं असेल आइती ।**
**तें जोडे माझ्या संतांची संगती । सत्संगें भक्ति उल्हासे ॥१५५१**

असो. नाथांच्या या ओव्यांतला हा विषय मनांत भरला असतां, तुकोबांस 'गोदेकाठीं होता आड' हा सूत्ररूप अभंग स्फुरला हें उघड आहे. ग्रंथाध्ययनानें व अन्य साधनांनीं प्राप्त झालेल्या ज्ञानावर मी टोंकून बसलों असतां संतांनीं कृपा करून मला परमात्म्याच्या भक्तिरूप महागंगेत नेऊन सोडलें हें तुकोबांना ह्या अभंगांत सांगावयाचें होतें. ' जीवींच्या जीवना एका जनार्दना ' याप्रमाणें तुकोबांनीं नाथांचा सप्रेम उल्लेख चार दोन ठिकाणीं करून त्यांचें 'वाचारिण' त्यांनीं फेडलें हें त्यांच्या भलाईचेंच द्योतक आहे.

१७ आतां नामदेवांकडे वळूं. नामदेवांचा गाथा व्यवस्थेशीरपणें छापलेला नसल्याकारणानें व नामदेवांचाच अवतार तुकोबा असल्यानें त्यांचा संबंध उताऱ्यांवरून दाखविण्याचें विशेष प्रयोजन नाहीं. ज्या ज्या प्रकरणांवर नामदेवांचे अभंग आहेत बहुधा त्या त्या प्रकरणांवर तुकोबांचे अभंग आहेत. नामदेवांची सगुणभक्ति अत्युत्कट जिव्हाळ्याची आहे, त्यांची मधुरभक्ति पराकाष्ठेची मधुर आहे, या संबंधांत त्यांच्यासारखे तेच आहेत ! नामदेवराय आपल्या घरच्या

---

१ गाथापंचकांत नामदेवांचा गाथा छापला आहे. त्यांत ज्ञानेश्वरनामदेवांच्या समकालीन संतांत नाथांचे पणजे भानुदास यांनाही गोंवलें आहे ( अभंग ५७८ व ९९५ पहा ) हें उघडच चुकीचें आहे. तसेंच नामदेवकृत संतचारित्रांत भानुदास बोधलेबोवा यांचींही चरित्रें दिलीं असून मिराबाईच्या चरित्रांत ' एकनाथाघरीं वाहतसे पाणी ' याही उत्तरकालीन गोष्टीचा समावेश केला आहे ! नामदेवांच्या अभंगांचें चांगलें संशोधन झालें पाहिजे हें उघड आहे.

सगळ्या मंडळीसगट, दासीजनीसगट, पांडुरंगाचे सर्वस्वी झालेले आहेत. त्यांची देवाशीं अर्जुनासारखी सख्यभक्ति आहे. देव त्यांच्या घरच्या मंडळीसारखाच त्यांच्याशीं अहोरात्र खेळणारा, बोलणारा, प्रेमकलह करणारा, त्यांच्या घरचाच होऊन बसलेला आहे. ‘आह्मां सांपडलें वर्म । करूं भागवतधर्म ’ यासाठीं नामदेवांचा अवतार. त्यांच्याशीं ह्म० ह्या कलियुगीन उद्धवाशीं देवाच्या व त्यांच्या ज्या परमप्रेमाच्या गुलगुल गोष्टी होत, ‘अगे तूं माउली संतांची साउली आठवितां घाली प्रेमपान्हा ’ असें हट्टानें ह्मणत देवाशीं ते अतिकोमल लडिवाळपणा करीत व देवही आपलें षड्गुणैश्वर्यत्व विसरून त्यांच्या प्रेमांत मुरून जात तो देवभक्तांचा प्रेमळ कोमळपणा नामदेवांच्या वाणीनेंच ऐकावा. तूं पक्षिणी मी अंडज, तूं कुरंगी मी पाडस, तूं माउली मी तान्हुली, तूं समुद्र मी द्वारका, तूं तुळशी मी मंजरी, तूं कृष्ण मी रुक्मिणी, इ० प्रकारें देवाशीं अलौकिक सलगी नामदेवांनीं केलेली पाहून व नवनीतालाही मृदुपणांत लाजविणारी त्यांची अमृतमधुर वाणी ऐकून पाषाणही उलेल यांत तिळमात्र शंका नाहीं. बाकी सर्व बाबतींत नामदेवांची सुधारून वाढविलेली आवृत्ति ह्मणजे तुकोबा होत ! तुकोबांच्या वाणींत भगवद्भक्ताची, लोकोद्धारक व धर्मप्रवर्तक महंताची जी दिव्यस्फूर्ति, जो ठसकेदारपणा, जी प्रखरता, जें ओज आहे तें कांहीं अलौकिकच आहे. असो आपणांस दोघांची येथें तुलना करायची नाहीं. जे नामदेव तेच तुकोबांच्या रूपानें धर्मकार्यार्थ अवतरले असल्यामुळें नामदेवांचे राहिलेलें मोठें कार्य तुकोबांनीं करून दाखविलें. आतां उभयतांच्या अभंगांत थोडेंसें साम्य पाहूं. ‘ देवावीण ओस स्थळ नाहीं ’ ‘ देवावीण ठाव रिता कोठें आहे, ’ इ० अनेक चरण उभयतांच्या गाथ्यांत सारखेच आढळतात. ‘ पंढरीच्या सुखा । अंतपार नाहीं लेखा ’ असा नामदेवांचा चरण ‘ गोकुळींच्या सुखा अंत-

पार नाहीं लेखा ' अशा रूपानें तुकोबांच्या अभंगांत आला आहे. 'वीतभर पोट लागलेंसे पाठीं ' हा नामदेवांचा अभंग व ' पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ' हा तुकोबांचा अभंग पहा. दोघांचेही लटक्यांचे चार चार अभंग आहेत. ' लटिका मी गाणु लटिका मी नाचणु ' व ' लटिकें माझें ज्ञान लटिकें माझें ध्यान ' असें नामदेव सगळें लटिकेपण भक्तीच्या उत्कटपणानें आपल्याकडे घेतात, व तुकोबा ' लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान । जरी हरिकीर्तन प्रिय नाहीं ' याप्रमाणें लटिकेपण खरोखरीच्या लटिक्यांच्या पदरांत घालतात !

( १ ) आम्ही होतों पंढरीसी । आमची जुनाट मिरासी ॥ १ ॥
राही रखुमाई माता । पांडुरंग आमुचा पिता ॥ ध्रु० ॥
पुंडलीक आमुचा भाई । चंद्रभागा बहिणाई ॥ २ ॥
नामा ह्मणे हो शेवटीं । घर चंद्रभागे कांठीं ॥ ३ ॥
आमची मिरास पंढरी । आमचें घर भीमातीरीं ॥ १ ॥
पांडुरंग आमुचा पिता । रखुमाई आमुची माता ॥ ध्रु० ॥
भाऊ पुंडलीक मुनी । चंद्रभागा आमुची बहिणी ॥ २ ॥
तुका जुनाट मिरासी । ठाव दिला पायांपाशीं ॥ ३ ॥

( २ ) देवा माझे मन करोनी स्वाधीन ।
निमोळी स्वामीपण भोगसी ना ॥ १ ॥
फुकाचा कामारा वोळगे निरंतर ।
न घाली तुज भार कल्पनेचा ॥ २ ॥ नाम०

कामारा=दास, सेवक. निमोळी=मोलावीण, जेथें मोल देऊन सेवक मिळवावे लागत नाहींत तरच फुकटचे सेवक मिळतात असें स्वामीपण. नामदेवरायांचें देवाला सांगणें आहे कीं ' देवा ! माझें मन आपल्या स्वाधीन करून घेऊन तुम्हीं फुकटचें स्वामीपण कां भोगीत नाहीं ? मी बिनपगारी सेवक होऊन तुमची सेवा करण्या-

स उत्सुक आहे.' हाच भाव तुकोबांनीं कसा व्यक्त केला आहे पहा:—

मोल वेंचूनीयां धुंडिती सेवका । आम्हीं तरी फुका मागों बळें १
नसता जवळा हित फार करूं । जीवभाव धरूं तुझ्या पायीं ॥ २ ॥
(३) समर्थाचें बाळ पांघरे वाकळ। हांसती सकळ लोक कोणा
ऐसा तूं अविनाश त्रिभुवनींचा राजा । नामा म्हणे माझा तूंचि स्वामी ॥ ३—नाम०

समर्थाचें बाळ कींविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥१
अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ध्रु०
तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जालों तुझा ॥ २।
(४) 'भोगावरी आम्हीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें'
हा चरण दोघांच्याही एका अभंगाचा प्रथम चरण असून पुढें नामदेवांच्या अभंगाचे २ चरण व तुकोबांच्या अभंगाचे ५ चरण असून ते अगदीं भिन्न आहेत.

(५) 'विठाई माउली वोरसोनी प्रेमपान्हा घाली' हे शब्द-प्रयोग दोघांच्याही अभंगांतून वारंवार सांपडतात.

(६) 'तत्त्व पुसावया गेलों वेदज्ञासी' हा नामदेवांचा अभंग व 'ज्ञानियाचे वरीं चोजावितां देव' हा तुकोबांचा अभंग दोन्ही एकाच अर्थाचे आहेत. वेदज्ञ, शास्त्रज्ञ, पंडित, पुराणिक, इत्यादि सर्व पाहिले पण तुझें प्रेमसुख त्यांजजवळ नाहीं म्हणून तुझेच पाय चित्तांत व नाम मुखांत धरिलें आहे असा दोघांनींही आपापला अनुभव या अभंगांतून सांगितला आहे.

१८ उत्तरहिंदुस्तानांतील संतकवींपैकीं कबीरांच्या दोहऱ्यांशीं तुकोबांचा बराच परिचय होता हें त्यांनीं स्वतः कांहीं दोहरे केले आहेत यावरून व कांहीं अंतः प्रमाणांवरूनही दिसतें:—

(१) 'जग अमंगळ' ह्या अभंगांत तुकोबा म्हणतातः—

धर्म भूताची ते दया। संत कारण ऐसिया ॥ २ ॥
नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगे संत ॥ ३ ॥

'भूतांची दया हाच धर्म होय' हें त्यांनीं संताच्या वचनाची साक्ष ठेवून म्ह० 'दया धरमका मूल है' ह्या कबीरांच्या वाक्याधारें ह्मटलें आहे.

( २ ) खांड खेलौना दोन्ही, खांड खेलौना एक ।
तैसेही सबजग देखिये किये कबीर विवेक ।

---

खडा रवाळी साखर । जाला नामाचाचि फेर ।
न दिसे अंतर । गोडी ठायीं निवाडितां ॥ १ ॥

खांड म्ह० साखर व खेलौना म्ह० साखरेचें चित्र हीं एकच आहेत.

( ३ ) कामिकका गुरु काम है लोभीका गुरु दाम ।
कबीरका गुरु संत हे संतनका गुरु राम ॥ १ ॥
लोभीके चित धन बैठे कामिनीचित काम ।
माताके चित पुत बैठे तुकाके मन राम ॥ २ ॥

( ४ ) प्रऱ्हादने पिता तजे भरतने अपनी माय ।
बिभीसनने भाई त्यजे श्रीरामके कार्य ॥ ३ ॥

नारायणीं जेणें घडे अंतराय हो कां बापमाय त्यजावीं तीं १।
प्रऱ्हादें जनक बिभीषणें बंधु राज्य माता निंद्यु भरतें केली ॥३।

तुकोबांच्या वेळीं कबीरांची ख्याति भरतखंडभर झाली होती. कबीर ( शके १३६२–१४४० ) व तुकोबा यांत शंभर सवाशें वर्षांचें अंतर होतें. तुकोबा एकवार काशीसही गेले होते (मागें पृ० ९५ पहा ) तेथें कबीरांची कविता त्यांच्या ऐकण्यांत व पाहण्यांत आली असावी.

१९ तुकोबांचे टिपऱ्याच्या खेळावर जे सात अभंग आहेत त्यांत एक अभंग आहे. त्यांत 'खेळ खेळोनियां निराळे' राहिलेल्या–प्रपंचाच्या डावांत न सांपडलेल्या चार प्रमुख खेळियांचें त्यांनीं

वर्णन दिलें आहे. ते चार खेळिये म्ह० नामदेव, ज्ञानेश्वर (व त्यांचें मंडळ ), कबीर व एकनाथ हे होत. तुकोबारायांचे विशेष आवडते व ते गुरुस्थानीं मानीत असलेले हे चार खेळिये होत.

(१) शिंपियाचा पोर एक खेळिया नामा तेणें विठ्ठल बसवंत केला रे।
एकघाई खेळतां तो न चुकेचि कोठें तया संत जन मानवले रे।
(२) ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा सोपान आनंदें खेळती रे।
कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला आपण भोंवतीं नाचती रे।
सकळिकां मिळोनि एकचि घाई त्यांच्या ब्रह्मादिक लागती पायां रे
(३) रामा बसवंत कबीर खेळिया जोडा बरवा मिळाला रे ।
(४) ब्राह्मणाचें पोर एक खेळिया एका भला तेणें जन खेळकर केला रे
जनार्दन बसवंत करूनियां तेणें वैष्णवांचा मेळ मेळविला रे।
एकाचि घाई खेळतां खेळतां आपणचि बसवंत झाला रे ॥४॥

प्रत्येक खेळियाचा एकेक बसवंत म्ह० उपास्य होतें. ह्या चौघांशिवाय 'आणिक खेळिये होऊनियां गेले वर्णावया वाचा मज नाहीं रे । ' पण ' या चौघांची तरी धरि सोई रे ' म्ह० नामदेव, ज्ञानेश्वर, कबीर व एकनाथ ह्या चौघांच्या तरी मार्गाला लागा म्हणून त्यांनीं आपल्या श्रोत्यांना सांगितलें आहे. या खेळियाचें ध्रुवपदः—

एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकासिल भाई रे
त्रिगुणांचे फेरीं तुं थोर कष्टी होसी या चौघांचि तरि धरि सोई रे।

ऐक्यभावानें तूं खेळ खेळूं लागलास तर या प्रपंचाच्या डावांत सांपडणार नाहींस पण द्वैतभाव धरशील (दुचाळा म्ह० कात्री, चिमटा ) तर फसशील. त्रिगुणांचे कष्ट चुकवायचे असतील तर या चार खेळियांचा आश्रय धर, यांच्या मार्गानें जा. ज्यांच्या मार्गानें जाण्यास ते जनतेस सांगतात त्यांच्याविषयीं त्यांचा विशेष प्रेमादर होता हें उघड आहे, व त्या प्रेमादरामुळें त्यांनीं त्यांच्या ग्रंथांचें कसे बारकाईनें परिशीलन केलें होतें हें आपण येथवर पाहिलेंच आहे.

२० भागवतधर्मपरंपरेंतील प्राचीन व अर्वाचीन साधुसंतांच्या ज्या कथा तुकोबांनीं वाचल्या आणि कीर्तनपुराणांतून व संत-मुखांनीं ऐकल्या त्यांचा तुकोबांच्या मनावर फार मोठा संस्कार झाला. त्यांचे सिद्धांत दृढ झाले, विचार स्थिरावले, हरिप्रेम अपरंपार वाढलें व त्यांच्या रहाणीचें स्वरूप निश्चित झालें. संतकथा-श्रवणानें त्यांचें भक्तिबळ वाढलें व 'निर्मळ निश्चळ विठ्ठलीं विश्वास' बसण्यास त्यांचा उपयोग झाला. संतांचें त्यांना पाठबळ मिळालें. संत-कथा ह्या कामधेनूंसारख्या इष्टलाभ देतात, त्या उत्कट भगवत्प्रेम बळा-वतात, सन्मार्ग दाखवितात, निश्चयाचें बळ देतात व सिद्धांत पट-वितात. संतकथांतून तुकोबांनीं इष्ट तें तें वर्म काढून घेऊन स्वतःची कमाई केली. शीलवंत, साक्षात्कारी व धर्मनीतिप्रवण अशा संतसज्ज-नांच्या चारित्रांतून आत्महिताचीं कोणकोणतीं रहस्यें तुकोबांनीं घेतलीं हें आपण एकवार त्यांच्याच तोंडून ऐकूं:—

**( १ ) मानी भक्तीचे उपकार। ऋणिया ह्मणवी निरंतर ॥**

देव भावभक्तीला भुललेला असल्यामुळें भक्तांचा ऋणी (अंकित) होतो हें तत्त्व अंबरीष, बळी, अर्जुन व पुंडलीक यांच्या उदाहरणां-वरून ह्या अभंगांत सिद्ध केलें आहे. अंबरीषासाठीं दहा जन्म घेऊन 'दास्य करी दासांचें' हें भक्तीचें महिमान देवानें जगाला दाखविलें आहे. भक्तीचे उपकार फेडण्यासाठीं तो 'रक्षपाळ बळिद्वारीं' राहिला, अर्जुनाचे रथवारु वागवून त्याच्या मागें मागें हिंडला व पुंडलीकाचे द्वारीं तर २८ युगें उभाच राहिला आहे.

( २ ) **कनवाळू कृपाळू** देव भक्तांच्या कैवारानें त्यांच्यासाठीं हवे ते कष्ट सोसतो, हें अंबरीष व प्रऱ्हाद यांच्या चरित्रांत व द्रौपदीवस्त्रहरण, दुर्वासकृत धर्मछल इ. प्रसंगीं देवानें दाखविलें आहे.

**( ३ ) हरिजनांची कोणा न घडावी निंदा।** साहत गोविंदा

नाहीं त्याचें ॥ देव भक्तांविषयीं इतका कोमल असतो कीं त्याला स्वतःची निंदा सोसवते, पण भक्तछल वा भक्तनिंदा सोसवत नाहीं:—

दुर्वास हा छळों आला अंबऋषी।सुदर्शन त्यासी जाळित फिरे॥३॥
द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांति।होऊनि श्रीपती साह्य केली ॥४॥
न साहेचि बभ्रू पांडवा पारिखा । घुडाविला सखा बळिभद्र ॥ ५ ॥
तुका ह्मणे अंगीं राखिली दुर्गंधी । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रा॥६॥

त्यानें अंबरीष व द्रौपदी यांच्या छळाबद्दल दुर्वास व कौरव यांचीं हाडें मोकळीं केलीं, पांडवांचें शत्रुत्व करणारा त्रिकांड्या बभ्रू देवास सहन झाला नाहीं व पांडवांच्या विरुद्ध असलेल्या बळराम-बंधूसही देवांनीं पृथ्वीप्रदक्षिणेस लावून दिलें. अश्वत्थाम्यानें छापा घालून पांडवपुत्र मारले म्हणून देवांनीं त्याच्या मस्तकीं सदैव दुर्गंधी ठेवली. असें देवाचें भक्तप्रेम अलौकिक आहे ह्मणून त्याची भक्ति करा व देव आपुलासा करा.

( ४ ) शुकसनकादिकीं उभारिला बाहो—देव भक्तप्रेमाचा लोभी आहे हें मीच म्हणतों असें नाहीं, मोठमोठे बाहू उभारून हेंच सांगत आहेत. 'परिक्षिती लाहो सातां दिसां–' आणखी 'त्वरा झाली गरुडा टाकियलें मागें। द्रौपदीच्या लागें नारायणें॥१॥ भक्ताची हाक ऐकतांच 'प्रेमाची आवडी लोभा पूर' येऊन देव फार तांतडी करितात. म्हणून बा मना । त्वरा कर.

उठाउठी करीं स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥
(५) ऐका महिमा आवडीची । बोरें खाय भिल्लटीचीं ॥ १ ॥
थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥ ध्रु० ॥
पोहे सुदामदेवाचे । फके मारी कोरडेच ॥ २ ॥
न ह्मणे उच्छिष्ट अथवा थोडे । तुका ह्मणे भक्तीपुढें ॥ ३ ॥

( ६ ) प्रऱ्हादकथा मनांत येऊन तुकोबा विचारतातः—

हांकेसरसी उडी । घालोनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ २ ॥

(७) अडलिया जनांचा साह्यकारी एक देवच आहे:—

आडिले पीडिले गांजिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी देवराणा॥ २
प्रऱ्हाद महा संकटीं रक्षिला । तुह्मीं आपंगिला नानापरी ॥ ३ ॥

(८) माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव तो सांगतांना पुराणांतील अनेक भक्तकथांवर लक्ष ठेविलें आहे:—

मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवाराावे ॥ ३
योगक्षेम त्याचे जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ४
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पहावें पुराणीं विचारूनी ॥५

(९) देवानें ज्यांचा अंगीकार केला ते जगदृष्टीनें पूर्वी निंद्य असले तरी वंद्यच झाले आहेत:—

अंगीकार ज्यांचा केला नारायणें । निंद्य तेही तेणें वंद्य केले ॥ १
अजामेळ भिल्लो तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥ ध्रु०
ब्रह्महत्याराशी पातकें अपार । वाल्मीक किंकर वंद्य केला ॥ २
तुका म्हणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥ ३

देवाचा भक्त तोच खरा वंद्य व तोच खरा थोर. देवानें अंगीकार करणें हेंच वंद्यपणाचें बीज आहे. ' माझिये भक्तीवीण । जळो तें जियालेपण ( जीवित ) ' असें ज्ञानोबाही म्हणतात. अंतःकरण हरिप्रेमानें भरलें नाहीं, तर कुळ, जाति, वर्ण, रूप, विद्या इ० हे असून तरी काय उपयोगाचे ? उलट हे दंभाला कारण होतात. अजामीळ, कुंटणी व वाल्मीकि यांचें पूर्वाचरण व शबरीची जाति पूर्वी निंद्य असून नारायणानें याचा अंगीकार केल्यामुळेंच हे जगाला वंद्य झाले आहेत.

( १० ) **तुज करितां न्हे ऐसें कांहीं नाहीं!** मनुष्याच्या दृष्टीनें पसंत नापसंत याला कांहीं किंमत नाहीं, देवाला जें पसंत

तें शुभ, तें वंद्य, तेंच उत्तम असा देवाचा कायदा तुकोबा देवालाच सांगतांना प्रेमाच्या धिटाईनें ह्मणतातः—

**सोळा सहस्रनारी ब्रह्मचारी कैसा? निराहारी दुर्वासा नवल नोहे ३
पंच भ्रतार द्रौपदी ते सती। करितां पितृशांति पुण्य धर्मा ॥ ४ ॥
दशरथा पातकें ब्रह्महत्याराशी । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा॥५
मुनेश्वरा नाहीं दोष अणुमात्र । भांडवितां स्तोत्रवंद्य होती ॥ ६ ॥**

श्रीकृष्णनाथ सोळाहजार नारी भोगून पुन्हा ब्रह्मचारी, दुर्वास साठ खंड्या अन्न खाऊन पुन्हा निराहारी, द्रौपदीला पांच भ्रतार असून पुन्हां ती सती, भीष्मद्रोणादिकांचा रणांगणांत वध केला असून पुन्हा धर्मराज पुण्यशीलच, श्रावणवधाचें पातक करणाऱ्या दशरथाच्या पोटीं रामरायाचा जन्म, वसिष्ठविश्वामित्र हे आपापसांत भांडणारे असून पुन्हा वंद्य मुनीश्वरच ! ह्या कथांचें वर्म तुकोबा सांगतातः-

**अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा ॥ ध्रु०**

नीतिशास्त्रें जगाची राहाटी नीट चालावी ह्मणून कांहीं नीतीचे नियम बांधतात, पण अखेरचा न्याय पाहतां देवाच्या हातींच सर्व सूत्र आहे! ही व्यक्ति किंवा हें कर्म श्रेष्ठ व वंद्य असा देवानें त्याच्यावर शिक्का मारला म्हणजे तें नाणें जगांत चालतें! देवाच्या दरबारचा हुकूम जगाला मान्य होतो.

( ११ ) देवानीं गीतेंत स्वमुखानें ‘ सर्व धर्मान्परित्यज मामेकं शरणं व्रज । अहं त्वा सर्वपापेभ्योऽमोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ’ असें म्हटलें आहे. हें सर्व धर्मांचें सार आहे. हरिशरणागति हाच आणि हा एकच मार्ग सर्व शुभाशुभ कर्मबंधांपासून मुक्त होण्याचा आहे. ‘ **मागे शरणागत तारिले बहुत** ’ ते तरी तारतांना ‘ पाहिले अपराध नाहीं यातिकुळ ! ’ अनन्यता एवढाच गुण देव पाहतो, तो यातिकुळाचा किंवा भक्तांच्या पूर्वाचरित्राचाही विचार करीत नाहीं. अनन्यप्रेमाच्या गंगेंत सर्व शुभाशुभकर्में शुभच होऊन

जातात. देव पूर्वींच्या पापांची क्षमा करितो व अनन्यता झाल्यावर पापकर्में होतच नाहींत ह्मणून भक्त सहज कर्मबंधांपासून मुक्त होतो. अजामेळ, गणिका, भिल्ली, ध्रुव, उपमन्यु, गजेंद्र पशु, प्रल्हाद, पांडव इत्यादि सर्व भक्त देवानें त्यांच्या अपराधांचा किंवा जाति-कुळांचा विचार न करितां तारले आहेत.

प्रल्हाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ५
पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ ६
तुका म्हणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनिया मात शरण आलों ७

(१२) भक्तही देवाचें अखंड स्मरण कसें करतात पहा:—

पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥ १
प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥ २
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥ ३
तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर झाले तरी ॥ ४

(१३) देव भक्तांवर दुःखाचे डोंगर आणतो, त्यांच्या संसाराचें वाटोळें करून म्ह० संसारपाशांतून त्यांना पूर्ण सोडवितो. 'विपदः सन्तु नः शश्वद्यासु संकीर्त्यते हरिः' या कुंतीच्या वचनाचाच अनुवाद '**हरि तूं निष्ठुर निर्गुण**' या अभंगांत करून तुकोबांनीं हरिश्चंद्र, नळ, शिबी, कर्ण, बळी, श्रियाळ यांचीं सुप्रसिद्ध पण हृदयद्रावक उदाहरणें दिलीं आहेत. 'तुज भावें जे भजति । त्यांच्या संसारा हे गति !' पण भक्त बहाद्दर खरे, अनन्य शरणागतीचें वर्म ते रेसभर सोडीत नाहींत. म्हणूनच—

(१४) **वैष्णवांची कीर्ति गाइली पुराणीं:—**

**आदिनाथ शंकर नारद मुनीश्वर । शुकापेसा थोर आणिक नाहीं ॥ ३**
**तुका म्हणे मुकुटमणि हरिभक्ति । आणिक विश्रांति आरतीया ॥ ४**

आर्तांची विश्रांति अशी हरिभक्ति ही सर्वश्रेष्ठ आहे.

(१५) **नारायणीं जेणें पडे अंतराय-** त्या मातापितरांचा

सुद्धां देवासाठीं भक्त त्याग करितात मग स्त्रीपुत्रधनमानांची त्यापुढें किंमत आहे काय? प्र्ल्हादानें जनकाचा, बिभीषणानें बंधूचा व भरतानें मातेचा आणि राज्याचा देवासाठीं त्याग केल्याचें प्रसिद्धच आहे. देवाचे भक्त असे त्यागी, विरक्त व एकनिष्ठ असतात.

**( १६ ) न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥**

हें सिद्ध करण्यासाठीं वामनावतारांतील बळीचें, ऋषिपत्न्यांचें व गोपींचें अशीं भागवतांतलीं तीन मार्मिक उदाहरणें तुकोबांनीं दिलीं आहेत:—

**आड आला म्हूण फोडियेला डोळा । बळीनें आंधळा शुक्र केला ।**
**उल्लंघूनियां त्या भ्रतारांची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या ॥**
**गौळणी करिती देवासीं व्यभिचार । सांडूनि आचार भ्रष्ट तोही ।**

विधिनियम, शास्त्राचार किंवा नीतिबंधनें सर्वथा पाळलीं पाहिजेत हें काय तुकोबांस माहीत नव्हतें? त्यांनीं तर हीं बंधनें तोडणाऱ्या दांभिक खोट्या खळांवर कडक प्रहार केले आहेत! विषयसुखासाठीं कोणी निर्बंध तोडील तर त्यांना अधोगति आहे, पण 'सतां गतिः' अशा परमात्म्याच्या प्राप्तीसाठीं सर्वस्वाची[1] होळी करायचीच तयारी पाहिजे हा भक्तिशास्त्राचा सिद्धांत आहे. धर्माधर्माच्या भक्तिशास्त्रदृष्ट्या व्याख्या तुकोबा सांगतातः—

---

१ ख्रिस्तीधर्मशास्त्र जें बायबल त्यांतही हेंच तत्व सांगितलें आहे. "कोणीही मनुष्य मजकडे येईल आणि आपल्या बापाचा, आईचा, बायकामुलांचा बंधुभगिनींचा व स्वतःच्या नरदेहाचाही द्वेष ह्म० त्याग करणार नाहीं तर तो माझा शिष्य ( भक्त ) होण्यास पात्र नाहीं." ( ल्यूक १५ ) "जो कोणी आपल्या आईवर, बापावर, बायकोवर किंवा मुलांवर माझ्यावरच्या प्रेमापेक्षां अधिक प्रेम करील तो माझा भक्त नव्हे" ( मॅथ्यू ११ )

देव जोडे तें करावें अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ॥ १० ॥
तुका ह्मणे हा तो जाणतो कळवळा । ह्मणोनि अजामेळा उद्धरिलें

बळी, ऋषिपत्न्या व गोपी यांच्या भक्तीला देव भुलला, यांच्या एकनिष्ठ प्रेमाला देव भुलला व 'देव जोडे ते अधर्म' त्यांच्या ह्यातून घडले तरी त्यांजवर प्रसन्न होऊनः—

तयांसीं दिलें तें कवणांसी नाहीं ।

असें त्यांना काय एवढें घबाड दिलें ?

अवघा अंतर्बाहीं तोचि झाला! ॥ ९ ॥

( १७ ) हरिप्राप्तीचें मुख्य साधन जें नामस्मरण त्यानें असंख्य भक्त तरल्याचीं उदाहरणें तुकोबांनीं अनेक अभंगांत दिलीं आहेत. '**नाम ह्मणतां**' या अभंगांत केवळ नामबळानें तरलेल्या उपमन्यु, गणिका वेश्या व प्रल्हाद यांचीं उदाहरणें दिलीं असून '**नामाचे पवाडे गर्जती पुराणें**' या अभंगांत सर्वश्रेष्ठ असें शंकर, अखिल भक्तगुरु नारद, महाकवि वाल्मीकि व सात दिवसांत हरि-गुणनामसंकीर्तनानें उद्धरिलेला परिक्षिती अशीं त्यांनीं चार ठळक उदाहरणें दिलीं आहेत.

(१८) भक्तकरुणा बहु तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें
पक्षियासी तुझें नाम जें ठेविलें । तये उद्धारिलें गणिकेसी ॥धृ०॥
कुंटिणी ते दोष बहु आचरली । नाम घेतां आली करुणा तुज २
तुका ह्मणे सीमा नाहीं तुझे दये । कोमल ह्रदय पांडुरंगा ॥३॥

( १९ ) जननिया बाळकारे या पाळण्यांत काळबागुलाला भ्यालेल्या जीवांच्या हांकेबरोबर नारायण कसा धांवत येतो हें जनक, सिभ्रीया ह्म० राजा शिबी, गणिका, अजामेळ इ० उदाहरणें देऊन सांगितलें आहे.

(२०) भाविकांचें काज अंगें देव करी । काढी धर्मांघरीं उच्छिष्ट तें
उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं । आवडी तयांची मोठी देवा

काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ।२
अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥ ३॥
तुका म्हणे ऐसीं आवडती लाडिबाळें । जाणेवेचें काळें तोंड देवा

ह्या पुराणांतर्गत भक्तकथांप्रमाणेंच अर्वाचीन काळांत होऊन गेलेल्या भक्तभागवतांच्या व प्रेमळांच्या कथांचेंही तुकोबांना अत्यंत प्रेम होतें व त्यांच्या चरित्रांवरूनही तुकोबांनीं नामस्मरणभक्तीच सर्व साधनांवरिष्ठ आहे हें सार काढलें. महाराष्ट्रांत त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या अनेक संतभक्तांबद्दल त्यांनीं वारंवार प्रेमोद्गार काढले आहेत. अशा बहुतेक भक्तांचीं नांवें ' मंगलाचरणांत ' घेतलेल्या १२ व्या अभंगांत ' मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवित ओवियेसी ' असें प्रेमानें ह्मणून त्यांनीं सांगितलीं आहेत.

( २१ ) पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती ॥ १ ॥ वर्णाभिमानानें कोणी पावन झाले नाहींत व साधुसंत कनिष्ठ मानलेल्या जातींतही झाले आहेत.

अंत्यजादि योनी तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाट झालीं।
वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास॥५
कबीर मोमीन लतिफ मुसलमान॥ सेना न्हावी जाण विष्णुदास६
कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादू । भजनीं अभेदु हरिचे पायीं ॥७
चोखामेळा बंका जातीचा महार । त्याशीं सर्वेश्वर ऐक्य करी ॥८
नामयाची जनी कोण तिचा भाव।जेवी पंढरिराव तियेसवें ॥९॥
मैराळा जनक कोण कूळ त्याचें। माहिमान तयाचें काय सांगों ।१०

तात्पर्य काय कीं:—

यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥११
तुका म्हणे तुह्मीं विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ।१२॥

( २२ ) देव भावाचा भुकेला आहे, उंचनीच हे भेदाभेद तो पाहत नाहीं:—

उंच निंच कांहीं नेणे हा भगवंत । तिष्ठे भाव भक्ति देखोनियां ।१

दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरीं रक्षी प्रल्हादासी ॥१॥
चर्म रंगूं लागे रोहिदासासंगीं । कबिराचे मार्गीं विणी शेले ॥ २ ॥
सजनकसाया विकूं लागे मांस । मळा सावत्यास खुरपूं लागे ॥३॥
नरहरि सोनारा घडूं फुंकूं लागे । चोख्यामेळ्यासंगें ढोरें ओढी ।४।
नामयाची जनी सवें वेंची शेणी । धर्माघरीं पाणी वाहे झाडी ॥ ५॥
नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगें ओढी ६
अर्जुनाचीं घोडीं हाकी हा सारथी । भक्षी पोहे प्रीती सुदाम्याचे ।
गौळियांचे घरीं अंगें गाई वळी । द्वारपाळ बळिद्वारीं झाला ॥ ८ ।
ऐकोबाचें ऋण फेडी हृषिकेशी । अंबरिषाचे सोशी गर्भवास ॥९॥
मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥१०
घडी माती वाहे गोऱ्याकुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥११
पुंडलिकासाठीं आजूनि तिष्ठत । तुका ह्मणे मात धन्य त्याची ।१२।

( २३ ) भक्तऋणी देव बोलती पुराणें. देव भक्तांचा ऋणी आहे हें पुराणांचें वचन खरें आहे असें सांगून तुकोबांनीं कबीर, नामदेव, एकनाथ व भानुदास यांचीं उदाहरणें दिलीं आहेत.

मागें काय जाणों आइकिली वार्ता ।
कबीर सातें जातां घडिया वांटी ॥ २ ॥
माघारिया धन आणिलें घरासी ।
ने घे केला त्यासी त्याग तेणें ॥ ३ ॥

कबीर एक विणलेलें सणंग घेऊन बाजारांत जात असतांना त्यांनीं अर्धें सणंग एका दीन याचकास दिलें व अर्धें ब्राह्मणवेषधारी देवास दिलें. देवानें त्याची किंमत आणून कबीरास दिली, पण कबीरानें ती घेतली नाहीं.

नामदेवाचिया घरासी आणिलें । तेणें लुटाविलें द्विजा हातीं ॥ ४ ॥

नामदेवानें आपल्या जवळचें कापड वाटेंतल्या धोंड्यांना ते देव असें भावून वाटून टाकलें तेव्हांही असाच प्रकार झाला.

**प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण । एकोबाचें ऋण फेडियेलें ॥ ५ ॥**

एकनाथानें आळंदीस तीन महिने वारकरी भक्तांना पोसून ऋण केलेलें देवानें फेडलेली गोष्ट तर ताजी आहे ना ?

**बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ६ ॥**

भानुदासांनीं जवळचें पेरणीचें बीं दळून संतांस भोजन घातलें तेव्हां देवांना स्वतः त्याच्या शेताची पेरणी करावी लागली.

( २४ ) भक्तांचीं जगांत ख्याति होऊन त्यांच्या द्वारें जड जन उद्धारावे म्हणून देवानें अनेक चमत्कार केले आहेत व भक्तांचीं कामें केलीं आहेतः—

**फिरविलें देऊळ जगामाजी ख्याती । नामदेवा हातीं दूध प्याला॥१**
**...रियेली हुंडी नरसी मेहत्याचीं । धनाजी जाटाचीं शेतें पेरी ॥धु०**
**मीराबाईसाठीं घेतो विषप्याला । लाख्या कोलाट्याला ढोल पिटी**
**कबीराचे मागीं विणूं लागे सेले । उठविलें मूल कुंभाराचें ॥ ३ ॥**
**आतां तुह्मी दया करा पंढरिराया । तुका विनवी पायां वेळोवेळां ४**

२१ हें प्रकरण बरेंच लांबलें आहे, पण तुकोबांच्या अध्ययनाचें सर्व बाजूंनीं यथार्थ स्वरूप सर्वांच्या लक्ष्यांत यावें यासाठीं याचा एवढा विचार केला आहे. यावरून जुन्या व नव्या विचारांच्या कित्येक लोकांना आपलीं मतें बदलावीं लागतील. तुकोबांना ग्रंथवाचनाचें कारण नव्हतें, त्यांनीं ग्रंथ वाचले नाहींत व त्यांना लिहितां वाचतांही येत नव्हतें ही कित्येक जुन्या लोकांची भोळी समजूत चुकीची आहे हें यावरून स्पष्ट होतें. तुकोबांना लिहितां वाचतां येत होतें इतकेंच काय, पण त्यांनीं गीताभागवतादि संस्कृत व ज्ञानेश्वरी-नाथभागवतादि प्राकृत ग्रंथ अत्यंत आस्थेनें, सूक्ष्मपणानें चांगले अभ्यासिले होते, निवडक ग्रंथांचेंच पण पाठपाठांतर चांगलें केलें होतें, भागवतासारख्या ग्रंथाचा वाचतां वाचतां भावार्थ कळण्याइतपत संस्कृतही चांगलें येत होतें याविषयीं हें प्रकरण वाचल्यावर कोणा-

सही संशय राहूं नये असें मला वाटतें. ' पाहिलीं पुराणें । धांडोळलीं दरुशनें ' ह्या त्यांच्याच उद्गारावरून त्यांचें अध्ययन किती उच्च दर्जाचें होतें हें दिसतें. त्या मागच्या काळांतही तुकोबासारख्या शूद्राला इतकें अध्ययन करावयाची समाजांत सवड असतांना व तुकोबासारखे प्रज्ञावंत साक्षेपी त्याचा पूर्ण फायदा घेत असतांना हिंदुसमाजानें स्त्रीशूद्रादिकांना बुद्धिपुरःसर अज्ञानांत ठवलें ही कित्येकांनीं जी ओरड चालविली आहे ती व्यर्थ आहे हें उघड आहे* त्याचप्रमाणें तुकोबांची शिष्यीण बहिणाबाई, समर्थांच्या शिष्यिणी आक्का व वेणू, आणि ज्ञानेश्वरकालीन मुक्ताबाई व जनाबाई (व त्यानंतर मिराबाई) यांचें शिक्षण अध्ययन व ग्रंथकर्तृत्व हें पाहिलें असता समाजानें स्त्रीवर्गाच्या उन्नतीकडे दुर्लक्ष केलें हें म्हणणेंही दुराग्रहाचें ठरतें. वाहत्या ज्ञानगंगेंतलें पाणी पिऊन तृप्त होण्याचा सर्वकाळीं सर्वांस अधिकार आहे, पण ज्ञानगंगोदक पिण्याची आवड, सवड व निवड सर्वांसच असते असें नाहीं त्यामुळें ब्राह्मणांत काय किंवा इतर जातींत काय अविद्येचा प्रभाव अधिक पडलेला सर्वत्र दिसत असतो. असो.

तुकोबांच्या शिक्षणाविषयीं जुन्या लोकांची भोळी कल्पना जशी चुकलेली आहे त्याप्रमाणेंच तुकोबांना ज्ञानेश्वरनाथापासून फोडण्याचा जो प्रयत्न कित्येक अर्वाचीन पंडित करित असतात

---

* तुकोबांच्या पूर्वी झ० शके १४८६ मध्यें शिंगणापूरचा कवि महालिंग दास यानें ' विक्रमबत्तिशी ' नामक एक मोठा ओवबिद्ध ग्रंथ रचिलेला मल. २० वर्षांमागें उपलब्ध झाला होता. तसेच शके १६२० मध्यें अवचितसुत काशी यानें ' द्रौपदीस्वयंवर ' नामक २५ प्रसंगांचा सुंदर ग्रंथ लिहिलेला प्रसिद्ध आहे. हे दोनही कवी अस्सल मराठावर्गांतील होत. शिवराजासही लिहितां वाचतां येत होतें. या सर्व पुराव्यावरून ब्राह्मणांशिवाय इतर जातींतही विद्यावंत पुरुष होते हें उघड आहे.

तेंहीं गैरवाजवी आहे. ज्ञानेश्वरनाथांच्या वाङ्मयतरंगिणींत तुकोबा किती आवडीनें बुडया मारीत, व त्यांतून त्यांनीं किती तरी विचाररत्नें हस्तगत करून घेतलीं हें आपण पाहिलेंच आहे. कोणीही ग्रंथकार आपल्या पूर्वजांचें ऐश्वर्य नीट संभाळून त्यांत शक्य तितकी भर टाकतो. यांत कोणत्याच प्रकारचा कोणाला कमीपणा नाहीं. बाप—आजांनीं मिळविलेली संपत्ति आपल्या ताब्यांत घेऊन तिचा उपभोग घेणें व आपल्या पराक्रमानें तिचें संवर्धन करणें हें सत्पुत्राचें कर्तव्यच आहे. ज्ञानोबांनीं व्यासांची गीता घेऊन तिच्यावर आपल्या प्रतिभेचीं लेणीं चढविलीं, नाथांनीं ज्ञानेश्वरी व भागवत पचवून त्यांच्या आधारें आपली वाणी रंगविली, तुकोबांनीं ज्ञानेश्वरनाथांनीं निर्माण केलेल्या रत्नांच्या खाणींची मालकी मिळविली व त्यांतून आपल्या अभंगाचे हिरे पाडून त्यांच्या प्रभेनें साऱ्या जगाला थक्क केलें ! हा क्रम अनादि चालत आलेला आहे, व एवढ्या विजयवीर्यशाली पूर्वजांच्या कुळांत आपण जन्मास आलों याबद्दल सर्व महाराष्ट्रीयांस धन्यताच वाटली पाहिजे व वाटतेही. पण नामदेवतुकोबांना ज्ञानेश्वरनाथांपासून फोडण्याची जी कांहीं लोकांची धडपड चालली आहे ती पाहून चमत्कार वाटतो. पांडुरंगाच्या कानांतील ' ज्ञानदेव नामदेव एका तुका ' ही मोत्यांची चवकडी सर्वजनमान्य, सर्वप्रिय व सर्वपूज्य आहे, ही कोणालाही फोडतां येणार नाहीं. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे सकलसंतांचे मुकुटमणि आहेत, ज्ञानेश्वरीमाउलीचें दूध पिऊन बहुतेकांनीं आपलें अध्यात्मबळ वाढविलें आहे. ज्ञानेश्वरांचे शिष्य विसोबा खेचर हे नामदेवांचे गुरु होत, अ० ज्ञानेश्वर हे नामदेवांचे परमगुरु होत.

१ मी सटीप तयार केलेल्या व निर्णयसागर प्रेसनें छापलेल्या ' एकनाथी भागवत ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत नाथांनीं ज्ञानेश्वरी कशी पचविली होती, हें दिलें आहे.

पंधराव्या शतकांत एक दुसरे नामदेव झाले आहेत व त्यांनीं महाभारतावर कांहीं ओवीबद्ध पर्वें किंवा अभंग व संतचरित्रें वगैरे लिहिलीं असून त्यांच्या कवितेचा मूळ नामदेवांच्या कवितेशीं गोंधळ झालेला गाथा छापला आहे हे खरें आहे; तथापि ज्ञानेश्वर-समकालीन नामदेव हेच सर्वसंतमान्य आहेत यांत शंका नाहीं. ज्ञानेश्वर, नामदेव व एकनाथ यांच परंपरेंत तुकोबा येताहेत. ज्ञानेश्वरी व नाथभागवत ह्या ग्रंथांशीं तुकोबांचा किती अंतरंगपरिचय होता हें आपण पाहिलेंच आहे, तेव्हां त्यांच्या मधून तुकोबांना फोडणें हें कोणालाही शक्य नाहीं. नामदेव व तुकाराम यांनींच भक्तिपंथ काढला व त्याच्याशीं ज्ञानेश्वरएकनाथांचा कांहीं संबंध नाहीं हें त्रिखंडपंडितांचेंही मत गडगच्च पुराव्यांपुढें क्षणभरही टिकणारें नाहीं.

हा भागवतसंप्रदाय फार प्राचीन आहे, ज्ञानेश्वरांच्याही फार पूर्वींचा आहे; त्याचे महाराष्ट्रांतले मुख्य प्रसारक ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम हे आहेत. भागवतधर्माची श्रेष्ठ व्यक्तींच्या ठिकाणीं निष्ठा आहे पण हा व्यक्तिनिष्ठ नाहीं, हा श्रीकृष्णोपासकांचा संप्रदाय आहे. श्रीकृष्णाची, पांडुरंगाची उपासना हा याचा परमधर्म आहे. जो कोणी परम कृष्णभक्त असेल त्याला या संप्रदायांत मान आहे, त्याची जातगोत कोणी पुसत नाहीं. ज्ञानेश्वरनाथ हे केवळ ब्राह्मण म्हणून मान्य नाहींत, तर परम कृष्णभक्त ह्मणून मान्य आहेत. नामदेव आणि तुकाराम हेही परम कृष्णभक्त ह्मणून तसेच मान्य आहेत. भागवतसंप्रदायांत जातीचें बंड नाहीं व जातिद्वेष व जातिसंकरही नाहीं. वरील चार प्रमुख महंतांप्रमाणेंच हा संप्रदाय नरहरी सोनार, रोहिदास चांभार, सजन कसाई, सूरदास, कबीर, वेश्या कान्हूपात्रा, चोखामेळा महार, भानुदास, कान्हू पाठक, मिराबाई, गोरा कुंभार, दादू पिंजारी, शेखमहंमद, मुक्ताबाई व जनाबाई, बेदरचा कारभारी दामाजी, दौलताबादचे किल्ले-

दार जनार्दन स्वामी, सांवता माळी, तुळाधार वैश्य इत्यादि भगवद्भक्तांनाही परमपूज्यच मानतो. हरिभक्ताची जात कोणी पुसत नाहीं, धंदा पुसत नाहीं, पूर्वचरित्रही विचारीत नाहीं. हरिभक्तीच्या कसावर जो कोणी शंभरनंबरी ठरेल त्यालाच संत मानतात. अशा शंभरनंबरी संतांतही ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम ही चौकडी संतांनींच अग्रगण्य म्हणून ठरविली आहे. जातीच्या अभिमानानें किंवा द्वेषानें कोणी ती फोडूं म्हणेल तर तें शक्य नाहीं. 'ज्ञानदेव नामदेव एका तुका' किंवा 'निवृत्तिज्ञानदेव सोपान मुक्ताबाई । एकनाथ नामदेव तुकाराम ' हीं महाराष्ट्रानें एकमतानें तयार केलेलीं भजनेंच या चौघांच्या एकरूपतेची साक्ष देत आहेत. त्यांना एकात्मतेच्या भावानेंच वंदन करून मी हें प्रकरण पुरें करितों.

येथवर तुकोबांच्या ग्रंथाध्ययनाचा विचार झाला. गीता, भागवत, कांहीं पुराणें, भर्तृहरीचीं शतकें व महिम्नादि स्तोत्रें ह्या संस्कृत व ज्ञानेश्वरी, नाथभागवत, नामदेवकबीरादि संतांच्या उक्ति या प्राकृत भाषेंत प्रगट झालेल्या भागवतधर्ममान्य ग्रंथांच्या सूक्ष्म अध्ययनाचा तुकोबांच्या आचारविचारांवर व भाषेवर अत्यंत परिणाम झाला आहे हें वाचकांच्या लक्ष्यात आलें असेलच. ज्यांच्या ग्रंथांचीं त्यांनीं अनेकवार विश्वासें आदरें पारायणें केलीं, ज्यांच्या उक्तींशीं व तदंतर्गत भावनाप्रधान सुविचारांशीं ते मनानें अहोरात्र तन्मय झाले, ज्यांनीं वर्णिलेल्या भक्तिज्ञानवैराग्यपरिपूर्ण सत्कथांशीं ते पूर्ण तादात्म्य पावले त्यांचाच विचारसरणीचें व भाषापद्धतीचें त्यांना संपूर्ण वळण लागलें यांत आश्चर्य करण्याजोगें कांहीं नाहीं. हें व्हायचें तसेंच झालें. परमार्थाची आवड उत्पन्न होऊन कुलपरंपराप्राप्त व सहजसुलभ अशा पंढरीच्या वारकरीसंप्रदायाचा मार्ग तुकोबांनीं अंत:करणपूर्वक स्वीकारला व त्यांतच संप्रदायाचें जे ज्ञाने-

श्वरनामदेवएकनाथादि पूर्वाचार्य त्यांच्याच ग्रंथांचें अध्ययन करून व तद्दर्शित मार्गानें जाऊन ते भगवत्कृपेला पूर्ण पात्र झाले आणि शेवटीं भक्तीच्या उत्कर्षानें, सद्धर्माचरणानें व प्रबोधशक्तीनें त्यांच्याच माळिकेंत जाऊन बसले.

—***—

## प्रकरण सातवें.

# गुरुकृपा व कवित्वस्फूर्ति.

**मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश। धरिला विश्वास दृढनामीं ॥१॥**

१ विषयप्रवेश. २ सद्गुरुवांचून कृतार्थता नाहीं हा वेदशास्त्रसंतांचा सिद्धांत. ३ स्वामी विवेकानंदांचा अनुभव. ४ तुकोबांची महात्म्याच्या भेटीविषयीं तळमळ. ५ गुरुच मुमुक्षूला धुंडतात. ६ बाबाजी चैतन्यांचा स्वप्नांत उपदेश. ७ दिनकर गोसावी यांचें उदाहरण. ८ अभंगांत गुरुनाम वारंवार कां नाहीं? ९ राघव, केशव, बाबाजी चैतन्य यांची हकीकत. १० चौघांच्या गुरुपरंपरा. ११ केशव चैतन्य व बाबाजी चैतन्य एक नव्हत. १२ बंगाल्यांतील चैतन्य-संप्रदायाशीं संबंध नाहीं. १३ कवित्वस्फूर्ति.

१ अतीव उत्कंठेनें तुकोबांचा अभ्यास चालला होता. 'देव कृपा करील मज? काय लाज राखील' हेंच ज्याला त्याला पुसावेसें त्यांना वाटत होतें, 'काय मी उद्धार पावेन। काय कृपा करिल नारायण' असें आश्वासन कोणी तरी संतमहात्मा देईल याविषयीं ते अत्यंत घाबरे झाले होते. माझी बुद्धी कधीं स्थिर होईल, हरीचें वर्म मला केव्हां समजेल, देहपात होण्यापूर्वी नारायणाची भेट कशी होईल, त्याच्या पायीं मी कधीं मिठी घालीन, त्यासाठीं सद्गदितकंठ होऊन मी देहभाव कधीं विसरेन, तो मला आपल्या चाऱ्ही भुजांनीं कधीं कुरवाळील, माझे डोळे त्याचें स्वरूप पाहून कधीं निवतील अशी त्यांना तळमळ लागून राहिली होती. ज्यानें देव प्रत्यक्ष पाहिला आहे असा सत्पुरुष मला भेटेल काय असें तें मनालाच विचारीत. ज्यासाठीं प्रपंचाची होळी केली, खतपत्रें इंद्रायणीच्या डोहास समर्पून धन गोमांससमान मानण्याची शपथ

घेतली, घरादाराचा लोभ सोडला, आप्तइष्टांकडून वाईट म्हणवून घेतलें, एकांत गांठला व वायुवेगानें ग्रंथाध्ययन व रामकृष्णहरीचें भजन चालविलें तो विश्वव्यापक पांडुरंग कोठें कसा कधीं भेटेल हें सांगणारा, त्याला प्रत्यक्ष पाहिलेला, महात्मा मी डोळ्यांनीं कधीं पाहीन अशी त्यांना प्रखर चिंता लागून राहिली. आणि परमात्मा कल्पवृक्ष आहे, चिंतामणि आहे, चिंतिलेलें पुरविणारा आहे हा सर्व भक्ताचा अनुभव यावेळीं तुकोबानाही आला. त्यांना महात्मा भेटला, स्वप्नांत भेटला, त्यानें यांच्या मस्तकीं हात ठेवला, आवडीचा मंत्र रामकृष्ण हाच दिला. तुकोबांचें प्रिय उपास्य पांडुरंग याच्याच ठिकाणीं निष्ठा ठेवण्यास सांगितलें. आपण चाललों आहोंत तें योग्य मार्गानें चाललों आहोंत असा त्यांना विश्वास आला. रामकृष्णहरीचें भजन पूर्वींचेंच होतें, पण अधिकृत महात्म्याच्या मुखानें तो मंत्र मिळाला, उपासनेचें वर्म समजलें, निश्चय दृढ झाला, समाधान झालें. खटल्याचा निकाल काय होणार हें ज्याचें त्याला आधींच माहीत असतें, वकील सांगत असतो, पण न्यायधीशाच्या तोंडून निकाल ऐकल्याशिवाय त्याचें खरें समाधान होत नाहीं, तसाच कांहींअंशीं हा प्रकार आहे. अधिकृत पुरुषाच्या मुखानें मंत्र मिळाला. धीराचे आशीर्वादाचे दोन शब्द त्याच्या तोंडून ऐकले, म्हणजे जीवाचें समाधान होतें, आपला मार्ग चुकला नाहीं याची त्याला खात्री वाटते, ग्रंथ वाचूनही कळत नाहीं तें वर्म क्षणांत समजतें, बुद्धी पोंचत नाहीं तेथील रहस्य आयतें पदरांत पडतें. स्वानुभवी साक्षात्कारी महात्म्याच्या क्षणैक समागमानें सर्व कार्य होतें. परमार्थ पचविलेला महापुरुष पाहिला म्हणजे परमार्थ रोमरोमांत भिजून जातो, हाही परमार्थरूप होतो. हा योग तुकोबांच्या भाग्यानें त्यांना आला.

२ सद्गुरुप्रसादावांचून कोणाचाही परमार्थ केव्हांही सिद्ध झाला नाहीं. ग्रंथाध्ययन पुष्कळ झालें, परोक्ष ज्ञान मि-

ळालें, योगाभ्यास झाला, आमच्या बुद्धीनें आम्हांला ज्ञानाचें रहस्य समजलें, आम्हांला आतां दुसऱ्या गुरूची गरज काय, गुरु अधिक तें काय सांगणार असें ज्यांस वाटतें ते शेवटीं अहंकाराच्या जाळ्यांत गुरफटलेलेच सांपडतात ! गुरुकृपे-वांचून रजतम साफ धुवून जात नाहींत, ज्ञानाच्या म्ह० आत्मज्ञाना-च्या ठिकाणीं दृढतम निष्ठा उत्पन्न होत नाहीं, ज्ञानाचा साक्षात्कार होत नाहीं. " शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्या-सिलें । तें तैंचि म्हणों ये आपुलें । जैं सानुकूळ श्रीगुरु ॥' ( ज्ञाने० १०–१७२ ). ज्याची त्यालाच सर्व कमाई करावी लागते हें खरें, पण त्यावर श्रीगुरूच्या कृपेचें शिक्कामोर्तब पडल्याशिवाय ती कमाई भगवंताच्या दरबारीं मान्य होत नाहीं. अत्यंत सूक्ष्म व निर्मळ बुद्धीनें ज्ञान आकलन झालें तरी दिव्याच्या पोटीं काजळी तसा ज्ञानाच्या पोटीं उत्पन्न होणारा अहंकार निःशेष घालविण्या-साठीं सद्गुरूचे चरण अवश्य धरिले पाहिजेत. श्रीरामकृष्णांनाही गुरुचरणांचा आश्रय जोडावा लागला तेथें इतरांचा पाड काय? वेद, शास्त्रें, पुराणें व संत यांची याविषयीं एकवाक्यता आहे. ' श्रोत्रिय ' म्ह० श्रुतिशास्त्रनिपुण, व ' ब्रह्मनिष्ठ ' म्ह० स्वानुभव-संपन्न, अशा सद्गुरूला शरण जा म्हणजे ब्रह्मविद्येचा अनुभव येईल अशी श्रुतिमाउलीची आज्ञा आहे. ' शाब्दे परेच निष्णातं ब्रह्मण्यु-पशमाश्रयम् ' अशा गुरूला मुमुक्षूनें शरण जावें असें भागवत सां-गतें व ' तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ' असें भगवानांनीं गीतेंतही सांगितलें आहे. 'आचार्यवान् पुरुषो वेद' याप्रमाणें आत्मवेत्त्या महापुरुषाचे पाय धरायला वेद सांगतात व आचार्यही ' षडंगादि-वेदो मुखे शास्त्रविद्या कवित्वादि गद्यं सुपद्यं करोति । गुरोरंघ्रिपद्मे मनश्चेन्न लग्नं ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ? ' असें विचारतात. परम भाग्यानें सद्गुरूची गांठ पडतांच त्यांना सर्व-

भावानें शरण जावें व ' यथा देवे तथा गुरौ ' ह्म० देवाप्रमाणेंच गुरूला भजावें असा हा अनादि परिपाठ आहे. सद्गुरु हे आपण जेऊन तृप्त झालेले असतात म्हणून अधिकारी जीवाची त्यांना करुणा येते.

**पोट धालें आतां जीवनीं आवडी । पुरवावी परवडी बहुतांची॥१॥**
**नावेचा भार तो उदकाचें शिरीं । काय हळू भारी तये ठायीं ? ।२।**

अपरंपार स्वानंदजीवनावर तरंगणाऱ्या गुरुरूप नौकेला चार दोन वाटसरू तिच्यावर अधिक चढले काय व चार उतरले काय तिला जड थोडेंच आहे ! गुरूला सच्छिष्यभेटीचा आनंद असतो, अद्वैतानुभव द्वैतमिषानें भोगायला सांपडतो ! श्रीकृष्ण पार्थाला ह्मणतातः " जें अद्वैताचरीही भोगिजे । तें अनुभाविंचें तूं विरजें । पुसेनि मज माझें । देतोसि सुख ॥" ( ज्ञाने० १५--४५० ). शब्दशास्त्रांत निष्णात, स्वानुभवानें परिपूर्ण, प्रबोधशक्तीनें संपन्न, दयाळु व परम शांत या पांचही गुणांनीं श्रीगुरु युक्त असतातः—.

तरी तो कायावाचामनें । अति कृपाळु दीनाकारणें ।
तोडी शिष्याचीं भवबंधनें । उडवी ठाणें अहंकाराचें ॥२९७॥
जो शब्दज्ञानें पारंगतु । ब्रह्मानंदें सदा डुल्लतु ।
शिष्यप्रबोधनीं समर्थु । यथोचितु निजभावें ॥ २९८ ॥

—एकनाथी भागवत अ० ३

गुरुप्रसादावांचून संतपदवीस चढलेला एकही पुरुष नाहीं. सर्व संतांचीं चरित्रें पाहिलीं तरी गुरुप्रसादाचें महत्त्व व माधुर्य सर्वांनीं वानिलें आहे. गुरुभक्तीचे हजारो उतारे देतां येतील, पण विस्तारभयास्तव आटोपतें घरितों. गुरुस्तुतीचें वाङ्मय अफाट आहे, तें अनुभवाचें आहे, व अत्यंत हृदयंगम आहे. ज्याच्यावर गुरुप्रसाद झाला असेल, गुरुसेवेचा परमानंद ज्याला भोगायला सांपडला असेल त्यालाच त्याची माधुरी कळेल. ज्ञानोबाराय व नाथ या दोघांनींही गुरुभक्तीची माधुरी अपार लुटली आहे. यांनीं गुरुसमागमाचा व गुरु-

सेवेचा लाभ पूर्णपणें भोगला आहे. उभयतांच्या ग्रंथांत सर्व मंगलाचरणें श्रीगुरुस्तवनपर आहेत व तीं पराकाष्ठेचीं मधुर आहेत. १३ व्या अध्यायांच्या ७ श्लोकांतील 'आचार्योपासनम्' हें पद पाहतांच ज्ञानोबारायाच्या गुरुभक्तीचा पाट फुटला तो त्यावर शंभर ओव्या निघून गेल्या तरी त्यांना आवरला नाहीं. त्यांच्या गुरुभक्तीचा बहार लुटावयाची इच्छा होईल त्यानें माझ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या चरित्रांतील 'उपासना आणि गुरुभक्ति' हें नववें प्रकरण समग्र पहावें (पृ० १५८–१९२). तसेंच नाथांच्या गुरुभक्तीचा प्रकार नाथांच्या चरित्रांत (पृ० ३८ ते ४५ पहावा. गुरुभक्ताला गुरु आणि उपास्य एकरूप होतात. ज्ञानेश्वरनाथांनीं श्रीगुरुमूर्तींतच पांडुरंग पाहिला, तुकोबांनीं पांडुरंगातच श्रीगुरु पाहिले. गुरु साक्षात् ब्रह्म आहेत व ब्रह्म गुरूच्या सगुणरूपानें कृतार्थ करितें. गुरुप्रसादावांचून मात्र कृतार्थ झालेला एकही महात्मा आढळावयाचा नाहीं. श्रीगुरु हें चालतें बोलतें ब्रह्म आहे. त्याच्या चरणधुळींत आंघोळ केल्याशिवाय स्वरूपाजवळ कोणीच गेलेला नाहीं.

३ अर्वाचीन युगांतले विख्यात सत्पुरुष स्वामी रामतीर्थ व स्वामी विवेकानंद हेही श्रीगुरूला शरण जाऊनच कृतार्थ झाले आहेत. स्वामी विवेकानंद आपल्या भक्तियोगावरील प्रबंधांत म्हणतातः " गुरूच्या कृपेनें मनुष्याच्या उच्च व गूढ शक्तींचा विकास होतो, त्यांना चैतन्य येऊन त्यांच्या आध्यात्मिकतेची वाढ होते व अखेर नराचा नारायण होतो. हें आत्मविकासाचें कार्य ग्रंथ वाचून होत नाहीं. एका जीवात्म्याला दुसऱ्या जीवात्म्याकडूनच हें साह्य मिळालें पाहिजे. तुह्मी हजारो ग्रंथ जन्मभर उलथेपालथे करीत बसा, त्यानें फार तर तुमची बुद्धी वाढेल, पण आपलें अध्यात्मबळ मुळींच वाढलें नाहीं असेंच तुम्हांस शेवटीं आढळून येईल. बुद्धीच्या वाढीबरोबर अध्यात्मशक्तींचाही विकास झाला पाहिजे असें कोणी

ह्मणेल तर तें खरें नाहीं. ग्रंथवाचनानें मनुष्यांत असा भ्रम उत्पन्न होतो खरा; पण बारकाईनें पाहिल्यास बुद्धी खूप वाढली तरी अध्यात्मशक्तींची वाढ झाली नाहीं असेंच त्याला समजून येईल. अध्यात्मशक्तींचा विकास करण्यास नुस्ते ग्रंथ असमर्थ आहेत, आणि ह्मणूनच अध्यात्म बोलणारे पुष्कळ सांपडतात पण त्यांचा कृतीशीं मेळ बसलेले लोक फार विरळ आहेत! एका जीवावर अध्यात्माचे खरे संस्कार घडविण्यास दुसरा तसाच जीवकोटींतून पुढें गेलेला महात्मा पाहिजे. हें सामर्थ्य ग्रंथांत नाहीं. अध्यात्माचे संस्कार ज्यावर घडतात तो शिष्य व ते घडविणारा तो गुरु. भूमि भाजलेली, नांगरलेली तयार पाहिजे, आणि बीज निर्मळ जिवट पाहिजे; उभय संयोगांतच अध्यात्माचा विकास होतो........अध्यात्माची तीव्र क्षुधा लागतांच ह्म० जमीन तयार होतांक्षणींच त्यांत ज्ञानबीजाची पेरणी होते असा सृष्टीचा कायदा आहे. आत्मप्रकाश ग्रहण करण्याची पात्रता सिद्ध होतांच प्रकाशाचा पुरवठा करणारी शक्ति प्रगट होते........सत्यज्ञानानंद अशा सद्गुरूला जग देवाप्रमाणें पूज्य मानतें. शिष्य शुद्धचित्त, जिज्ञासु व कायक्लेशी असावा लागतो, तसा तो तयार होतांच त्याला श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, निष्पाप, दयाळु, व प्रबोधचतुर असे समर्थ सद्गुरु भेटतात........सद्गुरु डोळ्यांत ज्ञानांजन घालून शिष्याला डोळस करितात. असे सद्गुरु भाग्यानें भेटतील तेव्हां अत्यंत नम्रतेनें, विमल भावानें, दृढविश्वासानें त्यांना शरण जावें, आपलें सर्व हृदय निष्कपटपणानें त्यांस अर्पावें, त्यांच्याविषयीं चित्तांत परमावधीचें प्रेम ठेवावें, त्यांस साक्षात् परमेश्वर भावावें म्हणजे भक्तिज्ञानाचा समुद्र आपलाच आपणांस सांपडून कृतार्थता वाटेल........महात्मे हे ईश्वरावतारच होत. ते केवळ स्पर्शानें, एका कृपाकटाक्षानें, किंवा नुस्त्या इच्छेनेंही शिष्यास कृतार्थ करितात, पापाचे पर्वत असलेल्या भ्रष्ट जीवासही ते दयेनें क्षणार्धांत

पुण्यात्मा बनवितात. ते गुरूंचे गुरु होत. मनुष्यरूपानें प्रगट झालेले हे साक्षात् नारायण होत. मनुष्याला यांच्याच रूपानें परमात्मा दिसतो. देव निर्गुण निराकार आहे, पण आपण जोंवर मानव आहोंत तोंवर मानवरूपानेंच आपण त्याला भजलें पाहिजे. तुम्ही वाटेल तें म्हणा, हवा तितका प्रयत्न करा, तुम्हांला मनुष्यरूपी ( सगुण ) परमेश्वरा- चेंच भजन केलें पाहिजे. निर्गुण निराकारपणाच्या कोणीही वल्गना करो, सगुणाला झिडकारून बोलो, अवतारांची निंदा करो, सूर्य- चंद्रतारागणांकडे बोट दाखवून बुद्धिवादानें तेथेंच देव पाहण्यास सांगो—त्याला परमात्म्याचें काय ज्ञान आहे हें तुम्ही पहायाला जाल तर तें 'शून्य' आहे असेंच तुम्हांस आढळून येईल ! आपण माणसें आहोंत, परमात्मा सगुणरूपानें—सद्गुरूच्या रूपानेंच आपणांस भेटतो यांत संदेह नाहीं." (स्वामी विवेकानंदांचे समग्र ग्रंथ भाग ३रा. पृ.५१६ ते ५२१ मूळ इंग्रजीवरून ) स्वामी आणखी म्हणतात कीं " भ- गवद्भेटीची आकांक्षा बाळगणाऱ्या मुमुक्षूचे डोळे उघडणारे श्रीगुरु- च होत. गुरु व शिष्य यांचें नातें पूर्वज व त्यांचे वंशज यांच्या नात्या- सारखेंच आहे. श्रद्धा, नम्रता, शरणागति, व आदरभाव या गुणांनीं शिष्य गुरूचें मन मोहील तरच त्याची आध्यात्मिक उन्नति होईल. आणि लक्ष्यांत ठेवण्याची ही गोष्ट आहे कीं गुरुशिष्यांचें असें अ- त्यंत प्रेमाचें नातें ज्या ज्या ठिकाणीं असतें तेथें तेथें च प्रचंड अध्या- त्मशक्तिचे महात्मे उत्पन्न झालेले आढळतात. ज्ञानाची परम सीमा अशी जी स्वानुभूति ती ग्रंथांपासून मिळत नसते. तुम्ही पृथ्वीपर्य- टनानें सारी भूमि पालथी घाला, हिमालय, आल्प्स, कॉकेशश हे महापर्वत ओलांडून शोधून या, समुद्राच्या तळीं बुड्या मारा, तिबेट देश पहा नाहींतर गोबीचें अरण्य धुंडा, स्वानुभवाचें खरें धर्मरहस्य वरील गुण अंगीं आणून श्रीगुरूचा प्रसाद जोडल्याशिवाय तुम्हांला काळत्रयीं उमजणार नाहीं ! म्हणून भगवंताच्या अनुग्रहानें श्रीगुरु-

भेटीचा भाग्योदय येईल तेव्हां श्रीगुरूंना सर्वभावानें शरण जा, हेंच माझें परब्रह्म अशी त्यांवर दृढनिष्ठा ठेवा, त्यांचें लेंकरूं होऊन त्यांची अनन्यसेवा करा ह्मणजे धन्य व्हाल. अशा परम प्रेमादरानें जे श्री-गुरूला शरण गेले आहेत त्यांना—आणि त्यांनाच केवळ—सच्चिदानंद प्रभूनें प्रसन्न होऊन आपल्या परम भक्तीचे आणि अध्यात्माचे अलौकिक चमत्कार दाखविले आहेत!!”

४ तुकोबांचा परमार्थ वरपंग नव्हता म्हणून त्यांनीं देखोवेखी गुरु करून टाकण्याची घाई केली नाहीं. पुष्कळ ठिकाणीं कसोटी लावून पाहिली, पण तिला उतरणारा कोणी भेटला नाहीं. ‘ घरो-घरीं अवघें झालें ब्रह्मज्ञान, ’ पण मुरलेलें ब्रह्मज्ञान त्यांना आढळलें नाहीं. ‘ निरें कोणापाशीं होय एकरज । तरी द्यारे मज दुर्बळाशीं ॥’ ह्म० खरें, वासनेनें न विटाळलेलें, आचरणानें प्रकाशणारें शुद्ध ब्रह्म-ज्ञान मला दुर्बळाला एक रजभर तरी द्या म्हणून त्यांनीं दीनवाणीनें याचना केली होती! पण ‘ जेथें तेथें पाहें देखीचे पर्वत । पा-यावीण भिंत तांतडीची ’ असें त्यांना चहूंकडे देखीचे पर्वतच दिसून आले. त्यांनीं भोंदू ‘ गुरूंचा ’ व दांभिक ‘ संतांचा ’ आपल्या अभंगांतून खरपूस समाचार घेतला आहे त्यावरून त्यांना देखीच्या पर्वतांचा कसा मनापासून तिटकारा होता हें दिसतें.

कामक्रोध लोभ चित्तीं । वरिवरि दाविती विरक्ती ॥
तुका ह्मणे शब्दज्ञानें । जग नाडियेलें तेणें ॥ १ ॥

*　*　*　*

डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥
तरी ते नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥

*　*　*　*

रिद्धिसिद्धीचे साधक । वाचासिद्ध होती एक ।
त्यांच्या आह्मासी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥

*　*　*　*

**दावुनि वैराग्याची कळा । भोगी विषयांचा सोहळा ।**
**ज्ञान सांगतो जनांसीं । अनुभव नाहीं आपणांसी ॥ १ ॥**

*　*　*　*

अशा प्रकारचे दांभिक, अर्धवट किंवा पोटभरू लोक केव्हाही पायलीचे पंधराच सांपडायचे. तुकोबांच्या शुद्ध व सूक्ष्म दृष्टीला खऱ्याखोट्याचा निवाडा तेव्हांच करितां येत असे. सामान्य लोक बाह्यवेषावरून चकतात, पण तुकोबांनीं ' नव्हती ते संत करितां कवित्व ' ह्या अभंगांत सांगितलें आहे कीं, कवित्व करतात ते संत नव्हत, संतांचे आप्त ते संत नव्हत, हातीं भोपळा धरून नैराश्य मिरवणारे ते संत नव्हत, वेदपाठक, पुराणिक, कीर्तनकार, माळामुद्रांचे धारक, भस्मलावे, वन सेवणारे, कर्मी, जपी, तपी हे सर्व ' संत ' नव्हत. ह्या सर्व बाह्य लक्षणांवरून संतपण सिद्ध होत नाहीं:

**तुका ह्मणे नाहीं निरसला देह । तंववरी हे अवघे संसारिक ॥**

देहाचा निरास झाला नाहीं तोंपर्यंत कोणीही ' संत ' पणाच्या पायरीला पोंचलाच नाहीं असें समजावें.

**करिसी ते देवा करीं माझे सुखें । परि त्यासि मुखें न ह्मणे संत ॥**
**जया राज्य द्रव्य करणें उपार्जन । वश दंभमानइच्छे झाले ॥ २ ॥**

द्रव्यलोभाची किंवा मानदंभाची वासना जोंपर्यंत पोटांत आहे तोंपर्यंत ' संतपण ' दूरच आहे. संत म्हणविणारे लोक या जगीं बहुत आहेत, ' हिऱ्याऐशा गारा ' दुरून दिसतात, पण तुकोबांच्या पसंतीला यांतून कोणीच उतरेना.

**ह्मणविती ऐसे आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणी ॥ १ ॥**

खरे संत दुर्लभ आहेत, म्हणून निराशापूर्वक त्यांनीं एकदा उद्गार काढले आहेत:—

**ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥**
**ह्मणोनियां ऐसे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ ध्रु० ॥**
**वेदपारायण पंडित वाचक । न मिळती एक एकांमधीं ॥ २ ॥**

पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखे चेष्टा विपरीत ॥ ३ ॥
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करिती रागें गुरुगुरु ॥४॥
तुका म्हणे मज कोणाच्या पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां॥५

ज्ञान्यांच्या घरीं देवाचा शोध करूं जावें तर तेथें अहंभावानें तेच झपाटले आहेत असें दिसलें. वेदपारायण, पंडित, वाचक हे पहावे तर एकमेकांशीं वाद करून दुसऱ्याला खोटें पाडून आपलेंच मत प्रस्थापित करण्यांत जो तो गुंग झालेला दिसला. ह्यांची आत्मनिष्ठा पाहूं गेलों तर उलट हे देहनिष्ठ आहेत असेंच दिसून आलें. ह्यांच्या तोंडांत आत्मनिष्ठेच्या गोष्टी असल्या तरी पोटांत हे सगळे देहोपासकच आहेत असें आढळलें. असाच अनुभव मला योगिराज म्हणविण्याऱ्यांचा आला, आणि खरेंच आहे—जे आपण स्वतः शांतिसुख पावले नाहींत, ज्यांचा देहनिरास झाला नाहीं, जें स्वतः अंतर्बाह्य हरिरूप झाले नाहींत ते दुसऱ्याला काय उद्धरणार ? जो स्वतः तरला असेल तोच दुसऱ्यास तारील ! तुकोबा ह्मणतात मला असा कोणी कृतार्थ झालेला महात्मा सांपडला नाहीं, ह्मणून पांडुरंगा ! मीं तुझेच पाय दृढ धरिले आहेत.

९ पण संत दुर्लभ असले तरी आहेत, नाहींत असें केव्हांही होत नाहीं. चंदन महाग—पण मिळतें. मातीसारखी कस्तुरी वाटेल तेव्हां व वाटेल त्याला मिळत नसली तरी ज्याच्या खिशांत दाम आहेत त्याला ती मिळाल्याशिवाय राहत नाहीं. उंची हिरे सामान्यांच्या डोळ्याला पहायलाही दिसत नाहींत, पण श्रीमंताला ते घेतां येतात; त्याप्रमाणें ज्याच्या पदरीं पुण्यसंपत्ति विपुल आहे त्याला सत्संग घडतो. सत्संग दुर्लभ आहे, अगम्य आहे, पण अमोघही आहे; भगवंताच्या अनुग्रहावांचून हा महल्लाभ प्राप्त होत नाहीं. जीवाची भाग्यश्री उदयोन्मुख होण्याच्या वेळींच संत भेटतात, त्यांतून ज्यांला भगवंतांची आज्ञा होईल तेच धांवत घरीं

बसल्याजागीं येऊन कृतार्थ करितात. मुमुक्षूला गुरु धुंडावे लागत नाहींत, गुरुच कृतार्थ होण्यास कोण जीव पात्र आहेत ते धुंडीत असतात. व फळ पाडाला आलें कीं शुक अनाहूत तेथें येऊन टोंच मारतात, तद्वत् विरक्त जीव पहातांच कृपाकुल सद्गुरु धांवत येऊन निजगुज सांगून मुमुक्षूला कृतार्थ करितात. सर्व संत सद्गुरुरूपच आहेत, तथापि सर्व स्त्रिया आईसारख्या असल्या तरी स्तनपान करविणारी आई ही देवानें योजिलेली एकच असते, त्याप्रमाणें सर्व संत गुरुरूप असले तरी स्वानुभवामृत पाजणारी सद्गुरुमाउली हीही नियोजित असते व मुमुक्षुबाळ स्वानंदामृत प्राशनाच्या भुकेनें व्यथित झालें कीं मग तिला पळाचाही धीर निघत नाहीं, ती असेल तेथून धांवत येऊन याला अमृत पाजते. गुरु नियोजित असतात, गुरुशिष्यांचे लागेबांधे फार मागचे असतात, व ठरीव वेळीं ठरीव शिष्याला ते कृतार्थ करितात. तुकोबांचे सद्गुरु बाबाजी चैतन्य असेच भगवदिच्छेनुसार यथाकालीं यथोचित रीतीनें येऊन तुकोबांवर प्रसाद करिते झाले.

६ तुकोबांनीं गुरूपदेश झाला त्या प्रसंगाला अनुलक्षून चार दोन अभंग केले आहेत. त्यांपैकीं पहिला सर्वप्रसिद्ध अभंग हा आहे:—

**सत्य गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं॥१॥**
**सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर॥**
**भोजना मागती तुप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ २ ॥**
**कांहीं कळे उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा जाली ॥३॥**
**राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ४ ॥**
**बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्णहरी ॥ ५ ॥**
**माघ शुद्ध दशमी पाहूनी गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे॥६**

ह्या अभंगावरून पुढील गोष्टी सिद्ध होतात:—

( १ ) सद्गुरूंनीं तुकोबावर कृपा केली व त्यांना रामकृष्णहरी हा मंत्र दिला.

( २ ) हा उपदेश त्यांना स्वप्नांत ते गंगास्नानाला ( देहूस इंद्रायणीच्या स्नानाला ) जात असतांना झाला. गुरूंनीं मस्तकावर हात ठेवला.

( ३ ) सद्गुरूंनीं भोजनाला पावशेर तूप मागितलें पण तें तुकोबांकडून त्यांना विस्मृतीमुळें मिळालें नाहीं. सद्गुरूंची सेवा कांहीं एक घडली नाहीं याबद्दल तुकोबांना जागृतींत आल्यांवर खेद झाला व सेवेंत कांहीं अंतराय घडला ह्मणून कीं काय कोण जाणे पण सद्गुरूंनीं जाण्याची त्वरा केली.

( ४ ) राघवचैतन्य केशवचैतन्य ही त्यांनीं आपली गुरुपरंपरा सांगितली व आपलें नांव बाबाजी असें सांगितलें.

( ५ ) हा उपदेश माघ शुद्ध दशमी गुरुवार या दिवशीं जाला.

( ६ ) या प्रमाणें तुकोबांचा सद्गुरूंनीं अंगिकार केला.

**माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ १ ॥**
**आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंफा कांहीं कोठें॥ध्रु०**
**जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ २ ॥**
**जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥३**
**तुका ह्मणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरु पांडुरंग ॥ ४ ॥**

ह्या दुसऱ्या अभंगांत आणखी मुद्द्याच्या तीन गोष्टी सांगितल्या आहेत.

( ७ ) माझ्या मनांतला भाव जाणून सद्गुरूंनीं माझ्या आवडीचा सोपा मंत्र सांगितला व त्यामुळें कोठें कांहीं भानगड (गुंफा) उत्पन्न झाली नाहीं.

ह्याचा भाव असा आहे:—गुरूंनीं उपदेश करण्यापूर्वींच तुकोबांची विठ्ठलोपासना ठरून गेली होती व रामकृष्णहरी हा त्यांचा मंत्रही ठरून गेला होता. विठ्ठल त्यांचें कुलदैवतच होतें. उपा-

त्याचा आवडीचाच मंत्र सांगितल्यामुळें कोठें कांहीं गुंफा ( भानगड, गुंतागुंत ) उत्पन्न झाली नाहीं. समजा गुरूंनीं गणेशाची उपासना व त्याचा मंत्र सांगितला असता, किंवा दुसऱ्या एखाद्या देवतेची उपासना किंवा दुसराच मंत्र दिला असता, किंवा योगयागादि अन्य साधनक्रम सांगितला असता तर 'गुंफा उत्पन्न झाला असता. पूर्वीचा साधनक्रमच पुढें चालविण्यास गुरूंनीं सांगितल्यामुळें तुकोबांना दुप्पट अवसान चढलें, नाहीं तर पूर्वीं चालविलेली उपासना पुढें चालवावी कां गुरूंनीं सांगितलेल्या मार्गानें जावें असा संदेह मनांत येऊन कदाचित् मनाची चलबिचल झाली असती तर मोठाच 'गुंफा' झाला असता. पण गुरूंनीं 'कृपेचा सागर जो पांडुरंग तोच मला तारू' दाखविल्यामुळें, आवडीचाच 'रामकृष्णहरी' हा मंत्र दिल्यामुळें व माझीच उपासना दृढतर निष्ठेनें चालविण्यास मला सांगितल्यामुळें कोठें कांहीं भानगड उत्पन्न झाली नाहीं.

( ८ ) एकामागें एक अनेक साधुसंत—ज्ञानेश्वर नामदेव एकनाथादि—ह्याच मार्गानें जाऊन भवसागराच्या पार झाले आहेत.

तुकोबारायांना विठ्ठलाची उपासना व रामकृष्णहरी हा मंत्र हे जसे प्रिय होते तसें त्यांचा नित्य व्यवसाय ज्ञानेश्वरनामदेवनाथादिकांच्या ग्रंथांचें श्रवणमनन हा असल्यामुळें त्यांचा सहवासही प्रिय होता. तोही ह्या योगानें कायम राहिला. त्यांना समजा गुरूंनीं दत्तमंत्र देऊन गुरुचरित्राचीं पारायणें करण्यास सांगितलीं असतीं; ह्या योगानेंही त्यांचें कार्य झालें नसतें असें नाहीं—तर पूर्वसंस्कारबलानें दृढ होत चाललेली उपासना एकदम सोडून दुसरी घेण्याचा प्रसंग आला असता ! तरी देखील कांहीं 'गुंफाच' उत्पन्न झाला असता. ह्याप्रमाणें आवडीचें उपास्य, आवडीचा मंत्र व आवडीचा पंढरीचा भागवतसंप्रदाय यांना सोडावें न लागतां किंबहुना अधि-

कच दृढ धरितां येईल असा गुरूंनीं उपदेश केल्यामुळें कोठें कांहीं गुंफा झाला नाहीं.

(९) मला आवडता असाच मार्ग सद्गुरूंनीं दाखवून दिला तरी जाणत्या नेणत्या सर्वांना त्यांच्या त्यांच्या अधिकाराप्रमाणें व आवडीप्रमाणें उपदेश करण्यास गुरुराज समर्थ आहेत, जाणते नेणते जसे जसे शिष्य भेटतील तसे तसे त्यांना 'उतार सांगडी तापे पेटी' हे उपाय ते सांगतात. हा चरण किंबहुना हा अभंग नीट समजून घेण्यास आपणास ज्ञानेश्वरीचा आश्रय केला पाहिजे! 'दैवी ह्येषा गुणमयी' (अ० ७–१४) व 'तेषामहं समुद्धर्ता' (अ० १२–७) ह्या श्लोकांवरील ज्ञानोबारायांच्या ओव्या पुढें ठेवून ह्या चरणाचा अर्थ उलगडतो. जाणत्या नेणत्यांना त्यांच्या त्यांच्या अधिकाराप्रमाणें मार्ग दाखविला जातो. 'सडे जे देखिले। ते ध्यानकासे लाविले। परिग्रही घातले। तरियावरी' (ज्ञाने० १२–९१) ह्म० जे ब्रह्मचारी, संन्यासी वगैरे सडे आहेत त्यांना योगमार्ग व जे परिग्रही ह्म० बायकामुलें असून संसार करणारे आहेत त्यांना नामनौका–(तरी) नामस्मरणाचा मार्ग देव दाखवितात. मायानदींतून तरून जातांना कोणी उताराने जातात. अहंभाव सांडून 'ऐक्याचिया **उतारा**' जातात (ज्ञाने ७–१००), कोणी 'वेदत्रयाचिया **सांगडी**' घेऊन जातात (८४), कोणी 'यजनक्रियेची **पेटी** पोटीं बांधून घेतात (८९), व कोणी 'आत्मनिवेदनाचें **तरांडें**' (ताफा) घेतात. तुकोबांच्याही सांगण्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं समर्थ सद्गुरुंजवळ सर्व साधनें तयार असतात; पण शिष्याच्या आवडीप्रमाणें तें त्याला इष्ट तो मार्ग लावतात. मला श्रीगुरूंनीं आवडीचा मंत्र सांगितला तेणेंकरून या विविध साधनांचा कांहीं गुंफा पडला नाहीं.

आणखीही चार पांच ठिकाणीं गुरूपदेशाचे उल्लेख आहेत.

श्रीसंतसद्गुरूंनीं ' लावूनियां हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी. ' श्रीगुरूंनीं ' सांगितला मंत्र रामकृष्ण साचा । सर्व काळ वाचा हेंचि बोले. ' श्रीगुरूंनीं स्वप्नांत अनुग्रह करून रामकृष्णहरी मंत्र दिला, पण याशिवाय त्यांनीं कांहीं वर्म सांगितलें असलें तर तुकोबांनीं तें वाचेंत आणलेलें नाहीं. सांप्रदायिक रहस्य कोणी उघड सांगतही नाहीं.

७ बाबाजी चैतन्यांनीं तुकोबांस स्वप्नांत उपदेश दिला असाच प्रकार यानंतर २० वर्षांनीं नगर जिल्ह्यांत भिंगारच्या ईशान्येस १४ कोसांवर वृद्धेश्वरीं झाल्याचा मराठी वाङ्मयांत एक दुसरा दाखला सांपडतो. ' स्वानुभवदिनकर ' ह्या सुंदर ग्रंथाचे कर्ते दिनकर गोसावी हे समर्थ रामदासस्वामींचे शिष्य होत. हे भिंगारचे जोशी. ह्यांचें उपनांव मुळे, पण ज्योतिषाच्या व्यासंगामुळें यांना पाठक हें उपनांव मिळालें. दिनकरांना ऐन तारुण्यांत वैराग्य प्राप्त झालें व तें आपलें गांव सोडून वृद्धेश्वरच्या रम्य खोऱ्यांत शके १५७४ चे फाल्गुनांत शिरले. त्या एकांतांत त्यांनीं एक वर्ष यथाविधि पुरश्च-रण केलें. शके १५७५ च्या फाल्गुन शुद्ध १५ ला रात्रीं नाम-स्मरण करीत असतां त्यांना निद्रा लागली. दिनकर स्वामी लिहितातः-

अवस्था जागरस्वप्ननिद्रांत । तुर्या केवळ इत्थंभूत ।
ते समईं नेत्र होऊनि उन्मीलित । विनीत अप्रभावेसी ॥६॥

अशा स्थितींत रामदासस्वामींच्या वेषानें श्रीरामरायांनीं प्रत्यक्ष येऊन त्यांच्या मस्तकावर डावा हात ठेवला ! इतक्यांत दिनकर गोसावी जागे झाले. त्यांना परमानंद तर झालाच पण ती मूर्ती प्रत्यक्ष जागृतींत दिसावी अशी त्यांना तळमळ लागून राहिली.

इतुकें स्वप्नांतीं जंव हो न सरे । तंव स्वानुभवीं आनंदाचेनि भरें ।
ध्यान लक्षीं चित्त चेइरें । तत्काळ जालें ॥ ८ ॥

आई न दिसल्यामुळें तान्ह्या मुलाची किंवा गाय वरीं वेळेला

न आल्यानें वासराची किंवा निधान चुकल्यानें कृपणाची जशी अवस्था होते तशी दिनकरांची झाली.

**तेवि सरतां सुषुप्ति स्वप्नसंधि । जागृति अवस्थेचिया अवधीं ।**
**दिनकरीं प्राप्त तुर्यायुक्त समाधि । श्रीरामदासकृपां ॥ ११ ॥**
**तेणें समाधियोगें निश्चळ चित्त । विरमलें जेथील तेथ ।**
**चाकाटोनियां निवांत । तटस्थ ठेलें ॥ १२ ॥**
**कांहीं स्वप्न कांहीं जागर । कांहीं सुषुप्तीचाहि गमे पडिभर ।**
**परि तुर्यावस्था साचार । ठसावली दिसे ॥ १३ ॥**

कांहीं स्वप्न, कांहीं जागर, कांहीं सुषुप्ती अशा तिहींच्या संधींत तुर्यावस्थेंत चित्त जेथल्या तेथें विरमून ताटस्थ्य आलें असतांना श्रीरामरायांनीं समर्थांच्या रूपानें दिनकरांच्या मस्तकावर डावा हात ठेवला. स्वप्नांतली सगुणमूर्ति त्यांच्या चित्तावर पूर्ण ठसावली व ती जागृतींत भेटेपर्यंत त्यानीं अन्नपाणी वर्ज्य करायचा निश्चय केला. त्याप्रमाणें ते एकवर्ष राहिले. बाह्योपाधींचें भान हारपलें, स्वप्नमूर्ति अंतर्बाह्य व्यापून राहिली. असें एक वर्ष क्रमतांच शके १५७६ च्या फाल्गुनी पौर्णिमेस साक्षात् समर्थ प्रगट झाले. दिनकरांच्या आनंदास पारावार उरला नाहीं. समर्थांनीं मस्तकावर उजवा हात ठेवून त्यांस कृतार्थ केलें. उजवा हात सद्गुरूवांचून कोणासही ठेवतां येत नाहीं. हा सर्व कथाभाग ‘ स्वानुभवदिनकर ’ ग्रंथांत ( कलाप १६ किरण ४ ) अवश्य पहावा.

तुकोबांच्या स्वप्नानुग्रहांत व दिनकर गोसावी यांच्या स्वप्नानुग्रहांत विलक्षण साम्य आहे. पांडुरंगानें बाबाजी चैतन्यांच्या रूपानें तुकोबांवर अनुग्रह केला असें महिपतबावा म्हणतात, व रामरायांनीं रामदासरूपानें दिनकर गोसावी यांजवर अनुग्रह केला असेंच स्वानुभवदिनकर सांगतो. तुकोबांचे गुरु त्यांच्या अनुग्रहाच्या आधीं पुष्कळ वर्षे समाधिस्थ झाले होते व ‘ पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं

जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ' असा तुकोबांना पांडुरंगदर्शनाचा ध्यास असल्यामुळें तुकोबांस तें दर्शन झालें व दिनकर गोसावी यांनीं स्वप्नदृष्ट मूर्तीच्या दर्शनाचा निदिध्यास घेतल्यामुळें त्यांना बरोबर एक वर्षानें त्यांची गुरुमूर्ति प्रत्यक्ष येऊन भेटली. ज्याला ज्याचा निदिध्यास असतो त्याला त्या रूपानें स्वप्नांत व जागृतींतही प्रत्यक्ष दर्शन होतें ही गोष्ट दोन्ही उदाहरणांवरून सिद्ध होते. आतां महात्म्यांना दुसऱ्याच्या स्वप्नांत जाऊन कसा बोध देतां येतो हें आह्मांसारख्या प्राकृत जिवांस गूढ वाटलें तरी तुकोबा व दिनकर गोसावी यांसारखे निष्कामभक्त आपणांस स्वप्नात गुरूपदेश झाला हें स्वतः सांगत असतांना त्याविषयीं अविश्वास बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा बाबतींत विश्वासाशिवाय प्रचीति येत नाहीं व प्रचीती आल्यावांचून प्रायः विश्वास बसत नाहीं ह्मणून भाविक माणसें प्रथम विश्वास ठेवतात व त्यांच्या पूर्वभाग्यानें किंवा भगवत्कृपाबलानें प्रचीतीचा दिवस केव्हां तरी उगवण्याचा संभव असतो. स्वप्नांतच काय पण गर्भांतही उपदेश केल्याच्या कथा आपल्या पुराणांतून आहेत. त्या कांहीं मिथ्या मानतां येत नाहींत. महात्मे चारी देहांहून वेगळे व पूर्ण स्वतंत्र असल्यामुळें चारी देहांवर त्यांची सत्ता चालते. ते देहांचे मालक असतात. अर्थात् हवा तो देह हवा तेव्हां स्वीकारणें व टाकणें या दोन्ही गोष्टी त्यांच्या हातच्या आहेत. बाबाजी चैतन्यांनीं स्थूलदेहाचा त्याग केल्यावर सूक्ष्म देहांत येऊन भंडाऱ्यावर स्वोद्धारार्थ अहर्निश झगडणाऱ्या तुकोबांची चित्तशुद्धि व अधिकार जाणून त्यांजवर कृपा केली व तुकोबांनीं चालविलेली उपासनाच पुढें चालविण्यास प्रोत्साहन दिलें. असें प्रोत्साहन वरच्या कोटींतील जीवाकडून खालच्या कोटींतील जीवांना मिळत असतें. वस्तुतः गुरु व शिष्य यांच्यांत वरचा व खालचा असा भेदभाव राहिलेलाही नसतो. दोन

पाण्यानें तुडुंब भरलेलीं सरोवरें जवळजवळ असलीं ह्मणजे ज्या सरोवरांतलीं पूर्णतेची पहिली लाट दुसऱ्या सरोवरांत जाते त्या सरोवराला गुरुत्व देण्याची मनानें तयारी करावी न करावी तोंच दोन्ही सरोवरांच्या लाटा एकमेकांवर वाहूं लागून मधील बांध बुजून जातो व दोनीं सरोवरें मिळून एक महासरोवर बनतें असाच प्रकार गुरुशिष्यांच्या एकात्मतेचा होत असतो. शिष्य गुरुपदावर केव्हां आरूढ होतो व गुरुशिष्य केव्हां एकमय होऊन जातात हें सांगण्याइतकाही काळ यास लागत नाहीं. ‘ उद्धरेदात्मनात्मानं ’ हेंच खरें आहे, तथापि शेवटची बत्ती गुरूशिवाय कोणी देत नाहीं. हा ज्या मार्गानें चालत असतो त्याच मार्गानें चालत जाऊन मुक्काम गांठलेला व मागच्यांना उत्साहबळ देण्यासाठींच परत फिरणारा कोणी वाटाड्या वाटेंत भेटावा लागतो. हाच गुरु होय. हा भेटल्यानें मोक्षमार्गींच्या या पथिकास हिंमत येऊन आपण आडरानांत न जातां बरोबर मार्गानेंच चाललों आहोंत असा विश्वास येतो. असे मोक्षमार्गांत अनेक गुरु भेटतात. हेंच मार्गदर्शकाचें काम संतमहात्मे करीत असतात. अखेर जे गुरु भेटतात तें पूर्णकाम करून अनुभवसुख याच्या पदरांत बांधून याला पूर्ण करितात हे सद्गुरु होत. सद्गुरूंचें काम अत्यल्प पण अत्यंत उपकारक असतें ‘ जीवत्मया शिवात्मयाशीं ते ऐक्यता ’ करितात.

८ तुकोबांचे गुरु बाबाजी चैतन्य हे होते याविषयीं बिलकूल शंका नाहीं. ‘ बाबाजीसद्गुरुदास तुका ’ असें तुकोबाच स्वतःस ह्मणतात. ज्ञानोबा, नामदेव किंवा नाथ यांच्या ग्रंथांत किंवा अभंगांत श्रीगुरूचें नांव जसें वारंवार येतें तसें तुकोबांच्या अभंगांत येत नाहीं ही गोष्ट खरी आहे, पण यावरून तुकोबांनीं गुरूपदेश घेतलाच नाहीं किंवा पांडुरंगानेंच त्यांना स्वप्नांत उपदेश करून आपलें नांव बाबाजी चैतन्य असें कांहीं तरी सांगितलें ही कोणाकोणाचीं

कल्पना आहे ती मात्र चुकीची आहे असें स्पष्ट ह्मणावें लागतें. 'मस्तकीं सहावें' ह्या अभंगांत 'सद्गुरुसेवन तेंचि अमृतपान' असें तुकोबांनीं ह्मटलें असून 'नेणे अर्थ कांहीं' ह्या अभंगांत:—

तुका ह्मणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥५॥

असें तुकोबांनीं स्पष्ट सांगितलें आहे. गुरूची आज्ञा व तुकोबांच्या मनाची आवड एकरूप झाली, ध्याननिष्ठा दृढतर झाली, नामसंकीर्तनसाधन स्थिर झालें. तुकोबांना स्वप्नांत उपदेश झाल्यामुळें इतर संतांप्रमाणें गुरुसहवास घडला नाहीं. ज्ञानेश्वरांच्या समोर निवृत्तिनाथांची, नामदेवांपुढें विसोबाखेचरांची व नाथांपुढें जनार्दनस्वामींची मूर्ति अहोरात्र खेळत होती, त्यांच्याशीं संवादसुख त्यांना भोगतां येत होतें, त्यांच्या दर्शनसेवेचा नित्यानंद त्यांना मिळत होता, त्यांचें शुद्ध स्वरूप जाणायचा त्यांना अवसर सांपडला होता, निर्गुणब्रह्मच या गुरुरूपानें सगुण झाल्याची प्रतीति प्रतिक्षणीं त्यांना येत होती, यामुळें परब्रह्मच सद्गुरुरूपानें प्रगट झाल्याची त्यांची निष्ठा अचल होती. तुकोबांना गुरूपदेश स्वप्नांत झाला व गुरूंनीं पावशेर तूप मागितलें असतांही यांना त्यावेळीं तें देण्याचें भान राहिलें नाहीं व पुढेंही सेवेचा अवसर सांपडला नाहीं शिवाय गुरूंनींही पांडुरंगध्यानाचाच प्रकार सांगितला व आपण गुप्त झाले. या कारणासाठीं तुकोबांच्या अभंगांत गुरुवर्णन आलें नाहीं व त्यांचा नामोल्लेखही चारदोन वेळच येऊन गेला. पांडुरंगाचा पुढील ध्यानप्रकार, सगुणसाक्षात्कार व निर्गुणबोध हे क्रमानें गुरूपदिष्ट मार्गानें जाऊनच झाले असल्यामुळें पांडुरंगस्वरूपांत गुरुस्वरूप मिळून गेलें, व पांडुरंगसेवा ही गुरूचीच आज्ञा असल्यामुळें पांडुरंगभक्तींतच गुरुभक्तीचा अंतर्भाव होऊन गेला! यासाठीं तुकोबांच्या अभंगांत गुरूंचा नामोल्लेख फार वेळ झालेला आढळत नाहीं; तथापि जे उल्लेख आहेत त्यांवरून बाबाजी चैत-

त्यांचा स्वप्नांत उपदेश झाला ही गोष्ट निश्चित आहे. गुरूपदेश स्वप्नांतच व्हावा लागतो ! स्वरूपजागृति झाल्यावर उपदेशाची गरज उरत नाहीं व मोहनिद्रेंत जीव असतांना त्याची सूक लागत नाहीं; म्हणून मुक्तावस्था व बद्धावस्था या दोन्ही गुरूपदेशाला योग्य नाहींत ! ना धड जागृति ना धड बंधन अशी मध्यम मुमुक्षावस्थाच उपदेशाला योग्य आहे !

९. बाबाजीचैतन्यांचा तुकोबांस स्वप्नोपदेश झाला हें सिद्ध आहे, पण त्यांचेविषयीं कांहींही विश्वसनीय माहिती उपलब्ध झाली नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. ज्या चारदोन गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांत परस्परविरोधी असा भाग बराच आहे. अशा स्थितींत तुटपुंज्या, अर्धवट व परस्परविरोधी असलेल्या माहितीच्या आधारावर तर्कांची इमारत उभारून निश्चयात्मक सांगणें उचित नाहीं. संतचरित्र म्हणजे कांहीं कल्पित कादंबरी नव्हे, आधारावांचून येथें काहणी सांगायची सोय नाहीं. बरें त्यावांचून विशेष अडत आहे असांतलाही भाग नाहीं. माघ शुद्ध १० ला तुकोबांना गुरूपदेश झाला म्हणून ही तीथ तेवढी वारकरीमंडळांत पवित्र मानली जाते व त्या दिवशी ठिकठिकाणीं कीर्तनभजनादिकांची गर्दी उडते ही एकच गोष्ट यासंबंधानें निश्चित आहे. तुकोबांचे गुरु कोण होते, कोठें राहत असत, ते समाधिस्थ कधीं झाले, त्यांची परंपरा मागून कोठून चालत आली, याविषयीं वारकरीमंडळांत कांहीं एक परंपरेची माहिती नाहीं व ग्रंथही उपलब्ध नाहीं. तुकोबांना स्वप्नांत अल्पकाळ गुरुदर्शन व उपदेश झाला, गुरूंनीं राघवचैतन्य केशवचैतन्य ही माळिकेची खूण सांगितली व स्वतःचें नांव बाबाजी सांगितलें, आवडीचा रामकृष्णहरी मंत्र तुकोबांस दिला ते व त्वरा करून गुप्त झाले या पलीकडे पूर्ण विश्वसनीय अशी कांहीं एक माहिती मिळत नाहीं. 'मानियेला स्वप्नीं गुरूचा उप-

देश' असें तुकोबांनीं स्पष्ट ह्मटलें आहे त्यांतील 'मानियेला' या पदावरून तुकोबांना त्यांचे गुरु पुन्हा कधी स्वप्नांत किंवा जागृतींत भेटले असावेत असें दिसत नाहीं, ह्मणजे स्वतः तुकोबांनाही गुरूकडून कांहीं अधिक गोष्टी कळल्या असें मानायला आधार नाहीं, अशा स्थितींत तुकोबांच्या गुरुबद्दल चरित्रकारानें तरी अधिक काय लिहावें? माझा स्वतःचा या पलीकडे कोणत्याही गोष्टीवर विश्वास नाहीं, वारकरीही ठेवीत नाहींत व त्यांना त्याची अवश्यकताही वाटत नाहीं हें स्पष्ट नमूद करून आतां ज्या गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांचा थोडासा विचार करूं.

चैतन्य कथाकल्पतरु नांवाचा एक ओवीबद्ध ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. ह्या ग्रंथ निरंजनबुवा नांवाच्या एका पुरुषानें शके १७०९ प्लवंग संवत्सरांत कार्तिक शुद्ध ११ स लिहून पुरा केला. यांत राघवचैतन्य व केशवचैतन्य यांची माहिती दिली आहे. ह्या ग्रंथाला मूळ आधार त्याहून एका प्राचीनतर ग्रंथाचा आहे असें शेवटीं ह्मटलें आहे.

> **कृष्णदासबैरागी परमभक्त। तेणें वर्णिला हा वृत्तांत।**
> **शके पंधराशें शहाण्णवांत। ग्रंथ पूर्ण पै जाला॥ १४१॥**
> **त्या ग्रंथाचेनि आधारें। बोलिलों वेडींवांकुडीं उत्तरें**

कृष्णदासबैरागी यांनीं शके १५९६ मध्यें पूर्ण केलेल्या ग्रंथाच्या आधारें हा ग्रंथ लिहिल्याचें निरंजनबुवा सांगतात. कृष्णदासबोवांचा ग्रंथ मिळाला असता तर निरंजनबुवांचें प्रस्तुत प्रकरण त्याशीं ताडून पाहतां आलें असतें. तूर्त सदर ग्रंथांत तुकोबांच्या गुरुपरंपरेविषयीं काय माहिती मिळते ती पाहूं. या ग्रंथाचे ६ अध्याय असून ओवी संख्या ७६० आहे. यांत तुकोबांची गुरुपरंपरा दिली आहे ती श्रीविष्णु—ब्रह्मदेव—नारद—व्यास—राघवचैतन्य—केशवचैतन्य उर्फ बाबाजी चैतन्य—तुकोबाचैतन्य अशी आहे. व्यासांचा राघवचैतन्यास उपदेश झाला. राघवचैतन्य हे 'उत्तम

नामनगरीं । मांडवी पुष्पावतीचे तीरीं ' बहुत काळ तप करीत होते. ' जाल्या नखांच्या चुंबळी । अंगावरी वाढली धुळी । जटा लोंबती भूतळीं । देह शुष्क जाहला ' अशा प्रकारची त्यांची तीव्र तपश्चर्या पाहून श्रीव्यास प्रगट जाले व त्यांनीं त्यांना ' नमो भगवते वासुदेवाय ' हा मंत्र प्रणवयुक्त सांगितला. उत्तमनगरी म्हणजे ओतूर. हा गांव पुणें जिल्ह्यांत जुन्नरपासून चार कोसांवर आहे. तेथून चार मैलांवर पुष्पावती उर्फ कुसुमावती ही नदी कुकडी नदीस मिळते. राघवचैतन्यास ओतूर मुक्कामीं गुरूपदेश झाला. गुरूपदेशानंतर राघवचैतन्यांनीं ( हें नाव त्यांस त्यांच्या गुरूंनीं दिलें ) अधिक तीव्र तप केलें. तेथे त्यांस कांहीं काळानें तृणामल्ल ( तिनवल्ली ? ) येथील देशपांडे नृसिंहभट यांचे द्वितीय पुत्र विश्वनाथबाबा हे भेटले. नृसिंहभट हे कर्मनिष्ठ ब्राह्मण होते. तृणामल्ल येथील शिवालय यवनांनीं भग्न केल्यावर नृसिंहभट तेथून निघाले व ते फिरत फिरत पुनवाडी ( तेव्हांचें पुणें ) येथें आले. तेथें ते आपली स्त्री आनंदीबाईसह सुखरूप राहिले. या दंपत्यास त्र्यंबक, विश्वनाथ व बापू असे तीन पुत्र झाले. नृसिंहभट समाप्त झाल्यावर तिन्ही पुत्रांत कलह सुरू झाले. ' बाबांची वृत्ति उदासीन । त्रिकाळ करावें संध्यास्नान । धर्मालागीं उदार पूर्ण । गृहकृत्य कांहीं करूं नये ॥ ' असा विश्वनाथबाबांचा नित्यक्रम पाहून दोघां बंधूंनीं त्यास घराबाहेर घालविलें. विश्वनाथबाबांची पत्नी गिरिजाबाई हीही त्यांजबरोबर घराबाहेर पडली. हें दंपत्य तीर्थयात्रा करीत ओतुरास आलें. दोघेही विपत्तीनें त्रस्त होऊन गेल्यामुळें हिंडत होते. पूर्वप्रारब्धबळानें त्या ठिकाणीं त्यांची व राघवचैतन्यांची गांठ पडून त्यांची विश्वनाथबाबांवर कृपादृष्टि झाली. विश्वनाथबाबा ऋग्वेदी ब्राह्मण होते. ते संसारतापानें तप्त झाले होते. बंधूंनीं घराबाहेर घालविलें. स्त्रीनेंही यांचे दारिद्र्यास्तव यांस पीडा दिली. ' कानीं नाहीं

बाळींबुगडीं । मिळाली नाहीं लेणींलुगडीं । सुख नाहींच अर्धघडी। जाले याचे संगतीनें ' असा बायकोचा नित्य आक्रोश ऐकूनही त्यांचे कान किटले होते. ते राघवचैतन्यांस एकदम शरण गेले. यावेळीं त्यांचें वय २५ वर्षांचें होतें. कांहीं काळानें त्यांस पुत्र झाला. त्याचें नांव नृसिंहभट ठेवलें. विश्वनाथबाबांनीं त्यानंतर ' वैराग्यें चित्त शुद्ध जालें । स्त्रीचें रिणही फिटलें ' असें म्हणून संन्यासदीक्षा घेण्याची इच्छा गुरूपाशीं प्रगट केली. विश्वनाथबाबांस संन्यास दिला व त्यांचें राघवचैतन्यांनीं केशवचैतन्य असें नामाभिधान ठेवलें. उभयता गुरुशिष्य ओतूरपासून थोड्या अंतरावर अरण्यांत जाऊन राहिले व तेथें ब्रह्मानंद भोगते झाले. कांहीं काळानें दोघेही तीर्थयात्रेस बाहेर पडले. नाशीक, त्र्यंबकेश्वर, द्वारका, प्रयाग, काशी, जगन्नाथ इत्यादि क्षेत्रें करीत ते कलबुर्ग्यास आले. तेथें ते पावसानें बेजार होऊन एका मशीदींत शिरले. तेथें त्यांनीं एका मधल्या कोनाड्यांत पादरक्षा ठेवल्या. मुलाणा तेथें आल्यावर निमाजस्थानीं पादुका ठेवल्याबद्दल तो त्या उभय यतींवर फार रागावला व त्यानें ही गोष्ट काजीच्या कानांवर घातली. दोन हिंदु संन्याश्यानीं मुसलमानांच्या मशीदींत फार बेअदबीचें वर्तन केलें अशी बातमी निजामशहाच्या कानांवर जाऊन सर्व यवन संतापले व त्या गांवांतील ब्राह्मणांचा फार छळ झाला. पादशहाही मशीदींत आला व त्याप्रसंगीं उभय यतीनीं त्या मशीदीस आज्ञा केल्यावरून ती जड इमारत पाव कोसावर उडून बसली ! हा चमत्कार पाहून पातशहा थक्क झाला व हे महान् पीर पैगंबर आहेत असें मनांत समजला. दोन्ही यति लगेच गुप्त झाले. पातशहा त्यांच्या भेटीसाठीं उतावीळ झाला. त्यानें त्यांची भेट आळंदगुंजोटीस घेतली. स्वामींनीं त्यास अभय दिलें. स्वामींच्या सन्मानार्थ बादशहानें मशीदींतच दोन कबरा बांधून त्यांचीं नांवें राघव-

दराज व केशवदराज अशीं ठेवलीं. राघवचैतन्यांनीं यानंतर लवकरच जनांची उपाधि वाढूं लागली तेव्हां समाधि घेतली. त्यांनीं ओतुरास जाण्याची आपल्या शिष्यास शेवटची आज्ञा केली. राघवचैतन्यांची समाध आळंदगुंजोटीस आहे. तेथून ३ कोसांवर असलेल्या मान्यहाळ गांवीं केशवचैतन्य कांहीं दिवस मठ बांधून राहिले. ते वारंवार गुरूच्या समाधीच्या दर्शनास आळंदगुंजोटीस येत. राघवचैतन्य फार देखणे असत. " चंद्रासम सुंदर वदन। जटा शोभती हेमवर्ण । सर्वांगीं भस्म विराजमान । दिगंबर मूर्ति नेटकी ॥ " असें त्यांचें दिव्य रूप असे. केशवचैतन्य यानंतर तेथून ओतुरास गेले. मागें त्यांच्या शिष्यांनीं मान्यहाळ गांवीं त्यांच्या पादुका स्थापन केल्या. हे केशवचैतन्यच तुकोबारायांचे गुरु होत. बाबाजी हें यांचें पूर्वाश्रमींचें नांव होय. तिसऱ्या अध्यायाचे शेवटीं:—

**सर्व जन म्हणती केशवचैतन्य । भाविक ह्मणती बाबाचैतन्य ।**
**दोन्हीं नामें एकाचि जाण । अत्यादरें बोलती ॥ १ ॥**

असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. शेवटल्या अध्यायांत 'बाबाही म्हणती पूर्वाश्रमीं' असा पुन्हां उल्लेख आहे. इतकी हकीकत पहिल्या तीन अध्यायांत देऊन ४ थ्या व ५ व्या अध्यायांत केशवचैतन्यांचें उर्वरित चरित्र सांगून सहाव्यांत तुकोबांना उपदेश झाल्याची गोष्ट त्यांच्या अल्पचरित्रासह सांगितली आहे. केशवचैतन्यांचे पुत्र नृसिंहभट व त्यांचे पुत्र केशवभट. केशवचैतन्यांनीं केशवभटावर कृपा केली व जगदुद्धारार्थ अनेक चमत्कारही करून दाखविले. केशवचैतन्यांनीं शके १४९३ प्रजापति संवत्सरीं वैशाख वद्य १२ स ओतूर येथें समाधि घेतली. समाधि घेतल्यावरही त्यांनीं अनेक चमत्कार केले. त्यांनीं आपला पूर्वाश्रमींचा नातु केशवभट यास समग्र भागवत सांगितल्याचें निरंजनबावांनीं वर्णन केलें आहे. त्यांनीं समाधि घेतल्यावर काशींत प्रगट होऊन एका ब्राह्मणावर

कृपा केली. त्याचप्रमाणें कित्येक वर्षानंतर तुकोबांस त्यांनीं स्वप्नांत उपदेश केला. निरंजनबुवांनीं उभय चैतन्यांबद्दल जी हकीकत दिली आहे तिचा गोषवारा येथवर सांगितला. तिच्या खरेखोटे-पणाचें प्रत्यंतर पाहण्यासारखा दुसरा ग्रंथ आजवर उपलब्ध झाला नाहीं. कृष्णदास बैराग्याच्या ज्या ग्रंथाधारें निरंजनबुवांनीं आपला ग्रंथ लिहिला आहे तो शके १५९६ मध्यें म्हणजे तुकोबांच्या प्रयाणानंतर २५ च वर्षांनीं लिहिला गेला असल्यामुळें बराच प्रमाण मानावा लागता. पण तो ग्रंथ उपलब्ध झाला नसल्यामुळें ह्या चैतन्यविजय कल्पतरूंतली कोणती गोष्ट कृष्णदासानें सांगित-लेली आहे व कोणती निरंजनबुवांनीं आपल्या माहितीप्रमाणें स्वतंत्र सांगितली आहे हें समजण्यास तूर्त मार्ग नाहीं.

राघवचैतन्य हे थोर सिद्ध पुरुष असून प्रेमळ कृष्णभक्त होते. आमचे गोवेकर मित्र विठ्ठलराव कामत यांनीं त्यांचा पुढील अत्यंत मधुर श्लोक मजकडे १० वर्षांपूर्वी पाठविला होता:—

---

१ केशवचैतन्यांची समाधि ओतुरास आहे असें बांबेगॅझिटिअरमध्यें ( खंड १८ भाग ३ ) ओतूरच्या वर्णनांतही प्रसिद्ध झालें आहे. गुलबुर्ग्याचे वकील रा. मोहोळकर यांनीं ता. १५।१२।१९०३ च्या केसरींत प्रसिद्ध केलें कीं, " राघव, केशव व बाबाजी चैतन्य हें चैतन्यत्रय परस्पर गुरुबंधु असून तिघांचे गुरु वडवाळसिद्ध नागनाथ हे होत. वडवाळ क्षेत्र मोहोळ स्टेश-नजवळ आहे." ही माहिती बरोबर नसावी असें बहिणाबाई व शंकरस्वामी शिऊरकर यांच्या पुढें येणाऱ्या गुरुपरंपरेवरून वाटण्यासारखें आहे. तसेच त्यांनीं, तिकडे मुसलमान लोक बाबाचैतन्यास शेखसाहेब, केशवचैतन्यास बंदेनवाज म्हणत असून केशवचैतन्यास सरकारांतून एक लक्षाची जहागीर आहे वगैरे जें प्रसिद्ध केलें आहे त्यासही कांहीं प्रमाण अर्थ नाहीं असें मीं स्वतः गलबुर्ग्यास जाऊन शोध केला तेव्हां समजून आलें. लेखी प्रमाण किंवा परंपरा या दोहोंचा—निदान एकाचा तरी प्रत्यंतर पुरावा मिळाल्याशिवाय कोणतीच गोष्ट जमेंत धरितां येत नाहीं. श्रीकेशवचैतन्यांचें देऊळ काशीस आहे व समाधि ओतुरास आहे.

पुंजीभूतं प्रेम गोपांगनानां मूर्तीभूतं भागधेयं यदूनाम् ।
सांद्रीभूतं गुप्तवित्तं श्रुतीनां श्यामीभूतं ब्रह्म मे सन्निधत्ताम् ॥
श्यामीभूतं ह्म० सावळें परब्रह्म० ' गोपींच्या प्रेमाचा केवळ पुंज, यादवांचें मूर्तिमंत भाग्य, श्रुतींचें घनवटपणास आलेलें रहस्य असें हें सांवळें परब्रह्म निरंतर मत्सन्निध असो ! '

राघवचैतन्यांची आणखी कांहीं कविता आहे ह्मणून समजतें. केशव चैतन्यांचें एक पद मला बहिणाबाईच्या गाथ्यांत मिळालें. (पृ० ९५) तें पुढें देतों.

पद.

विषयाचे लोभें मन भ्रमलेसे भारी ।
गृह पुत्र कलत्र हे जाले सुखकारी ॥
आतां याचें दुःख मज सोसवेना हरी ।
ह्मणोनि विनावितो कमळावरा रे ॥ १ ॥
दीनानाथा दीनबंधु शरण तुला रे ॥ ध्रु० ॥
भवाब्धीचा तरणोपाय नेणवेचि कांहीं ।
साधुसंग सेवा मज घडलिच नाहीं ॥
शिश्नोदरव्यापाराच्या पडिलों प्रवाहीं ।
यांतुनिया त्वरें आतां काढी मजला रे ॥ २ ॥
चित्तशुद्धि होचि आतां मज वाट दावी ।
वेदशास्त्रपुराणांची गती सुचवावी ॥
नवविधा भक्ति निरंतर करवावी ।
केशवचैतन्य म्हणे भूषण तुला रे ॥ ३ ॥

१० तुकोबारायाचे तीन थोर शिष्य निळोबाराय, बहिणाबाई व महिपतबावा यांचे गुरुपरंपरेचे अभंग पुढें देतों.

१ निळोबारायांचा गुरुपरंपराः

मुख्य महाविष्णु चैतन्याचें मूळ । सांप्रदायफळ तेथोनीयां ॥ १ ॥
हंसरूपी ब्रह्मा उपदेशी श्रीहरी । चतुःश्लोक चारी भागवत ॥ २ ॥
तें गुज विधाता सांगे नारदासी । नारदें व्यासासी उपदेशिलें ॥ ३ ॥

राघवचैतन्यें केलें अनुष्ठान । त्यासी द्वैपायनें कृपा केली ॥ ४ ॥
कृपा करूनि हस्त ठेवियेला शिरीं । बोध तो अंतरीं ठसावला ॥५॥
राघवा चरणीं केशव शरण । बाबाजीसी पूर्ण कृपा त्याची ॥ ६ ॥
बाबाजीनें स्वप्नीं येऊनि तुकयाला । अनुग्रह दिला निजप्रीती ।।७॥
जगद्गुरु तुका अवतार नामयाचा। संप्रदाय सकळांचा तेथोनीयां॥८
निळा म्हणे मज उपदेश केला । संप्रदाय दिला सकळ जनां ॥९॥

## २ बहिणाबाईचा गुरुपरंपरा.

आदिनाथें उपदेश पार्वतीसि केला । मछिंद्रें ऐकिला मच्छगर्भी॥१
शिवहृदयींचा मंत्र पै अगाध । झालासे प्रसिद्ध भक्तियोगें ॥ २॥
त्यानें त्या गोरक्षा केलें कृपादान । प्रगट तेथोनि गहिनीप्रती ॥३॥
गहेनीनें दया केली निवृत्तिनाथा । बाळपण असतां योगरूप ॥४॥
तेथोनि ज्ञानेश पावले प्रसाद । झाले ते प्रसिद्ध सिद्धासनीं ॥ ५ ॥
सच्चिदानंद बाबा भक्तीचा आगर । त्यासि अभयवर ज्ञानें केला ६
पुढें विश्वंभर शिवरूप सुंदर । तेणें राघवीं विचार ठेविलासे ॥७॥
केशव चैतन्य बाबाजी चैतन्य । झालेसे प्रसन्न तुकोबासी ॥ ८ ॥
एकनिष्ठभाव तुकोबाचे चरणीं । म्हणोनि बहेणि लाधलीसे ॥९॥

## ३ महिपतबावांची गुरुपरंपरा.

निळोबारायांच्या अभंगांचे पहिले आठही चरण तसेच आहेत. थोडा फरक आहे. ‘ त्यासी द्वैपायनें कृपा केली ’ बद्दल ‘ त्यासी द्वैपायनें भेट दिली; ’ पांचव्या चरणाबद्दल ‘ कृपाहस्त त्यानें ठेवियेला शिरीं । राघवाअंतरीं बोध केला; ॥ ’ ८ व्या चरणाचा उत्तरार्ध ‘ संप्रदाय त्याचा ऐशा रीती ’ असे किरकोळ भेद असून शेवटला चरण असा आहे:—

महिपती ह्मणे ऐसी हे मालिका । सकळ भाविकां उच्चारितां ॥९॥

हा अभंग मला त्यांच्या वंशजांकडून मिळाला.

बहिणाबाई व निळोबाराय हे दोघेही तुकोबांचे शिष्य. निळोबांचे शिष्य शंकरस्वामी शिऊरकर आणि बहिणाबाई दोघेही राहणार एका गांवचे. बहिणाबाई तुकोबांच्या साक्षात् शिष्य व

शंकरस्वामी प्रशिष्य. आतां शंकरस्वामींची गुरुपरंपरा मला खुद्द शिऊर येथें त्यांच्याच घरीं मिळाली व तशीच एक शिऊरकरांचे शिष्य जे वासकर ह्यांच्या फडावर मान्य असलेली त्यांचे फडावरील कीर्तनकार हरिभाऊ गिंडे यांजकडून मिळाली. ह्या गुरुपरंपरेचे श्लोक १५ आहेत. आहेत तसेच्या तसेच मी खालीं देतों. त्यांच्यां शुद्धाशुद्धतेकडे न पाहतां तात्पर्याकडेच पहावें!

### ४ शंकरस्वामींची गुरुमालिका.

॥ श्रीगुरुप्रसन्न ॥ अथ गुरुमालिका स्तोत्र प्रारंभः ॥

योऽस्मै शिवस्तुप्रणवः प्रणवैक्यगम्यो
यो निर्गुणो प्रणवतत्वहरोहरश्च ।
यो ह्यादिनाथगुरु ज्ञानप्रदोस्ति नित्यं
भक्त्या व्रजामि तमहं शिवसंप्रदायम् ॥ १ ॥
ईशंच पृच्छाति शिवा निजतत्वमैशं
तां शंभुरहं कृपया अपयाति भेदम् ।
ज्ञानं च यो दिशाति गुह्यतमं पयोब्धौ
भक्त्या व्रजामि तमहं शिवसंप्रदायम् ॥ २ ॥
गौरीशयोर्यमनुवादमगाधबोधं
तं ज्ञानवान् तनुशत्रुतनूद्भवेन ।
मच्छोदरं मुनिवरं प्रणमामि प्रीत्या ॥ भक्त्या० ॥ ३ ॥
यः शंकरोपमगुणैरतुलस्त्रिलोक्यां
मच्छींद्रनाथसुपदिष्टमनुक्रमेण ।
गोरक्षनाथ मुनिशं गुरुसेवकंच भक्त्या० ॥
यो योगविद्गुरुवरः प्रवरस्त्रिलोक्यां
योगेश्वरो मुनिवरो गयनी प्रसिद्धः ।
गोरक्षनाथमुपदिष्ट मनोज्ञतत्वं ॥ भक्त्या० ॥ ५ ॥
ज्ञात्वा कलौ मतिहतांश्च जनान्पृथिव्यां
तानुग्रहायच शिवेन निवृत्तिनाथम्
भक्तित्रिकं प्रकटितं गयनेरवाच्यं ॥ भक्त्या० ॥ ६ ॥
आचार्य शंकरकुलौ किल धर्मशास्ता
जातस्तथैव हरिरेव हि ज्ञानदेवः ।

लोके चकार हरिभक्तिप्रसिद्धमेव ॥ भक्त्या० ॥ ७ ॥
श्रीमन्निवृत्तिरुपदेशितमात्मज्ञानं
श्रीज्ञानदेव कृपयाहि जनैस्तदाप्तम् ।
देवाहि भक्तिसहितं विमलं हि ज्ञानं ॥ भक्त्या० ॥ ८ ॥
ज्ञानेश्वरस्य पद कंजपरागरागी
संसारसार वरिभोग निवृत्तरागः ।
सच्चित्सुखाख्य मुनिपुंगवस्ततोगे
विश्वंभरोऽथ प्रवरोकिल राघवाख्यः ॥ ९ ॥
चैतन्य केशव रथो किल केशवाच्च
बाबाजिसद्गुरुवरेणच कौतुकायो
अद्यापि यस्य चरितानिच कौतुकाय ॥ भक्त्या० ॥ १० ॥
यः कौतुकाराम विभेदतास्या
यः कौतुकाराम हरिः प्रियानाम ।
यः कौ तुकाराम प्लवो भवाब्धौ ॥
यः कौ तुकाराम गुरुः प्रसिद्धः ॥ ११ ॥
ग्रामोस्ति यस्य किल पिप्पलनेर नाम्ना
यः सर्वथा सुपथगामि तुकोपदिष्टम् ।
यस्य गृहे हरिकृतं सकलंहि कृत्यं
तं नीलकंठ प्रणस्यं प्रणमामि भक्त्या ॥ १२ ॥
ग्रामः शिवाख्य निकटं शिवनाम शैलो
रामेश्वराख्य शिवलिंग प्रसिद्ध यत्र
यो नीलकंठवर शिष्याहि शंकराख्य-
स्ग्रेततो कालिमलापहरो अखंडः ॥ १३ ॥
इत्थं शिवान्वयपरंपरा कलौच्च
भक्तित्रिकं प्रकटितं भगवज्जनैर्यैः।
यात्राभिरेव विपुलैर्हरिनामघोषै-
रद्यापि कीर्तनरसैर्जनतारकैस्तैः ॥ १४ ॥
गुरूमाला इदं स्तोत्र यः पठेद्धरिसंनिधौ
सर्वकामफलं तस्य विष्णुसायुज्य माप्नुयात् ॥ १५ ॥
॥ इति गुरुपरंपरास्तोत्रं संपूर्णमस्तु ॥

१३ राघवचैतन्यांच्या मागील गुरुपरंपरेंत येथें दोन प्रकार दिसतात. निळोबाराय व निरंजनबुवा यांचें एक मत आहे व बहि-

णाबाई व शंकरस्वामी शिऊरकर यांचें एक मत आहे. दोन्ही गुरु-परंपरा पुढें देतों:—

१ निळोबारायांची

महाविष्णु
|
हंस ( ब्रह्मा )
|
नारद
|
व्यास
|
राघव चैतन्य
|
केशव चैतन्य
|
बाबाजी चैतन्य
|
तुकोबाराय
|
निळोबा

२ बहिणाबाईची

आदिनाथ
|
पार्वती — मच्छेंद्रनाथ
|
गोरक्षनाथ
|
गहिनीनाथ
|
निवृत्तिनाथ
|
ज्ञानेश्वरमहाराज
|
सच्चिदानंद बावा
|
विश्वंभर
|
राघव चैतन्य
|
केशव चैतन्य
|
बाबाजी चैतन्य
|
तुकोबाराय
|
बहिणाबाई

बहिणाबाई व निळोबाराय दोघेही तुकोबारायांचे शिष्य, मग दोघांच्या गुरुपरंपरेंत भेद कां पडावा? बहिणाबाई तुकोबांच्या संगतींत देहूस कित्येक वर्षे जाऊन राहिलेल्या, तेव्हां ज्ञानेश्वरमहाजांच्या परंपरेंतलेच तुकोबा हें त्यांचें म्हणणें अविश्वसनीय कसें मानावें? बरें निळोबारायांची व तुकोबारायांची साक्षात् भेट नव्हती, तरी त्यांना स्वप्नांत उपदेश होऊन तुकोबांची टाळवीणा मिळाल्यामुळें परंपरा चालविण्याचे अष्टाधिकार मिळालेले. निळोबारायांची वारकरीमंडळांत मान्यता अतिशय. निळोबारायांचे शिष्य शंकरस्वामी व शंकरस्वामींचे शिष्य मल्लापा वासकर. वासकरांचा फड पहिला आणि त्याला अग्रपूजेचा मान. अशा स्थितींत निळोबारायांनीं दिलेली परंपरा तरी अमान्य कां करावी? इकडे साक्षात् निळोबांचे शिष्य जी परंपरा देतात ती बहिणाबाईंनीं दिलेल्या परंपरेशीच सर्वांशीं जुळती आहे! बहिणाबाईंचे शिष्य कोणी दीनकवि[1] होऊन गेले त्यांनीं दिलेली परंपरा बहिणाबाईंनीं दिलेल्या परंपरेशीं पूर्णपणें मिळती आहे. 'क्षीरसिंधूचिया स्थानीं' चंद्रमौळी शंकर (आदिनाथ) यांनीं पार्वतीस (उदोनाथ ह्म० जगदंबा) 'आत्मारामीं मिळावया जो ज्ञानशक्तिबोध' केला तो मच्छेन्द्रनाथास मिळाला. त्यांनीं तो बोध गोरक्षनाथास, त्यांनीं गैनीनाथास, गैनीनाथांनीं निवृत्तिनाथास व त्यांनीं ज्ञाननाथास (ज्ञानेश्वरमहाराजांस) दिला. ज्ञाननाथापासून हा बोध बाबा (सच्चिदानंद बाबा), योगीराय विश्वनाथ, शुद्धचैतन्य असे राघो चैतन्य, केसो चैतन्य, बाबा चैतन्य, तुको चैतन्य, बहिणाबाई या शिष्यपरंपरेनें दीन कवीस मिळाला. ही माहिती दीनकवीनें शके १६५२ साधारण संवत्सरीं कृष्णेच्या उत्तरतीरीं १८ प्रकरणात्मक पंचीक-

---

१ दत्तोपंत पोतदारांचा लेख पहा. (भारतइतिहाससंशोधक मंडळाचें शके १८३७ चे वार्षिक इतिवृत्त. पृ. २७१–२७४).

रणनामक ग्रंथ लिहिला त्यांत दिलेली आहे. आदिनाथांपासून ज्ञाननाथांपर्यंतची परंपरा ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत स्वतः ज्ञानोबारायांनीं दिली आहे, राघवचैतन्यांपासून तुकोबांपर्यंत स्वतः तुकाराममहाराजांनीं दिली आहे, तेव्हां या दोनी परंपरा निर्विवाद आहेत. कालानुक्रमें पाहतां ज्ञानेश्वरमहाराज व तुकोबाराय यांच्यांत सुमारें ३२९ वर्षांचें अंतर पडतें, व एवढ्या काळांत सच्चिदानंद बाबा, विश्वनाथ [ विश्वंभर व विश्वनाथ एकच ], राघव चैतन्य व केशव चैतन्य हे चारच पुरुष धरावे लागतात, ह्मणजे प्रत्येक पिढी ८० वर्षांची धरावी लागते व हें इतिहासशास्त्रदृष्ट्या अशक्य आहे, अशी यावर या चौकस काळांत शंका निघणें स्वाभाविक आहे. त्यास उत्तरही असें दोन प्रकारचें देतां येईल कीं महापुरुषांचें व योगपरंपरेशीं संगत असलेल्या महापुरुषांचें आयुष्य सामान्यदृष्टीनें मापणें योग्य नाहीं; किंवा मधल्या कमी प्रसिद्ध अशा कांहीं पुरुषांचीं नांवें गाळण्यांत आलीं असतील किंवा विस्मरणांतून गेलीं असतील. तें कसेंही असो, बहिणाबाई व निळोबाराय हे दोघेही स्वानुभवी थोर संत होते, दोघांच्याही अभंगांवर गुरुकृपेची पूर्ण छाप पडलेली आहे, तथापि दोघांच्याही गुरुपरंपरेंत थोडा फरक आहे तो वर दाखविला आहे. वारकरी मंडळांत निळोबारायांची मान्यता अतिशय आहे, इतकीं कीं कीर्तनांत तुकोबारायांच्या पश्चात् झालेल्या कोणाचेंही वचन काढावयाचें नाहीं असा निर्बंध आहे, तरी निळोबाराय हे त्यास अपवाद आहेत. त्यांच्या अभंगांस ज्ञानेश्वर नामदेवतुकोबानाथ यांच्या वचनांइतकाच मान असून त्यांच्या अभंगांवर कीर्तनेंही होतात. इकडे बहिणाबाईची परंपरा सत्य मानली तर ज्ञानेश्वरमहाराजांच्याच परंपरेंतले तुकोबाराय ठरतात व महाराष्ट्रांत या एकाच परंपरेंत ज्ञानेश्वर व तुकाराम हे दोन पुरुष झाले असें होऊन ‘ ज्ञानेश्वर माउली तुकाराम ’ या भजनाचें वर्म ध्या-

नात येतें आणि हें भजन ह्मणजे संपूर्ण संप्रदायाचाच जयजयकार असें सिद्ध होतें. पण निळोबांची गुरुपरंपरा मानावी कां बहिणाबाईची मानावी हा प्रश्न न सुटता तसाच राहतो !

११ मागें राघव व केशव चैतन्य याचें चरित्र ज्या निरंजनबोबांच्या ग्रंथांतून दिलें आहे तो ग्रंथ सांप्रदायिक दिसत नाहीं. केशव चैतन्य तेच बाबाजी चैतन्य असें निरंजनबुवांचें आग्रहाचें सांगणें दिसतें, पण सर्व परंपरा या मताच्या विरुद्ध आहे. राघव चैतन्य,केशव चैतन्य व बाबाजी चैतन्य हे तीन वेगवेगळे पुरुष असून पहिले दुसऱ्याचे गुरु अशी ही माळिकेची खूण आहे. यास प्रमाणें:—

(१) **राघव चैतन्य केशव चैतन्य । सांगितली खूण माळिकेची।**
**बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्ण हरी ॥**

बाबाजी हें तुकोबांच्या गुरूचें नांव. त्यांनीं आपलें बाबाजी हें नांव सांगतांना राघवचैतन्य केशवचैतन्य ही माळिकेची खूण सांगितली. केशव तेच बाबाजी ह्मटल्यास ' माळिका ' कोठें राहते ? एकाच पुरुषाची ' माळिका ' कशी होईल ? राघव, केशव या माळिकेंतला मी बाबाजी आहें असें त्यांनीं सांगितलें हेंच म्हणणें युक्त आहे. शिवाय या अभंगांत तुकोबांनीं आपली त्रयी सांगितली आहे असें मानणें उचित आहे. वंश दोन प्रकारचे समजले जातात, एक मांसवंश व एक विद्यावंश. गुरूपदेशानंतर निस्सीम गुरुभक्त सर्वस्वी गुरूचेच होऊन जातात. मुलीचें लग्न झाल्यावर मग तिचा संसार जसा सासरकडचा, नातें नांव संबंध सर्व सासरचे लावून ती पूर्णपतिपरायण झाल्याचें दर्शवितें; तसेंच गुरुशिष्यांचें नातें आहे. ' पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण ' तसा गुरुभक्तांना गुरु प्रमाण. ज्ञानेश्वरमहाराजांचे निवृत्तिनाथ हे वडील बंधु, पण उपदेश झाल्यानंतर तें गुरूचें होऊन पहिलें नातें संपलें, म्हणून त्यांनीं आपणांस निवृत्तिदास, निवृत्तिनाथसुत असें म्हटलें

आहे. याच न्यायानें एकाजनार्दन, विठारेणुकानंदन, इ० गुरुभक्तांचीं नांवें पडलीं आहेत. गुरुशिष्यांचें नातें असें आहे. आपण संसारी लोक श्राद्धपक्ष करितांना किंवा रोजही 'रामचंद्रनारायणकृष्णशर्माणां हरितसगोत्राणां' अशा प्रकारें आपल्या त्रयीचा उच्चार करीत असतो, त्याचप्रमाणें तुकोबांनीं वरील करणांत आपल्या त्रयीचा उच्चार केलेला आहे. तुकोबांचे गुरु बाबाजी चैतन्य, परमगुरु केशवचैतन्य व परात्पर गुरु राघवचैतन्य अशी ही गुरूची त्रयी आहे व सांप्रदायिक परंपरेंतून ती तशीच समजली जाते. ह्या दृष्टीनें हे तिघे किंवा दोघे गुरुबंधु होत असें एका दोघांनीं लिहिलें आहे तें चुकीचें आहे. आतां हे तीन पुरुष वेगळे आहेत हें तुकोबांच्या पुढील परंपरेंतही कसें समजलें जातें तें पाहूं:—

( २ ) तुकोबांच्या अभंगांच्या ज्या वह्या पंढरीस, देहूस त्यांच्या वंशजांकडे अगर अन्यत्र त्यांच्या शिष्यांकडच्या वंशजांकडे आहेत त्यांत प्रारंभीं तिघांनाही वेगवेगळें नमन आहे. पंढरीस तुकोबांच्या वंशजांकडे जी अभंगांची गाथा आहे तिचे प्रारंभीं "श्रीगुरुपरंपरा ॥ श्रीराघव चैतन्य ॥ श्रीकेशव चैतन्य ॥ श्रीबाबा चैतन्य ॥ गुरुमंत्र रामकृष्ण हरी ॥" असा उल्लेख आहे. इंदुप्रकाश गाथेच्या प्रारंभहीं "श्रीनिवृत्तिनाथाय नमः ॥ श्रीज्ञानेश्वराय नमः ॥ श्रीराघवचैतन्य श्रीकेशवचैतन्य श्रीबाबाचैतन्य सद्‌गुरुभ्यो नमः॥" असाच आहे.

( ३ ) निळोबाराय परंपरेच्या अभंगांत म्हणतातः—

**राघवचैतन्यें केलें अनुष्ठान । त्यासी द्वैपायनें कृपा केली ॥ ४ ॥**
**राघवाचरणीं केशव शरण । बाबाजीसीं पूर्ण कृपा त्याची॥ ५ ॥**

( ४ ) बहिणाबाई म्हणतातः—

**तेणें राघवीं विचार ठेविलासे ॥ ७॥**
**केशवचैतन्य बाबाजीचैतन्य । झालेसे प्रसन्न तुकोबासी ॥ ८ ॥**

केशव व बाबाजी हे एकच असते तर दोन्ही नांवांपुढें चैतन्य

असें पद आलें नसतें. शिवाय 'झालेसे' ह्या क्रियापदांत एकवचन नाहीं. बहिणाबाई देवाशीं भांडण यावरील २४ व्या अभंगांत ( पृ. स. १४६ ) ह्मणतातः—

**बाबाजीचे हातें तुकोबाचें ऋण। फेडविलें जाण येणें खरें ॥७॥**

( ५ ) महिपतबावांचेंही हेंच सांगणें आहे. तेही गुरुपरंपरा देतांना हे तिन्ही पुरुष भिन्नभिन्न असेंच म्हणतात. पुढील ओवी ( भक्तलीलामृत अ० ५–२९७ ) स्पष्टच आहे:—

**राघवचैतन्य जगविख्यात। केशवचैतन्य महाभक्त।**
**बाबाचैतन्य प्रसिद्ध संत। ज्यांणीं भक्तिपंथ स्थापिला ॥**

( ६ ) बहिणाबाईचे शिष्य दीनकवि म्हणतात:—

**राघो चैतन्यें भरी। केसो चैतन्यें पूर्ण लहरी।**
**बाबाचैतन्या परी। तेचि ते लाधली ॥ २८ ॥**

( ७ ) रंगनाथस्वामींनीं आपल्या संतमालिकेंत 'राघवचैतन्य केशवचैतन्य। बाबाचैतन्य तुकोबा' ( ९७ ) ह्याप्रमाणें तुकोबांचा त्यांच्या त्रयीसह उल्लेख केला आहे.

( ८ ) देहु येथील अनेक जुन्या हस्तलिखित बाडांतून 'राघवचैतन्य याचे शिश्य केशवचैतन्य याचे शिश्य बाबाजीचैतन्य याचे शिश्य तुकोबाचैतन्य' असेंच लिहिलेलें मला आढळलें. हीं बाडें तुकोबांच्याच घराण्यांतील पुरुषांनीं लिहिलेलीं असल्यामुळें तुकोबांच्या घराण्यांत केशवचैतन्याहून बाबाचैतन्य हे पुरुष भिन्न असल्याचें स्पष्ट दिसतें.

ह्या प्रमाणाष्टकावरून 'चैतन्य कल्पतरू' कर्त्या निरंजनबावांचें अट्टहासाचें सांगणें कीं केशव व बाबाजी हे एकच पुरुष होत हें म्हणणें खोटें ठरतें.

जर ओतुरास 'केशवचैतन्यांची' समाध प्रसिद्ध आहे म्हणून सांगतात आणि राजर्षी हे आपण केशवचैतन्यांचे वंशज आहोंत

ह्मणून ह्मणतात तर मग बाबाजीचैतन्यांची समाध कोठें आहे? ओतुरास एकच समाध आहे, ती गांवांपासून एक मैलावर आहे व ती केशवचैतन्यांची आहे असें म्हणतात.

१२ वरील सर्व विवेचनावरून तुकोबांची त्रयी निश्चित आहे, पण राघवचैतन्यांच्या मागें जावयास निर्बाध सर्वसंमत प्रमाण उपलब्ध नाहीं असेंच म्हणावें लागतें. राघवचैतन्यांचा वडवाळसिद्धांसी संबंध लावण्यास बिलकूल आधार नाहीं, तसेंच बंगालच्या श्रीकृष्णचैतन्यांच्या संप्रदायाशींही तुकोबांचा दूरचाही संबंध दिसत नाहीं. बंगाल्यांत श्रीकृष्णचैतन्य उर्फ गौरंगप्रभु नांवाचे एक विख्यात कृष्णभक्त पंधराव्या शतकांत होऊन गेले. बंगालभर श्रीकृष्णभक्तीचा त्यांनीं प्रसार केला व आजही बंगाल्यांत जी कृष्णभक्ति लोकप्रिय झाली आहे ती त्यांच्याच प्रभावाचें फळ होय. श्रीकृष्णचैतन्यांचें अत्यंत प्रेमळ व रसभरित चरित्र बाबू शिशिरकुमार घोस यांनीं इंग्रजी भाषेंत लिहिलें आहे. आंग्लभाषाभिज्ञांनीं तें अवश्य वाचावें. त्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागाच्या २६२ व्या पृष्ठावर ( इ. स. १८९८ ची आवृत्ति ) बाबूंनीं लिहिलें आहे कीं, " पुण्याचे संत तुकाराम हे गौरंगप्रभूचे किंवा त्यांच्या शिष्याचे शिष्य होत हें ठरवणें अनवश्यक आहे म्ह० ही गोष्ट उघडच आहे. " गौरंगप्रभु पंढरपुरांतून गेले, पंढरपूर हें तुकोबांचे गांव होतें, गौरंगप्रभूंची स्वप्नांत उपदेश करायचीच पद्धत होती इ० गोष्टी त्यांनीं लिहिल्या आहेत, त्यामुळें तुकोबांना गौरंगप्रभूंचा किंवा त्यांच्या कोणातरी शिष्याचा उपदेश झाला होता असा कित्येकांचा समज झालेला आहे, पण तुकोबांचा बंगाल्यांतील चैतन्यसंप्रदायाशीं दूरचाही संबंध लावतां येईल असें मला वाटत नाहीं. एक तर कृष्णचैतन्य समाधिस्थ होऊन तुकोबांच्या जन्मकाळीं ७५ वर्षें झालीं होतीं. त्यांचा काळ शके १४०७–१४५५ हा होय, यानंतर ७५

वर्षांनीं तुकोबांचा जन्म झाला ! कृष्णचैतन्यांनींच बाबाचैतन्यांच्या रूपानें स्वप्नांत येऊन तुकोबांस उपदेश केला असें कोणी म्हणेल तर मग कृष्णचैतन्यांचे मागें केशव व राघव चैतन्य हे होते असें म्हणावें लागेल, पण हेंही कोणी पत्करणार नाहीं. अर्थात् श्रीकृष्ण-चैतन्य हे तुकोबांचे गुरु होते असें बिलकूल मानतां येत नाहीं. आतां राघवचैतन्य हे कृष्णचैतन्यांचे शिष्य होते असें मानलें तर कृष्णचैतन्यांच्या प्रसिद्ध शिष्यांत राघवचैतन्य या नांवाचे कोणी पुरुष नाहींत व राघवचैतन्यांचे गुरु कृष्णचैतन्य होते यास कोठेंही प्रमाण नाहीं, म्हणून कृष्णचैतन्य किंवा त्यांचे कोणी शिष्य तुको-बांचे गुरु होते हें ह्मणण्यास आधार नाहीं. शिवाय बंगाल ओरिसा प्रांतांत जो कृष्णचैतन्यांचा संप्रदाय आहे तो मध्वाचार्यांच्या द्वैत-पंथांतून निघाला आहे. त्यांत राधाकृष्णांची भक्ति विशेष आहे. चैतन्य व वाल्लभ संप्रदायांत राधाकृष्णभक्तीचें विशेष माहात्म्य आहे, महाराष्ट्रीय ( तुकोबासगट ) कोणत्याही भक्ताच्या उपासनेंत राधेचें तसें विशिष्ट माहात्म्य नाहीं. शिवाय तुकोबांचा संप्रदाय द्वैताचा नव्हे, अद्वैताचा आहे. तुकोबांच्या अभंगांत अद्वैतसिद्धांत स्पष्टच आहे. या कारणास्तव त्यांच्या संप्रदायाचा कोणत्याही निव्वळ द्वैती संप्रदायाशीं संबंध जोडणें शक्य नाहीं. चैतन्यसंप्रदाय व महाराष्ट्रीय भागवतसंप्रदाय हे दोन्ही कृष्णभक्तीचे संप्रदाय खरे, पण चैतन्यसंप्रदायाचें कोणतेंही विशिष्टत्व तुकोबांच्या अभंगांत नाहीं व महाराष्ट्रीय भागवतधर्माचे प्रवर्तक जे ज्ञानेश्वरनामदेव-नाथादि कृष्णभक्त त्यांच्या आचारविचारांहून रेसभरही निराळे-पण तुकोबांच्या अभंगांत व चारित्रांत नाहीं, मग महाराष्ट्राबाहेरचे संस्कार त्यांच्यावर घडले असें ह्मणण्यांत तात्पर्य काय आहे ? बंगा-लच्या कृष्णचैतन्याविषयीं आमचा प्रेमादर आहे, पण त्यांच्या संप्र-दायाशीं तुकोबांचा दूरचाही संबंध लावण्यास कांहीं एक आधार

नाहीं हें स्पष्ट सांगितलें पाहिजे. कृष्णभक्तीचे वैष्णवसंप्रदाय भरतखंडांत बरेच आहेत, पण त्या प्रत्येकाचें कांहीं विशिष्टत्व आहे. तसें पंढरपूरच्या वैष्णवसंप्रदायाचेंही विशिष्टत्व आहे. तें विशिष्टत्व ज्ञानेश्वरींत प्रथम प्रकट झालें व त्याच मोहरेवर नामदेवनाथतुकोबादि आपले सर्व संत गेले आहेत. या सर्वांची सर्वबाबतींत पूर्ण एकवाक्यता आहे. आपलें सोडायचें नाहीं, बाहेरचें सहसा घ्यायचें नाहीं हा जो महाराष्ट्रीयांत एक प्रकारचा चिवटपणा आहे, व तुकोबांच्या स्वभावांतही मराठ्यांची जी चिकाटी व धडाडी आहे त्या दृष्टीनें पाहिलें तरी बंगालच्या चैतन्यसंप्रदायाशीं तुकोबांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असें स्पष्ट ह्मणावें लागतें.

१३ स्वप्नांत गुरूचा उपदेश झाल्यानंतरच मला कवित्वस्फूर्ति झाली असें तुकोबांनीं आत्मचरित्रपर अभंगांत ह्मटल्याचें वाचकांस आठवतच असेल. या तुकोबांच्याच खास उद्गारावरून त्यांनीं गुरूपदेशापूर्वी कवित्व केलें नव्हतें हें उघड आहे. ही कवित्वस्फूर्ति त्यांना नामदेवांच्या प्रेरणेनें झाली. व्युत्पत्तीच्या बळावर कविता करणारे कवि पुष्कळ सांपडतात, पण प्रसादाचा रंग दैवी स्फूर्तीवांचून येत नसतो. तुकोबांना स्फूर्ति कशी झाली याबद्दल त्यांचे स्वतःचे दोन अभंग आहेतः—

**नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें । सवें पांडुरंगें येवोनीयां ॥ १ ॥**
**सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नये ॥ २ ॥**
**माप टाकी सळे धरिली विठ्ठलें । थापटोनी केलें सावधान ॥ध्रु०॥**
**प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले ते शेवटीं लावी तुका॥३॥**

पांडुरंगासह नामदेव स्वप्नांत आले, त्यांनीं स्वप्नांत मला जागें केलें व सांगितलें कीं ‘ कवित्व कर, वाणी व्यर्थ वेंचूं नकोस. तूं कवितेचें माप टाकीत चल, तुझा अभिमान विठोबानें घेतला आहे असें नामदेवांनीं मला काम सांगितलें व थापटून जागें केलें. शत-

कोटी अभंगाचें प्रमाण नामदेवांनीं सांगितलें व त्यांनीं अभंग करून जी बाकी संख्या राहिली होती ती, तुकोबा म्हणतात, मीं पुरी केली.'

**द्याल ठाव तरी राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥ १ ॥**
**आवडीचा ठाव आलोसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ २ ॥**
**शेवटील स्थळ नीच माझी वृत्ति । आधारें विश्रांती पावेइन ॥३॥**
**नामदेवापायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे॥४॥**

तुम्ही आश्रय द्याल तर तुमच्या संगतीला राहीन. संतांच्या पंगतींत ( ओळींत, माळिकेंत ) पायांपाशीं राहीन. अगदीं शेवटचें स्थळ मला पुरें. माझी चित्तवृत्ति अजून मलिन आहे. पण आपल्या आधारानें राहून मी विश्रांति पावेन. नामदेवानें पांडुरंगाला बरोबर आणल्यामुळें तुकोबांला स्वप्नांत पांडुरंगाचें दर्शन झालें व स्वप्नांतून जागे झाल्यावरही त्याच्या प्रसादाचा आनंद चित्तांत भरून राहिला.

वरील दोन्ही अभंगांचा स्पष्टार्थ वर दिला आहे. त्यावरून असें दिसतें कीं—तुकोबांना स्वप्नांत पांडुरंग व नामदेव यांचें दर्शन झालें. 'यापुढें लोकांशीं वृथा भाषण करण्यांत वाणी खर्च न करितां ती कवित्व करण्यांत खर्च कर. तूं आपला अभंगामागें अभंग बोलत जा. पांडुरंगानें तुझा अभिमान घेतला आहे. तो तुझ्या पाठीशीं उभा आहे. तुझ्या वाणींत प्रेम, प्रसाद, स्फूर्ति देण्याचा देवाचा संकल्प झाला आहे' असें नामदेवांनीं तुकोबांस देवाच्या समक्ष आश्वासन दिलें. शतकोटि अभंगांचा नामदेवांचा संकल्प होता पण तो कांहींसा अपुरा राहिल्यामुळें बाकीचे अभंग रचून तुकोबांनीं ती संख्या[1] पुरी केली. दुसऱ्या अभंगांत तुकोबांनीं देवाची

---

१ महिपतबावांनीं भक्तिलीलामृत अ० ३२ मध्यें शतकोटीचा हिशेब असा दिला आहे कीं नामदेवांनीं ९४ कोटी ४० लक्ष अभंग रचून शेवटीं ९ लक्ष

प्रार्थना केली आहे. तुकोबा पांडुरंगांस विनवितात, ' देवा ! तुह्मी आश्रय द्याल, कृपा कराल तर मी ज्ञानोबा, नामदेव, नाथ, कबीर यांच्याच निरंतर संगतींत राहीन, त्यांचा अनुभव अंगीं जडेल असे सायास करीन. अशा संतांच्या मालिकेंत अगदी शेवटचें स्थळ मला दिलेंत तरी पुरे ! ते सर्व महात्मे पुण्यपुंज होते. अद्याप माझ्या वृत्तींत मलिनता आहे असें मला भय वाटतें. पण आपला व यांचा आधार असला ह्मणजे मी शुद्धमति होऊन आपल्या स्वरूपीं समरस होऊन परमानंद पावेन. ' ह्यानंतर स्वप्नांत तरी देवाची भेट झाली हा नामदेवाचाच उपकार आहे असें कृतज्ञतापूर्वक आठवून तुकोबा ह्मणतात कीं स्वप्नांतून जागृतींत आल्यावर मी आपल्याकडे पाहूं लागलों तों हें स्वप्न अनेक मिथ्या स्वप्नांपैकीं नसून देवभक्तांच्या भेटीचा व कृपेचा आनंद माझ्या ह्रृदयांत संचरला आहे व त्यांचा प्रसाद मजवर खास झाला आहे असें मला जाणवलें !

---

अभंग ललिताचे केले व बाकीचे ५ कोटी ५१ लक्ष अभंग तुकोबांस करण्यास सांगितलें ! तुकोबांच्या मुखांतून एकंदर अभंग किती प्रगट झाले याची बरोबर मोजमाप करितां येत नाहीं. यासंबंधानें दोन अभंग प्रसिद्ध आहेत.'वेदाचे अभंग केलें श्रुतिपर ' हा अभंग इंदुप्रकाश गाथेच्या चरित्रभागांत दिला आहे. यांत १ कोटी अभंग भक्तिपर, १ कोटी ज्ञानपर, एक कोटी अनुभवपर मिळून ३ कोटी, ७५ लक्ष वैराग्यपर व ७५ लक्ष नामपर मिळून आणखी दीड कोटी, असे एकंदर ४॥ कोटी ठेकळ विषयांवरील अभंग झाले. शिवाय ६० हजार उपदेशपर व ६० हजार रूपवर्णनपर मिळून १ लक्ष २० हजार. बाकीचे कांहीं श्रुतिपर, आत्मबोधपर वगैरे असा एकंदर हिशेब सरासरी ५कोटी ७० लक्षांचा दिला आहे ! याशिवाय असाच एक दुसरा अभंग मला मिळाला आहे त्यांत ७ कोटी अभंग तुकोबांनीं केल्याचें सांगून त्यापैकीं ६॥ कोट अभंग गणपतीनें स्वहस्तानें लिहिल्याचें सांगितलें आहे ! कसेंही असो आपल्या वांट्याला महाराजांचे साडेचार हजारच उरले आहेत ही गोष्ट खरी !!

# प्रकरण आठवें.



# चित्तशुद्धीचे उपाय.

तुका ह्मणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दीस जागृतीचा ॥१॥

*　　*　　*　　*

बैसोनी निवांत शुद्ध करी चित्त। तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥
येवोनी अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसालियां ॥ २ ॥

१ अध्यात्मसार. २ नाथांचें चिरंजीवपद व तुकोबांची सावधानता. ३ तुकोबांनीं साधनमार्ग कां धरिला ? त्यांच्या लोकप्रियतेचें बीज. ४ मनोजयाचा उपाय. ५ तुकोबांच्या मनाशीं झटापटी. ६ कनककांताविषयक वैराग्य. ७ लौकिकाची चाड. ८ जनसंगाचा कंटाळा. ९ छलकवादकांच्या उपसर्गानें झालेला मनःक्षोभ. १० एकांतवास व त्याचें सुख. ११ अहंकार कसा मावळला. १२ स्वदोषांचें निवेदन. १३ सत्संग व १४ नामसंकीर्तन.

१ जीव ब्रह्मच आहे. ब्रह्माहून वेगळा नाहीं हा जर शास्त्राचा सिद्धांत व संतांचा अनुभव आहे तर आपल्या ब्रह्मस्वरूपाची प्रतीति सर्व जीवांस कां नसावी ? ब्रह्म सर्वगत सदा सम आहे, परमात्मा जवळी अंतरीं आहे, सर्व भूतांच्या हृदयांत आहे, सर्वभूतांतरात्मा आहे, सर्वव्यापी सर्वसाक्षी आहे, जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं भरला आहे, तयावीण रिता ठाव नाहीं—हें जर खरें आहे तर तो सर्वांस सर्वकाळीं सुलभ कां नसावा ? ' तरी पवित्र आणि रम्य । तेवींच सुखोपाय सुगम्य । आणि सुसुख परमधर्म्य । वरी आपणपां जोडे ॥ ( ज्ञाने० ९—५५ ) ह्म० ब्रह्मसुख पवित्र, उत्तम, सुगम्य, सुसुख, सुखोपाय, सुधर्म्य असें जर आहे तर सर्व जीवांच्या उद्धा

त्यावरच कां पडत नाहींत ? चार दमड्यांसाठीं जे अहर्निश धडपड-तात त्यांनीं अशा अनायासें मिळणाऱ्या परमसुखाच्या मार्गें कां लागूं नये ? आयत्या ब्रह्मसुखाचा आस्वाद न घेतां संसार दुःखसा-गर आहे, भवनदी दुस्तर आहे, मायामोह दुर्घट आहे, विषय-वासना अनिवार आहे असें नित्य रडगाणें गात हे संसारालाच विळखा घालून कां बसतात ? आपलें सहजसिद्ध अमरपद सोडून जन्म-मरणाच्या नांवानें खडे कां फोडितात ? मोक्ष दुर्लभ कां ह्मणतात ? परमार्थ बिकट कां वाटतो ? जपतपाध्ययनादि नाना साधनांचे सायास कां करितात ? घरचें स्वानंदसाम्राज्य टाकून विषयांचे काचमणि गोळा करणारे रंक कां बनतात ?—

याचाच तर सत्पुरुषांना चमत्कार वाटतो ! जीव अशी उलटी भाषा बोलतात याचें त्यांना परकाष्ठेचें हंसूं येतें. ही मृत्युलोकची उफराटी राहाटी पाहून त्यांना विस्मय वाटतो. ते म्हणतातः—सोडा, हें बोलणें सोडा. उलट बोलायला शिका, उलट पाहायला लागा. मी जीव आहें, संसारी आहें, दुःखी आहें हें वाटणें सोडा व मी ब्रह्म आहें, मुक्त आहें, सुखी आहें असें म्हणा म्हणजे तुह्मी खरोखरीच मुक्त व सुखी आहांत ! किल्ली उजवीकडून फिरवीत बसलात ती डावीकडून फिरवा कीं कुलूप झटकन् उघडेल. जातां तिकडे न जातां उलट या, पुढें न पाहतां मागें पहा, बाहेर न पाहतां आंत पहा, ओघ सोडून उगमाकडे वळा कीं खरोखरीच तुह्मी मुक्त आ-हांत, सुखी आहांत, ब्रह्मरूप आहांत ! यांत अवघड काय आहे ? परमार्थ याहून निराळा कोठें आहे ? जीव आपल्या संकल्पानेंच बांधला आहे व संकल्पानेंच मोकळा आहे. मी बद्ध जीव आहें असें हा घोकीत बसला आहे म्हणून जन्ममरण, पापपुण्य, विधि-निषेध, बंधमोक्ष, इ० गिरक्या खात हा भोंवडत आहे; पण पायां-चे चवडे सोडून नळिकायंत्रांवरून उड्डाण करणाऱ्या पोपटाप्रमाणें

यानें अहं व मम हे दोन संकल्प सोडले तर हाही तत्क्षणीं मुक्त आहे. कोण कोणाला बांधतो व कोण कोणाला सोडवितो ? एक संकल्प ! संकल्प करावा तसा मनावर चित्रपट उभा राहतो. संकल्प, कल्पना, संसार, वासना, वृत्ति, मन, माया हे 'सप्तही एकरूपी 'आहेत. संकल्पानें जर जीव बांधला आहे तर संकल्प सुटला कीं हा मुक्त आहे. अहंमम या दोन दोऱ्यांनीं हा जखडला आहे तर या दोऱ्या सोडल्या कीं मुक्तपण सहजच आहे. संकल्पाचें किडाळ जळून गेलें कीं, जीवाचा हिणकसपणा जाऊन त्याचेंच सोनेंच होतें. तें सिद्धच आहे. कल्पनेचेंच बंधन व कल्पनेचाच मोक्ष. आपलें आपण बंधमोक्षरहित निर्विकल्प निरंजन सुखरूप ठायींचे ठायींच आहोंत. पण—

अश्रद्दधानाःपुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ गीता. ९–३ ॥

जीव ही श्रद्धा बाळगील तर तत्क्षणीं तो मुक्त आहे. जीवाची तशी एकदम श्रद्धाच होत नाहीं म्हणून परमार्थप्राप्तीचा खटाटोप त्याला करावा लागतो. साधनांचे कष्ट करावे लागतात.—

२ तुकोबांनीं हा सगळा वेदांत शतशः वाचला, ऐकला व सांगितला होता. ते ठरलेल्या साधनमार्गानें चालले होते. पंढरीची वारी, एकादशी व्रत, कथाकीर्तनश्रवण, सद्ग्रंथाभ्यसन हें सर्व त्यांचें निग्रहपूर्वक चाललें होतें. गुरुप्रसाद झाला होता. नामदेवरायांनीं स्वप्नांत भेट देऊन कवित्व करण्याची स्फूर्ति दिल्याप्रमाणें कीर्तनप्रसंगीं व अन्यस्थळींही अभंगांचे लोट त्यांच्या मुखावाटें लोटत होते. श्रोते धन्यवाद देत होते. कीर्तिही चहूंकडे फैलावत चालली होती. संत म्हणून कित्येक मानूं लागले होते, लोक पायांवर डोकें ठेवून कोणी त्यांच्या वक्तृत्वाची, कोणी कवित्वशक्तीची, कोणी साधुत्वाची तारीफ करीत होते. एकंदरींत बस्तान चांगलें बसत चाललें होतें ! २७।२८

वर्षांचें वय. या वयांत इतकी लोकमान्यता मिळण्याचें थोड्यांच्याच प्रारब्धीं असतें. पण बहुतेक अर्धवट परमार्थी एवढ्यावरच संतुष्ट होऊन गुरुत्वाचा बाजार मांडतात व शेवटीं आपला बोजवारा उडवून घेतात ! अशीं उदाहरणें आपल्या डोळ्यांसमोरही थोडींथोडकीं नाहींत. पांचचार वर्षें झटून परमार्थ करावा, चार दोन स्वप्नदृष्टांत, थोडाफार साक्षात्कार झाला कीं तेवढ्यानेंच कृतार्थता मानावी, भोंवतालीं उदो उदो करणारीं शुद्धभावाचीं पण भोळींबापुडीं गोळा होताच त्यांच्या मुखांनीं स्तुतिस्तोत्रें ऐकून आतां मी कृतार्थ झालों असें वाटून तेथेंच मुक्काम करावा, रिद्धिसिद्धींचे थोडेसे मासले पाहून भुलून वाट चुकावी व ब्रह्मपर्वताच्या पंचवीस पायऱ्या चढून वर गेला असल्यास पन्नास पायऱ्या गडगडून खालीं रसातळास जावें असा प्रकार शेंकडों ठिकाणीं होत असतो ! ज्यांचा आरंभच दांभिकपणांत असतो त्यांची गोष्ट सोडून द्या, पण जे मनोभावें परमार्थाला लागतात त्यांतलेही शेंकडोजण याप्रमाणें नित्य गडगडत असतात. अशासाठीं नाथांनीं ' चिरंजीवपद ' ह्मणून एक ४२ ओव्यांचें बहारीचें प्रकरण लिहिलें आहे. साधकांनीं तें सावधानतेसाठीं निरंतर डोळ्यांपुढें ठेवावें. विषय केवळ प्रापंचिकांनाच नाडतात असें नसून साधकांनाही कसें फशीं पाडतात हें यांत नाथांनीं सांगितलें आहे. साधकाला प्रथम अनुताप आणि वैराग्य पाहिजे. तो देहसुखाला लालचावेल तर सारा परमार्थ मूळांतच खुंटेल. 'त्याग केला पूज्यतेकारणें । सत्संग सोडूनि पूजा घेणें । शिष्यममता धरोनि राहणें । हें वैराग्य राजस. " हें परमार्थ बुडविणारें वैराग्य कुचकामाचें होय. घर सोडून मठ बांधला, बायकापोरें सोडून शिष्यशाखा मिळविली यानें काय साधलें ? विषयभोगेच्छा समूळ सांडणें, व प्रारब्धानें विषय प्राप्त झाले तरी तेथून मन निष्टंक काढणें हें सात्विक वैराग्यच साधकाला अवश्य पाहिजे. विषय आणि जनमान ह्म. लौकिक-

प्रतिष्ठा यांचा साधकानें सर्वथा त्याग केला पाहिजे. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांचही विषय साधकाला कसें झकावितात तें पहा: जनाला थोडें वैराग्य दिसलें कीं ते याची स्तुति, सन्मान व पूजा करितात, हा हरीचा अवतार आह्मांला तारावयाला प्रगट झाला आहे असें नित्य स्तुतिस्तोत्र गातात, 'महाराज' ह्मणून गौरव करितात—व याला ती शब्दगोडी लागून हा भुलतो. 'महाराज' ह्मणून स्तुति करितील तेच याला आवडतात. व इतर अप्रिय होतात. मौज ही कीं स्तुति करणारेच पुढें मागें निंदा ही करूं लागतात, पण हा मात्र स्तुतीच्या शब्दाला भुलून स्वहिताला कायमचाच मुकतो. शब्द-विषय साधकाला याप्रमाणें नाडतो. याच्या भोंवती नाचणारे कित्येक याला मृदु आसनें देतात, सुंदर पलंग, उंची वस्त्रेंपात्रें व देवाला उचित असे उपचार देतात, नरनारी शुश्रूषा करितात, हातपाय मस्तक रगडतात, मग हा त्या मृदुस्पर्शाला भुलतो, देहकष्ट याला नकोसे वाटतात या प्रमाणें स्पर्शविषय याला बाधक होतो. याच न्यायानें जन गोडगोड खाऊं घालतात, याला आवडेल तें पुरवितात, सुमनहार, चंदनाच्या उट्या, केशरविलेपन, मधुर गायन, इ० रूप, रस, गंध हे विषयही त्याला बुडवितात. पण हा सावध राहत नाहीं. याला पूजकांची ममता लागते. कोमळ कंटकासारखें याचें कोंवळें वैराग्य अशा संगतींत पार मोडून जातें. याप्रमाणें हा जनमानाच्या नादीं लागतो. असे हजारो साधक आजवर डुबले आहेत. यांतून पुन्हां वर डोकें निघणें कठिण, 'जरी कृपा उपजेल भगवंतीं। तरीच मागुता होय विरक्त.' खरा विरक्त कसा असतो?—

**तो विरक्त कैसा ह्मणाल। जो मानलें सांडी स्थळ।**
**सत्संगीं राहे निश्चळ। न करी तळमळ मानाची ॥ २६ ॥**
**मांडीना स्वतंत्र फड। म्हणे अंगा येईल अहंता वाड।**
**धरूनि जीविकेची चाड। न बोले गोड मनधरणी ॥ २७ ॥**

नावडे प्रपंचजनीं बैसणें । नावडे कोणासीं बोलणें ।
नावडे योग्यता मिरवणें । बरवें खाणें नावडे ॥ २८ ॥
नावडे लौकिक परवडी । नावडती लेणीं लुगडीं ।
नावडे परान्नगोडी । द्रव्यजोडी नावडे ॥ २९ ॥
नावडे स्त्रियांत बैसणें । नावडे स्त्रियांचें पाहणें ।
नावडे स्त्रियांचें रगडणें । त्यांचें बोलणें नावडे ॥ ३० ॥
स्वस्त्रीसही कार्यापुरतें । पाचारावें स्पर्शावें निरुतें ।
परी आसक्त होवोनि तेथें । सर्वथा चित्तें नसावें ॥ ३४ ॥
नरनारी शुश्रूषा करिती । भक्तिममता उपजविती ।
परी शुद्ध जो परमार्थी । तो स्त्रियांचे संगतीं न बैसे ॥ ३५ ॥
अखंड एकांतीं बैसणें । प्रमदासंगीं न राहणें ।
जो निःसंग निराभिमानें । त्यापैं बैसणें सर्वदा ॥ ३६ ॥
कुटुंबआहाराकारणें । अकल्पित न मिळे तऱ्ही कोरान्न करणें ।
ऐसे स्थिती जें वर्तणें । तें जाणणें शुद्ध वैराग्य ॥ ३७ ॥
ऐसी स्थिति नाहीं ज्यासी । तंव कृष्णप्राप्ती कैंची त्यासी ।
यालागीं कृष्णभक्तासी । ऐसी स्थिति असावी ॥ ३८ ॥

या दहाच सुंदर ओंव्यांत नाथांनीं साधकाला किती उत्कृष्ट मार्ग दाखवून दिला आहे. खऱ्या विरक्ताच्या अंगीं हीं सर्व लक्षणें सहज असतात. ज्याचें कोमळ वैराग्य असेल त्यानें हा आरसा निरंतर आपल्यापुढें ठेवावा. ढिलेपणाचें वर्तन करून अखेर फसणारे बापडे सर्वकाळीं सर्वस्थळीं रगड असतात, पण खऱ्या विरक्ताचा आदर्श असें तुकोबारायासारखे पुरुष विरळ, त्यांनाच कृष्णभेटी होऊन चिरंजीवपद मिळतें. तुकोबांचें वैराग्य तीव्र जळजळित, त्यांची आत्मसंशोधनाची जागृति अखंड, नित्य अंतरंग शोधीत राहून आंतले चोर हुडकून काढून त्यांना धुडावून लावण्याची तत्परता भारी. असा आत्मपरीक्षणाचा अभ्यास ठेवल्यानेंच चित्तशुद्धि होत असते, मलिनसंस्कार धुवून जातात व नवे जडत नाहींत. साधकाला हा अभ्यास डोळ्यांत तेल घालून अहोरात्र करावा लागतो. हा अभ्यास तुकोबांनीं कसा

केला हें आपणांस आतां पहावयाचें आहे. ग्रंथाध्ययन झालें, गुरूपदेश झाला तरी ज्याचें त्यानेंच जागृत राहून आत्मशोधनाचें कार्य सतत केलें पाहिजे. मन हें ओढाळ गुरूं आहे. त्याच्या गळ्यांत वैराग्याचें लोढणें अडकवून त्याची चाल मंद करीत करीत त्याला वश केलें पाहिजे. मनोनिग्रहावांचून इतर साधनें केव्हांही फोल होतात. मनोजय न झाल्यानें मोठमोठ्यांच्या तपश्चर्या भंग पावल्या आहेत, मी मी ह्मणणारे वीर नेस्तनावूत झाले आहेत, बडे बडे पंडित ज्ञानाच्या गिरिशिखरावरून रसातळाला गेले आहेत. मन बलिष्ठ आहे. दुर्जय आहे, दुराराध्य आहे.

**तुका म्हणे येणें । बहु नाडिले शाहणे ॥ ४ ॥**

ह्मणून विषयांकडे सतत धांवणाऱ्या मनोव्याघ्रावर पल्याण घालून जो त्याला मागें वळवील त्याची करामत सर्वांहून अधिक आहे. 'सोपें वर्म परी मन नाहीं हातीं' ही सर्वांची रड आहे ह्मणून—

**मागें परतवी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥ २ ॥**

असो. तुकोबांनीं मनाशीं कशा झटापटी केल्या, त्याला भगवंताच्या साह्यानें व कृपेनें वठणीवर आणण्यास काय काय परिश्रम केले, आशा, ममता, तृष्णा, प्रतिष्ठा, गर्व, लोभ इ. वृत्ति सावधानतेनें कशा जिंकल्या व ह्याप्रमाणें चित्तशुद्धीचा मार्ग धैर्यानें व निग्रहानें कसा चोखाळला हें आपणांस पाहावयाचें आहे.

३ येथें प्रथम एक गोष्ट नीट लक्ष्यांत ठेवली पाहिजे ती सांगून ठेवतों. तुकोबाराय सिद्ध कोटींतले पुरुष, वैकुंठाहून जगाचा उद्धार करण्यासाठीं भूलोकीं अवतरलेले, त्यांना चित्तशुद्धीच्या साधनांची गरज काय होती अशी कित्येक भाविकांना शंका येण्यासारखी आहे. जगाला वेदनीतीचा मार्ग दाखविण्यासाठीं, भक्तीचा डांगोरा पिटण्यासाठीं, संतमार्ग चोखाळण्यासाठीं आम्ही वैकुंठाहून आलों, देवाचा निरोप घेऊन आलों, असें तुकोबाराय स्वतःच जर सांगत

आहेत तर मग इतर सामान्य जीवांप्रमाणें तुकोबांनीं चित्तशुद्धीचे उपाय धुंडले व त्याप्रमाणें मग साधनसायास करून ते लोकोद्धाराच्या कार्यास समर्थ झाले हें ह्मणण्यांत तात्पर्य काय? जगाला उद्धरण्यास जे आले त्यांचें चित्त अशुद्ध कधीं होतें कीं त्यांना साधनांची अवश्यकता भासावी? ते मूळचेच मनाचे मालक होते तेव्हां त्यांना मनोजयासाठीं व मलिनवृत्ति शोधण्यासाठीं सायास करावे लागले हें ह्मणणें गैर नाहीं का? अशी भाविकांना पुढील भाग वाचतांना शंका येणें साहजिक आहे, त्यांस पुन्हां एकवार येथें उत्तर देऊन ठेवतों. भगवंताचीं व अवतारी महात्म्यांचीं चरित्रें म्हणजे त्यांनीं मनुष्यरूपानें येऊन केलेल्या त्यांच्या लीला होत. त्यांच्या चरित्रभर त्यांचें विभूतिमत्त्व ज्ञात्यांना स्पष्ट दिसत असतें. विभूतिमत्त्वाशिवाय त्यांचीं चरित्रें इतकीं पुण्यपावन, उज्ज्वल, व लोकोपकारक झालींच नसतीं. विभूतिमत्त्वाशिवाय इतकी निर्विघ्न कार्यसिद्धि, इतकी तेजस्विता, इतकें यश त्यांना मिळालें नसतें. मनीं धरिलें तें करून दाखवणें ही कांहीं सामान्य सिद्धि नव्हे. हें सर्व खरें, तथापि विभूतींनाही मनुष्यदेह घेऊन आल्यावर मनुष्यांसारखीच लोकसंपादणी करावी लागते, एरव्हीं त्यांच्या चरित्रांपासून जीवांना बोध घ्यायला जागा उरली नसती. महात्म्यांच्या चरित्रांत दैवी भाग व मनुष्यभाग असे दोन अंश प्रगट असतात. दैवीभागाचें आपण साश्चर्य कौतुक करावयाचें असतें, व त्यावरून त्यांचें विभूतिमत्त्व जाणावयाचें असतें. त्यांतील मानवी चरित्र जें असतें तें आपल्यांला उदाहरण घालून देण्यासाठीं असतें. गीतेंत भगवंतांनीं विश्वरूप दाखवून आपल्या ईश्वरत्वाची प्रतीति दाखविली आणि 'ममवर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः' ( ३—२३ ) हें तत्त्व सांगून वर्णाश्रमादि धर्मानें लोकस्थिति कायम रहाण्याचे नियमही बांधून दिले. रेड्याकडून वेद बोलवणें, भिंत चालविणें या गोष्टींनीं ज्ञानोबारायांनीं

आपलें ईश्वरत्व दर्शविलें आणि पैठणच्या ब्राह्मणांकडून शुद्धिपत्र मिळविण्याच्या खटपटीनें मनुष्याला उचित असा वर्तनक्रमहि सुचविला. तुकोबारायांनीं सदेह वैकुंठगमन करून आपलें विभूतिमत्त्व जातां जातां जगाला शेवटीं दाखवून दिलें आणि जन्मभर साधकाची दशा संभाळून जगाला भगवद्भक्तीचा धोपट मार्ग घालून दिला. ह्यांत त्यांचा परम कारुणिकपणाच स्पष्ट दिसून येतो. ' भूतांची दया हें भांडवल संतां' हें म्हणणें त्यांनीं स्वतः वागून सत्यसें जाणविलें आहे. तुकोबारायांनीं चित्तशुद्धीचे जे उपाय केले ह्मणून पुढें वर्णन येणार आहे त्यांतील हें बीज लक्ष्यांत ठेवून सदर प्रकरण किंबहुना महाराजांचें हें संपूर्ण चरित्र वाचावें. तुकोबाराय आपलें हृदय जितकें मोकळें करून बोलले आहेत तितक्या मोकळेपणानें दुसरे कोणी बोलले नाहींत. सर्वांना एकाच मुक्कामावर जावें लागतें. कोणाच्या उड्या मोठ्या पडतात, कोणाच्या लहान असतात. गोगलगाय शंभर पायांनीं चालत असून मंदमंद चालते, आणि वाघोबाची एकच उडी पण बारा हातांवर पडते. कोणी पिपीलिकामार्गानें जातात, कोणी विहंगममार्गानें जातात. एखादा गणिती चार उड्यांतच उदाहरण सोडवून त्याचें उत्तर काढतो, एखाद्याला क्रमानें जाऊन बारा उड्यांत तें उत्तर मिळतें. पहिल्याच्या बुद्धिमत्तेचें कौतुक होतें तरी क्रमानें सर्व पायऱ्या दाखविण्याची रीत सर्व विद्यार्थ्यांना समजते. त्यांतही चार उड्यांत उत्तर काढण्याइतकी बुद्धिमत्ता अंगीं असून जो शिक्षक मधली कोणतीही पायरी न गाळतां सर्व क्रम सर्वांस समजावून देतो तो अत्यंत लोकप्रिय होतो ! त्याची रीत सर्वांस समजते, त्याच्याच मार्गानें सर्वांस जावेंसें वाटतें, व जो सावधानतेनें त्याच्या पावलावर पाऊल देऊन जातो त्याला त्याच मुक्कामावर जातांही येतें. तुकोबांचा हाच मार्ग होता व अशा मार्गदर्शित्वामुळेंच ते अत्यंत लोकप्रिय झाले आहेत ! ' संसारतापें

तापलों मी देवा ' येथपासून तों ' तुका झाला पांडुरंग ' येथपर्यंत वाटेंतले सर्व मुक्काम तुकोबारायांनीं आपल्या अभंगांत स्पष्ट दाखविले आहेत. ' पतित मी पापी शरण आलों तुज ' हा पहिला दगड ठोकला तर तेथपासून तों ' बीज भाजुनि केली लाही । आह्मां जन्ममरण नाहीं ' या शेवटच्या मुक्कामापर्यंत वाटेंत मैलामैलावर दगड रोवून त्यांनीं हा भक्तिमार्गाचा रस्ता इतका धोपट करून दिला आहे कीं तुकोबांची अभंगवाणी हृदयांत ठेवून प्रत्येक मैल शोधीत साधकानें बेधडक अखेरच्या मुक्कामावर डोळे मिटून ( कां उघडे ठेवून ? ) जावें ! आजवर पुष्कळांनीं पुष्कळ रस्ते बांधले असतील; पण लहानथोर, सूज्ञअज्ञ, ब्राह्मणमहार, समर्थदुबळे, पुण्यपापी या सर्वांना निःशंकपणें जाण्यायोग्य असा सुगम, रुंद व आनंददायक रस्ता जसा तुकोबारायांनीं बांधला आहे, असा कोणींही कोठेंही बांधलेला नाहीं. जमीन वेदोनारायणाची, पण तुकोबांनीं कांहीं जुने दगड व कांहीं नवे स्वतः सायासानें फोडलेले दगड लावून हा राजमार्ग—नव्हे संतमार्ग—तयार केला आहे. जें ज्याला पाहिजे तें त्याला येथें मिळतें. मार्ग ओळखीचा वाटतो. तुकोबांच्या संगतीनें मनाला हुरूप येतो. मार्ग दूरवरचा तरी सुसाध्य वाटतो. आपल्या मनांत असेल तें येथें भेटतें, हवें तें मिळतें, न कळत पाऊल पुढें पडत जातें. वाटेंत रम्य उपवनें आहेत. त्यांत खुशाल रमावें व त्रिविध तापांपासून मुक्त व्हावें. जागोजाग अभंग—आरसे लावले आहेत त्यांत सावकाश आपलें तोंड पाहत बसावें व त्याची मलिनता काढून तें स्वच्छ करावें. रहदारीचा रस्ता असल्यामुळें संगतीचा दुष्काळ नाहीं. रस्ता निर्भय, रम्य आहे. तुकोबांनीं स्वतः जीवापाड कष्ट सोडून हा दिव्य मार्ग तयार केला आहे. आपण त्यांच्याबरोबर येथवर चालत आलों, पुढेंही त्यांच्या संगतीनचें चालत चालूं. त्यांनीं कसकसे कष्ट सोसले हें त्यांच्या मुखानेंच ऐकूं. ते स्वतः आतां कष्टाच्या पार

आहेत, तरी या रस्त्यावर त्यांची नजर आहे. चोरचहाडांचा त्रास या रस्त्याला अगदीं कमी आहे. चला तर आतां तुकोबांनीं मनोजय कसा केला; लौकिकापासून ते कसे झटकले, जनसंबध सोडून ते एकांतवासांत कसे रमले, अहंकारादि घरांतल्या चोराला त्यांनीं कसें दटावले भगवंताचें साह्य कसें मागितलें व मिळविलें, सर्व साधनांचें सार जें नामसंकीर्तन तें सत्संगतींत व एकांतांत किती आवडीनें केलें हा सर्व त्यांच्या चरित्राचा मनोरम भाग त्यांच्याच मुखानें आपण स्वस्थपणानें ऐकूं व त्यांच्याच कृपेनें आपणही एकेक कोस त्यांच्या मागोमाग जाऊं!

४ तुकोबांनीं आपल्या मनास परोपरीनें आळविलें आहे. मनोजयावांचून परमार्थ लटका आहे. दुनियेचें राज्य मिळवितां येईल, पण मनोजय करणें परमदुर्घट आहे, म्हणून पृथ्वीचें राज्य संपादणाऱ्या चक्रवर्ती राजापेक्षां मनाला कह्यांत वागविणाऱ्या साधूंची योग्यता सर्व देशांत फार मोठी समजली जाते. युरोपांत येशूख्रिस्त व साक्रेटीस यांची मान्यता कोणाही राजाला कधीं मिळाली नाहीं. आपल्या प्रिय भरतभूमींतही 'अनंताचि झाले जन्मोनियां मेले। होवोनियां गेले रावरंक' पण शुकाचार्य, भीष्म, हरिश्चंद्र, मारुतिराय, भरत, शंकराचार्य, तुळसीदास, मिराबाई, रामदास, एकनाथ, तुकोबाराय, ज्ञानोबाराय, शिवाजी राजे, अहल्याबाई इ० मनोजय करणाऱ्या सत्पुरुषांना जो मान आहे तो दुसऱ्या कोणाला मिळाला आहे? याचें कारण मनावर खोगीर ठेवून अंतःशत्रूंस जिंकणाऱ्या वीराची योग्यता अश्वारूढ होऊन रणांगणांत रिपुदळें लोळवणाऱ्या शूरापेक्षांही जास्त आहे. प्ऱ्हाद आपल्या बापास म्हणाला, "बाबा! आधी चित्तांतला आसुरभाव टाकून द्या कारण कीं तोच तुमचा खरा शत्रु आहे. 'समं मनो धत्स्व न सन्ति विद्विषः' म्ह० मन साम्यस्थितींत ठेवा, उच्छृंखळ व कुमार्गाकडे सहज धांवणाऱ्या मना-

पेक्षां दुसरा प्रबळ शत्रु कोणी नाहीं. मनाची समता राखणें हीच अनंताची महापूजा आहे" (भागवत ७–८–१०) योगवासिष्ठांत व भागवतांत मनोनिग्रहाचे उत्तम उपाय सांगितले आहेत. भागवतांतलें (स्कंध ११–२३) भिक्षुगीत अवश्य पहावें. आपल्या सुखदुःखाला कारण दुसरे लोक नाहींत. देवता नाहीं, ग्रहकर्मकाल यांपैकीं कोणीही नाहींत, तर केवळ मन आहे. संसार मनःकल्पित आहे. त्रिगुणात्मक अनंत वृत्ति मनापासून उद्भवतात. दान, स्वधर्म, यमनियम, कर्म, ज्ञान, सद्व्रतें या सर्वांचा उद्देश तरी मनाचें नियमन करावें हाच होय. ' परोहि योगो मनसः समाधिः ' ह्म० मनाची निश्चळता हाच परम योग आहे. ज्याचें मन समाहित–शांत आहे त्याला दानादिकांची आवश्यकता नाहीं, बरें ज्याचें मन समाहित नाहीं त्याला हीं साधनें अनुपयुक्त आहेत ! इंद्रचंद्रादि देव मनाचे अंकित झाले, पण मन कोणाच्या अंकित राहत नाहीं. अशा दुर्जय मनावर जो स्वार होईल तो सर्व बलिष्ठांहून बलिष्ठ होय ! मन काळाला आटपत नाहीं, मनाला रोग होत नाहीं, मन रोडावत नाहीं, मनाला पकडायला त्याचें स्थान सांपडत नाहीं ! तर मग असें हें मन वश व्हावें कसें ? नाथांनीं ' जेवीं हिरेनि हिरा चिरिजे । तेवीं मनेंचि मन धरिजे ' हा मनोजयाचा सर्वोत्कृष्ट उपाय सांगितला आहे. हिऱ्यानेंच जसा हिरा चिरला जातो, त्याप्रमाणें मनानेंच मन जिंकलें जातें. मनाला चुचकारून हरिगुरुभजनीं राबवावें, रंगवावें, स्वरूपीं भरावें हा एकच मनोजयाचा उपाय आहे. ' मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ' याप्रमाणें समर्थांनीं मनाला २०५ श्लोकांनीं आळवून हरिभजनाची गोडी दाखविली आहे. मन चंचल व दुर्निग्रह आहे असें अर्जुन म्हणाला तेव्हां ' अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ' ( गीता ६–३५ ) असा मनो-

नयाचाच देवानीं स्वत: उपाय सांगितला. ह्यावर ज्ञानोबाराय म्हणतात:—

वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरे ।
तरी केतुलेनि एकें अवसरें । स्थिरावेल ॥ ४१९ ॥
यया मनाचें एक निकें । जे देखिले गोडीचिया ठाया सोके ।
ह्मणोनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाइजे ॥ ४२० ॥

एकीकडून वैराग्याग्नीच्या ज्वाळांनीं चित्ताला जागें करून विषय सोडायला लावायचें व दुसरीकडून हरिचिंतनाची गोडी चाखवायची, याप्रमाणें वैराग्य व अभ्यास ह्या दोन्ही साधनांचा मारा करून मनोदुर्ग सर करायचा असतो. अभ्यास गुरुभक्तांनीं गुरुभक्तीचा करावा, प्रेमळांनीं सगुणभक्तीचा करावा व ज्ञात्यांनीं स्वरूपानुसंधानाचा करावा. तात्पर्य व फळ एकच आहे. गुरु, सगुण व निर्गुण तत्त्वत: एकच आहेत. पण आवडीप्रमाणें यांपैकीं कोणताही अभ्यास दृढ केला तरी फलनिष्पत्ति एकच होते. या मनाचा एक मोठा गुण आहे कीं तें जेथें लगटेल तेथून तें उठायचें म्हणून नाहीं! त्याला प्रपंचाची गोडी आहे तर ही विश्वरचना दग्धपटवत् आहे हें त्याला सतत जाणवून तें प्रपंचाला विटेल असें दृढतम वैराग्य ठेवावें व दुसरीकडून त्याला परमार्थाची गोडी लावीत लावीत हरिभजनीं समाधी द्यावी! मनानेंच मनाला मारणें, मन हरिभजनीं रंगवून उन्मन करणें, हरिस्वरूपीं झगटून मन मनपणानें नुरवणें ह्मणजेच मनोजय करणें होय! नाथ ह्मणतात:—

या मनाची एक उत्तम गती । जरी स्वयें लागलें परमार्थी ।
तरी दासी करी चारी मुक्ती । दे बांधोनि हातीं परब्रह्म॥६८७॥

मन स्वयें परमार्थीं लागेल तर मोक्षाचें गांठोडें आणून हातांत देईल, परब्रह्म हस्तगत होईल. एवढा महल्लाभ मन वश झाल्यानें होतो.

गति अधोगति मनाची हे युक्ति । मन लावी एकांतीं साधुसंगें॥१॥

५ आतां मनोजयाचें हें महत्त्व व वर्म जाणून तुकोबांनीं मन कसें जिंकलें तें आपण पाहूं. ते म्हणतात:—

**मग करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें साधन ।**
**मोक्ष अथवा बंधन । सुखसमाधान इच्छा ते ॥१॥**

गति अथवा अधोगति देणारें मन आहे. मन सकळांची माउली आहे. साधक, वाचक, पंडित, श्रोते, वक्ते या सर्वांना बाहू उभारून तुकोबा सांगतात कीं ' मनावांचून दुसरें दैवत नाहीं, याला आधीं प्रसन्न करून घ्या. ' मन प्रसन्न करून घेणें ह्मणजे त्याला विषयाच्या ओढीपासून खेंचून धरून हरिभजनाच्या खुंट्याला बांधणें होय ! मनावर सदा राखण पाहिजे, हें जेथें जेथें जाईल तेथून तेथून सावध राहून याला परतवलें पाहिजे.

**तुका ह्मणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दीस जागृतीचा ॥ ४ ॥**

नित्य जागृत राहून या मनाला आवरावें लागतें. मदोन्मत्त हत्ती जसा अंकुशावांचून आवरत नाहीं त्याप्रमाणें हें चंचल मन अखंड सावधानता राखल्यावांचून ठिकाणावर राहतच नाहीं. तुकोबांनीं मनाला कधीं दैवत ह्मणावें, कधीं चंचल म्हणावें, कधीं दुर्जन म्हणावें, पण सर्व प्रसंगीं देवाला स्मरून देवावर त्याला संभाळण्याचा भार टाकावा. मनुष्य आपल्या बुद्धीनें या चंचल मनाला किती आवरील ? किती सावध राहील ? एका क्षणांत पन्नास ठिकाणीं भऱ्याऱ्या मारणारें हें मन देवानें कृपा केली तरच आवरणारें आहे.

**आवरितां मन नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥२॥**
**अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । ह्मणोनि अंतर तुझ्यापायीं ॥३॥**

देवा ! हें मन पहा संसाराचेंच चिंतन करितें. तुझ्या माझ्यांत हाच एक मोठा अडसर आहे. माझें भजनपूजन होतें पण अंतर्यामीं संसाराचें ध्यान सुटत नाहीं तोंवर भक्तिचें हें मला ढोंगच वाटतें. नारायणा ! धांव धांव. तूंच माझें अंतर भरून रहा.

**कामक्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पैलीकडे ॥ १ ॥**
**नुल्लंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥**

देवा! या मनापायीं मी फार हिंपुटी ( कष्टी ) झालों आहें. 'भयभीत पोटीं सदा दुःखी' असा मी आहें. हे मनाचे विकार तुला नाहीं ना आवरतां येत?—

**आवरितां तुझे तुज नावरती। थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें॥ २॥**
**तुका ह्मणे माझ्या कपाळाचा गुण। तुला हांसे कोण समर्थासी?४**

मनाच्या अनंत ऊर्मि पाहून एखादवेळ तुकोबांनीं अत्यंत निराश व्हावें! 'तुका ह्मणे माझा न चले सायास' हें मोकळेपणानें देवाला सांगावें.

**आतां कैचा मज सखा नारायण। गेला अंतरोन पांडुरंग॥**

मी उदास झालों तरी देवा! तुह्मी मात्र उदास होऊं नका.

**मन माझें चपळ न राहे निश्चळ। घडी एक पळ स्थिर नाहीं॥ १॥**
**आतां तूं उदास न हो नारायणा। धांवे मज दीना गांजिलेंसे॥श॥**

या मनाला कोंडायला जावें तर हें अधिकच बेफाम होतें.

**अधिक कोंडितां चरफडी। मलतीकडे घाली उडी॥ १॥**
**भजन नावडे श्रवण। धांवे विषय अवलोकून॥ ४॥**

याला जागृतींत व स्वप्नांत दोन्ही वेळ राखूं तरी किती?

**मज राखे आतां। तुका ह्मणे पंढरिनाथा॥ ७॥**

नित्य या मनासी विचार करितों पण पहावें तर 'हें तों अनावर विषयलोभी' आहे. आपल्या बळें हें राखूं पाहतों पण मी 'न देखे हें जाळें उगवतां' असा निराश होतों. 'अनंत उठती चित्ताचे तरंग' हें देवा! तुम्हांला काय दिसत नाहीं?

**कोण तुह्मांविण मनाचा चालक। दुजें सांगा एक नारायणा॥**

तुमच्यावांचून मनाचा चाळक दुसरा कोणी असेल तर त्याचें तरी घर दाखवून द्या, तुमची कास सोडून मी त्यालाच धरीन!

**निरोधितों परी न मोडे विकार। बहु हीं दुस्तर विषयद्वारें॥ १॥**
**राहतेती तुह्मी भरोनी अंतरीं। होतों तदाकारीं निर्विषयचि॥ २॥**

मनाचा पुष्कळ निरोध करून पाहिला पण मनाचे दुष्ट विकार सोडत नाहींत. विषयांचीं द्वारें अशीं हीं इंद्रियें फार वाईट आहेत. हीं बाहेरून निरंतर घरांत विषय आणीत असतात. मनाची व इंद्रियांची गट्टी फारां दिवसांची असल्यामुळें त्यांनीं विषय आणले कीं श्रवणमननादि साधनांनीं जमवलेले परमार्थविचार क्षणांत विसरून मन तात्काळ विषयाकार होतें. म्हणून नारायणा! तुह्मी अंतर भरून रहाल तरच तरणोपाय आहे. अंतर तुह्मी भरलेलें पाहतांच हे विषय बाहेरच्या बाहेर राहतील. देवा! करुणाकरा नारायणा! या हो या. माझें अंतर भरून तुह्मीच सर्वदा येथें नांदा. देवा! तुह्मी ह्मणाल ' तूं हीं इंद्रियें आवर, मी मनाचें पाहून घेईन' पण देवा ! हें नका बोलूं!

**एकाचेंही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसा राखों ॥**

देवा माझ्या बळानें मला एकही इंद्रिय आवरतां येत नाहीं, मग हीं सगळीं मी कसा आवरूं ? इंद्रियें आवरतां येत नाहींत, मन ताब्यांत नाहीं. सारा अंधकार दिसतो—

**तुका ह्मणे झाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावी॥४॥**

* * * * *

त्यांनीं मध्येंच एखादवेळ मनाला गोड शब्दांनीं आळवावें. बा मना ! तूं आपला पंढरीचा ध्यास घे कसा, मग तूं सांगशील तें मी ऐकेन.

**मना एक करीं । ह्मणे मी जाईन पंढरी ।**
**उभा विटेवरी । तो पाहेन सांवळा ॥ १ ॥**

बा मना ! मी रामकृष्ण हरी म्हणेन, कथेला उल्हासानें जाईन, संतांच्या पायां लागेन असें म्हण. तूं मात्र एवढें साह्य कर:—

**नाचे रंगीं वाहे टाळी । होय सादर ते काळीं ।**
**तुका ह्मणे मळी । सांडुनियां अंतरींची ॥ ४ ॥**

मी रंगशिळेवर हरीच्या प्रेमानें नाचेन तेव्हां अंतरींची मळी सांडून तूं सादर हो. मना ! तूं ह्या इंद्रियाबरोबर वणवण हिंडून

थकला असशील. तुला एक अखंड विश्रांतीची जागा दाखवितों. चल, आपण तुपण तेथें अखंड सुख भोगूं.

**देवाचिये पायीं मना देई बुडी । नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥ १॥**
**सर्वसुखें तेथें होती एकवेळे । न सरती काळें कल्पांतींही ॥ ध्रु० ॥**
**जाणें येणें खुंटे धांव येरझार । न लगे डोंगर उसंतावे ॥ २ ॥**
**सांगणें तें तुज इतुलेंचि आतां । मानीं धन कांता विषतुल्य ॥ ३॥**
**तुका ह्मणे तुझे हातीं उपकार । उतरों हा पार भवसिंधु ॥ ४**

* * * *

पुन्हां मनाचें गाऱ्हाणें देवाकडे न्यावें, हरीवर सर्व भार टाकावा, शरणागत व्हावें, प्रेमानें देवावर कोपावें हे चाललेच होतें. ' तुम्ही देवा माझा करा अंगीकार ' असें देवा ! मी आतां नाहीं ह्मणणार. व्हायचें तें होऊन गेलें. तुमची आणि आमची दोघांचीही पत गेली——

**आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देवभक्तपण लाजवीलें ॥ ध्रु० ॥**

तुमचें ठीकच आहे. विश्वनाथ तुह्मी, थोर. जग तुमची नापत झाली असें ह्मणायला धजणार नाहीं. माझी मात्र—पण झालें काय? सांगूं ? ऐका—

**एकांतीं एकलें न राहे निश्चय । न राहेचि पळ मन ठायीं ॥ ३ ॥**
**पायीं महत्वाची पडली शृंखळा । बांधाविला गळा स्नेहहातीं ॥४॥**
**शरीर सोकलें देखिलियां सुखां । कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥५॥**
**तुका ह्मणे झाला अवगुणांचा थारा । वाढली हे निद्रा आळस बहु ॥**

देवा ! मी आतां वायां गेलोंच आहे. महत्वाची शृंखळा पायांत पडली आहे, बायकापोरांच्या स्नेहकर्दमांत रुतलों आहे, दिसेल तें सुख शरीर मागतच आहे, कदान्न जीभ पत्करीत नाहीं, तिला चांगलें चांगलें गोडधोड पाहिजे, निद्रा, आळस वाढत्या प्रमाणावर आहे—याप्रमाणें सगळ्या दोषांचें मी घर झालों आहे. क्षणभर एकांतांत निश्चळ बसून तुझें चिंतन करावें तर पळभरही मन स्थिर राहत

नाहीं ! देवा ! आतां आमच्या भक्तपणाला व तुमच्या देवपणाला दोघांनाही काळोखी लागली !

न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥ १ ॥
ह्मणउनि नारायणा । कींव भाकितों करुणा ॥ २ ॥

देवा ! माझे सारे अवगुण मला समजतात, पण करूं काय ? मन अनावर आहे, इंद्रियें अनावर आहेत, वाचेनें बोलतों पुष्कळ पण बोलल्याप्रमाणें वर्तन होत नाहीं. अशा स्थितींत—मन इंद्रियें एकीकडे व मी एकीकडे अशा या विषम परिस्थितींत—तुह्मी मध्यस्थ झाले पाहिजे तरच हा कलह मिटेल !

माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥
आतां आड उभा राहे नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥ ध्रु०
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां आधीन जालों देवा ॥ २ ॥
तुका ह्मणे जैसा तैसा तुझा दास । न धरीं उदास मायबापा ॥३॥

मी आहे अशाचा असा पत्करा व दयासिंधुपण सत्य करून दाखवा ! 'मन आवरा, मन आवरा' याप्रमाणें नित्य देवाची प्रार्थना करीत असतांनाही मन स्वाधीन होत नाहीं व दयासिंधु बोलत नाहीं अशा समजुतीनें गजबजून तुकोबा म्हणतातः—

काय करूं आतां या मना । न संडी विषयाची वासना ।
प्रार्थितांही राहेना । आदरें पतना नेऊं घाली ॥ १ ॥
आतां धांवे धांवे गा श्रीहरी । वायां गेलों नाहीं तरी ।
न दिसे कोणी आवरी । आणिक दुजा तयासी ॥ ध्रु० ॥
न राहे एके ठायीं एक घडी । चित्त तडतडां तोडी ।
भरले विषय भोवडी । घालूं पाहे उडी भवडोहीं ॥ २ ॥
आशा तृष्णा कल्पना पापिणी । घात मांडला माझा यांणीं ।
तुका ह्मणे चक्रपाणी । काय आजूनी पाहसी ॥ ३ ॥

पाषाणाचेंही अंतःकरण उलेल अशा करुणस्वरानें मनाला आवरण्यासाठी नारायणाची केलेली प्रार्थना देव मुकाट्यानें ऐकत होते.

याची ही धडपड अशीच चालूं द्या, या धडपडींतच मनोजयाचें बीज आहे हें जाणून देव बाह्यात्कारी तटस्थ होते. यावर कृपा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं इतकी याची चिकाटी जबर आहे हें ओळखून देव तुकोबांची मनोजयाची धडपड पाहत होते. ' तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्यावीण ॥ ' हा सिद्धांत खरा आहे, म्हणून अंतर्यामीं अत्यंत कोमळ व भक्त-वत्सल असें पांडुरंग तुकोबांकडे अत्यंत प्रेमपडिभरानें पाहत होते, मधून मधून प्रसादाची चुणूक दाखवीत होते, पण प्राप्तिसमय येई-तों—या धडपडीनें याची चित्तशुद्धि होत आहे ती होऊं द्या अशा विचारानें ते तटस्थपणा राखून होते. पूर्ण चित्तशुद्धि होतांच व आस्थेचा तवा तापतांच तो करुणामेघःश्याम बोळला, पण त्या गोड प्रसंगाकडे वळण्यापूर्वीं तुकोबा आपल्या चित्तांतील सर्व वि-कार दवडण्याची व तें शुद्ध करण्याची कशी धडपड करीत होते तें आपण आणखी पाहूं.

६ पैका, बायका आणि प्रतिष्ठा हे परमार्थमार्गांत तीन मोठे खड्डे आहेत. परमार्थमार्गाचे वाटसरू आधीं थोडे, आणि या थो-ड्यांत कांहीं पहिल्या पैक्याच्या खड्ड्यांत गडप होतात, त्यांतून वांचून पुढें जातात ते दुसऱ्या खड्ड्यांत पडतात, या दोहींतून वांचून कोणी कदाचित् पुढें गेलेच तर ते तिसऱ्या प्रतिष्ठेच्या खड्ड्यांत पडतात ! हे तीनही खड्डे ओलांडून जातात ते भगवत्कृपेला पात्र होण्याचा संभव असतो, पण असे फारच विरळ असतात. ' विरळा ऐसा कोणी । तुका त्याचे लोटांगणीं ॥. ' तुकोबांचा मनःसंयम दांडगा, यामुळें त्यांना पहिले दोन खड्डे सहज ओलांडून जातां आले, तिसरा प्रतिष्ठेचा खड्डा ओलांडून जातांना थोडेसे श्रम पडले असें दिसतें ! तुकोबा वैष्णववीर प्रचंड त्यामुळें त्यांचा बाणेदारपणा पहिल्यापासून कसाला लागून ते त्यांतून लीलेनें पार पडले व

तीनही खड्ड्यांच्या पैलपार गेले. प्रथम धनाचा प्रश्न. पण त्यांनीं वैराग्याच्या प्रथम दर्शनेंतच धन पाषाणासमान, फार काय पण गोमांसासमान मानण्याचा निश्चय केला, खतपत्रें इंद्रायणीच्या डोहांत बुडवून देण्याघेण्याच्या संबंधांतून मोकळे झाले, शिवछत्रपतींनीं त्यांजकडे जवाहीर पाठविलेलें न पाहतां तसेंच परत केलें व वैराग्य लाभानंतर यावज्जीव त्यांनीं धनाला नुस्ता स्पर्शही केला नाहीं या गोष्टींवरून पैक्याचा मोह त्यांना यावज्जन्म शिवलाच नाहीं हें स्पष्ट होतें. आतां दुसरा मोह बायकांचा. पण याही बाबतींत ते पहिल्यापासून अत्यंत सोंवळे राहिले. स्वस्त्रीचीही जेथें आठवण नसायची तेथें परस्त्रीचा विचारच काय राहिला? तुकोबा रात्रीचें विठ्ठल मंदिरांतलें कीर्तन आटपलें कीं घंटा दोन घंटा निजलेच तर मंदिरांत किंवा घरीं निजायचे, पांहटेस उठून स्नान, विठ्ठलपूजा उरकून सूर्योदयाला इंद्रायणीच्या पार व्हायचें ते रात्रीं पुन्हां गांवांत आले कीं कीर्तनास उभे! सारा दिवस भंडाऱ्यावर ग्रंथाध्ययन व नामस्मरण यांत रमलेले असायचे. अशा स्थितींत दिवसाही बायकोचीही गांठ पडायची पंचाईत मग स्त्रीवर्गाशीं दाक्षिण्याची भाषा बोलायची त्यांना फुरसत कोठून होणार? चार चार महिन्यांत तुकोबाची गांठ पडत नाहीं म्हणून जिजाबाई गंगेवर व घरींदारीं शेजारच्या आयाबायांपाशीं वाणें वांटीत बसलेली आढळायची! असलें प्रखर वैराग्य ज्या पुरुषाचें त्याला बायकांचा मोह कोठून होणार? शिवाय त्यांनीं मनाशीं एक आडाखा बांधून ठेवलेला होता:-

**तुका म्हणे तैशा दिसतील नारी। रिसाचिया परी आम्हांपुढें॥**

तुकोबा म्हणतात बायका समोर आल्याच तर या आस्वलीसारख्या आम्हांला वाटणार! आस्वली गुदगुल्या करून प्राण घेतात त्याप्रमाणें परमार्थी पुरुषानें यांचा संग बाधक होईल हें समजून यांच्यापासून चार पावलें दूर राहावें हेंच श्रेयस्कर आहे असें मना-

शीं त्यांनीं ठरवून ठेवलें. ‘ बाइल्या ’ पुरुषाची त्यांनीं दोन चार अभंगांत चांगली खरड काढली आहे. साधकाची दशा कशी असावी हें सांगतांना—

**एकांतीं लोकांतीं स्त्रियांसीं भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये ॥**

असें त्यांनीं स्पष्ट बजावल्याचें आपण मागें ( पृ० १४० ) पाहिलेंच आहे. साधकाचें वैराग्य अभंग राहण्यास असा करडेपणा अवश्य पाहिजे, शेंकडों गुरु, बुवा, महाराज, सुधारक, नवे जुने या करडेपणाच्या अभावीं दाक्षिण्याच्या आणि वनितोद्धाराच्या गोष्टी सांगतां सांगतां घसरलेले आपण नित्यशः पाहतों व ऐकतों ! तुकोबा किंवा समर्थ असल्या वैराग्यशिखामणी साधुपुरुषांनींच स्त्री-वर्गाच्या उन्नतीकडे लक्ष पुरवावें, बाकी अर्धवटांनीं उन्नतीच्या नांवाखालीं स्वतःच अधोगतीस जाऊं नये हें उत्तम. असो. तुकोबा वैराग्याचे मेरुमणि. ते भंडाऱ्यावर हरिचिंतनांत निमग्न होऊन पडले असताना एक स्त्री, स्वयंप्रेरणेनें असो किंवा कुटाळांनीं चिथावल्यामुळें असो, पण तुकोबाचें सत्व पाहावयास तेथें एकांतांत गेली; तेव्हां तुकोबारायांनीं केलेले दोन अभंग प्रसिद्धच आहेत. पहिला अभंग त्या स्त्रीचा भाव समजतांच ते देवाला उद्देशून बोलले व दुसऱ्या अभंगांत आपला निर्धार त्यांनीं त्या बाईला सांगितला:—

**स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या**
**नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरेना ॥ ध्रु० ॥**
**दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ २॥**
**तुका म्हणे जरि अग्नि जाला साधु । तरी पावे बाधूं संघट्टणें ॥ ३॥**

स्त्रियांच्या काष्ठपाषाणमृत्तिकेच्या मूर्तिही समोर नसाव्यात, लावण्य अनेक स्त्रीपुरुषांच्या नाशाला आजवर कारण झालें आहे, अग्नीनें पुष्कळ साधुत्व धारण केलें तरी त्याचा संसर्ग बाधकच होतो म्हणून नारायणा ! ज्यांत देवाचें व भजनाचें विस्मरण होतें

अशा ह्या स्त्रीजनांचा सहवास हानिकारक आहे. मला हा नको—दाखवूं नकोस. तुकोबा नंतर त्या बाईस उद्देशून म्हणाले:—

**पराविया नारी रखुमाईसमान । हें गेलें नेमून ठायींचेचि ॥ १ ॥**
**जाई वो तूं माते ! न करी सायास । आम्ही विष्णुदास तैसे नव्हों**
**न साहावे मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ २ ॥**
**तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार । तरी काय नर थोडे झाले ॥ ३ ॥**

तुकोबानीं तिला माते म्हणून संबोधिले व परस्त्री ही आम्हां विष्णुदासांला रुक्मिणीआईसारखी आहे असा आमचा निर्धार फार मागेंच ठरून गेला आहे असें तिला स्पष्ट सांगितलें व वाटेला लावून दिलें. ! तात्पर्य परमार्थाला मारक असे जे कनक आणि कांता हे दोन्ही विषय तुकोबांच्या चित्तीं केव्हांही घुसले नव्हते, त्यामुळें या बाबतींत मनोनिग्रहाचें त्यांना कारणही पडलें नाहीं. ते उपजताच सद्गुणी व विरक्त होते. परधन आणि परदारा यांचा अभिलाष पामरांच्या चित्तांत असतो. त्यांच्या संबंधानें ' परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ' असें तुकोबांनीं म्हटलें आहे. ज्यांना या अमंगलवृत्तींची बाधा होते पण जे विवेकवैराग्य-पूर्वक त्यांचा निरोध करितात त्यांचें शौर्यही कमी प्रतीचें नाहीं, पण ज्यांच्या हृदयाकाशांत असल्या हीन वृत्तींचे ढगही उठत नाहींत त्यांनाच खरं सदाचरणी म्हणणें योग्य आहे. जो सदाचार घसरेल कीं काय असला संशय उत्पन्न करितो तो खरा सदाचार नव्हे. पापकल्पनेचा वाराही पुण्यपुरुषांच्या चित्ताला लागत नाहीं; तेच खरे शुचि होत. तुकोबाराय असें शुचिष्मंत होते हें काय सांगायला पाहिजे ? ज्यांच्या निस्सीम शुचित्वामुळें देहू गांवाला क्षेत्रपण आलें व इंद्रायणीला तीर्थपण मिळालें, ज्यांच्या दर्शनानें हजारो जीव उद्धरून गेले, ज्यांच्या नामसंकीर्तनानें पापी तेच पस्तावून पुण्यवंत झाले ते तुकोबाराय धगधगीत पुण्यराशि होते

असें सांगण्याचेंही कारण नाहीं. तात्पर्य, पैका व बायका किंवा कनक आणि कांता या जगाला भुलविणाऱ्या दोन मोहवस्तूंपासून तुकोबा यावज्जीव मोकळे राहिले. त्यांचें वैराग्य अढळ होतें.

७ मनुष्यमात्राला लौकिकाची चाड असते. लोकांनीं बरें म्हणावें, लोकांत प्रतिष्ठा असावी, चारचौघांत या जा असावी, असें प्रत्येकाला वाटतें. फक्त दोघांस लौकिकाची चाड नसते, एक व्यसनासक्त होऊन दुराचारांत रुतलेला असतो त्यास किंवा सत्या-सत्याला मन ग्वाही करून नारळीच्या झाडासारखा सरळ जातो त्यास ! दोघेही निःसंग व निर्लज्ज बनलेले असतात ! पहिला संगांत असतो पण व्यसनदुराचारांत इतका निर्ढावलेला असतो कीं त्याला लोकांच्या बरेंवाईट म्हणण्याची दिक्कत वाटत नाहीं; दुसरा आपल्या चित्तशुद्धीसाठीं व निश्चित कार्यासाठीं बुद्धिपुरस्सर जन-संमर्द टाळतो व आत्मविश्वासामुळें लोकांच्या स्तुतिनिंदेची तमा बाळगीत नाहीं. दोन्ही प्रकारचे लोक ह्या जगांत विरळच आहेत, बाकी बहुजनसमाज पाहिला तर लौकिकाच्या मागें लागलेला असतो. आचारविचारांत, लौकिककार्यांत किंवा वैदिक कर्मानु-ष्ठांत चार लोकांनीं बरें म्हणावें यापलीकडे जनतेची दृष्टि नसते.गृह्या-चार, लोकाचार लोकांनीं नांवें ठेवूं नयेत एवढ्याचसाठीं प्राय: पाळले जातात ! चारचौघांत मिसळावे, चारचौघांसारखे वागावें, गप्पासप्पा भोजनावलि, लायब्ररी, मंडळें, व्याख्यानें कोठेंही हा गोम्या नाहीं असें कोणाला वाटूं देऊं नये, बगण्याबिगण्या नाक मोडीत पण बाह्यात्कार संभाळण्यासाठीं देऊन सर्व ठिकाणीं असावें असाच सामान्यजनांचा लौकिकाचार आहे. आयुष्याचें कांहीं उच्च ध्येय ठरलेलें नाहीं, महत्वाचें कार्य कांहीं अंगावर घेतलेलें नाहीं, वेळेचें मोल समजत नाहीं, जन्मसार्थकाची निश्चित दिशा लागलेली नाहीं जन्मास यावें कांहीं तरीं करावें कसें तरी मरून जावें हाच ज्यांच

आयुष्यक्रम असेच जीव लौकिकाचे मोठे भोक्ते असतात ! कार्य-कर्त्या पुरुषाला लौकिकाची पर्वा बाळगून चालत नाहीं. असो तुकोबारायांनीं सत्यासत्याला मन ग्वाही करून आपला परमार्थ-मार्ग आक्रमिला तेव्हांच त्यांनीं लौकिकाची बाजू सोडून दिली. ही तीन प्रकारें सोडली: ( १ ) जनांचा त्याग केला ( २ ) एकांतवास धरिला व ( ३ ) स्तुतिनिंदेची किंमत मानली नाहीं. हें त्यांनीं कसें साधलें तें आपण पाहूं.

८ परमार्थ्यानें जनांच्या नादीं लागूं नये. जन दुतोंडी असतात हें तुकाबांनीं 'ऐसा हा लौकिक कदा राखवेना' ह्या अभंगांत सांगतलें आहे. लोक असेंही म्हणतात व तसेंही ह्मणतात. ! कसें तें पहा. 'संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळशी पोट-पोसा ! ' आचार पाहिला ह्मणजे ह्मणतात कीं यानें बाजार मांडला आहे, आचार नसला तर भ्रष्ट ! संतसंग केला तर उपदेशी ह्मणून हेळणा, न केला तर अभागी म्हणून निंदा ! निर्धनास करंटा व समर्थास ताठा चढला म्हणतात ! बोलतां वाचाळ व न बोलतां गर्विष्ठ ! भेटीला गेले तर लोंचट, न गेलें तर निष्ठुर. लग्न करितां उन्मत्त, न करितां नपुंसक—असे हे जन दुतोंडी आहेत. 'निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ! ' मृदंगाला दोहींकडून थापा बसतात, त्याप्रमाणें लोक दोहींकडून बोलणारे आहेत. तात्पर्य ' ओक तैसा लोक धरितां धरवेना ' म्हणून ज्याला स्वहित पाहिजे त्यानें ' त्यजूनियां जन ' हरिभक्तीचा प्रांजळ मार्ग आदरावा. व्यवहारांतही ' धनवंतालागीं । सर्व मान्यता हे जगीं ' असा अनुभव सर्वांना आहे. इतर बाहेरचीं माणसेंच काय पण घरांतलीं, प्रेमाचीं मातापिताबंधुभगिनी भार्यासुत हीं माणसें सुद्धां द्रव्य आहे तर अधिक मानतात असा अनुभव कोणाला नाहीं ? अपवाद आहेत पण त्यांनीं सिद्धांतालाच बळकटी येते. पण

धनाच्या मागें लागून त्यांत आयुष्य घालविलें तरी अखेर कमाई काय? 'सवें नये रे लंगोटी' मृत्युसमयींही जिवाचे जिवलग कोणी कामास येत नाहींत. 'तुका ह्मणे धन । भाग्य अशाश्वत जाण' याप्रमाणें अशाश्वताचा कंटाळा येऊन शाश्वत परमात्मसुख मिळविण्याचा तुकोबांचा निग्रह जसा झाला तसा जन व जनाचार यांत काळ व बुद्धि वेंचण्याचा त्यांना सहज कंटाळा आला, संगाचा वीट आला, निःसंगाचा सांगात प्रिय वाटूं लागला. 'नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया' असा मनास उपदेश करून 'तुका ह्मणे माझीं न होत हीं कोणी । तुज चक्रपाणीवांचोनीयां' याप्रमाणें ते पांडुरंगाला शरण गेले. हरिनाम-संकीर्तनसुख एकांतांत भोगायला ज्यास्त सांपडतें व जनपीडाही तेथें कमी होते म्हणून ते एकांतांतच रमून गेले, 'देवाचा भक्त तो देवासीच गोड' ह्या अभंगांत इतरांना देवदासाची आवड नसते, लोक त्याला वेडाबापडा म्हणतात, त्याला माझा असें प्रेमानें कोणी म्हणत नाहीं, तो 'रानीं वनीं भलते ठायीं' असतो, प्रातःस्नान विभूति-चर्चन, कंठीं तुळसीमाळा अशी त्याची मूर्ति पाहून घरचे दारचे सर्व जण त्याची निंदा करितात असें जणुं थोडें आत्मचरित्रच तुकोबांनीं सांगितलें असून शेवटीं म्हटलें आहेः—

**जन्मोनीयां जाला अवघियां वेगळा।ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो॥९॥**
**तुका ह्मणे जो या संसारा रुसला।तेणेंचि ठाकिला सिद्धपंथ॥१०॥**

असो. तुकोबांनीं गांवांत कीर्तनापुरता संबंध ठेवला तरी तेवढाही उपसर्ग त्यांना बाधक झाला. तुकोबांना कळकळीमुळें वाटे कीं सर्वांनीं कीर्तनाला यावें, नामसुख भोगावें व उद्धरून जावें. पण कांहीं आळशी घरींच निजायचे, कांहीं मन लावून ऐकायचे नाहींत!

**आपुला विचार करीन जीवांसी । काय या जनासी चाड मज ॥१॥**
**आपुलें स्वहित जाणती सकळ । निरोधितां बळ दुःख वाटे ॥ध्रु०॥**

**आइको नाइको कथा कोणी तरी । जाऊनीयां घरीं निजो सुखें ॥४॥**
**तुका ह्मणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥५॥**
असा देवाच्या प्रीतीसाठींच कीर्तन करायचा क्रम ठेवला.

९ तरी कोणी कांहीं तर्ककुतर्क काढून छलबुद्धीनें वाद करायला किंवा शंका विचारायला तुकोबांकडे येत व त्यांना सतावून सोडीत. हाही संसर्ग तुकोबांना नकोसा झाला.

**कोणाच्या आधारें करूं मी विचार ।कोण देईल धीर माझ्या जीवा**
संतांच्या आज्ञेप्रमाणें मी देवाचे गुण गातों.मी शास्त्रज्ञ नाहीं, वेदज्ञ नाहीं, सामान्य शूद्र आहे. हे लोक येऊन मला त्रास देतात, माझा बुद्धिभेद करूं पाहतात, देव असा निर्गुण आहे तसा निराकार आहे असें ह्मणतात तर देवा ! तुझें भजन तरी करूं किंवा नको तें सांगः—

**कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ॥३॥**
**मज हा संदेह झाला दोहींसवा । भजन करूं देवा किंवा नको?॥४॥**
आतां नारायणा ! हे जन त्यागावें किंवा मरावें हेंच उरलें आहे !

**न वजतां घरा । आह्मीं कोणाच्या दातारा ॥१॥**
**कां हे छळों येती लोक । दाट बळोंचि कंटक ॥ध्रु॥**
**नाहीं आम्हीं खात । कांहीं कोणाचे लागत ॥ २ ॥**
**कळे तैसी सेवा । तुका ह्मणे करूं देवा ॥ ३ ॥**

नानाप्रकारचें कोरडे वाद उकरून काढणारे विद्वान् किंवा देवाची निंदा करून भजनाला विरोध करणारे पाखांडी यांनीं तुकोबांची जशी पाठ पुरविली होती ! त्यांची निष्ठा जणुं काय कसाला लावायचा त्यांनीं विडाच उचलला होता. अशा लोकांचा ताप बहुधा प्रत्येक साधकाला होत असतो. मात्र साधकांचें वैराग्य दृढ करण्याचें व त्यांचें भक्तिप्रेम वृद्धिगत करण्याचे कामीं या शब्दछलकांचा किंवा पाखांड्यांचा उपयोग होत असतो, साधकाला आपल्या

चित्तांतले दोष शोधून काढून टाकण्याचे बाबतींतही यांचे उपकार कमी योग्यतेचे नसतात. निंदकाचें घर असावें शेजारी-तें एवढ्याचसाठीं. निंदक, छलक, वादक, कुतर्की, संशयखोर अशा जीवांना पुढें काय मार्ग लागत असेल तो लागो, पण साधकांच्या उद्धाराला यांचा खरोखरीच फार उपयोग होत असल्यामुळें हे त्याला गुरुस्थानींच आहेत ! असो.

पाखांड्यानीं पाठी पुरविला दुमाला।तेथें मी विठ्ठला काय बोलें।।१।।
न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडती ।। २ ।।
तुझ्या पायांवीण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वांठायीं एक मज।। ३ ।।

* * * *

नको दुष्टसंग । पडे भजनांमधीं भंग ।। १ ।।
तुज निषेधितां । मज न साहे सर्वथा ।। २ ।।
एका माझ्या जीवें । वाद करूं कोणांसवें ।। ३ ।।
तुझे वर्णुं गुण । कीं हे राखो दुष्ट जन ।। ४।।
काय करूं एका । मुखें सांग ह्मणे तुका।। ५ ।।

* * * *

अशा लोकांच्या संगतींत तुकोबांची सत्वस्थ धीरताही कधीं कधीं भंग पावावी व क्रोधाचा आवेग त्यांना दुर्वह व्हावा. असेंच एकदां ते देवावर रागावले !—

आह्मां गांजी जन । तरी कां मेला नारायण ? ।। १ ।।

काय आह्मी त्याचे दास पोरटे झालों ? याची लाज कोणाला ?

आह्मी जनां भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ?।। २।।
तुका ह्मणे देश । झाला देवावीण आस? ।। ३ ।।

अशा छलकांवर तुकोबा एकदा कांहीं प्रसंगानें खूप संतापले, मागाहून त्यांना पश्चात्ताप झाला व क्रोधमांगाचा विटाळ घालविण्यासाठीं त्यांनीं नामगंगेंत स्नान केलें ! भक्ताच्या हातून कांहीं दोष घडल्यास अधिक नामस्मरण करणें हेंच त्याचें प्रायश्चित्त असतें. तुकोबा ह्मणतात:—

आजी शिवला मांग । माझें विटाळलें अंग ॥ १ ॥
यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठल विठ्ठल हृदयांत ॥धु०॥
झाली क्रोधासी भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ॥ २ ॥
अनुतापें न्हाऊं । तुका ह्मणे रवी पाहूं ॥ ३ ॥

तुकोबांना ही दुर्जनसंगत त्रासदायक झाली. त्यांना भक्तभाविकांची व प्रेमळांची संगति नेहमींच असे हें आपण मागें ( पृ० १२०–१२५ ) पाहिलेंच आहे. आवडते व नावडते असे उभयविध लोक आहेत ही भावना आहे तोंवर गुणदोषविचार मनांत येतात, द्वैतभाव जागृत राहतो, आपपरभेद मावळत नाहीं. ही सगळी घरांतली बाहेरची कटकट टाळण्यास एकांतवास हाच एक उत्कृष्ट उपाय आहे.

आणिकांची येती अंतरा अंतरें । सुखदुःख बरें वाईट तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥ ४॥

१० एकांतवासाचा लाभ व आनंद अपार आहे. नुस्ता एकांत ही अर्धी समाधि आहे ! जनसंमर्दाचा कंटाळा व वीट आल्यावर तुकोबांना एकांत अधिक प्रिय झाला. ‘ निरोधाचें मज न साहे वचन, ’ कां कीं त्यांत जीव फार कासावीस होतो. जनसंग सोडून ‘ बैसतां एकांतीं गोड वाटे. ’ संग हा चित्तवृत्तिनिरोधाला मोठा मारक आहे. ‘ संगें वाढे शीण न घडे भजन । त्रिविध हे जन बहु देवा ! ’ संगांत ‘ दिसताती डोळां नाना छंद ! ’ आनंदकंद अशा गोविंदाचा छंद पाहिजे तर नानाछंदांच्या फंदांत पडतां कामा नये. एकांतांत एकनिष्ठभाव राखतां येतो, हरीचें प्रेम जमत जातें. शाब्दिकांना स्वहित कळत नाहीं, इतकेंच काय पण त्यांना हरिप्रेमी मनुष्य त्यांना शत्रुसारखा वाटतो.

तुका ह्मणे आतां एकलेंचि भलें । बैसोनि उगलें राहावें तें ॥ ५ ॥

एकांतसुखाची गोडी काय सांगावी ? ती स्वयें चाखावी ह्मणजेच

कळून येणार आहे. एकांताची आवड उत्पन्न होणें हेंच ज्ञानभा-ग्याचें मोठें लक्षण आहे. " आणि तीर्थ धौतें तटें । तपोवनें चो-खटें । आवडती कपाटें । वसवूं जया ॥६१२॥ शैलकक्षांचीं कुहरें। जलाशयपरिसरें । अधिष्ठी जो आदरें । न ये ॥ ६१३॥ बहु एकां-तावरी प्रीती । जया जनपदाची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ ६१४ ॥" ( ज्ञाने अ. १३ ). हें ज्ञान्याचें लक्षण तुकोबांना बरोबर लागतें. त्यांनीं जनपदाची खंती वाटून नगराचा बहुतेक त्यागच केला. गोराडा, भामनाथ किंवा भंडारा, यांपैकीं को-णत्या तरी डोंगरावर त्यांचा दिवसभर मुक्काम असे. भंडाऱ्यावर पश्चिमच्या बाजूस एक गुहा असून जवळच पाण्याचा झरा आहे, तेथें त्यांची वस्ती झाली. डोंगराच्या शिखरावरून चारी बाजूंस लहान मोठे डोंगर, रम्य हिरवीगार शेतें, इंद्रायणीनदीचा प्रवाह व अनेक लहान मोठें ओहोळ यांची अनुपम शोभा दिसते. अशा त्या डोंगराला तुकोबांच्या सहवासामुळें तपोवनाचीच योग्यता आली. त्यांच्या विठ्ठलनामघोषानें सारा डोंगर निनादित झाला. तेथील वृक्षवल्लींना व पशुपक्ष्यांना तुकोबांच्या पुण्यमूर्तीचा दृढपरि-चय झाला व तुकोबांनाही त्यांच्या समागमाचा आनंद वाटू लागला. श्रीविठ्ठलस्वरूपीं रंगलेली ही भंडाऱ्यावरील महर्षींची मूर्ति ज्या डोळ्यांनीं पाहिली असेल ते डोळे धन्य होत; फार काय पण तेथील वृक्षलता, झाडेंझुडपें, त्या पुण्यपरिसरांत विहार करणाऱ्या पक्ष्यांच्या झुंडी, व तेथील पाषाणही धन्य होत. तुकोबांना एकांतवास फार आवडला व मानवला. निवळीची बी पाण्यांत टाकल्यानें पाणी स्वच्छ होतें, त्याप्रमाणें एकांतवासानें चित्तांतल्या मलिन वृत्ति नाहींशा होऊन त्यांचें अंतःकरण रमणीय आणि प्रसन्न झालें. ' शुचौ देशे प्रतिष्ठाप्य ' ( गीता ६–११ ) ह्यावर भाष्य करितांना ज्ञानोबारायांनीं एकांतवासाचें मनोरम वर्णन



भंडारा डोंगर.

A. B. PRESS, POONA.

न केलें आहे, "जेथ आराणुकेचेनि कोडें (सुखसमाधानाच्या इच्छेनें) बैसलिया उठों नावडे। वैराग्यासी दुणीव (दुप्पट बळ) चढे। देखिलियां जें ॥ १६४ ॥ जो संतीं वसविला ठावो। संतोषासी सावावो (साह्य)। मना होय उत्सावो। धैर्याचा ॥१६५॥ अभ्यास आपण यातें करी। हृदयातें अनुभव वरी। ऐसी रम्यपणाची थोरी। अखंड तेथ ॥ १६६ ॥" एकांतवासाच्या शुचिप्रदेशांत ज्ञानवैराग्याला बळ चढतें, मनांत असो नसो—अभ्यास आपण होऊन हृदयांत घुसतो, चित्तावरचे मलिन संस्कार नष्ट होऊन चित्त प्रसन्न होतें, सुखसमाधानांत दिवसरात्र केव्हां निघून जातात तेंही कळत नाहीं, भगवत्प्रेमाच्या लहरींशी खेळतां खेळतां जीवभाव लोपून जाऊन अखंड अद्वयानंदाचा अनुभव प्राप्त होतो; यासाठीं तर साधुसंत गिरिकंदरीं, किंवा जलाशयपरिसरीं सर्वसंगपरित्याग करून कायम वस्ती करितात. शहरांतून वेदांताचे कितीही ग्रंथ वाचले लिहिले, व्याख्यानें ऐकिलीं व दिलीं, चर्चावादांत काळ घालविला तरी शब्दचावटीच्या पलीकडे सहसा मजल जात नाहीं, व अनुभवाचे अंग प्राप्त होत नाहीं. जनांनीं गजबजलेल्या नगरांत गुणदोष अंगीं जडतात, शब्दाची खूप गलबल होते, पण निःशब्दाचा एकांत मिळत नाहीं. एकांताशिवाय ज्ञान मुरत व पचत नाहीं, अनुभवाचें दिव्य सुख प्राप्त होत नाहीं. प्रत्येक सत्पुरुषानें आपल्या आयुष्याचीं कांहीं वर्षें तरी एकांतांत घालविलीं आहेत. शहरांत मिळवावें आणि खेडेगांवांत जाऊन खावें अशी प्रपंचांतली एक म्हण आहे, त्याप्रमाणें सत्संगतींत मिळवावें आणि एकांतांत भोगावें असें परमार्थांतही म्हणतां येईल. एकांतावाचून परमार्थ मुरत नाहीं, वृत्ति निवळत नाहींत. तुकोबांनीं बहुतेक अध्ययन एकांतांत केलें, देहूगांवासीं त्यांचा थोडाफार संबंध येई तेवढ्यानेंही जनपीडा त्यांना बहुत होऊन चित्त दुखवलें गेलें, पण त्याचा वचपा

एकांतांतच वसून काढला. त्यांचे एकांतवासाच्या अनुभवावर दोन उत्कृष्ट अभंग आहेत.

**वृक्षवल्लीं आम्हां सोईरीं वनचरें । पक्षीये सुस्वरें आळवीती ॥१॥**
**येणें सुखें रुचे येकांताचा वास । नाहीं गुणदोष आंगा येत ॥ध्रु॥**
**आकाशमंडप पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करूं ॥ २ ॥**
**कंथाकुमंडळ देहउपचारा । जाणवीतो वारा अवसरू ॥ ३ ॥**
**हरिनामें भोजनप्रवडी विस्तार । करूनी प्रकार सेवूं रुची ॥ ४ ॥**
**तुका ह्मणे होये मनासी संवाद । आपलाची वाद आपल्यासी ॥५॥**

एकांताचा वास कां आवडला हें तुकोबा वरील अभंगांत सांगतात. जनांत लोकांचे गुणदोष अंगाला येतात तसे ते वनांत येत नाहींत. वनांत आह्मांला संगतीला वृक्षवल्ली व वनचरें आहेत, देवाला मधुर-स्वरानें आळवणारे पक्षीही आहेत. ही संगत गोड व निरुपद्रवी आहे. यांना माणसांप्रमाणें दुसऱ्याच्या गुणदोषांच्या नस्त्या उठा-ठेवी करण्याची संवय नसल्यामुळें यांच्या संगतींत आमच्याही अंगाला गुणदोष येत नाहींत ! येथें ध्यान करायला जागाही विपुल आहे. मन रमेल तेथें आह्मीं बसतों. आकाशाचा मंडप व पृथ्वीचे आसन करून आह्मीही विराट होऊन विराटाचें ध्यान करितों. सर्व जागा आमचीच आहे. आह्मी येथें काळाचेंही बांधलेले नाहीं घड्याळाच्या ठोक्यानें चालणारीं आह्मीं यंत्रें नव्होंत, प्रभातका-ळचा, माध्यान्हीचा, सायंकाळचा अंगाला वारा लागेल त्यावरू आम्हांला वेळ समजते. याप्रमाणें स्थळ व काळ या बावतीं आम्हीं मोकळे आहोंन. हरिनामरसाचे अनेक उंची पदार्थ आम्ह आपल्या आवडीप्रमाणें येथें तयार करितों व हीं मधुर पक्का रुचीनें सेवन करितों, आपला आपल्याशींच वाद खेळतो, आपल मनासींच संवादसुख भोगतो, आपला आपल्याशींच आनंद करित हीं सुखें आम्हांला एकांतांत मिळतात ‘ येणें सुखें रुचे एका-ताचा वास !’

खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुकें विनोदें निरंजनीं ॥१॥
पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीसी ॥ ध्रु०॥
एकांताचें सूख जडलें जिव्हारीं । वीट परिचारीं बरा आला ॥ २ ॥
जगाऐसी बुद्धि नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा झालों पायीं॥३॥
आणिक ते चिंता नलगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥४॥
तुका ह्मणे घडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विसांवलें ॥ ५ ॥

एकांताचें सुख जिव्हारीं जडलें, जनसंगाचा बाह्यउपाधींचा वीट आला, जगासारखी बुद्धि राहिली नाहीं ह्म० जग देहबुद्धीचे, अहंममत्वाचे, प्रपंचाचे नित्य खेळ खेळत आहे पण माझ्या बुद्धीनें ते वेडेचार सोडून दिले असून ती गोविंदाचे पायीं रत झाली आहे, कसलीही चिंता ह्मणून वाटत नाहीं. निरंजन ( अंजन ह्म० माया, मायातीत ) जो सखा पांडुरंग त्याच्या पायाशीं बसून मी आपला आपल्यासींच कौतुकविनोदाचे संवाद करून मनाशीं खेळत असतो. हें सुख माझ्या पचनीं पडलें व पचेत तें पुनः पुन्हा भोगावेंसें वाटतें या न्यायानें हेंच मला नित्य आवडलें आहे. हाच घडा पडून गेला आहे. मनाच्या सर्व चळवळी संपून तें पांडुरंगरूपीं विसावलें आहे ! पांडुरंगीं मन रंगलें, व आनंदसुख भोगायलें मिळालें पण तेंच निरंतर भोगावें, असेंच देहभावविवर्जित होऊन गोविंदाच्या पायीं लगटावें हेंच माझ्या आवडीला डोहाळे होऊं लागले आहेत !

महाराज ! हे आपल्या आवडीचे डोहाळे आपण असेच पुरवीत रहा. यथाकाल तिच्यापोटीं श्रीकृष्ण जन्माला येऊन आम्हांला त्यांच्या बारशाचे भक्तिसुखाचे लाडू खायला मिळणार आहेत, आह्मीही त्यासाठी उतावीळ झालों आहोंत !

११ अहंकार जीवाच्या ठिकाणीं सहज आहे. आत्मस्वरूपाला आच्छादून तो खडा उभा राहतो म्हणून तो तमोगुणाचा आहे असें शास्त्र सांगतें. ह्या तमोमय अहंकारांत अनंत प्रकार आहेत !

देह मी, जीव मी, ब्रह्म मी हे अहंकाराचेच प्रकार. देह मी हा ओवळा अहंकार व ब्रह्म मी हा सोवळा अहंकार असें पाहिजे तर म्हणावें ! देह मी म्हटल्याबरोबर अहंकाराच्या लक्षावधि ठिणग्या उत्पन्न होतात. रूप, धन, विद्या, गुण, कीर्ति हे जीवाच्या अहंकाराचे विषय होतात. देश, भाषा धर्म, वर्ण, जाति, कुळ हेही अहंकाराचे विषय होतात. गुणदोष हे प्रकृतिस्वभाव असल्यामुळें जीवानें त्यांचा हर्षविषाद किंवा स्तुतिनिंदा करण्याचें वस्तुतः कारण नाहीं असें वेदांतशास्त्र सांगतें, पण मौज ही कीं अज्ञानी व ज्ञानी या सर्वांवर अहंकाराचा सारखाच पगडा बसलेला दिसतो. प्रकृतिपर परमात्म्याकडे दृष्टि पोंचेंपर्यंत हा कोणालाही सोडीत नाहीं. जीवपरमात्म्यांमधला हा पडदा निःशेष दूर होईतों त्यांची भेट होत नाहीं. “ थोरपण पऱ्हां सांडिजे । व्युत्पत्ति आघवी विसरिजे । जैं जागा धाकुटें होईजे । तैं जवळिक माझी ॥ ” ( ज्ञाने० ९–३७८ ) हें खरें, पण भगवत्कृपेशिवाय तो निःशेष दूर होत नाहीं. अहंकाराचे एकेक पडदे दूर होत जातील तसतसा परमात्मा सन्मुख होतो, सर्व पडदे दूर होतांच त्याची भेट होते. विद्वानांच्या मागें तर हा फार लागतो. कसलेही गुण किंवा विद्या अंगांत आली कीं हा सैतान अंगांत संचरतो. गुण किंवा विद्या अंगीं नसतांनाही त्यांचा फुंज असणें हें अज्ञानाचें व मूर्खत्वाचें पुरें चिन्ह आहे. ते अंगीं असून त्यांची जाणीव असणें व बाह्यात्कारी नम्रता धरणें ही व्यवहारज्ञांची एक लपेटी आहे याचा उन्नतीला कांहीं उपयोग नाहीं. गुणांचा अहंकार अगीं वाजत आहे, आणि खंतीही वाटते हें साधकाचें लक्षण होय—‘ आहे ऐसा कोठें आठवाचि नाहीं ’ ही खऱ्या ज्ञानवंताची स्थिति. असो तुकोबांचीही प्रथम जेव्हां लोकांत पूज्यता वाढली, सत्कार होऊं लागला, कीर्तनाची छाप लोकांवर पडतेसें दिसेल तेव्हां ही थोडीशी बाधा त्यांनाही होऊं लागली होती, पण त्या जागृत

पुरुषानें देवाचा धांवा करून अहंकारवृत्ति पार जिरविली. देवाचें प्रेम जसजसें वाढत जातें, कर्ता तो आहे मी नव्हे, आहे हें सर्व देवाचें आहे माझें कांहीं नाहीं, हा भाव जसजसा बळावत जातो तसतसा अहंकाराचा वारा वाहणें बंद होत जातें. ‘ पदोपदीं नारायणा । तुमची करीन भावना ’ या अंतरंग अभ्यासानें सर्व नारायणरूप भावत जातें तसा अहंकार नाहींसा होतो. अहंकारादि सर्व जीवभाव नष्ट होण्याचा एकच उपाय आहे आणि तो नारायणाची दृढतम उपासना जीवीं धरणें हा होय. तुकोबांनीं भक्तिबळानेंच या सर्व वृत्ति जिंकल्या. अहंकार, लौकिक, प्रतिष्ठा, जनमान, मोठेपणाची बुद्धि हे सर्व ढग उत्कटभक्तीच्या सूर्योदयाबरोबर पार वितळून गेले. हा अभ्यास त्यांनीं कसा केला हें आपण आतां त्यांनीं देवाला एकांतांत आळवितांना जीं भाषणें केलीं त्या भाषणांचें श्रवणमनन करीत सावधानचित्तानें ऐकूं:—

हीन माझी याती । वरि स्तुति केली संतीं ॥ १ ॥
अंगीं वसूं पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥ ध्रु० ॥
मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥ २ ॥
राख राख गेलों वायां । तुका ह्मणे पंढरिराया ॥ ३ ॥

*     *     *     *

मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसे ॥ १ ॥
याचा कांहीं तुह्मीं देखावा परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ ध्रु० ॥
कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां जालों उतराई । कळों यावें पाईं निरोपिलें ॥ ३ ॥

याप्रमाणें देवापुढें आपलें अंतःकरण उघडें करून असेल नसेल तें सर्व त्याला निवेदणें व सर्व कार्यांत त्याचें साक्ष मागणें ही भक्ति मोठी उंच कोटीची आहे. मीं पुष्कळ ग्रंथ वाचले आहेत, मी उत्तम कीर्तन करितों, मी जाणता आहे अशा अहंकाराच्या वृत्ति

चित्तांत उत्पन्न होतात, पण देवा ! यांचें पायीं माझा नाश होईल असें मला भय वाटतें, म्हणून तुह्मीच कृपा करून यांचा परिहार करा. तुम्ही नारायणा ! सर्वज्ञ आहांत, उदार आहांत, समर्थ आहांत. हा अहंकार माझ्या चित्तांतून दवडा.

**कथनीं पठणीं करूनि काय । वांचुनि रहणी वायां जाय ॥ १ ॥**

पुष्कळ पाठांतर केलें व लोकांना ज्ञान सांगितलें, पण तें ज्ञान रहणींत ह्म० आचरणांत आलें तरच त्याचा उपयोग ! मुखांत अमृतासारखी गोड वाणी आहे पण स्वतः भुकेनें चरफडतो तर त्याचा याला लाभ काय ? ( जिलबीच्या ) पाकांत दगड टाकला तर त्या दगडाला तें काय होय ? माशी मध मिळवून ठेवतें पण ती पोळी पारधी आयता घेऊन जातो. लोभी कवडी कवडी करून धन मिळवतो व तें मातींत आपल्या हातानें पुरून ठेवतो, तें धन दुसऱ्याच्या उपयोगीं पडत असेल पण याच्या हातीं तोंडीं तर मातीच पडते ! हें मार्मिक दृष्टांत देऊन तुकोबा ह्मणतातः—

**आपुलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ६ ॥**

महाप्रयासानें गुरुशास्त्रमुखानें ज्ञान मिळवून तें ज्ञानान्न स्वतः जो खात असेल, आपल्याच ज्ञानभोजनानें आपण तृप्त होत असेल,ज्याचें ज्ञान त्याच्या रहणींत उतरलें असेल तोच वक्ता धन्य होय. आपण जेवून लोकांस जेवविणारा ज्ञानदाता धन्य होय!कीर्तनांत ब्रह्मानंदाचा पाऊस पाडून श्रोत्यांचीं अंतःकरणें निववणारा जो हरिदास स्वतः त्या सुखांत भिजून निवाला असेल त्याच्या चरणाचा तुका दासानुदास आहे. माझ्या अंगीं हें सामर्थ्य आलें नाहीं. लोक माझ्या कीर्तनांत माना डोलवतात पण मला माझी वाणीच कोरडी वाटते. तुमच्या प्रसादाचा रंग नाहीं, तुमचा आधार मिळाला नाहीं.

**काय बोलों सांगा । या उपरीं पांडुरंगा ॥ १ ॥**
**कोरड्या उत्तरीं । नका गौरवूं वैखरी ॥ ३ ॥**

**भक्तिभाग्यसीमा । द्यावा जोडोनीयां प्रेमा ॥ ४ ॥**
**करी विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥ ५ ॥**

१२ देवा ! मी तुमचे गुण नित्य वाखाणतों, भक्तिभावाचें श्रोत्यांवर छत उठवतों, लोक माझी स्तुति करितात पण माझ्या अंतर्यामीं ओलावा नाहीं, उपदेशाप्रमाणें कृति होत नाहीं !

**तुज पहावे हें धरितों वासना । परी आचरणा ठाव नाहीं ॥ १ ॥**
**बाहिरल्या वेषें उत्तम दंडिले । भीतरीं मुंडिले नाहीं तैसे ॥ २ ॥**

* * * *

**चतुर मी झालों आपुल्या भोंवता । भावेंवीण रिता फुंद अंगीं॥१॥**
**आतां पुढें वायां जावें हें तें काई । कामक्रोधें ठाई बास केला ॥**
**गुणदोष आले जगाचे अंतरा । भूतांच्या मत्सरावरी बुद्धी ॥ २ ॥**
**तुका ह्मणे करूं उपदेश लोकां । नाहीं झालों एका दोषा परता॥३॥**

मी आपल्या शहाणपणाच्याच डौलांत असतो, पण देवा ! अंतरांत भक्तीचा जिव्हाळा नसून मी भक्त आहे असा नुस्ताच फुंज माझ्या ठिकाणीं वाढला आहे. काम क्रोध तर चित्तांत घर करून राहिले आहेत. लोकांच्या गुणदोषांची उठाठेव करितां करितां ते माझ्या चित्तांत घुसले आहेत.‘कोणाही जीवाचा न घडो मत्सर’असा उपदेश करितों, पण बुद्धि निर्मत्सर झाली नाहीं. नारायणा ! सर्व दोषांचे आगर मीच झालों आहे!आतां वायां जायचें काय बाकी राहिलें आहे ? मी कथा करितो, नाचतों उडतों गातों, पण अंतःकरण अजून खडकासारखें कठोरच आहे तें प्रेमानें पाझरत नाहीं. प्रेमाच्या खूप गोष्टी सांगायच्या पण चित्त जर प्रेमानें उचंबळत नाहीं, डोळ्यांतून प्रेमाश्रूच्या धारा चालत नाहींत, चिंतनसुखानें हृदय प्रेममय होत नाहीं तर ही विटंबनाच नाहीं तर काय काय ?

**बोलविसी तैसे आणी अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥**

‘ मीठावांचून पक्वान्न ’ म्ह० जिलबी आहे पण तिच्यांत साखर नाहीं, गोडी नाहीं तर तें पक्वान्न कसलें ? शव खूप शृंगारलें पण त्यांत

प्राण नाहीं, सोंग घेतलें पण संपादणी बरोबर होत नाहीं, रूप चांगलें आहे पण अंगांत गुण नाहीं, मंगलकार्य आहे पण त्याचा आनंद वाढविणारीं अपत्यें ह्म० कन्या–पुत्र नाहींत तर हीं सर्व व्यर्थच नाहींत कां ? हे दृष्टांत देऊन तुकोबा म्हणतात:—

**तुका ह्मणे तैसी मज होते परी । न देखे अंतरीं प्रेमभाव ॥ ५ ॥**

आपला दुर्लौकिक व्हावा, लोक साधु म्हणून सेवा करितात ते सारे निंदा करीत उधळून जावे व असें झालें म्हणजेच माझ्या हातून तुझी मनासारखी सेवा घडेल असेंही देवापाशीं मागतात !—

**पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥ १ ॥**
**करा दंड नारायणा । माझ्या मानाची खंडणा ॥ ध्रु० ॥**
**जनाहातीं सेवा । घेतों लंडपणें देवा ॥ २ ॥**
**तुझा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥ ३ ॥**

खऱ्या भक्तिभावानें अंतरंग रंगत चाललें; सर्व खेळ नारायणाचा आहे, कर्ताहर्ताभर्ता तो आहे, जीवाला अहंता बाळगायला यत्किंचितही जागा नाहीं; ‘ तुका ह्मणे नरकीं घाली अभिमान ’ असा हा अहंकार देव दुरावणारा आहे असा प्रत्यय येत चालला तसतशी जनमानाची इच्छा समूळ नाहींशी झाली. लोक साधु म्हणून, देव म्हणून भजतात, पूजाउपचार करितात, स्तुतिस्तोत्रें गातात, मिष्टान्न प्रेमाग्रह करून खायला घालतात, या सर्व लोकादराचा तुकोबांना मनापासून वीट आला, हा जनमान मला खडकावर आपटून माझ्या परमार्थाचा सत्यनाश करील असें त्यांना भय वाटलें. ज्या मानासाठीं, देहउपचारासाठीं, स्तुतिगौरवासाठीं जाणतेही अंतर्यामीं लाळ घोटीत असतात त्यानें तुकोबांचें उलटें अंग पोळूं लागलें इतका हा जनमान त्यांना दुस्सह झाला. !

**भक्त ह्मणे जन । परी नाहीं समाधान ॥ १ ॥**
**माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥ २ ॥**

कृपेचा आधार । नाहीं, दंभ जाला फार ॥ ३ ॥

*   *   *   *

नव्हे सुख मज न लगे हा मान । न राहे हे जन काय करूं ॥ १ ॥
देहउपचारें पोळतसे अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न हें ॥ ध्रु० ॥
नाइकवे स्तुति वानितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥२॥
तुज पावे ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतूनी ॥ ४ ॥

*   *   *   *

लोक ह्मणती मज देव । हा तों अधर्मउपाव ॥ १ ॥
आतां कळेल तें करीं । शीस तुझे हातीं सुरी ॥ ध्रु० ॥
अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥ २ ॥
मन जाणे पापा । तुका ह्मणे मायबापा ॥ ३ ॥

बाहेरच्या रंगाला जग भुलतें, पण ज्याचें मन त्याला माहीत असतें. लोकांकडून आपली पूजा करून घेणें हा अधर्म आहे, हा माझ्या अधोगतीचा मार्ग आहे,आणि शिवाय नारायणा!मी ह्या मानास पात्र नाहीं. तर देवा आतां याचा मला उचित तो दंड करा. माझें शीर तुमच्या हातांत दिलें आहे, अधर्माचा उच्छेद करण्यासाठी तुमचा अवतार आहे !

गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ १ ॥
परि तूं पतीतपावन । साच करीं हें वचन ॥ ध्रु० ॥
मुखें ह्मणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥ २ ॥
तुका ह्मणे दावी वेश । तैसा अंतरिं नाहीं लेश ॥ ३ ॥

*   *   *   *

ह्मणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोट भरीं॥ १ ॥
खोटें कोठें सरे तुझ्या पायापाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥ध्रु०॥

*   *   *   *

तुह्मी कृपा केली नाहीं । माझें चित्त मज ग्वाही ॥ २ ॥
तुका मज देवा । मज वायां कां चाळवा ! ॥ ४ ॥

कळों आला भाव माझा मज देवा।पायांवीण जीवा आट केली ॥१॥
जोडूनि अक्षरें केली तोंडपिटी।नलगे शेवटीं हातीं कांहीं ॥ ध्रु० ॥
देव जोडे ह्मणून सांगतसे लोकां ।माझा मीच देखा दु:ख पावे॥२॥
तुका ह्मणे माझे गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥३॥

* * * *

काय आतां आह्मी पोटाचि भरावें । जग चाळवावें भक्त ह्मणू ॥१॥
ऐसा तरी एक सांगाजी विचार।बहु होतों फार कासावीस ॥ध्रु०॥
काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची॥२॥
तुका ह्मणे काय गुंपोनि दुकाना।राहों नारायणा करूनि घात ॥३॥

* * * *

नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष।अंगा कांहीं रस नयेचि तो ॥ १ ॥
तुका ह्मणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरी माझ्या॥२॥

ग्रंथ पाहिले व ऐकले आणि त्यांतल्याच गोष्टी व सिद्धांत मी लोकांना सांगत आहे, पण ते माझ्याच अंत:करणांत ठसले नाहींत. ' शिकलों ते बोल । बोले, तैसी नाहीं ओल ॥ ' अनेक संकल्प माझ्या चित्तांत आहेत, संकल्पाचा नाश झाला नाहीं; हें करीन, तें करीन असें अद्याप वाटत आहे. बुद्धिनिश्चय नाहीं. ' बुद्धि नाहीं स्थिर । तुका ह्मणे शब्दा धीर॥'तात्पर्य, ग्रंथांतले ज्ञान मी कीर्तनांतून लोकांना मोठ्या आवेशानें सांगत आसतों खरा, माझें चित्त अजून हरिप्रेमानें आर्द्र झालें नाहीं, बुद्धि व्यवसायात्मिका नाहीं, नानाविध संकल्पांनीं अंत:करण डहुळलें आहे, आणि ' बोले आन सांगे आन ' अशीच माझी स्थिति आहे, नामाचा महिमा लोकांना सांगतों पण नामरसांत अंतर अजून भिजलें नाहीं.

शिकाविला तैसा पढो जाणे पुंसा । कैची साच दशा तैसी अंगीं ॥१॥
स्वप्नीचिया सुखें नाहीं होत राजा। तैसा दिसे माझा अनुभव ॥ध्रु०॥
कासया हा केला जिव्हे अळंकार। पायासीं अंतर दिसतसे ॥ २ ॥

* * * *

**कळों आला भाव माझा मज देवा।पायांवीण जीवा आट केली ॥१॥**
**जोडूनि अक्षरें केली तोंडपिटी।नलगे शेवटीं हाती कांहीं ॥ ध्रु० ॥**
**देव जोडे ह्मणून सांगतसे लोकां ।माझा मीच देखा दुःख पावे॥२॥**
**तुका ह्मणे माझे गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥३॥**

* ❀ ❀ ❀

**काय आतां आह्मी पोटाचि भरावें । जग चाळवावें भक्त ह्मणू ॥१॥**
**ऐसा तरी एक सांगाजी विचार।बहु होतों फार कासावीस ॥ध्रु०॥**
**काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची॥२॥**
**तुका ह्मणे काय गुंपोनि दुकाना।राहों नारायणा करूनि घात ॥३॥**

❀ ❀ ❀ ❀

**नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष।अंगा कांहीं रस नयेचि तो ॥१॥**
**तुका ह्मणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरी माझ्या॥२॥**

ग्रंथ पाहिलें व ऐकले आणि त्यांतल्याच गोष्टी व सिद्धांत मी लोकांना सांगत आहे, पण ते माझ्याच अंतःकरणांत ठसले नाहींत. ‘ शिकलों ते बोल । बोले, तैसी नाहीं ओल ॥ ’ अनेक संकल्प माझ्या चित्तांत आहेत, संकल्पाचा नाश झाला नाहीं; हें करीन, तें करीन असें अद्याप वाटत आहे. बुद्धिनिश्चय नाहीं. ‘ बुद्धि नाहीं स्थिर । तुका ह्मणे शब्दा धीर॥’तात्पर्य, ग्रंथांतले ज्ञान मी कीर्तनांतून लोकांना मोठ्या आवेशानें सांगत आसतों खरा, माझें चित्त अजून हरिप्रेमानें आर्द्र झालें नाहीं, बुद्धि व्यवसायात्मिका नाहीं, नानाविध संकल्पांनीं अंतःकरण डहुळलें आहे, आणि ‘ बोले आन सांगे आन ’ अशीच माझी स्थिति आहे, नामाचा महिमा लोकांना सांगतों पण नामरसांत अंतर अजून भिजलें नाहीं.

**शिकाविला तैसा पढो जाणे पुंसा । कैची साच दशा तैसी अंगीं १**
**स्वप्नींचिया सुखें नाहीं होत राजा। तैसा दिसे माझा अनुभव ॥ध्रु०**
**कासया हा केला जिव्हे अळंकार। पायासीं अंतर दिसतसे ॥ २॥**

* * * *

'शिकल्या शब्दाचे व्युत्पादितों ज्ञान।' पण त्याचा मला उपयोग काय? 'अनुभव कई होईन भोगिता?'

तुकोबा संतांनाही विनवून सांगतातः—

**नाहीं साजत हो मोठा। मज अळंकार खोटा॥ १॥**
**असे तुमचा रजरेण। संतां पायींची वहाण॥ ध्रु०॥**
**नाहीं स्वरूपीं ओळखी। भक्तिभाव करीं देखी॥ २॥**
**नाहीं शून्याकारीं। क्षर ओळखी अक्षरीं॥ ३॥**
**नाहीं विवेक या ठायीं। आत्मा अनात्मा ते काई॥ ४॥**
**कांहीं नव्हे तुका। पायां पडणें हें ऐका॥ ५॥**

भक्त, ज्ञानी, संत ही पदवी फार मोठी आहे, हा मोठा अळंकार आहे हें खरें, पण तो मला साजत नाहीं. मी तुह्मां संतांच्या पायींचा रजःकण आहे, तुमच्या पायींची वहाण आहे, तुमच्या पायीं मस्तक ठेवावें एवढाच माझा अधिकार आहे. मी देखोवेखी ह्म०चारचौघे करितात तसें भजन मात्र करितों. ज्याला स्वरूपसाक्षात्कार झाला आहे, क्षर, अक्षर व जेथें सर्वांचा लय होतो तें महाशून्य ज्यानें ओळखलें आहे, आत्मानात्माविवेक ज्याच्या ठायीं सिद्ध झाला आहे, त्यालाच 'संत' पणाचा अळंकार शोभतो.

तुकोबा संतांना विनवितात कीं तुह्मी कृपा करून माझी स्तुती करूं नका. स्तुति ही अभिमानाचें विष माझ्या अंगांत भिनवून माझा नाश करील व देवाला अभिमान खपत नसल्यामुळें अभिमान जडला तर माझा विठोबा मला अंतरेल व तुम्हींही अंतराल!

**न करावी स्तुति माझी संतजनीं। होईल यावचनीं अभिमान॥ १॥**
**भारें भवनदी नुतरवे पार। दूरावती दूर तुमचे पाय॥ ध्रु०॥**
**तुका म्हणे गर्व पुरवील पाठी। होईल माझ्या तुटी विठोबाची॥ ३**

१३ आतां आपण सत्संगाचा विचार करूं. तुकोबांना कीर्तनप्रसंगानें सत्संग मिळाला. भगवंताचे गुणानुवाद ऐकायला व

गायला सांपडले. ‘ कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम ’ हा आनंद अद्भुत आहे. वादक, निंदक, छलक, पाखांडी यांच्या संगतीचा तुकोबांना वीट आला, पण त्याची भरपाई सज्जनसंगतीनें झाली. दुनियेंत प्रेमळ, भाविक, सत्वस्थ लोकही सदा सर्वत्र असतात. जे भाविक तुकोबांकडे कीर्तनप्रसंगानें ओढले गेले त्यांच्या गोड संगतींत ‘ तुका म्हणे येणें आनंदीआनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ’ हा त्यांना लाभ मिळाला.

पापताप दैन्य जाय उठाउठी । जालियां भेटी हरिदासांची ॥ १ ॥
तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥ ४ ॥

*　　*　　*　　*

वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाभ ॥ १ ॥
संत कृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥ ध्रु ॥
तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोनि जाये ॥ ३ ॥

*　　*　　*　　*

ज्याचे नारायण गांठीं । भरला हृदयसंपुटीं ॥
भाविक विश्वासी । तुका ह्मणे नमन त्यांसी ॥

*　　*　　*　　*

संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥
मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ ध्रु० ॥
कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे नामरूप ॥ २ ॥
तुका ह्मणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ३ ॥

*　　*　　*　　*

अंगीं अनुभव आला मज । संतचरणरजांचा ॥ १ ॥
सुखें धालों या सेवनें । दुःख नेणे यावरी ॥ २ ॥

*　　*　　*　　*

दास जालों हरिदासांचा । बुद्धिकायामनें वाचा ॥ १ ॥
तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळ मृदंग कल्लोळ ॥ ध्रु० ॥

**नासे दुष्टबुद्धि सकळ । समाधि हरिकीर्तनीं ॥ २ ॥**

* * * *

**भाग्यें झाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥३॥**
**तुका ह्मणे श्रम केला । आवघा आला फळासी ॥ ४ ॥**

* * * *

येथें ' संत ' शब्दाचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. संत शब्द अशा अभंगांतून तुकोबांनीं जो वापरला आहे तो हरिदास, भाविक, प्रेमळ वारकरी या सामान्य अर्थानें साधकावस्थेंत योजला आहे. वरील सारख्या अभंगांत संत शब्दाची जी अघळपघळ योजना केली आहे ती काय तुकोबांच्या वेळीं संतांचा सुकाळ झाला होता कां तुकोबा न समजून भोळेपणानें सगळ्यांनाच संत म्हणून संबोधीत होते ? अशी शंका निघेल तर दोन्ही कल्पना खऱ्या नाहींत. अस्सल संत केव्हाही विरळच असायचे. तुकोबांच्या वेळीं असे संत होते व त्यापैकीं कित्येकाच्या तुकोबांच्या भेटीही झाल्या. चिंतामणि देव, पुण्याचे अनगडशहा, नगरचे शेख महंमद, बोधलेबोवा, दैठणकरबोवा, यांच्या तुकोबांच्या भेटीबैठकी झाल्या होत्या, उत्तरवयांत रामदासांची त्यांची भेट झाली पण असे संत विरळ. खऱ्या संतांचीं लक्षणें तुकोबांनीं आपल्या अभंगांत दिलीं आहेत. तुकोबांचीं संतांची कसोटीही सामान्य नव्हती ( पृ० १२७ - १२९ पहा ). बरें तुकोबा अज्ञानानें किंवा भोळेपणानें वाटेल त्याला संत ह्मणतील अशापैकीही नव्हते. त्यांनीं भोंदू, दांभिक, खोट्या लोकांचा चांगला खरपूस समाचार घेतला आहे. त्यांची सत्यनिष्ठा इतकी जाज्ज्वल्य, भक्ति इतक्या जिव्हाळ्याची व वाणी इतकी न्यायनिष्ठुर होती कीं यत्किंचित् खोटेपण त्यांना खपत नव्हतें. त्यांच्यावेळीं खरे संत इतके सुकाळाचे नव्हते व ते भोळेही नव्हते मग त्यांनीं ' संत ' पद इतक्या अघळपघळ कां योजलें आहे ? तर पुष्कळ ठिकाणीं हें पद गौरवार्थ वापरलें आहे. सर्व

वारकरी कांहीं तुकोबा नव्हते ! कोणत्याही संप्रदायांत सामान्य जनसमूह असाच असायचा, पण प्रवर्तकांना आपला संप्रदाय वाढवावयाचा असल्यामुळें अंमळ बऱ्यांपैकी उत्सुक अल्पस्वल्प कार्यकर्ते जे असतील त्यांना गौरवून घेऊन अधिक कार्यक्षम करण्यासाठी त्यांना वाणीनें गौरवायचें असतें. यांत कांहीं लबाडी किंवा खोटेपणा असतो असें नाहीं. आपला संप्रदाय लोकांचें व राष्ट्राचें कल्याण करणारा आहे, याचा प्रसार होऊन लोक उद्धरले पाहिजेत असें ज्यांना वाटतें ते तो हरप्रकारें वाढविण्याचा प्रयत्न करितात, त्यासाठी त्यांना उत्तम, मध्यम, कनिष्ठ सर्व प्रकारचे लोक हातीं धरावे लागतात. या न्यायानें नामदेवनाथांपासून—गळयांत माळ घालून पंढरीची वारी नियमानें करणारे, कथाकीर्तनभजनांत रमून प्रेमानें विठ्ठलाची उपासना घेणारे जे वारकरी त्यांना, व विशेषत: त्यांतील हरिदासांना व भजनीमंडळांच्या पुढाऱ्यांना 'संत' ही गौरवाची पदवी लावीत असत. याच न्यायानें तुकोबांनींही संत शब्द पुष्कळ ठिकाणीं गौरवार्थ वापरला आहे. जे विठ्ठलाचे दास आहेत, भजन करणारे प्रेमळ वारकरी आहेत, ज्यांचें भजनकीर्तनाला साह्य झाल्यामुळें कीर्तनसुखाचा रंग आपल्यास उल्हासानें भोगतां येतो, लोकोद्धारक असा कीर्तनसंप्रदाय वाढविण्यास ज्यांचे मनोभावें साह्य होतें, त्यांचा कृतज्ञताबुद्धीनें गौरव करणें हें सौजन्याचेंच लक्षण आहे. तुकोबांचे सर्व टाळकरी व श्रोते कांहीं तुकोबा

---

१ सांप्रतकाळींही असाच प्रकार आहे. शिवाजी महाराजांसारखे खरे 'देशभक्त' विरळ, अपण देशासाठी थोडेंफार काम करणाऱ्यांना 'देशभक्त' किंवा राष्ट्रीय' हें पद देण्यांत येतेंच कीं नाहीं ? 'सुधारक' याचा अर्थ कांहींही असो, पण समाजसुधारणेच्या बाबतींत कांहीं काम करणारे, कामाला मदत करणारे, किंवा सहानुभूति दाखविणारे व चहाते या सर्वांना 'सुधारक' म्हणतात !

नव्हते. 'देशभक्त' या संप्रदायांत जसे शिवाजी विरळ, तसे 'वारकऱ्यांत' हीं तुकोबाही विरळच सांपडायचे! शिवाय आपल्या भक्तिसुखवर्धनाला ज्यांचें पूर्ण साह्य होतें, ज्यांच्या प्रेमळ संगतींत ज्ञानवैराग्यभक्तीला दुणीव चढतें, ज्यांच्या सहवासानें आपल्या परमार्थबुद्धीला भरती येते, त्यांच्या गुणदोषांकडे दुर्लक्ष होणें, कालेंकरून दोष दिसले तरी जातील या बुद्धीनें त्यांचा प्रेमभाव कायम राखणें हा सज्जनांचा स्वभावच आहे. समुदाय ह्मटला कीं त्यांत सर्व प्रकारचे लोक असणारच.

हरिभक्त माझे जिवलग सोइरे। हृदयीं पाउलें धरीन त्यांची ॥१॥
कंठीं तुळशीमाळा नामाचे धारक। ते माझे तारक भवनदीचे ॥५॥
आळसें दंभें भावें हरिचे नाम गाती। ते माझे सांगाती परलोकीचे ७
तुका ह्मणे तया उपकारें बांधलों। ह्मणउनि आलों शरण संतां १०

* * * *

हो कां दुराचारी। वाचे नाम जो उच्चारी ॥ १ ॥
त्याचा दास मी अंकित। कायावाचामनेसहित ॥ ध्रु० ॥
नसो भाव चित्तीं। हरिचे गुण गातां गीतीं ॥ २ ॥
करी अनाचार। वाचे हरिनामउच्चार ॥ ३ ॥
हो कां भलतें कुळ। शुचि अथवा चांडाळ ॥ ४ ॥
ह्मणवी हरिचा दास। तुका ह्मणे धन्य त्यास ॥ ५ ॥

दुराचारी, अभाविक, अनाचारी, अकुलीन कसाही मनुष्य असला तथापि हरिनामोच्चार करणारा हरीचा दास असेल तर, तुकोबा म्हणतात, मी त्याला शरण आहे. यांत तीन तत्वें आहेत. एक तर हरिनामाचें सामर्थ्य एवढें थोर आहे कीं तें कसल्याही पतिताला अखेर उद्धरण्यास समर्थ आहे हा हरिनामाविषयीचा दृढविश्वास यांत स्पष्ट आहे.

अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्‌।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितोहि सः ।।गीता ९—३०॥

मनुष्य आधीं दुराचारी इ० असला तरी हरिभजनाच्या मार्गाला लागला ह्मणजे तो साधुच समजला पाहिजे, कारण त्याचा निश्चय पवित्र आहे, तो चांगल्या पंथाला लागला आहे; अर्थात् तो यथाकाल उद्धरून जाईल. 'यालागीं दुष्कृती जरी जाइला। तरी अनुतापतीर्थीं न्हाला। न्हाउनि मज आंत आला। सर्वभावें' (ज्ञाने० ९-४२०). दुराचाऱ्याच्या दृष्टीनें हा विचार झाला. तुकोबा ह्मणतात मला हरिनाम गाणारा व स्मरविणारा माझ्या जातीचाच वाटतो. 'आवडे ज्या हरी अंतरापासोनी। ऐसियाचें मनीं आर्त माझें' हरिभक्तच काय पण हरिमार्गाला लागलेलाही माझा सखा आहे. तिसरें असें कीं दुसऱ्यांच्या दोषांकडे पाहून मला लाभ कोणताच नाहीं. वाण्याघरीं गुळ घ्यायचा असला तर गुळ घ्यावा, त्याच्या यातिकुळाकडे पाहून आपणांस काय करायचें आहे?

**कासया गुणदोष वानूं आणिकांचे। मज काय त्यांचें उणें असे?॥**

दुसऱ्यांच्या गुणदोषांचा विचार करण्यांत व्यां आयुष्य कां दवडावें? दुसऱ्याचे दुष्टनष्टपण पाहूं तर 'तयाहून अणु अधिक माझेंच नष्टपण' आहे! माझ्याहून कुचरा खोटा कोण आहे? मी अवगुणांची राशी असतांना माझें घर सोडून दुसऱ्याच्या घरचा केर मी कशाला पाहूं? स्वतःचे व दुसऱ्याचे गुणदोष पाहण्याचा तुकोबांस पुरा वीट आला होता. 'आतां माझे नका वानूं गुणदोष' असें त्यांनीं इतरांसही सांगावें. कीर्तनप्रसंगानें गुणदोषचर्चा निघालीच तरी कोणाही व्यक्तीची निंदा, मत्सर, हेवा माझ्या मनीं नाहीं, दोष जावेत यासाठींच कळवळ्यानें मी बोलतों.

**मानदंभासाठीं छळितसे कोणा। आण या चरणां विठोबाची॥**

आपला मान वाढावा व दुसऱ्याची कुत्सा करावी या क्षुद्र बुद्धीनें मी बोलत नाहीं यास पांडुरंग साक्ष आहे.

असो तुकोबांनीं आपल्या अंतःशुद्धीनें आपल्या सहचरांस या-

प्रमाणें पूज्य समजून त्यांच्या संगतीनें आपल्या ठिकाणचा भगवत्प्रेमा वाढविण्याचे कामीं त्यांचें साह्य घेतलें. यांत कित्येक सामान्य तर कित्येक थोर अधिकाराचे, शुद्धाचरणाचे, प्रेमळ वारकरी असलेच पाहिजेत. एकेक गुण तुकोबाही त्यांच्यापासून शिकले. असे अनेक सज्जन तुकोबांना भेटले. त्यांच्या संवादसुखाचा व संगतीचाही त्यांना लाभ झाला. विश्रांतीचा ठाव, प्रेममूर्ति, सच्छील, ब्रह्मनिष्ठ, हरिभक्त अशांचा सहवास त्यांना घरीं, भंडाऱ्यावर, कीर्तनांत, मंदिरांत वेळोवेळीं झाला. संत नव्हते त्यांसही संत मानून घेण्याचा व त्यांचा गुणलेश घेऊन आपला प्रेमा वृद्धिंगत करण्याचा अभ्यास त्यांनीं मनोभावें केला. ' संतांचिये गावीं प्रेमाचा सुकाळ ' असतो, तळमळ किंवा दुःखलेश सांपडत नाहीं, त्यांचें अवघें धन विठ्ठल असतो, ते प्रेमसुखाची देवघेव करितात. ' संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ' असे दयाळु संत मला ' निरंतर जागवितात, त्यांचे उपकार ' कोठवर मानूं असें संतप्रेमानें तुकोबांनीं वारंवार म्हटलें आहे. हरिकथामाउलीचें अवीट अमृतक्षीर ज्यांच्या संगतींत मला सेवन करितां येतें; त्या माझ्या प्रेमळ हरिभक्तांच्या दासांचा मी दास आहे. आमची ' दीन आणि दुर्बळांसी । सुखराशी हरिकथा '—माउली संतसंगतींत पान्हावते. असो. तुकोबांनीं सत्संगाचा लाभ याप्रमाणें आपण स्वतः अंतरंगांत संत होऊन घेतला.

१४ तुकोबांनीं अखंड सावध राहून मनोजयाचा अभ्यास कसा चालविला होता, मनाशीं त्यांच्या झटापटी कशा चालल्या होत्या, त्यांचें कनककांताविषयक वैराग्य कसें खणखणीत होतें, वादकछलकांच्या त्रासाला व जनतेच्या संगाला कंटाळून त्यांनीं एकांतवास कसा धरिला, एकांताचें सुख लाभून त्यांचें चित्त कसें उपशम पावलें, अहंकार कसा मावळला, आपल्या दोषांचें निवेदन ते देवा-

पाशीं कसें करीत व सत्संग कसा धरिला हें आपण येथवर पाहिलें. आतां आत्मशुद्धीच्या ह्या प्रयत्नांचें शिरोरत्न जें नामसंकीर्तन त्याब- द्दल चार शब्द लिहून हें प्रकरण संपवूं. एकांताचें सुख त्यांना मिळत होतें यांत शंका नाहीं, पण त्यांत साक्षात् सुख जें मिळालें तें नामस्मरणाच्या अभ्यासानेंच मिळालें. नुस्त्या एकांतानें उपाधी दूर झाल्यामुळें फार तर दुःखध्वंसाचें अप्रत्यक्ष सुख मिळालें असेल पण प्रत्यक्षसुखाचा झरा जो लागला तो नामसंकीर्तनाच्या अभ्या- सामुळेंच होय. कीर्तनभजनप्रसंगीं समशील साधुसंतांच्या व भा- विकांच्या संगतींत नामस्मरणाचा लाभ ते घेतच होते ( मागें पृ० १२२ ते १२८ पहा ), पण एकांत मिळाल्यामुळें सर्वकाळ नामस्मरणाला मोकळाच सांपडला. कथेंत सज्जनसंगाचा व मृदंग- टाळवीणादिकांच्या साह्यानें होणाऱ्या नादब्रह्माचा आनंद अपूर्वच आहे, पण तेवढ्यानें भागत नाहीं. अखंड नामस्मरणाचा आनंद सर्वकाळ भोगल्याशिवाय चित्तशुद्धीचा साक्षात्कार होणें नाहीं. प्रहरभर कीर्तनांत तन्मयता झाली, पण बाकीच्या वेळांतही मनाला कोठें तरी समाधि दिल्याशिवाय त्याच्याहातून सुटका होत नाहीं. विष्णुसहस्रनामाचे पाठ तुकोबांनीं चालविलेच होते ( पृ० १७४) पण अखंड नामस्मरणाचा छंद त्यांनीं आपणास लावून घेतला हें त्यांचें साधनसर्वस्व होय. नामस्मरणाचा छंद वाचा प्रथम मोठ्या कष्टानें पत्करते पण एकदा पत्करल्यावर वाचा नामाला पळही विसं- बत नाहीं. चित्तांत रूपाचें ध्यान व मुखांत हरीचें नाम असें नाम- स्मरण असतें. अंतर्यामीं ध्यान ठसावत जाणें, ध्यानांत चित्त रंगून जाणें, अंतर्यामीं तन्मय होणें, हें नाम वाचेंत अखंड बसल्याचें लक्षण आहे. ' चित्तीं नसे तरी नसो । परी वाचे तरी असो ' येथून तुको- बांचा नामाभ्यास सुरू झाला तों ' माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ' यांत त्याचें पर्यवसान झालें.

या मधल्या अभ्यासांतला जो आनंद आहे तो ज्याचा त्यानेंच अनुभव घेऊन भोगायचा आहे, तो वाचेनें व्यक्त करणें अशक्य आहे. कुलाचार, संप्रदायपरंपरा, पुराणें व साधुसंतांचे ग्रंथ, गुरूपदेश या सर्वांनीं नामस्मरणच श्रेष्ठ साधन आहे ह्मणून तुकोबांस सांगितलें हें आपण पाहिलेंच आहे. सांगितलें पुष्कळ, पण केलें पाहिजे ! तुकोबांनीं नामाभ्यास केला व ते धन्य झाले. श्रीपांडुरंगाचें रूप पाहून किंवा ध्यानांत आणून तुकोबांच्या चित्तांत प्रेमसुखाच्या लहरी उठत व त्यांत तें स्वयें विरून विरघळून जात.

देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवोनियां ॥१॥
तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण चरण न सोडावें
मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळी प्रेमसुखें ॥२॥
तुका ह्मणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥ ३ ॥

* * * *

देखिलीसे मूर्ती । माझ्या हृदयाची विश्रांती ॥ १ ॥

* * * *

काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥ २ ॥

* * * *

धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहतां संकल्प गोविंदाचे॥१॥

* * * *

धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळितां ॥ १ ॥
बरवा बरवा पांडुरंग । कांती सावळी सुरंग ॥ ध्रु० ॥
सर्व मंगळांचें सार । मुख सिद्धींचें भांडार ॥ २ ॥
तुका ह्मणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ३ ॥

श्रीविठ्ठलरूपाच्या ठिकाणीं इतकी चित्तवृत्ति तन्मय झाली असतांना ‘ व कोंडकोंडुनि धरीन जीवें । देहभावें पूजीन ’ असा पांडुरंग हृदयसंपुटीं सांठविण्याचा दृढाभ्यास चालला असतांना ह्या अभ्यास अखंड करण्यास अखंड नामस्मरणापरतें, चिंतनापरतें

अन्य कोणतें साधन कोणी कोठें कधीं सांगितलें आहे ? नाम-
स्मरण सर्वांस सर्वकाळीं अत्यंत सुलभ आहे. ' नाम घेतां
लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल. ' आणि हें साधन तात्काळ
फळ देणारें आहे, येथें उधारी नाहीं. ' मुखीं नाम हातीं मोक्ष
ऐसी साक्ष बहुतांसी ' पण हा दुसऱ्यांचा हवाला न देतां ' तुका
म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आह्मीं ' याप्रमाणें तुकोबांनी
स्वानुभवही सांगितला आहे. जिव्हेला नामाची एकवार चट
मात्र लागली पाहिजे मग ' ते जीव गेल्या न सोडी ' एवढी अ-
पार गोडी नामचिंतनाची आहे. साखर आणि गोडी तसे ना
आणि नामी एकरूप आहेत हा अनुभव नामस्मरणानंद भोग-
णाऱ्यासच प्राप्त होतो व नाम हें केवळ साधन नसून नामछंदा
साध्यसाधन एकमय होऊन जातात अशीही प्रतीति येते. तुको-
बांनीं नामसुख अपार भोगलें, किंबहुना नामसुख अखंड भोगण्या-
करितां व भोगण्याचे लोकांस शिकविण्याकरितांच त्यांचा अवतार
होता असेंही ह्मणावेसें वाटतें. आसनीं, भोजनीं, शयनीं, गमन-
गमन करितां, सर्व कार्य करितां त्यांचें नामचिंतन चाले व 'चिंत-
चिंतनें तद्रुपता ' हा अनुभव त्यांना येई. नामचिंतनानें जन्मजरा
भयव्याधि सर्व दूर होतात. ' भवरोगा ऐसें जाय । आणिक का
क्षुल्लकें? ' तुकोबांनीं नामाचा आनंद कसा भोगला, संसारपाश त्यामु-
कसे तुटले, हरिप्रेमगोडी वाढून रसना कशी गोडावली, इंद्रियांच्या
धांवा कशा खुंटल्या, अमूप सुख घरीं कसें चालून आलें याबद्द-
त्यांनीं हजारों प्रसंगीं आपले गोड अनुभव अनुपम गोडीनें वर्णि-
आहेत. देवाचें रूप पाहतां किंवा ध्यानीं येतां नामरंग चित्ती
उमटे व नामरंगीं रंगतां रंगतां श्रीरंग अंतरीं प्रगटे व नामनामी-
च्या एकरूपतेंत तुकोबा विरून जात. 'अवघा विठ्ठलाचे उरे' अस
हा परमामृतभोजनाचा तुकोबांच्या घरचा समारंभ पाहून ज्याच्या

तोंडाला पाणी सुटणार नाहीं असा पाषाण कोण असेल ! तुकोबांच्याच तोंडून नामामृतगोडीचा थोडा आस्वाद आपणही घेऊं:—

नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृताचि स्रवे ।
होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥
मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें ।
केलियां विठ्ठलें । कृपा ऐसी जाणावी ॥ २ ॥

*　*　*　*

बैसूं खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गावूं ॥ १ ॥
रामकृष्णनाममाळा । घालूं ओवूनियां गळा ॥ २ ॥

*　*　*　*

संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥ २ ॥
तुका ह्मणे काळ । अवघा गोविंदें सुकाळ ॥ ४ ॥

*　*　*　*

इंद्रियांची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥

*　*　*　*

काळ ब्रह्मानंदें सरे । उरलें उरे चिंतन ॥

*　*　*　*

समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते धणी ॥ १ ॥
धार अखंडित । ओघ चालियेला नित्य ॥ २ ॥

*　*　*　*

बोलणेंचि नाहीं । आतां देवाविणें कांहीं ॥ १ ॥
एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥

*　*　*　*

पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥ १ ॥
तुका ह्मणे चवी आलें । जें कां मिश्रित श्रीविठ्ठलें ॥३॥

*　*　*　*

लागलें भरतें । ब्रह्मानंदाचें वरतें ॥ १ ॥
तुका ह्मणे वाट । बरवी सांपडली नीट ॥ ४ ॥

*　*　*　*

मतिविण काय वर्णू तुझें ध्यान । जेथें पडिलें मौन वेदश्रुति ॥
करूनि गोजिरा आपुलिये मती । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥
सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख । तेणें हरे भूकतान माझी ॥
रसना गोडावली ओव्या गातां गीत । पावलेसें चित्त समाधान
तुका ह्मणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥

* * * *

नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । ह्मणउनि मन स्थिरावलें ॥
धरियेलीं जीवीं पाउलें कोंवळीं । कंठीं एकावळी नाममाळा ॥
शीतळ होवुनीयां पावलों विश्रांती । न साहे पुढती घाली चित्त
तुका ह्मणे झाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ३

* * * *

नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १ ।
गोड गोमटें हें अमृतासी वाड । केला कईवाड माझ्या चित्तें ।
प्रेमरसें झाली पुष्ट अंगकांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ २ ।

* * * *

पाय चित्तीं, रूप डोळां व नाम मुखीं असें हें नामस्मरण
द्रियांसगट जीवाला हरिप्रेमानंद भोगवून त्याचें जीवत्व हिर
नेतें, मग ‘ उरला उरे विठ्ठल ’ याप्रमाणें अद्वयानंदच राहत
नामस्मरणानें न कळे तें कळों येतें, न दिसे तें दिसूं लागतें, अबो
बोलतां येतें, न भेटे तें भेटतें असा अलभ्य अपार लाभ घरीं च
येतो असें तुकोबांनीं स्वानुभवाचें रहस्य सांगितलें आहे. ‘तुका
जों जों भजनासी वळे । अंग तों तों कळे सान्निधता ’ हा अ
स्वतः जो घेईल त्यासच कळणार आहे. नामावांचून दुसरा तर
पाय नाहीं हें तुकोबांनीं ‘ विठोबाची आण ’ घेऊन सांगितलें
( मंगलाचरण अभंग १७ पहा ) ही बोलण्याची सीमा झ
असो. तुकोबांचे आणखी तीन अभंग देऊन हें प्रकरण पुरें क
विषयीं विसर पडला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ १ ।
माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे

लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा २
तुका ह्मणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय॥३॥

*　*　*　*

प्रेमामृतें माझी रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं॥१॥
सकळही तेथें बोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥धु०॥
सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप । वोतलें स्वरूप तयामाजी ॥ २ ॥
तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । नांदे तेथें देव संदेह नाहीं ॥ ३ ॥

*　*　*　*

आनंदाच्या कोटी । सांठविल्या आह्मांपोटीं ॥ १ ॥
प्रेम चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ ० धु॥
अखंड खंडेना जीवन । रामकृष्ण नारायण ॥ २ ॥
घडी आह्मिक्य परत्र । तुका ह्मणे समतीर ॥ ३ ॥

नामाचें माहात्म्य अनेकांनीं अनेक ठिकाणीं गायिलेलें आहे, पण तुकोबांनीं सर्वांवर मात केली यांत शंका नाहीं. अशी अमृत-रसतरंगिणी अन्यत्र कोठें सांपडणार आहे? तुकोबांच्या गायमुखांतून घडघडाट वाहिलेल्या या नाममंदाकिनीनें सारें विश्व आपल्या पवित्र उदरांत आणलें आहे. नामामृतसेवनानें तुकोबांची रसना गोडावली, वाचा अनावर झाली, सकळेंद्रियें ब्रह्मरूप झालीं, तुकोबा व नाम एकरस झाले, मग या नामभक्तांना सोडून देव दूर कोठें राहील? देव, भक्त, आणि नाम यांचा त्रिवेणीसंगम झाला. तुकोबांची अपार नामप्रीति पाहून देव भुलले व त्यांना तुकोबांच्या भेटीला तुकोबांना आवडेल अशा रूपानें यावें लागलें. 'अच्युताचा योग नामछंदें' या त्यांच्याच वचनाप्रमाणें अच्युताला नामरूपाची बुंथी घेऊन त्यांच्या भेटीस येणें प्राप्त झालें. तुकोबांना पांडुरंगाचें साक्षात् दर्शन झालें, सगुणसाक्षात्काराचा महायोग प्राप्त झाला. तो दिव्य कथाभाग वाचकांना पुढील तीन प्रकरणांत वाचावयास मिळणार आहे. साधनांची सीमा झाली कीं साध्य आपण होऊन घरच्यसल्या चालत येतें. कसें तें वाचकांनीं मनाला अति हळुवारपण आणून पहावें, भोगावें व स्वानंद लुटावा.

---

# प्रकरण नववें.



# सगुणभक्ति व दर्शनोत्कंठा.



१ विषयप्रवेश. २ भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व. ३ सगुणनिर्गुणविवेक. ४ तुकोबांची सगुणनिष्ठा. ५ देवाचें सगुण साकार होणें. ६ विठ्ठल शब्दाची व्युत्पत्ति ७ ज्ञानेश्वरींत नामनिर्देश कां नाहीं ? ८ तुकोबा मूर्तिपूजकच होते. ९ तुकोबांची दर्शनोत्कंठा. १० देवाशीं प्रेमकलह. ११ भेटीचे मनोरथ.

१ मागील प्रकरणांत तुकोबारायांनीं चित्तशुद्धीचे कोणते उपाय केले, कोणत्या साधनांनीं जीवपरमात्म्यांच्या मधला मायेचा विरल पडदा दूर सारला, साधनांची परमावधी अखंड नामस्मरणांत कशी केली तें आपण पाहिलें. मागें ( पृ० ११२ ) सांगितल्याप्रमाणें सत्संग, सच्छास्त्र, गुरुकृपा हे तीन टप्पे आपण ओलांडून आलों, आतां साक्षात्काराचा चवथा टप्पा आपणांस गांठावयाचा आहे. ' बुडविल्या वह्या बैसलों धरणें ' अशा वेळीं ध्यानमग्न स्थितींत असतांना ' केलें नारायणें समाधान ' ( पृ० १०२ ) तो समग्र प्रकार आपणास आतां पहावयाचा आहे. या प्रकरणांत भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व, सगुणनिर्गुणविवेक, तुकोबांची सगुणप्रीति, विठ्ठलदर्शनाची उत्कंठा, या उत्कंठेंत देवाशीं केलेले प्रेमकलह, देवाच्या भेटीची तळमळ इ० प्रकार सांगावयाचे आहेत. भगवंताच्या सगुणदर्शनापूर्वी भक्ताच्या अंतःकरणाची कशी स्थिति होते हें आपणांस ह्या प्रकरणांत पहावयास सांपडेल. या पुढच्या प्रकरणांत

तुकोबांचें प्रियउपास्य श्रीपंढरपूरनिवासी पांडुरंग यांच्या स्वरूपाचा थांग लावण्याचा आपण प्रयत्न करूं ! श्रीविठ्ठलस्वरूपाचा बोध घेतल्यावर तिसऱ्या प्रकरणांत रामेश्वरभटांच्या सांगण्यावरून तुकोबांनीं वह्या बुडविल्या, तेरा अहोरात्र विठ्ठलचिंतनांत निमग्न होऊन ते शिलेवर पडले व श्रीविठ्ठलाचें त्यांना साक्षात् दर्शन झालें हा दिव्य कथाभाग आपण पाहूं. वस्तुतः हीं तीनही प्रकरणें ' सगुण-साक्षात्कार ' याच सदरांत यावयाचीं, पण साक्षात्कारप्रसंगाचें यथार्थ स्वरूप वाचकांच्या ध्यानांत यावें यासाठीं एकाचीं तीन प्रकरणें करून ह्या विषयाचा सांगोपांग विचार करण्याचें मी ठरविलें आहे. दर्शनाची उत्कंठा, ज्याचें दर्शन व्हावें अशी उत्कंठा त्या विठ्ठलाच्या स्वरूपाचें आविष्करण व अत्युत्कटभक्तिप्रसंगीं त्याच स्वरूपांत भगवंताचें दर्शन या क्रमानें होणाऱ्या गोष्टींचें या तीन प्रकरणांत विवेचन करावयाचें आहे, तिकडे वाचकांनीं सावधान चित्तानें लक्ष द्यावें अशी त्यांची विनंति करून आपण सगुणसाक्षात्काराच्या प्रसंगाचा पूर्वरंग पाहण्यास प्रारंभ करूं.

२ नरजन्मास आल्याचें सार्थक भगवत्प्राप्तींत आहे हें संत-शास्त्रमुखानें श्रवण केल्यावर भगवत्प्राप्तीचा कोणता मार्ग आपण स्वीकारावा किंबहुना आपल्या मनःप्रवृत्तीला कोणता मार्ग सहज-सुलभ व अनुकूल आहे याचा विचार होऊन मुमुक्षु तोच मार्ग निश्चित करितो. योगमार्ग, कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग हे भगवत्प्राप्तीचे चार मुख्य मार्ग आहेत. श्रुति कांडत्रयरूपिणी आहे ह्मणजे कर्म, उपासना व ज्ञान हे तीन मार्ग दाखविणारी आहे व पातंजलमुनींनीं चवथा योगमार्ग स्पष्ट केला असून आजवर हजारो मुमुक्षु या ४ मार्गांपैकीं जो ज्याला सुलभ व प्रिय तो मार्ग स्वीकारून कृतार्थ झाले आहेत. परमात्मपद गांठणें हें साध्य असून साधनांत ज्यानें त्यानें आपल्या आवडीप्रमाणें निवड केली आहे.

चारही मार्ग उत्तमच आहेत, तरी या कलियुगांत भक्तिमार्गच श्रेयस्कर आहे असें शास्त्रकारांनीं ठरविलें असून हजारो संतमहात्मे याच मार्गाचा पुरस्कार करणारे झाले आहेत. भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत व भागवतांत भक्तिमार्गाचाच मुख्यतः उपदेश केला आहे. गीता आणि भागवत हे भक्तिमार्गाचे आधारस्तंभ आहेत. भगवंतांनीं गीतेंत कर्म, ज्ञान व योग हे तीनही मार्ग भक्तिमार्गांतच आणून सोडले आहेत. देवांनीं अर्जुनाला जें आपलें विश्वरूप दाखविलें तें ' न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ' ( अ-११-४८ ) म्ह० चाऱ्ही वेदांचें अध्ययन, यथाविधि यज्ञांचें अध्ययन, दान, श्रौतादिकर्मे व घोर तपें इत्यादि कोणत्याही साधनानें जें त्याला किंवा कोणालाही दाखविलें नव्हतें, तें रूप भगवान् अर्जुनाच्या भक्तीला भुलल्यामुळें त्यांच्याच प्रसन्नतेनें अर्जुनास पहावयास मिळालें. देवाच्या भक्तीनेंच देवाचें स्वरूप दिसतें. देवांनीं गीतेच्या उपसंहारांतही ' गुह्याद्गुह्यतरं ज्ञानं ' सांगितलें तें

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**

सर्वभूताशयस्थित जो ईश्वर त्याला सर्वभावानें शरण जाणें हेंच सांगितलें व अगदीं अखेरचा गोड घांस ' सर्व गुह्यतमं भूयः ' जो अर्जुनाच्या व तन्निमित्तानें सर्व भूतांच्या तोंडांत घातला तोही 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु' व 'सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ' याप्रमाणें भक्तिरसाचाच घातला आहे. ' अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ' म्ह० हा लोक अनित्य आहे व दुःखदायक आहे म्हणून येथें जन्म मिळाला असतांना माझी भक्ति कर असाच गीतेचा उपदेश आहे. गीतेचें रहस्य हेंच आहे. सर्व साधुसंतांनीं भगवद्वचनानुरोधानें, स्वानुभवानें, व भूतहितेच्छेनें भक्तिमार्गाचाच पुरस्कार केला आहे. असो. तुकोबांच्या जीवींचा जिव्हाळा भक्त्यनुकूल होता व भागवतसांप्रदायाच्या संगतीनें

त्यांची मूळची भक्त्यनुकूल चित्तवृत्ति अधिकच भक्तिमय झाली. भगवान् भक्तीनेंच वश होतील व तेणेंकरून आपण कृतकार्य होऊं असा त्यांचा निर्धार झाला. ' निष्काम निश्चल विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकांची ! हा त्यांचा निर्धार कसा झाला तें आपण त्यांच्याच वाणीनें ऐकूं:—

**योगाभ्यास** करावा पण योगसाधनाची क्रिया मला माहीत नाहीं व तितकें बळही माझ्या अंगीं नाहीं. शिवाय मुख्य कारण असें कीं माझ्या चित्तीं देवावांचून दुसरें कांहीं नाहीं—

**नाहीं बळ योग-अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥१ तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगीं ।......**

दुसरें असें कीं ' भक्तीचें तें वर्म' ज्याच्या हातीं आहे त्याच्या—

**अष्टमहासिद्धी वोळगती द्वारीं । न वजती दूरी दवडितां ॥ १ ॥**

योगाच्या सिद्धी भक्ताच्या अंगीं त्याला नको असल्या तरी सुद्धां जर जडतात तर योगाभ्यास वेगळा तो कशाला हवा ? ' योगभाग्य घरा येती । अवघ्या शक्ती चालत !' योगाच्या नुसत्या कवायतीनें चित्तशुद्धि होत नाहीं म्हणून योगी म्हणून कोणाकडे गेलें तर 'योगी करिती रागें गुरुगुरु ! ' असा अनुभव येतो. खरा योग म्ह० जीवपरमात्मैक्य—देवभक्तांचें ऐक्य तें भक्तियोगानें साधतेंच.

इतर मार्ग पूर्वीच्या युगांत ठीक होते पण या कलियुगांत तरी भक्तिपंथच अत्यंत श्रेयस्कर आहे. **कर्ममार्गाचें** विधिविधान नीट कळत नाहीं व हातून घडणें तर त्याहूनही कठीण:—

**अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कलीं न घडे साधन ।**
**उचित विधिविधान । न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥**

भक्तिपंथ सर्वांत सोपा आहे. त्यांत सर्व कर्मे श्रीहरीला अर्पण होत असल्यामुळें पापपुण्याचा लेप लागत नाहीं व जन्ममृत्यूंचेंही खंडण होतें:—

**भक्तिपंथ बहु सोपा । पुण्या नागवे या पापां ।**
**येणें जाणें खेपा । येणेंचि एकें खंडती ॥ २ ॥**

आणखी असें कीं योगमार्ग, ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांचें आचरण करणाऱ्याला स्वतःच्या बळावरच चालावें लागतें तसा प्रकार येथें नाहीं. ह्या भक्तिमार्गानें जीव चालू लागला कीं त्याला भगवंत साह्य होतातः—

**उभारोनि बाहे । विठो पालवीत आहे ।**
**दासां मीच साहे । मुखें बोले आपुल्या ॥ ३ ॥**

बाह्या उभारून देवांनीं सांगितलें आहे कीं माझ्या भक्ताचा मीच साह्यकर्ता आहें. ‘ न मे भक्तः प्रणश्यति ’ ( गीता ९–३१ ) व ‘ तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ’ ( गीता १२–६ ) हे देव स्वतःच बोलले आहेत. तात्पर्य भक्तिपंथ सर्व मार्गांवरिष्ठ आहे. ‘ आणिकां उपाया अनुपान कठिण ’ अन्यमार्ग जे आहेत त्यांचीं अनुपानें आहेत, पण या भक्तिमार्गांत मनुष्य देवाला अनन्यभावें शरण गेला कीं त्याची कड लावण्याचा भार देव अंगावर घेतात. मंत्रतंत्रजपतपव्रत हे मार्गही बिकट व अनिश्चित फलदायी आहेत.

**तपें इंद्रियां आघात । क्षणें एक वाताहात ॥ ३ ॥**

**मंत्र चळे थोडा । तरी धडचि होय वेडा ॥ ४ ॥**

**व्रतें करितां सांग । तरी एक चुकतां भंग ॥ ५ ॥**

तात्पर्य **तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावाचि कारण देवा ॥ २ ॥**

ह्या वरून जपतपव्रतानुष्ठानादिकांचा तुकोबा धिक्कार करितात असें कोणीं समजूं नये. यासाधनांची मोहोर देवाकडे ठेवून हीं आचरिलीं ह्मणजे हीं भक्तिरूपच आहेत. ओव्यारूपी अभंगांत त्यांनीं ह्मटलें आहेः—

**करा जपतप अनुष्ठान याग । संतीं जे मारग स्थापियेले ॥**
**सत्य मानूनियां संतांच्या वचना । जारे नारायणा शरण तुह्मी॥**

आतां ज्ञानमार्ग पहावा, पण ज्ञानाच्या गोष्टी सांगायला सोप्या असल्या तरी ज्ञानाचा अनुभव कठिण आहे.

**सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी। अनुभव तो पोटीं कैच्या घडे॥ १ ॥**

शुद्धज्ञान परमदुर्लभ आहे. कोणत्याही वासनेचा विटाळ न झालेलें शुद्ध ज्ञान कोठें मिळेल म्हणून पाहूं लागलों तों ज्ञानाच्या पाठीं अहंकाराचें भूत बहुधा आढळून आलें. त्यापेक्षां ' चिंतनां मंगल अष्टौप्रहर ' हें जाणून भजनाची मीं सोय धरिली.

' मनवाचातीत तुझें हें स्वरूप ' जीवाला कळावें कसें असा विचार करितां, तुकोबा म्हणतात, ' योगयागतपें देहाचिया योगें। ज्ञानाचिया लागे न सांपडसी। ' म्हणून आम्हीं तुझी भोळ्याभावानें सेवा करणें हेंच श्रेयस्कर असें ठरविलें आहे. भक्तीचिया मापें मोजितों अनंता। इतरानें तत्वता न मोजवे ' ह्म० अनंत हा अनंतच आहे, त्याचा पार वेदांसकट कोणालाच लागला नाहीं; योग, ज्ञान, कर्म या साधनांनीं त्याचें पूर्ण आकलन होत नाहीं म्हणून आम्हीं भक्तीचीच कास धरिली आहे.

' बहु भितों जाणपणा—' ज्ञानापासून ज्ञानाचा फुंज अंगीं चढेल अशा भीतीनें आम्हीं तो मार्गच सोडून दिला आहे. प्रेमपान्हा पाहिजे, आम्हांला तुझें भक्तिसुखच पाहिजे. या प्रेममार्गाची—भक्तिमार्गाची योग्यता सर्वांत मोठी आहे:—

**यासी तुळे ऐसें कांहीं। दुजें त्रिभुवनीं नाहीं।**
**काला भात दही। ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ २ ॥**

ह्या भक्तीशीं कशाचीही तुळणा करवत नाहीं. श्रीकृष्णाचे सवंगडी होऊन काल्याचें सुख भोगणें ब्रह्मादि देवांनाही दुर्लभ आहे. देवा! आजपर्यंत अद्वैतज्ञानाच्या गोष्टी मी पुष्कळ बोललों पण तूं देव व मी भक्त ह्या भागांत खंड पाडूं नकोस व भक्तीचा रंग उणा पाडूं नकोस एवढेंच तुजपाशीं मागणें आहे.

**तुका ह्मणे हेंचि देई । मीतूंपणा खंड नाहीं ।**
**बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ४ ॥**

अभेदाची आवडी नाहीं असें तुकोबा अभेदाचा अनुभव घेतल्याशिवाय खास बोलले नाहींत. भक्तीची पायरी खालची व ज्ञानाची पुढची असें केवळ ज्ञानमार्गी पुरुष म्हणोत, पण ज्ञानेश्वरनाथतुकोबांसारखे ज्ञानीभक्त 'मोक्षावरील भक्तीचें' ह्म० पराभक्तीचें सुख अधिक मानतात. मोक्षाचें आह्मांसी अवघड नाहीं, तो आह्मी गांठोडीस बांधून ठेवला आहे, भक्तांना मोक्ष नको असतो, मोक्ष आमच्या दारींचें खेळणें आहे, भक्तांच्या दारीं मोक्ष काकुळती होऊन पडला आहे असें तुकोबांनीं अनेकवार उद्गार काढले आहेत, पण त्यावरून मोक्षाशीं त्यांनीं वैर बांधलें होतें असें नाहीं, तर तो सहज आहे अशी खात्री झाल्यावरच त्यांनीं भक्तिसुखाचें कोडकौतुक केलें आहे ! ज्ञानसंमिश्र भक्ति किंवा ज्ञानोत्तर भक्ति—तिला पराभक्तिही ह्मणा—पण ज्ञानानें स्वरूप ओळखल्यावरच—तुकोबांनीं भक्तीच्या परमानंदाचा सुखविलास भोगण्याची मनीषा धरली. वरील विवेचनावरून योगमार्गाची, ज्ञानमार्गाची किंवा कर्ममार्गाची विटंबना करून भक्तिमार्गाची तुकोबादि भक्तश्रेष्ठांनीं श्रेष्ठता गायिली आहे असें कोणी समजूं नये. हे मार्ग उत्तमच आहेत, पण भक्तिमार्गाचें अनुसरण केल्यानें ह्या सर्व मार्गांनीं मेल्याचें फळ मिळून शिवाय प्रेमसुखाचा लाभ होतो. योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध आणि तो साधण्याचा उपाय 'ईश्वरप्रणिधानाद्वा' असें पातंजलयोगसूत्रेंच आहे. तुकोबांना ईश्वरप्रणिधानानें चित्तवृत्तिनिरोध किती साधला होता हें पाहिलें

---

१ ह्या सूत्राचा अर्थ तुकोबांच्या वाणीनें ऐकावा:—
**योगाचें तें भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥ १ ॥**
**अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा जालिया ॥ २ ॥**

ह्मणजे ते योगी नव्हते असें कोण ह्मणूं शकेल? तसेंच संग व फलाशा सोडून कर्म करणें हें निष्काम कर्मयोगाचें जर सार आहे तर केवल भगवत्प्रीत्यर्थ कर्माचरण करणारे तुकोबा कर्मयोगी नव्हते असें कोणी म्हणावें? जीवपरमात्मयोग हें जर ज्ञानमार्गाचें अंतिम साध्य आहे तर 'तुका विठ्ठल दुजा नाहीं' ह्या अनुभवाच्या शिखरावर पोंचलेले तुकोबा ज्ञानी नव्हते असें तरी कोण म्हणेल! तात्पर्य कर्म, ज्ञान, योग यांचा भक्तीशीं विरोध नाहीं. हे सर्व शब्द वेगळे दिसतात व भगवंताला सोडून असतील तर हे मार्ग भिन्न वाटतात, पण वस्तुतः ते सर्व एकाच अनुभवाचे निदर्शक आहेत. तुकोबा योगी होते, कर्मी होते व ज्ञानी होते आणि त्यामुळें त्यांच्या चित्तांत व वाणींत अपार प्रेमरंग भरला आहे व ज्या जादूनें त्यांनीं जगाला आपलें वेड लावलें असे मुख्यतः निस्सीम भक्त होते. ह्या भक्तीचें स्वरूप शब्दांनीं सांगतां येणें शक्य नाहीं. प्रेमस्वरूप अनिर्वचनीय आहे. 'प्रेम नये बोलतां सांगतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे.' कर्मज्ञानयोगांला पूर्णत्व ज्या भक्तीनें येतें, कर्मज्ञानयोगाची सार्थकता ज्या प्रेमानें होते ती भक्ति, तें प्रेम, तो जिव्हाळा तुकोबांच्या हृदयांत पूर्ण होता, 'हेंचि माझें तप' ह्या अभंगांत भक्तिपूर्वक देवाचें चिंतन करणें, त्याचें नांव घेणें, त्याच्या रूपाशीं तन्मय होणें हेंच माझें तप, हाच माझा योग, हाच माझा यज्ञ, हेंच माझें ज्ञान, हेंच माझें जपध्यान, हाच माझा कुळाचार, हेंच माझें सर्वस्व असें त्यांनीं म्हटलें आहे. कर्माच्या 'आदीं अवसानीं अंतीं' देवाचें अखंड चिंतन हाच त्यांनीं स्वधर्म सांगितला आहे. कर्मज्ञानयोगांत जें जें न्यून असेल त्याची पूर्तता हरिप्रेमानें होते ह्मणून भक्तियोगच सर्वांत श्रेष्ठ आहे. तुकोबांनीं आजन्म भक्तिसुख भोगलें व भक्तीचा नगारा पिटून भक्तिमार्गाचा प्रसार केला. नारायण भक्तीनें वश होतो. 'प्रेम-

सूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी ' असो. भक्तिमार्गच श्रेष्ठ कां याचीं तुकोबांनीं वर दिलेलीं कारणें ज्यांना पटत नसतील त्यांना तुकोबा सौम्य उत्तर देतात कीं मला हा मार्ग रुचला म्हणून मीं हा पत्करला आहे ! ' तुका ह्मणे बहु सांडियेलीं मतें । आपुल्यापुरतें धरोनि ठेलों । ' बहुतां छंदांचें बहुत लोक आहेत, त्यांच्या बरोबर कुठवर नाचावें ? त्यापेक्षां ' करावा जतन आपुला विश्वास ' —आपली भगवन्निष्ठा जतन करावी व दुसऱ्याच्या वाटेला जाऊं नये. भक्तिसुख हें अविट आहे, पुनः पुन्हा सेवावेंसें वाटेत.

भक्तिप्रेमसुख नेणवे आणिका । पंडितवाचकां ज्ञानियांसी ॥१॥
आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्या॥२॥
तुका ह्मणे कृपा करिल नारायण । तरिच हें वर्म ठायीं पडे॥३॥

३ सगुणनिर्गुण एक हाच आपल्या संतांचा सिद्धांत आहे, तथापि त्यांनीं भक्तीचें कोडकौतुक केलें आहे. अद्वैतांत द्वैत आणि द्वैतांत अद्वैत, निर्गुण तेंच सगुण व सगुण तेंच निर्गुण असा त्यांचा निर्धार व अनुभव असल्यामुळें उभयविध आनंद त्यांच्या वाणींत भरलेला आहे. संत द्वैती नाहींत व अद्वैतीही नाहींत, द्वैताद्वैतशून्य अशा शुद्ध ब्रह्माशीं ते समरस झालेले असतात. ' तुज सगुण ह्मणों कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एक गोविंदु रे ' हें ज्ञानोबारायांचें व 'सगुणनिर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी' हें तुकोबांचें ह्मणणें याच सिद्धांताला धरून आहे. निर्गुण तोच भक्तकार्यार्थ आपलें निर्गुणपण न मोडतां सगुण झाला आहे. परब्रह्म मनवाचातीत आहे, ' अक्षरामाजीं सांपडे । कां कानावरी जोडे ' असें नाहीं:—

ऐसें शब्दजात माघौतें सरे।जेथ संकल्पाचें आयुष्य पुरे।
वाराही जेथ न सरे । विचाराचा ॥ ३१९ ॥
जें उन्मानियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य ।

अनादि जें अगण्य । परम तत्त्व ॥ ३२० ॥
जें विश्वाचें मूळ । जें योगद्रुमाचें फळ ।
जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा ॥ ३२१ ॥
जें आकाराचा प्रांत । जो मोक्षाचा एकांत ।
जेथ आदि आणि अंत । विरोनि गेले ॥ ३२१
जें महाभूतांचें बीज । जें महातेजाचें तेज ।
एवं पार्था जें निज- । स्वरूप माझें ॥ ३२३ ॥

असें जें अचिंत्य, अव्यक्त, अरूप, अगुण, अनाम, सर्वरूप, सर्वगत परमात्मतत्त्व—तें, अगदीं तेंच, तें निराकार, निर्विकार, निर्गुण परब्रह्मस्वरूप:—

ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपासि आली ।
देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंदें ॥३२४॥ ( ज्ञाने०अ०६ )

भक्तांनीं नास्तिकांचा छळवाद आरंभिला तेव्हां तेंच परब्रह्म चतुर्भुज नयनमनोहर झालें आहे. ' झालें आहे ' हा शब्दप्रयोग सुद्धां खुपतो, तेंच तें आहे !

लक्षूनियां योगी पाहती आभास । तें दिसे आह्मांस दृष्टीपुढें ॥१॥
कर दोनी कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥२॥
अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका ह्मणे ॥३॥

भगवान् ' ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहम् ' ( गीता १४–२७ ) म्हणजे ' ब्रह्म आन नसे मी वांचूनी ' ( ज्ञाने० ) असें स्वमुखानें सांगतात. ' सगुण निर्गुण गुणाचे अगुण, ' असें हरीचें स्वरूप आहे तरी ' ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं ' असा सगुणाचा छंदच भक्तजन घेत असतात. स्वतः देवांनींच गीतेच्या बाराव्या अध्यायांत अव्यक्तोपासना मोक्षप्रद खरी पण कष्टप्रद आहे ( क्लेशोधिकतरस्तेषां ) व व्यक्तोपासना सुलभ आणि श्रेष्ठ आहे ह्मणून सांगितलें आहे. ' व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत ' ह्म० दोन्ही रूपें एका-

चींच—दोन्ही मिळून एकच, पण भक्त भक्तिसुखार्थ व्यक्ताचीच उपासना करितात. अव्यक्त म्ह० निर्गुण, निराकार, निरुपाधिक, विश्वरूप ब्रह्म व व्यक्त म्ह० सगुण, साकार, सोपाधिक रामकृष्णादि रूप. अव्यक्त म्ह० जें कोणत्याही प्रमाणानें व्यक्त केलें जात नाहीं (न केनापि प्रमाणेन व्यज्यते) व व्यक्त म्ह० करण (इंद्रिय)-गोचर असें व्यक्ताव्यक्तांचें आचार्यांनीं विवरण केलें आहे. व्यक्ताची उपासना सुलभ, सुखकर, सर्वसाध्य असून आणि अखंड भक्तिप्रेमानुभव देणारी असून अव्यक्तोपासनेचें मोक्षरूप फळही देणारी आहे. आचार्य उपासना म्हणजे काय तें सांगतात:—"यथाशास्त्रं उपास्यस्य सामीप्यमुपगम्य तैलधारावत्समानप्रत्ययप्रवाहेण दीर्घकालं यदासनं तदुपासनम्" म्ह० तैलधारा अविच्छिन्नपणें सतत पडते त्याप्रमाणें उपास्याकडे एकसारखें दीर्घकाल लक्ष असणें ही उपासना होय. देहवंत जीवांना व्यक्ताचीच उपासना सुखकर वाटणारी आहे. अर्जुनाला विश्वरूप पाहिल्यावरही कृष्णरूपाचीच तहान लागली. 'किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव' 'जयाची उपनिषदा नाहीं भेटी' तें विश्वरूप पाहून अर्जुन म्हणाला:—

हे विश्वरूपाचे सोहळे। भोगोनि निवाले जी डोळे।
आतां होताति आधले ( अधीर )। कृष्णमूर्तीलागीं ॥६०४॥
तें साकार कृष्णरूपडें। वांचूनि पांहों नावडे।
तें न देखतां थोडें। मानिताति हे ॥ ६०५ ॥
आह्मां भोगमोक्षान्विया ठायीं। श्रीमूर्तीवांचूनि नाहीं।
ह्मणोनि तैसाचि साकार होई। हें उपसंहरीं आतां ॥ ६०६ ॥

हीच सर्व भक्तांची वृत्ति असते. पण अव्यक्त व्यापक आणि व्यक्त एकदेशी असें कोणी म्हणेल तर ज्ञानोबाराय सांगतात कीं सोन्याची लगड व गुंज या दोहोंत सोनेपणाच्या दृष्टीनें कांहीं भेद नाहीं किंवा अमृताच्या सागरीं जाऊन अमृताची एक चूळ घेतली तरी सागराचेंच सामर्थ्य एकाही चुळींत आहे त्याप्रमाणें विश्वरूप आणि चतुर्भुज मूर्ति या

मोक्षदानीं सारख्याच समर्थ आहेत. गीतेच्या १२ व्या अध्यायांत सगुणोपासनाच श्रेयस्कर आहे असा निजजनानंद व जगदादिकंद जो श्रीमुकुंद त्यानें स्वमुखानेंच सांगितलें आहे. एकनाथमहाराजांनीं भागवतांत (स्कंध ११ अध्याय ११ श्लोक ४६ वरील टीका पहा) ह्मटलें आहे कीं सगुण निर्गुण दोन्हीं समान हें खरें, पण निर्गुणाचा शोध कठिण, मनबुद्धिवाचेला अगम्य असून वेदशास्त्रांलाही त्याची खूण कळत नाहीं तसा प्रकार सगुणाचा नाहीं. सगुणाचें रूप पाहतांच भूकतान हरपते व मन प्रेमभरित होतें. सोनें आणि अलंकार एकच, पण सोन्याची खोट नववधूच्या गळ्यांत बांधली तर ती बरी दिसेल कीं सोन्याचे नानाविध अलंकार घडवून ते तिच्या अंगप्रत्यंगांवर चढविले असतां ती मनोहर दिसेल? दुसरें असें कीं तूप पातळ काय व घट्ट काय तूपच तें, पण पातळ तुपापेक्षां घट्ट तुपाचे गोळे खायला कसे गोड लागतात! तसाच 'निर्गुणापरिस सगुणीं पाहे। अतिलवलाहे स्वानंदू.' देवाच्या सगुणध्यानपूजनभजनांत जो परमानंद आहे तो कोणत्याही अन्य साधनानें मिळणारा नाहीं. सगुणभजनानें अद्वैतसिद्धि अनायास प्राप्त होते. 'रघुनाथभजनें ज्ञान झालें' असें समर्थांचें स्वानुभवपूर्वक सांगणें आहे. 'भक्त्या मामभिजानाति' असेंच देव सांगतात. ह्या संबंधानें नाथांनीं उत्कृष्ट सिद्धांत सांगितला आहे तो निरंतर ध्यानीं धरावा.

"दीपकाळिका हातीं चढे। तैं घराभीतरी प्रकाशु सांपडे।
माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे। तैं चैतन्य आंतुडे अवचेंचि॥"

देवाच्या मूर्तीचें दर्शन, भजनपूजन, कथाकीर्तन, नामस्मरण, इ० श्रद्धापूर्वक घडत राहिलें ह्मणजे हळूहळू ज्याची मूर्ति उपास्य तो ध्यानीं जडून चित्तांत खेळूं लागतो, स्वप्नदृष्टांत होऊन आदेश ऐकूं येतात, तो पाठीशीं आहे असा प्रत्यय येऊन त्याचें प्रेम वृद्धिंगत

होत असतें, मग त्याच्या प्रत्यक्ष भेटीची तळमळ लागते, पुढें प्रत्यक्ष भेट होऊन तो निरंतर संनिध आहे असा अनुभव येतो व शेवटीं आंत बाहेर तोच आहे व तोच सर्व भतांच्या हृदयीं आहे, त्यावांचून ब्रह्मांडांत दुसरा कोणी नाहीं, माझ्यांत तोच आहे, मीही तोच आहे असें होऊन सगुणनिर्गुण हे भेदभाव लयास जातात. सगुणभक्तींतच निर्गुणानुभव होतो, सर्व भेदभाव आटून जातात. असे समरस झालेले भक्त भक्तिसुखाचे सोहळे भोगण्यासाठीं 'तूं देव मी भक्त' एवढेंच मौजेचें द्वैत गमतीनें ठेवतात. असा भक्त पाहिला तरी त्याचें कर्म भक्ताचें, पण अंतरंग पाहतां तो परमात्माच आहे असें देखण्यास कळून येतें. ह्याच अर्थानें तुकोबांनींही 'अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख' असें ह्मटलें आहे. सर्व महाराष्ट्रसंत असेंच सगुणांत निर्गुण व निर्गुणांत सगुण, द्वैतांत अद्वैत व अद्वैतात द्वैत पाहणारे व पाहून तद्रूप झालेले आहेत. तुह्मी त्यांना द्वैती ह्मटलें तरी शोभेल, अद्वैती ह्मटले तरी शोभेल, सगुणभक्त ह्मटलें तरी चालेल, निर्गुणानुभवी ह्मटलें तरी ते अद्वैतानुभवांत असूनही द्वैतसुख भोगतात. आपला भागवतधर्म असाच अद्वैत आणि भक्ति यांचें ऐक्य करणारा आहे. ज्ञानोबाराय, समर्थ व तुकोबा या तिघांचाही अनुभव एकच कसा आहे तें सांगतों:—

(१) **पवन हालवूनि पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे ।**
**येरवीं गगन तो सहजें । असे जैसें ॥ ११५ ॥**
**तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्त ऐसा गमे ।**
**परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाहला ॥ ११६ ॥**

—ज्ञानेश्वरी अ० ७

(२) **देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना ।**
**ऐसी स्थिति सज्जना-। अंतरींची ॥ ४२ ॥**

—दासबोध द० ६ स० ७

(३) आधीं होता संतसंग । तुका झाला पांडुरंग ।
त्याचें भजन राहिना । मूळ स्वभाव जाइना ॥

ह्या तीनही उद्गारांवरून शुद्ध ब्रह्मज्ञान आणि निष्ठावंत भजन यांचें भक्ताच्या ठिकाणीं पूर्ण ऐक्य असतें हें उघड दिसतें. भक्तीचें अद्वैताशीं भांडण नाहीं इतकेंच काय पण त्यांची एकरूपता आहे. द्वैताद्वैत, सगुणनिर्गुण, देवभक्त, जीवब्रह्म हे भेद समजुतीपुरते आहेत, तत्त्वतः नाहींत हा सिद्धांत ध्यानांत धरून साधुसंतांनीं ज्या भावानें सगुणोपासनेचें कोडकौतुक केलें आहे त्याच भावनेनें आपणही सगुण-प्रेमाची कथा ऐकण्यास तयार होऊं. तुकोबांनीं देवाशीं विनोद केला आहे, प्रसंगीं स्तुतिबरोबर बाह्यतः निंदाही केली आहे, हव्या त्या कल्पना केल्या आहेत, प्रेमानें शिव्याही दिल्या आहेत पण देवाशीं आपलें मूळांतलें ऐक्य ओळखल्याशिवाय त्या खास दिल्या नाहींत. तुकोबांना सर्व महाराष्ट्र संतांप्रमाणें अद्वैतसिद्धांत सर्वस्वी मान्य होता हें ज्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं त्यांना तुकोबांनीं देवाशीं फार सलगी केली आहे याचेंच आश्चर्य वाटतें! सिद्धांत अद्वैताचा आणि सुखसोहळा भक्तीचा हें भागवतधर्माचें रहस्य न विसरतां सगुण-भक्तीचा आनंद आपण तुकोबांच्या संगतींत भोगायला तयार होऊं.

६ विठ्ठल शब्दाची व्युत्पत्ति ' विदा ज्ञानेन ठान् शून्यान् लाति गृह्णाति विठ्ठलः ' म्हणजे ज्ञानशून्य अर्थात् भोळेभावडे जे अज्ञ जन त्यांचा अंगीकार करणारा अशी धर्मसिंधुकार काशीनाथ बाबा पाध्ये यांनीं केली आहे. तुकोबांचा ' वीचा केला ठोबा । म्हणोनि नांव विठोबा ' असा एक चरण आहे. त्याचा वी. म्ह. पक्षी—गरुड, तो ज्यानें वाहन केला आहे ह्म. गरुडवाहन असा अर्थ असावा असें मला वाटतें. वी. (विद्) म्ह. ज्ञान त्याचा ठोबा म्ह. सोट, आकार अर्थात् ज्ञानाचा आकार, ज्ञानमूर्ति, परब्रह्माची सगुण साकार मूर्ति असाही कोणी कोणी अर्थ करितात. व्युत्पत्ति-

शास्त्रदृष्ट्या विष्णु—विठु—विठोबा असाही अर्थ होतो. विष्णु याचें प्राकृत भाषेच्या व्याकरणाप्रमाणें विठु असें रूप होतें. मुष्टि=मूठ, पृष्ठ=पाठ तसेंच विष्णु=विठु. 'ल' प्रत्यय प्रेमार्थी व 'बा' आदरार्थी आहे. कोणी विठ्ठल=विटस्थल, विटेवर उभा राहणारा असा अर्थ करितात. पांढऱ्या मातीची जमीन म्हणून त्या स्थानास पंढरपूर म्हणत, तेथें विटांचे कारखाने असावे. पुंडलीकानें देवापुढें वीट केली ती विटांचा मुलुख म्हणूनच होय. असो. विठोबा शब्दाचा धात्वर्थ कसाही असला तरी विठोबा ह्या शब्दानें पंढरीच्या विटेवरची श्रीकृष्णमूर्ति असाच बोध कोट्यवधि लोकांना आजवर होत आला आहे. श्रुतीनें परमात्म्याला 'ॐ' हें नांव दिलें तसें संतांनीं त्याच परमात्म्याच्या व्यक्तरूपाला—श्रीकृष्णाला—विठ्ठल असें नांव दिलें आहे. ज्ञानोबारायांनीं 'ॐतत्सदितिनिर्देशो' ह्या गीताश्लोकावर व्याख्यान करितांना प्रणवाबद्दल जें म्हटलें आहे तेंच देवाच्या विठ्ठल नांवाला लागू पडण्यास हरकत नाहीं.

तें ( ब्रह्म ) कीर अनाम अजाती। परि अविद्यावर्गांचिये राती-। माजीं वोळखावया श्रुती। खूण केली ॥ ३२९ ॥ उपजलिया बाळकासी। नांव नाहीं तयापाशीं। ठेविलेनि नांवेंसी। ओ देत उठी ॥ ३३० ॥ कष्टले संसारशिणें। जे देवो येती गाऱ्हाणें। तया ओ देणें नांव जेणें। तो संकेत हा ॥ ३३१ ॥ ब्रह्माचा अबोला फिटावा। अद्वैतत्वें तो भेटावा। ऐसा मंत्र दाखिला कणवा। वेदें बापें ॥ ३३२ ॥ मग दाविलेनि जेणें एकें। ब्रह्म आळविलें कवतिकें। मागां असत ठाके। पुढां उभें ॥ ३३३ ॥ (ज्ञानेश्वरी अ० १७)

ब्रह्म अनाम व अजाती असून त्याची संसारांत शिणलेल्या जीवांना ओळख पटावी म्हणून श्रुतीनें जो संकेत केला तो प्रणवशब्दानें ओळखला जातो, तसेंच संतांनीं श्रीकृष्णाची ओळख जीवांना पटावी म्हणून त्याचा विठ्ठलनांवानें निर्देश केला आहे व श्रीकृष्णही त्यांना या नांवानें कोणी आळविलें कीं प्रत्यक्ष होऊन भक्ताच्या पुढें उभे राहतात. श्रीकृष्णाला हरिवंशभागवतांत विठ्ठलनांवानें संबो-

धिलें नसलें व भक्तांनीं त्याचें हें नांव नवीन ठेविलें असलें तरी नां-वाच्या नवीनपणामुळें श्रीकृष्णाचें कृष्णपण कांहीं ढळत नाहीं. कित्येक पुराणांतून पंढरपुरच्या विठ्ठलाचे उल्लेख आहेत. पद्मपुराणांत (उत्तर-खंड, गीतामाहात्म्य) ' द्विभुजं विठ्ठलं विष्णुं भुक्तिमुक्तिप्रदायकम् ' असा उल्लेख आहे. गरुडपुराणांत ' विठ्ठलं पांडुरंगे च व्यंकटाद्रौ रमासखं ' म्ह० पंढरींत विष्णूला विठ्ठल म्हणतात असें म्हटलें आहे. स्कंदपुराणांत भीमामाहात्म्यांत ' पांडुरंग इति ख्यातो विष्णु-र्विपुलभूतिदः ' असा एकदां उल्लेख असून त्याच पुराणांत चंद्रलामाहात्म्यांत ' कमलावल्लभो देवः करुणारसशेवधिः ' असें पुन्हां विठ्ठलाचें वर्णन केलें आहे. याप्रमाणेंच ब्रह्मांडपुराण, भार्गवपुराण इ० पुराणांतून व श्रीशंकराचार्यकृत पांडुरंगस्तोत्रादि-कांतूनही श्रीपंढरपूरनिवासी पांडुरंगाचें वर्णन आलेलें आहे. पंढरी हें क्षेत्र व श्रीविठ्ठल ही देवता फार प्राचीन आहेत. पुराणां-तील वर दिलेल्या अवतरणांवरून विठ्ठल म्ह० विष्णु हें स्पष्ट आहे.

७ विठ्ठलस्वरूपाचा विचार आपण पुढील प्रकरणांत करणार आहोंत, येथें विठ्ठल म्ह० विष्णु व त्यांतही विष्णूचा पूर्णावतार श्रीकृष्ण हें लक्षांत घेऊन एका आक्षेपाचा विचार करून पुढें जाऊं. ज्ञानेश्वरींत विठ्ठलाचा नामोच्चार कां नाहीं व ज्या अर्थीं तो नाहीं त्या अर्थीं ज्ञानेश्वरमहाराज म्ह० ज्ञानेश्वरीकर्ते हे विठ्ठलभक्त होते असें नसून ते निर्गुणोपासकच होते असा कित्येक अर्वाचीन पंडि-तांचा तर्क आहे! ज्ञानेश्वर व नाथ हे दोघेही निःसीम गुरुभक्त होते व ग्रंथरचनाकालीं त्यांचे गुरुही त्यांच्या सन्मुख होते यास्तव त्यांच्या ग्रंथांचीं मंगलाचरणें गुरुस्तुतीनींच भरलेलीं आहेत; तथापि त्यांच्या ग्रंथांतून श्रीकृष्णप्रेमाचे जे अद्भुत निर्झर आहेत त्यांज-कडे लक्ष पोंचवलें असतां त्यांचें सगुणप्रेम किती अलौकिक होतें तें आंधळ्यासही दिसून येणार आहे. श्रीकृष्णार्जुनप्रेमाच्या वर्णनप्रसं-

गांतून ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपली कृष्णभक्तीची लालसा पुरवून घेतली आहे ( माझें श्रीज्ञानेश्वरचरित्र पृ० २११ ते २१८ पहा ) शिवाय जेथें जेथें श्रीकृष्णवर्णनाचे प्रसंग आले, तेथें तेथें महाराजांची वाणी किती कोमळ झाली आहे हें ज्ञानेश्वरीच्या वाचकांस माहीतच आहे. विस्तारभयास्तव उतारे देत नाहीं. ज्ञानेश्वरींत अ० ४ प्रारंभींच्या १४ ओव्या, अ० ९ ओव्या ४२५ ते४७५ पहा.

**ऐसें सांवळेनि परब्रह्में । तेणें भक्तकामकल्पद्रुमें ।**
**बोलिजे श्रीआत्मारामें । संजयो ह्मणे ॥ ९–५२१ ॥**

अकराव्या अध्यायाच्या उत्तरार्धांत व बाराव्यांत सगुणोपासनेचें–' त्या चतुर्भुजरूपाचें '–गोड वर्णन पहा. बाराव्याच्या उपसंहारांत

**ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ।**
**बोलिलें मुकुंदें । संजयो ह्मणे ॥ २३९ ॥**
**राया जो निर्मळू । निष्कळंक लोककृपाळू ।**
**शरणागतां स्नेहाळू । शरण्य जो ॥ २४० ॥**
**पैं सुरसहायशीळ लोकलालनलीळ ।**
**प्रणतप्रतिपाळ । खेळ जयाचा ॥ २४१ ॥**
**जो भक्तजनवत्सल । प्रेमळजनप्रांजळ ।**
**सत्यसेतु सकळ । कळानिधि ॥ २४३ ॥**
**तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा । ...**

ही सुधामधुरवाणी प्रेमळ सगुणभक्ताशिवाय कोणाच्या मुखांतून स्रवणें शक्य आहे ? निर्गुणबोध व सगुणप्रेम या दोन्ही गोष्टी पूर्णभक्तांच्या ठिकाणीं सांपडतात. चंदनाची द्रुती किंवा चंद्राची चंद्रिका तशी अद्वैतीं भक्ति आहे; पण हें ' अनुभवाचि जोगें । नव्हे बोलाऐसें ' ( ज्ञाने० १८–११५० ). वसुदेवसुत देवकीनंदन ( ज्ञाने० ४–८ ) हाच सर्वरूपरूपस, सर्वदृष्टिडोळस व सर्वदेशनिवास ( ज्ञा० १८–१४१७ ) असा परमात्मा असून ' भक्तांचिये प्रीती । अमूर्त हा आला व्यक्तीं ' हा भक्तप्रीती-

मुळें व्यक्तीस आला म्हणून जगाचें कार्य झालें, नाहीं तर हा काय तुम्हां आम्हांस आकळावयाजोगा आहे काय? ' येऱ्हवीं हा योगियां नाडळे । वेदार्थासी नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावती ना ' ( ४–१३ ) बरें झालें परमात्मा सगुणरूपानें व्यक्त झाला व तोच पुंडलिकाच्या प्रीतीसाठीं पंढरीस विटेवर कटीं कर ठेवून उभा राहिला आहे. भक्तांनीं आपल्या आवडीनें त्याचें विठ्ठल हें नांव ठेवलें आहे. तो जसा भावाल तसा आहे. भक्त त्याला सच्चिद्घन परमात्मा भावतात व तसाच तो त्यांच्या प्रचीतिस येतो. तो सर्वव्यापी आहे; आकाशाहून व्यापक आहे व परमाणूपेक्षां लहान आहे. तोच विश्व भरून भक्तांच्या हृदयांत राहिला आहे. ' जगीं पाहतां सर्वही कोंदलेंसे । अभाग्या नरा दृढ पाषाण भासे ' असें समर्थांनीं म्हटलें आहे. नामदेवराय, जनाबाई इ० सर्व संत श्रीविठ्ठलाचे उपासक होते. नाथमहाराज श्रीकृष्णाचे म्ह० विठ्ठलाचेच भक्त होते. ज्ञानेश्वरींत जसें विठ्ठलाचें नांव नाहीं तसें नाथभागवतांतही एका ओवीशिवाय—

**पावन पांडुरंगक्षिती । जे कां दक्षिणद्वारावती ।**
**जेथ विराजे विठ्ठलमूर्ती । नामें गर्जती पंढरी ।।** २९–२४५

या ओवीशिवाय दुसरा उल्लेख नाहीं, तथापि ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत हे दोन्ही ग्रंथ कृष्णभक्तीनें ओथंबलेले आहेत, आणि कृष्ण तेच विठ्ठल असल्यामुळेंच वारकरी मंडळांत हे ग्रंथ वेदतुल्य मानले जात आहेत. नाथांचे पणजे भानुदासमहाराज हे तर प्रख्यात विठ्ठलभक्त म्हणून प्रसिद्ध आहेत, पैठणास त्यांचें विठ्ठल-मंदिर आहे, याच मंदिरांत नाथांचीं पुराणें होत, याच श्रीविठ्ठल-मूर्तींपुढें नाथांचीं कीर्तनें होत, विठ्ठलावर नाथांचे शेंकडों अभंग आहेत याप्रमाणें नाथ हे महाभागवत, श्रीकृष्णभक्त, विठ्ठलभक्त असून नाथभागवतांत विठ्ठलावर एकच ओवी आहे, आणि ज्ञाने-

श्वरींत नामतः निर्देश नाहीं या गोष्टीचा अतिशय करून कित्येक अर्वाचीन पंडित ज्ञानेश्वरी हा तत्त्वज्ञानाचा व निर्गुणोपासनेचा ग्रंथ आहे व विठ्ठलभक्त वारकऱ्यांचा त्या ग्रंथाशीं कांहीं संबंध नाहीं असें प्रतिपादित असतात हें मोठें आश्चर्य आहे. ज्ञानेश्वरी हा कोणाला नुसता तत्त्वज्ञानाचा ग्रंथ वाटत असेल तर खुशाल वाटो, पण वारकऱ्यांचे तो ग्रंथ व नाथभागवत हे दोन्ही उपासनाग्रंथ आहेत. वारकऱ्यांची उपासना श्रीकृष्णाची आहे व हे परमकृष्णभक्तांचे कृष्णभक्तिपूर्ण ग्रंथ उपासनाग्रंथ म्हणूनच त्यांना मान्य झाले आहेत. ज्ञानोबा व नाथ हे दोघेही पूर्ण कृष्णभक्त, विठ्ठलभक्त होते, व त्यांचे ग्रंथ कृष्णभक्तीनें ह्मणजेच विठ्ठलभक्तीनें ओथंबले आहेत आणि म्हणूनच हे वारकरीमंडळांत अत्यंत प्रिय व मान्य आहेत. ज्ञानेश्वरनाथांना नामदेवतुकोबांपासून फोडण्याचा या लोकांचा प्रयत्न फोल आहे हें मागें ( पृ० २१५ ते २१८ ) सिद्ध केलेंच आहे. रुक्मिणी—रखुमाई ही श्रीकृष्णांची पट्टराणी, त्यांची चिच्छक्ति, आदिमाया हें प्रसिद्धच आहे आणि कृष्ण तेच विठ्ठल असल्यामुळें ‘ विठ्ठलरखुमाई ’ हा वारकऱ्यांचा नाममंत्र सिद्ध झाला आहे. ज्ञानेश्वरी व नाथभागवत हे ग्रंथ कृष्ण( विठ्ठल )भक्तिप्रधान आहेत हें नीट ध्यानीं घेतलें म्हणजे ज्ञानेश्वरनाथांना पढरीच्या भक्तिपंथापासून फोडणें सर्वथा अशक्य आहे हें वरील पंडितांनाही कबूल करावें लागेल. ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई,नाथ, तुकोबा हे सर्व एका विठ्ठलाचे भक्त आहेत. विठ्ठलाची उपासना तुकोबांनीं यावज्जीव केली.

विठ्ठलमूर्ति हा भक्तांच्या जीवींचा जिव्हाळा आहे, पंडित भगवानलाल यांच्या मतें ही मूर्ति ६व्या शतकापूर्वींची खास आहे. निर्गुण ब्रह्म आणि सगुण देव दोन्ही विठ्ठलमूर्तींत आहेत ही मूर्ति भक्तांना चैतन्यघन दिसते. या मूर्तीच्या पूजनभजनानें

व ध्यानधारणेनेंच भाविक भक्तांना देवाच्या सगुणरूपाचें दर्शन होऊन अद्वयानंदाचा अनुभव आलेला आहे व येत असतो. विठ्ठलाची भक्ति ही योगज्ञानाची विश्रामभूमिका आहे. कोणी म्हणेल कीं अद्वयानंदाला या मूर्तिपूजेची गरज काय आहे, पण मी विचारतों कीं मूर्तिपूजनानें भक्तिरसास्वाद मिळून अद्वयानंदाला उणेपणा येतच नाहीं मग मूर्तिपूजेनें तरी काय नुकसान आहे ! देव, भक्त व पूजन ही त्रिपुटी अद्वयानंदाच्या स्वानुभवावर उभारली असल्यामुळें कोठें बिघडतें ?

देव देऊळ परिवारु । कीजे कोरूनि डोंगरु ।

तैसा भक्तीचा वेव्हारु कां न व्हावा ॥ अमृतानुभव प्र०९-४१

डोंगरावरील कोरींव लेण्यांत एकाच खडकाचे शंकर, मार्कंडेय व शिवमंदिर किंवा विष्णु, गरुड व विष्णुमंदिर असे तीन प्रकार करून हरिहरभक्तिसुखास्वाद घेतां येत नाहीं काय? सुवर्णाचे राम, सुवर्णाचे मारुति व त्यावर सुवर्णाचीं फुलें उधळणारा परमभक्त अशा त्रिपुटीनें काय अद्वैतसुखाची हानी होते? हें सर्व पूजकाच्या अधिकारावर आहे ! मुद्दल कायम राहून व्याजाचे पैसे खिशांत पडले तर काय चतुर पुरुष ते घेत नाहीं? वजन आणि कस कमी न होतां अलंकारांची शोभा जर भोगायला मिळते तर तो आनंद सोडून नुस्ती सोन्याची लगडच उराशीं बाळगणाराला आपण काय शहाणा समजूं? अद्वैतबोधाला धका न बसतां देवाच्या मूर्तीसमोर भजनपूजनादि करून भक्तिसुखामृत सेवणारा भक्त काय अद्वयानंदाला पारखा होतो ? भक्तिसुखासाठीं भक्तच देव आणि भक्त दोन्ही आपणच होऊन पूजादि उपासनाकर्म करीत असतो. पण ही हातोटी सत्संगतींत मुरल्याशिवाय उमजत नाहीं व न उमजल्यामुळें सगुण आणि मूर्तिपूजा याचें वर्म ध्यानांत येत नाहीं ! हें मूर्तिपूजेचें वर्म ध्यानीं न आल्यामुळेंच ‘मूर्तिपूजा’ हा शब्द

ऐकतांच कित्येक लोक बिचकतात व तुकोबांसारखे महात्मे मूर्तिपूजक होते काय असा प्रश्न विचारतात.त्यांस स्पष्ट उत्तर देतां येतें कीं 'होय, ते मूर्तिपूजक होते व आमरण मूर्तिपूजकच होते.' आपला सर्व समाज मूर्तिपूजक आहे किंबहुना सारा मनुष्यसमाजच मूर्तिपूजक आहे असेंही म्हणतां येईल. वेदांत वरुण, सूर्य, उषा ह्या देवांच्या मूर्तींचीं स्तोत्रें आहेत. निराकारवादीही देवाची प्रार्थना करितात तेव्हां त्यांच्या मनांत तरी कांहीं एक प्रकारचें रूप उभें राहतें कीं नाहीं ? जर राहत असेल तर ती रूपाची—मूर्तीचीच—पूजा झाली, बरें जर राहत नसेल तर प्रार्थनेचें वैयर्थ्य सिद्ध होतें! देव अमूर्त आहे व मूर्तही आहे, त्याचा अनुभव भक्तभाविकांनाच आहे. ईश्वर सर्वत्र आहे तर मग मूर्तींत कसा नाहीं ? तुकोबा विचारतात:—

**अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ? ॥**

ईश्वर सर्वव्यापी आहे आणि प्रतिमेंत मात्र नाहीं, मग प्रतिमा ईश्वराहूनही मोठी झाली! असो. वाटेल त्या पाषाणाला कांहीं आम्हीं देव म्हणून पूजीत नाहीं. ब्राह्मणद्वारां शास्त्रमंत्रांनीं प्राणप्रतिष्ठा केलेल्या मूर्तीलाच देव म्हणून आम्हीं पूजतों व देव म्हणून तेथेंच भाव ठेवतों. भाव तोच देव आहे व भक्ताचा भाव जाणून देवही पाषाणांत प्रगट होतो. त्याचें पाषाणपण जातें व सच्चिदानंदघन परमात्माच तेथें प्रगट होतो. तुकोबा म्हणतात:—

**पाषाण देव पाषाण पायरी । पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १ ॥**
**सार तो भाव सार तो भाव । अनुभवी देव तेचि झाले ॥ २ ॥**

गंगोदक व इतर सामान्य उदक यांच्या गोडींत काय मोठासा फरक आहे ? पण भावनेनेंच गंगेला श्रेष्ठत्व आलें आहे ना ?

**तुका म्हणे हें भाविकांचें वर्म । येरीं धर्माधर्म विचारावे ॥ ४ ॥**

ज्याच्या उद्देशानें पूजादिकर्म केलें जातें त्याला तें कोणत्याही मार्गानें

अर्पण केलें तरी पावतें. पत्र,पुष्प,फल, तोय कांहींही, कोणीही, कोठेंही,कसेंही—पण शुद्धभावानें—अर्पण केलें म्हणजे मला पावतें—'तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मन:' (श्रीगीता ९—२६) असें भगवंताचें वचन आहे. 'शिवपूजा शिवासि पावे । माती मातीशीं सामावे' किंवा 'विष्णुपूजा विष्णूसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें' असें तुकोबानीं म्हटलें आहे. देवाची सगुण साजिरी सुलभ गोड मूर्ति पाहून हजारो भक्तांना आनंद झाला आहे व मूर्ति चिद्घन होऊन त्यांना पावली आहे.

धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥
पूजी प्रतिमेच्या देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ ध्रु० ॥
तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ३ ॥

तुकोबांची विठ्ठलमूर्तीवरील निष्ठा इतकी अचल होती कीं 'ह्मणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरी वहाण' 'ह्मणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे' इत्यादि उत्कट प्रेमाचे त्यांचे उद्गार निघाले आहेत. नाथभागवतांत (अ० ११ श्लोक ४६):—

निर्गुणाचा बोध कठिण । मनबुद्धिवाचे अगम्य जाण ।
शास्त्रांची न कळे ऊणखूण । वेदीं मौन धरियेलें ॥
तैसी सगुणमूर्ती नव्हे जाण । सुलभ आणि सुलक्षण ॥
देखतां जाय भूकतहान । निवताहे मन सप्रेमें ॥
जो नित्यसिद्ध सच्चिदानंदु । प्रकृतिपर परमानंदु ।
सगुण जाला जी गोविंदु । स्वानंदकंदु स्वलीला ॥
माझिये मूर्तीचेनि दर्शनें । होत डोळियां पारणें ।
जन्ममरणांचें उठवी धरणें । खत फाडणें विषयांचें ॥

मूर्तिपूजा सप्रेमभरित करणाऱ्या भक्तांसाठीं देव मूर्तीतच प्रगट झाल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. नाथ (अ० ७) म्हणतात:—

आतांही प्रत्यक्ष प्रमाण । दासाचेनि वचनें जाण ।
पाषाणप्रतिमे देवो आपण । आनंदघन प्रगटे पै ॥ ९८२ ॥

नाथांनीं आपल्या अभंगांतूनही म्हटलें आहे:—

मी तेचि माझी प्रतिमा । तेथ नाहीं आन धर्मा ॥ १ ॥
तेथें असे माझा वास । नको भेद आणि सायास ॥ २ ॥
कलियुगीं प्रतिमेपरतें । आन साधन नाहीं निरुतें ॥ ३ ॥
एका जनार्दनीं शरण । दोन्हीं रूपें देव आपण ॥ ४ ॥

२

देव सर्वाठायीं वसे । परि न दिसे अभाविका ॥ १ ॥
जळीं स्थळीं पाषाणीं भरला । रिता ठाव कोठें उरला ॥ २ ॥

* * *

असो तुकोबांचे व तत्सम अन्य संतांचे सगुणमूर्तिपूजेसंबंधानें विचार काय होते ते संक्षेपानें सुचविले आहेत. त्यांचा आचारही तदनुसार होता हें सांगावयास नकोच. पंढरीच्या विठ्ठलमूर्तीचे उपासक, विश्वंभरबावांच्या वेळेपासून कुळदेव विठ्ठलाची नित्यशः पूजाअर्चा करणारे, विठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार करणारे व विठ्ठलमंदिरांत अखेरपर्यंत नित्य कीर्तन करणारे तुकोबा मूर्तिपूजक नव्हते असें कोणता सत्यनिष्ठ पुरुष म्हणूं शकेल ? तुकोबांचे पुत्र नारायणबोवा यांच्या देहूच्या सनदेंतही 'तुकोबा गोसावी श्रीदेवाची मूर्तीची पूजा स्वहस्तें करीत होते' असे स्पष्ट शब्द आहेत !

९. श्रीविठ्ठलमूर्तीची पूजाअर्चा, ध्यानधारणा व अखंड नामस्मरण चालू असतां तुकोबांना देवाच्या साक्षात् भेटीची तळमळ लागून राहिली. ज्याच्या मूर्तीची आपण नित्य पूजा करितों त्याची प्रत्यक्ष भेट कधीं होईल असें त्यांना झालें. प्रल्हादध्रुवासारख्यांना बाळपणींच सगुण देवाचें दर्शन झालें, नामदेवाबरोबर देव प्रत्यक्ष बोलत चालत, जनाबाईसंगें दळूं लागत, अशा माझ्या पंढरिरायाचें मला दर्शन केव्हां होईल अशी त्यांना अपार उत्कंठा लागली. प्रत्यक्ष दर्शनाशिवाय ब्रह्मज्ञान कोरडें वाटूं लागलें; ब्रह्मज्ञानाच्या नुस्त्या

गोष्टी सांगून व ऐकून समाधान होईनासें झालें. बाहूंनीं देवाच्या भेटीसाठीं स्फुरण पावावें, सारखें टक लावून डोळ्यांनीं पाहात रहावें, डोळ्यांनीं देव दिसत नाहीं तर हे डोळे गेलेले काय वाईट, नेत्रांला देवाचे चरण नाहीं दिसले तर ते आंधळे झालेले पत्करले, असले मनोरथ सुरू झाले. उत्तरोत्तर ही भेटीची तळमळ वाढत चालली. या वेळची त्यांच्या मनाची स्थिति पुढील अभंगांत पहा:—

भेटीलागीं पंढरिनाथा । जीवा लागली तळमळव्यथा ॥ १ ॥
कै कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ ध्रु० ॥
शिणलें माझें मन । वाट पाहतां लोचन ॥ २ ॥
तुका ह्मणे भूक । तुझें पहावया मुख ॥ ३ ॥

*　　*　　*　　*

वाटुली पाहतां शिणले डोळुले । दाविसी पाउलें कै वो डोळां॥१॥
तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥ध्रु०॥
वा मोकलिलें करुणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें॥२॥
तुका ह्मणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा॥३॥

*　　*　　*　　*

नलगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥
लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या॥ध्रु०॥
जाळोनी संसार बैसलों अंगणीं ।नाहीं तुझे मनीं मानसींही ॥ २ ॥
तुका ह्मणे नको रागेजों विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां॥ ३ ॥

*　　*　　*　　*

आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांसी ॥ १ ॥
तळमळ करी चित्त । अखंडीत वियोगें ॥ २ ॥

*　　*　　*　　*

आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार ।
न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥ ४ ॥
तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिये जीवें ।

तुका ह्मणे द्यावें । दरुशन पायांचें ॥ ५ ॥

*       *       *       *

तुका ह्मणे एकवेळ देईं भेटी । वोरसोनि पोटीं आलिंगावें ॥ १ ॥

*       *       *       *

जातां भले काय डोळियांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥२॥
तुका ह्मणे आतां पांडुरंगावीण । न वांचतां क्षण जीव भला ॥३॥

*       *       *       *

तुका ह्मणे मज दाखवी श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥१॥

*       *       *

तुका ह्मणे येवोनियां देईं भेटी । कुरवाळूनि पोटीं धरीं मज ।

*       *       *

झुरोनि पांझरा होऊं पाहे आतां । येईं पंढरिनाथा भेटावया ॥ १ ॥

*       *       *

काय तुझें वेंचे मज भेटी देतां । वचन बोलतां एकदोन ॥ १ ॥
तुका ह्मणे तुझी नलगे दसोडी । परी आहे आवडी दर्शनाची ॥४॥

*       *       *       *

इच्छिती तयासी व्हावें जी अरूप। आम्हासी सरूपस्थिती चाड॥१॥

देवा ! तुमच्या निराकाररूपाची ज्यांना प्रीति असेल त्यांना तुम्ही निराकार व्हा, पण मला तुमच्या सगुण साकार रूपाचीच आवड आहे. ‘ पाउलांनीं इच्छा गोवियेली ’ ह्म० माझी इच्छा तुझ्या चरणदर्शनाचीच आहे. मी आपला अजाणताच आहें. ‘ लेंकरासी कोठें जाणत्याची परी । करूं येते दूरी धरावया ! ॥ ३ ॥ ’ ज्ञा त्यांची बरोबरी म्यां अज्ञान्यानें कशी करावी ? मूल जाणतें झालें ह्मणजे आई त्याला दूर धरते, पण नेणतें बाळ आईची मांडी सोडीत नाहीं. मुक्ति आपली ब्रह्मज्ञानी जे असतील त्यांना दे, मला ती नको. ‘ लागली न सुटे नामाची आवडी ’ तुझ्या नामाची जिव्हेला गोडी लागली आहे, तुझे चरण पाहाण्याची डोळ्यांना भूक लागली आहे, हा माझा भाव कांहीं बदलणारा नाहीं, तरी तुम्ही माझ

भक्तिरस ओस पाडूं नका,' मला चाळवूं नका. देवा !' मला तुझी मुक्ति नको, तूंच पाहिजेस !

**मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देई माझ्या॥१॥**

माझें संचित पूर्वपुण्य सर्व तूं आहेस. 'तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूंचि नित्यनेम नारायणा ॥ ४ ॥' मी तुझ्या कृपावचनाची वाट पाहत आहें.

**तुका ह्मणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोल सर्वोत्तमा मजसवें ॥ ५ ॥**

'शरण आलें त्यासी न दावी हे पाठीं' हीच देवा ! माझी विज्ञापना आहे. जे आळवितात त्यांना झडकर उत्तर द्यावें, गांजिलियाचें धांवणें करावें, भागलियाचा विसांवा व्हावें व आम्हांला विसरूं नये हीच नारायणा ! माझी प्रार्थना आहे.

'जाय परतें काय आणिला कांटाळा' असें तरी देवा ! एकदा आपल्या तोंडानें सांगा !! 'कां हो केली तुम्हीं निष्ठुरता देवा !' अहो ! तुम्हीं पूर्वीच्या साधूंसीं गोष्टीमाता केल्यांत तें भाग्य माझ्या अदृष्टांत नाहीं काय ? 'भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ? ॥ ४ ॥' तुह्मांपासून आजवर कोणाला अंतर पडलें नाहीं व तुमची भेट झाल्याशिवाय माझी ही बुद्धि कांहीं स्थिर होणार नाहीं !

'आम्हीं जाणावें तें काई । तुझें वर्म कोणे ठायीं ?' देवा तुला अंतपार नाहीं असें श्रुति बोलतात मग आम्हीं तुला कोठें कसें शोधावें ? सप्त पाताळांखालतीं व स्वर्गाहून वरती असा तूं ढिसाळ ( विश्वव्यापी, फार मोठा ) आहेस, अशा तुला मी मशक डोळ्यांनीं कसा पाहूं ? हे पंढरिनिवासा ! विठोबा ! तूं एवढा मोठा आहेस तरी प्रियभक्तांसाठीं तूं हवें तेवढें लहान रूप घेतोस.

**होई मज तैसा मज तैसा । साना सुकुमार हृषीकेशा ॥**
**पुरवी माझी आशा । भुजा चारी दाखवी ॥ २ ॥**

' तरी आम्ही तुझी धरियेली कास ' कां तर कोणीही तुझा दास आजवर वायां गेला नाहीं. तुझा दास वायां जात नाहीं, मी तुझा दास आहें, ह्मणून मीही वायां जाणार नाहीं ! तूं मात्र ' कृपावंता पाहे मजकडे ' आणि—

अगा पंढरीशा उभा विटेवरी । येई लवकरी धांवे नेटें ॥ २ ॥

' क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें ' दुष्काळांत भुकेनें पीडले-ल्याला मिष्टान्नाचें ताट पुढें दिसलें किंवा डोळा लावून असलेल्या ' मांजरें देखिला लोणियाचा गोळा ' मांजराला लोण्याचा गोळा दिसला ह्मणजे त्याची जशी धांदल उडते—

तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥२॥

' कोण पुसे आम्हां शिणलें भागलें '—पांडुरंगा ! तुझ्यावांचून आमच्या मायेचें या विश्वांत कोण आहे बरें ?

कोणापाशीं आम्हीं सांगावें सुखदुःख । कोण तानभूक निवारील?।

आमच्या तापाचा परिहार करणारा दुसरा कोण आहे ? आम्हीं इच्छेचें भातुकें कोणाजवळ मागावें ? कोण आह्मांला कवतुकें बुझा-वील? ह्मणून आतां प्रार्थना एवढीच आहे:—

धांव वालो आई । आतां पाहतेसी काई ॥ १ ॥
धीर नाहीं माझे पोटीं । झालों वियोगें हिंपुटी ॥ ध्रु० ॥
करावें शीतळ । बहु झाली हळहळ ॥ २ ॥
तुका ह्मणे डोई । कधीं ठेवीन हे पाई ॥ ३ ॥

१० देवदर्शनासाठीं चित्त तळमळत असतांना तुकोबांनीं दे-वावर कधीं रागवावें, कधीं प्रेमाची याचना करावी, कधीं अद्भुत युक्तिवाद किंवा विलक्षण कोटिक्रम करावा, कधीं त्याला निष्ठुर ह्मणावें व कधीं ' तुका ह्मणे भोळा । स्वामी माझा हो कोवळा ।' असें त्याचें भक्तवात्सल्य चिंतून प्रेमांत विरून जावें; कधीं ' पांडु-रंगें पहा ख्वादलीसे रडी । परी नामसोंडी धरिली आम्हीं ' असें

म्हणत देवावर आपला विजय झाला असें भावावें आणि कधीं आपलें पातित्य आठवून लज्जेनें मुख खालीं घालावें; कधीं देवाला संतांच्या पंचायतींत नेऊन त्याला फजितखोर, दिवाळखोर ठरवायचा डौल घालावा व कधीं 'काशासाठीं आम्हीं जाळिला संसार' 'केली कोणासाठीं संसाराची होळी' असें ह्मणून क्षीन होऊन जावें, 'कधीं प्रसंगीं देईन आजी शिव्या' म्हणून देवावर सडकून पुष्पांजळी वहावी व कधीं 'तूं माउलीहूनि मयाळ ! चंद्राहूनि शीतळ कल्लोळ प्रेमाचा' ह्मणून त्याच्या दयाळुत्वाचें चिंतन करीत विरघळून जावें; कधीं आपण पतित आहोंत म्हणावें, कधीं देवाशीं बरोबरी करावी, कधीं देवाला निर्गुण ह्मणावें, कधीं देवाला सगुण म्हणावें, कधीं द्वैतकल्पना करावी, कधीं अद्वैताचा रंग प्रगट करावा, याप्रमाणें प्रेमाचे अनंत प्रकार करून तुकोबांनीं देवाचें प्रेमसुख भोगावें, हे प्रेमाचे नानाविध रंगढंग त्यांनीं करावे. !! त्यांपैकीं कांहीं प्रेमकल्लोळ त्यांच्या शब्दांनींच पाहूं:—

'जेणें तुज आलें रूप आणि नांव:—' देवा तुला नांवरूपाला आणणारे आह्मीं पतितच तुझे खरे देव आहोंत. आह्मीं आहोंत ह्मणून तुझी थोरवी ! अंधारामुळें दीपाला शोभा येते, रोगांमुळें धन्वंतरी प्रसिद्धीस येतो व विषामुळें अमृताला व पितळेमुळें सोन्याला किंमत आहे !

'तुझें म्हणवितों':—'परी तुज नाहीं आमुचे उपकार ॥ नामरूपा थार केलियाचे' पण तुला आमच्या उपकाराची कांहीं आठवण तरी आहे काय ? दुसऱ्या एका वेळीं तुकोबा म्हणाले— देवा ! आम्हीं भक्तांनीं तुला नांवारूपाला आणलें ह्मणून तुझा जगांत एवढा बडिवार चालला आहे, 'नाहीं तरी तुज कोण हो पूसतें !'

'सोळा सहस्र होऊं येतें ?' ह्म० सोळा हजार नारींसाठीं सोळा हजार रूपें तुम्हांला घेतां येतात आणि या तुक्याला एक रूप दाखवा म्हटलें तर मात्र जिवावर आलें आहे—'हें देव म्हूण संपादे!'

देवा ! माझ्या जागृतिस्वप्नांचा मेळ नाहीं. अरे ! तुझें औदार्य मला कळून चुकलें ! पायांवर डोकी ठेविली तर तूं गळ्यांतली माळ सुद्धां माझ्या ओंजळींत टाकूं नयेस काय ? समजलें ! ' ताकें कृपण तो जेऊं काय घाली ? ' वाटीभर ताक देववत नाहीं तो पोटभर जेवायला कसचा घालतो ! !

देवा ! मागें भक्त तरले ते आपल्या कमाईनें तरले, त्यांनीं आपलें सर्वस्व तुला दिलें तेव्हां तूं त्यांना आपलें चित्त दिलेंस ! पण ' उसणें फेडितां धर्म तेथें कोण ? ' माझ्यासारखा कमाईचा हीन पतित जर तूं तारशील तरच तुझें औदार्य प्रगट होईल !

देवा ! आज तुह्मीं माझा प्रीतिभंग केलांत, आतां माझें तोंड ख्वळलें तर मी संतांत तुमची फजिती करीन ! तुह्मीं असें निष्ठुर-पणानें वागूं लागलांत तर ' कासयानें गांठीं उपजावा विश्वास ! '

ज्याचा स्वामी दुबळा त्या सेवकाचें जिणें लाजिरवाणें होय. ' देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परी भलें ! ' ज्याच्या नामोच्चाराबरोबर जग थरथर कांपतें त्याच्या दारचें कुतरें होऊन पडणें सुद्धां मोठ्या मानाचें आहे. देवा ! हा विचार माझ्या मनांत कां आला हें आपलें आपण जाणा, ' आळी मेळी—'

खचित ह्या मोठपणाला धिक्कार असो ! ' थोरिवेचें काळें तोंड ! मी दारांत सारखा हांका देत आहें, पण नुस्तें ' ओ ' सुद्धां देववत नाहीं ! एवढा शिष्टाचार सुद्धां तुह्मांला माहीत नसावा ? ' आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेंचे ? ' श्रीहरि ! हें तुह्मांलाच साजतें, लक्ष्यांत ठेवा, आह्मीं माणसें अशीं निलाजरीं नव्हों‍त !

तुझ्या तोंडून चार शब्द ऐकायला मिळणार नाहींत तोंपर्यंत माझी करकर संपणार नाहीं, जर एक शब्द बोलशील तर पहा ! तुला पुंडलिकाचीच शपथ आहे !

देवा ! तुम्ही चाळवाचाळवी करण्यांत कुशल आहांत, व मीहि अतिशय लागट आहें. आमचें कपाळ म्हणून तुला मौन धरायची बुद्धि होते दुसरें काय ? आम्हांला आपणांहून वेगळें केलेंत म्हणून हा विनोद !

खरेंच पण देवा ! ' तुजचि पासाव झालोंसें निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ? ' आम्हांत न्यूनता कोणती आहे ती तरी स्वमुखानें सांगा. चला, संतांपुढें आपला वाद निवडण्यासाठीं जाऊं—

अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ? ॥ १ ॥
तुज नांव जर नाहीं । तर माझें दाव काई ? ॥ २ ॥
तुज रूप नाहीं । तर माझें दाव काई ? ॥ ३ ॥
खेळसी तूं लीळा । तेथें मी काय वेगळा ? ॥ ४ ॥
साच तूं लटिका ? तैसा मीही म्हणे तुका ॥ ५ ॥

देवा ! तुझ्या प्रेमासाठीं, तुझ्या एका वचनासाठीं, तुझ्या दर्शनासाठीं मी भुकेला आहें. 'इंद्रियांची होळी । संसार दिला बळी' हें जाणून भेट द्या.

देवा ! तुझ्या माझ्यांत श्रेष्ठ कोण तें पाहूं—मी पतित आहें, पण तूं आपलें पावनत्व सिद्ध करून दाखविलें नाहींस; आम्ही भेदबुद्धि जीवाशीं घट्ट धरून बसलों आहोंत, पण तुझ्यानें तिचा छेद होत नाहीं; आमचे दोष इतके बळिवंत आहेत कीं तुझें त्यांच्यापुढें कांहीं चालत नाहीं; माझें मन दशदिशा भटकत आहे, पण तूं त्याच्या भयानें फार दूर ( मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ) लपला आहेस ! ! मग सांग बरें ! तूं श्रेष्ठ कां आम्हीं श्रेष्ठ ! !

देवा ! माझीं सगळीं नात्यागोत्याचीं माणसें मेलीं आणि तूंच रे कसा मेला नाहींस !

तुज देखतांचि माझा । गेला बाप आजा पणजा ॥
विठो ! कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥

**आम्हां लागलेसे पाठी । बालत्व तारुण्य काळीं ॥**
**विठो ! कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥**

देवा ! तूं मूळचा चांगला आहेस, पण ह्या मायेच्या भिडेनें बाइलबुद्ध्या झाला आहेस, तिच्या संगतींत रंग चाळे शिकलास !

**बहु होतां भला । परि ये रांडेनें नासला ॥ १ ॥**
**ज्याचें त्यासि नेदी देऊं । तुका म्हणे धांवे खाऊं ॥ ४ ॥**

देवा ! आम्ही आजवर तुझी स्तुति केली, निंदाही केली, पण तूं मला खमंग आहेस ! ‘ गोष्ट न करी नांव नेघे, ’ माझ्याशीं दोन शब्द बोलत नाहींस, माझें नांवही घेत नाहींस तेव्हां मी तर स्पष्ट सांगतों—

**माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥ १ ॥**

‘ कोण पर्वकाळ पाहशील तीथ ’ माझें चित्त तुमच्या भेटी-साठीं कासावीस झालें आहे. मी अन्यायी अवगुणी म्हणून कोप करूं नका. या नेणत्या पोराला रडवूं नकोस, मी पदरांशीं पिळा घालून तुला थोपवून धरीन.

देवा ! तूं वर घेणारा आहेस. ‘ जेथें तेथें देखे लांचाचे पर्वत ’ ह्य० कोणीही कांहीं घेतल्याशिवाय देत नाहीं, मग तूंच एकटा उदार कोठून असणार ! ‘ आधीं वरी हात या नांवें उदार ! उस-न्याचे उपकार फिटाफिट ’ असें खरें औदार्य दाखवा. आम्ही होईल अशी सेवा करीतच आहोंत !

देवा ! मी खराच पापी आहे काय हो ? ‘ पापी ह्मणों तरी आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनी ? ’ तुमचे मी पाय आठवीत असतों, मग सांगा बरें माझ्या दोषांचें बळ तुमच्या पायां-च्या बळाहून अधिक आहे काय ?

‘ उपजों मरों ’ ही तर आमची मिरास आहे, हें निवारशील तर तुझी थोरवी खरी !

देवा ! तुह्मी निरंतरचे सबळ आणि आम्ही निरंतरचे दुर्बळ अशी कांहीं दुर्बळपणाची मिराशी आम्हीं घेतली आहे काय ? आह्मी याचक आणि तुह्मी दाते असाच नित्य संबंध कां असावा ? हें पहा—'आमुचेही कांहीं असों द्या उपकार! एकल्यानें थोर कैंचे तुम्हीं !'

देवा ! आह्मी विष्णुदास, आम्ही तुमच्या बळावर निर्भर असायचे पण या काळाची सत्ता पाहतों तों आमच्यावर !

'काय देवा नेणों आलें गांडेपण! तुम्ही शक्तिहीन झाले दिसां !'

देवा ! आह्मी पतित, तुम्ही पतितपावन. आम्हांला धर्मनीत कळली तसें आम्ही वागलों. आमचा उद्धार करावा हें तुमचें उचित तें तुम्हीं संभाळा. 'करावें उचित ज्याचें त्याणें' ! कायावाचामनानें तुमचेंच ध्यान करणें तें मी करीत आहें. आतां तुमचा धर्म तुह्मी पहा !

देवा ! मागल्या संतांच्या मार्गानें मी चालत आहें. मी खोटा चाळा करीत नाहीं, मी तुमचें लेंकरूं ना? 'नये येऊं बळा लेंकरासी'

देवा ! तुम्ही समर्थ, मी दीन. 'तुका म्हणे तुम्हांसवें करितां वाद ! होईजे तें निंद्य जनीं देवा ।' श्रेष्ठाबरोबर मीं वाद केला तर लोकांत निंद्य ठरेन. म्हणून हुज्जत घालीत नाहीं, तुह्मी समर्थपणाची संपादणी करा म्हणजे झालें.

'काय तें सामर्थ्य न चले या काळें ?' देवा ! माझें संचित तुम्हांहून बलिष्ठ झालें ह्मणून तुम्हीं गप्प बसलांत किंवा 'काय गमाविली सुदर्शनगदा । त्या भेणें गोविंदा लाजतसां ?' पहा देवा ! दीनानाथ हें आपलें ब्रीद सांभाळा !

देवा ! माझा कंटाळा करितां, मग आधींच पायांचें प्रेम कां लावलेंत ! आजवर भीड ठेवून बोलत होतों, पण आतां विचारतों कीं आमचा जीव घ्यायचा तर तुह्मी आकारालाच कां आलेंत ?

देवा ! मीं सर्व देह तुमच्या पायीं समर्पिला आहे आणि तुह्मी

काय माझा विटाळ धरितां कां माझ्यापुढें यायला लाजतां ? मी अनन्य आहें. ' तुजविण रत आणिकाचे ठायीं ! ' असें ह्मणणारा एक तरी ग्वाही ( साक्षीदार ) माझ्या विरुद्ध तुह्मी आणाल काय !

माझ्यासारखा आजवर कोण उद्धरलांत सांगा पाहूं !

हातींच्या कांकणा कासया आरसा। उरलों मी जैसा तैसा आहें!'

आमच्यामुळें तुला देवपण आलें हा आमचा उपकार देवा ! तुह्मीं विसरलांत ? पण उपकार विसरणें हें मोठेपणाचें लक्षणच आहे!

' समर्थासी नाहीं उपकारस्मरण। दिल्या आठवण वांचोनिया।'

मी आतां खंडावर आलों आहें, प्रेम देऊन माझी समजूत काढा !

देवा ! मी पतित म्हणून तुम्ही पतित-पावन. माझें नांव आधीं आणि मग तुमचें !

जरी मी नव्हतों पतित। तरि तूं कैचा पावन येथ ॥ ४ ॥
म्हणोनि माझें नाम आधीं। मग तूं पावन कृपानिधी! ॥ २ ॥

देवा यांत फरक नका करूं—

नवें करूं नये जुनें। सांभाळावें ज्याचें त्यानें ॥ १ ॥

देवा ! मीं तुझी फार निंदा केली, पण ' तो कळवळ्याचा वाद आहे, भांडायची मला संवय आहे. कमजास्त शब्द सुटले असले तर क्षमा करा ' माझा धर्म खरा काय तो मी जाणतों—

कासयानें बळ करूं पायांपाशीं। भाकावी ते दासीं करुणा आह्मीं॥

तुझे मुखें दोन शब्द ऐकावे, तुझें श्रीमुख पहावें हीच आस आहे. देवा ! तुम्ही लवकर कां येत नाहीं ?

त्रिठाबाई ! विश्वंभरे! भवच्छेदके। कोठें गुंतलीस अगे विश्वव्यापके न करी न करीं न करीं आतां आळस आव्हेरु।

व्हावया प्रगट कैचें दुरी अंतरु ॥ २ ॥

" कांहो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी। कां मज हिंपुटी करितसां ? ' कंठीं प्राण आले, वचनाची वाट पहात आहें. देवाचा म्हणवितां देवाची भेट नाहीं याची मला लाज वाटत आहे.

देवा ! माझें प्रेम भंगूं नका. तुमची कृपा असल्यावर मी असा केविलवाणा राहणार नाहीं. पोट भरल्यावर काय जगाला सांगावें लागतें ! तृप्तता मुखावरूनच कळून येते. ' हेचि तयाची ओळखी। घालें टवटवीत मुखीं ॥ '

असो. अशा प्रकारें तुकोबांनीं देवाशी प्रेमभरांत विनोदउत्तर करीत असावें. क्वचित् बाह्यात्कारी शब्द जरी भांडखोरपणाचे कडक दिसले तरी त्यांतून कळकळीचा जो अपार रंग भरलेला आहे तो त्या विश्वव्यापक विठोमाउलीला कळत होता. ' कळावें तयासी कळे अंतरींचें ! ' आणि भांडण तरी प्रेमावांचून कोण करितो ! उत्कट प्रेमाशिवाय भांडायला तरी कड कोठून येणार ! प्रेमावांचून मनुष्याला कडोविकडीचें भांडणही करितां येणार नाहीं ! ! तुकोबांनीं देवाशीं जें भांडण केलें, जो मौजेचा विनोद केला, जे दीनवाणीचे किंवा बरोबरीच्या नात्याचे उद्गार काढले त्या सर्व उद्गारांवरून त्यांचें देवावरचें पराकाष्ठेचें प्रेम मात्र व्यक्त होतें. देवानें आपलें सगुणरूप दाखवावें ही एकच उत्कट वासना त्यांच्या मनांत खेळत होती. प्रत्यक्ष दर्शन नाहीं, ' आयकिली कानीं वदे वाणी ' यापलीकडे अनुभव नाहीं, तोंवर बोलांत ' रामरंग ' नाहीं अशी त्यांची बुद्धि दृढ झाली होती. सती वस्त्रालंकारांनीं खूप नटविली तरी पतीची संगत जोंवर झाली नाहीं तोंवर ती मनांत झुरत राहते. तशींच तुकोबांना देवाची भेट झाली नाहीं तोंवर सर्व हीन वाटे.

पत्रीं कुशलता भेटी अनादर । काय तें उत्तर येईल मानूं ॥ १ ॥
आलों आलों ऐसी दाऊनियां आस । बुडों बुडतयास काय द्यावें ॥ २

असें त्यांनीं देवास विचारलें आहे. जेवल्याचें समाधान नुसतें मांडेपुरीचा दहावेळ उच्चार करून होत नसतें; ह्मणून तुमच्या दर्शनाचा अनुभव द्या अशी त्यांनीं देवाच्या दारीं सारखी हकाटी लावली.

देवा ! तुझी प्रत्यक्ष भेट झाली नाहीं आणि तुझ्य गोष्टीच सांगत राहिलों तर हे संत मला काय म्हणतील विचार करा. नाटाच्या एका अभंगांत ते म्हणतातः—

मज ते हांसतील संत । जिहीं देखिलेति मूर्तिमंत

ह्मणोनि उद्वेगलें चित्त । आहाच भक्त ऐसा दिसे

ज्यांना तुझें प्रत्यक्ष दर्शन झालें ते संत मला हांसतील, ह वरपंगी भक्त आहे, देव पाहिल्याशिवायच देवाच्या गोष्टी सुटला आहे असें ह्मणतील याची माझ्या जिवाला फार ते. नुसत्या यशकीर्तीचा कोरडाच डांगोरा पिटला कीं झालें अशांपैकीं मी नव्हे:—

काय करूं कीर्ति लोकदंभमान । दाखवी चरण तुझे मज

मी तुझे चरण पाहिले नाहींत तोंवर माझ्या चित्ताचें सम नाहींच, पण लोकांचेंही समाधान होणार नाहीं.

सकाळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचून ॥ १

रूप दाखवी रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥ २

तुझें रूप एकदां मीं आपल्या डोळयांनीं पाहिलें म्हणजे तें तर चित्तांत वागवीन व मग मला संतही मानतील. साक्षा देवाला पाहिलें नाहीं त्याला संतांत मान कोणता ?

रूपा यावें जी अनंता । धरिन पुटाची त्या सत्ता ।

होईन सरता । संतांमाजीं पोसणा ॥

संत किंवा भक्त तोच कीं ज्याला देवाचा सगुण साक्षात्का तात्पर्य काय कीं ' तुका म्हणे धणी । नव्हे जेविल्याव

१० देवाच्या भेटीची लालसा वाढत चालली तेव्हां आपली भेट कशी व्हावी या तऱ्हेचीं तुकोबांना जागृतींतह स्वप्नें पडूं लागलीं. ' भागलों मी आतां ' ह्या अभंगांत ते

देऊनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें अंगें हीं दातारें निववावीं

अमृताची दृष्टि घालूनियां वरी । शीतळ हा करी जीव माझा

येई उचलोनी पुसें तहानभूक । पुसीं माझें मुख पीतांबरें ॥ ४ ॥
बुझावोनि माझी धरीं हनुवटी । ओंवाळूनि दिठी करूनि सांडीं॥५॥
तुका म्हणे बापा अहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं॥६

देव प्रेमभरानें मला मिठी देतील तो माझें सर्व शरीर सुखरोमांचित होईल, देवाची अमृतदृष्टि मजवर पडेल व माझा अंतरात्मा सुखसमुद्रांत बुडून जाईल, देव मला लेंकराला उचलून कडेवर घेतील, तानभूक पुसतील, आपल्या पीतांबरानें माझें तोंड पुसतील, माझी हनुवटी धरून माझें सांत्वन करतील—असल्या गोड गोड विचारांत त्यांचें मन मग्न होऊं लागलें. प्रत्यक्ष भेटीपेक्षां प्रियमनुष्याची भेट झाली म्हणजे काय काय प्रकार होतील त्यांचे आगाऊ मनोरथ उभारण्यांत अधिक सुख असतें ! भेट होतांच एकवार प्रेमाचा घुटका देऊन उत्कंठा तात्काळ स्थिरावते. प्रियवस्तु प्राप्त होण्यापूर्वी चाललेले मनोरथ वस्तुप्राप्तीपेक्षांही अधिक सुखमय असतात. गाडा आणायला बाप बाजारांत जायला निघाल्या वेळेपासून तो गाडा घेऊन परत येईपर्यंतच्या काळांत लेंकराच्या मनांत जे सुखाचे मनोरे उभे राहतात व गाडा मिळण्याच्या कल्पनेनें त्याचें जें नाचणें बागडणें चालतें त्याची सर गाडा मुलाच्या हातांत पडल्यावर होणाऱ्या सुखाला यायची नाहीं. वस्तुप्राप्तीच्या सुखापेक्षां तत्पूर्वी होणाऱ्या उत्कंठेचें सुख अनिवार आहे. आणखी हा आनंद पहा:—

भावबळें कैसा झालासी लहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ १ ॥
तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥ ध्रु० ॥
पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आलिंगूनि मिठी देईन पायीं २
चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥३॥
तुका म्हणे उत्कंठित हे वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥४॥

मागील अभंगांत भेट झाल्यावर देवांनीं काय करावेंसें तुकोबांना वाटत होतें तें सांगितलें, या अभंगांत मी काय करीन तें सांगतात. मी देवाला डोळे भरून पाहीन, प्रेमभरानें त्याचे पाय घट्ट धरीन,

चरणांवर दृष्टि ठेवून हात जोडून समोर उभा राहीन व देवाशीं मनमोकळेपणानें पोटभर बोलेन ! अशा प्रकारें भेटीची वासना उत्कंठित झालेली त्यांच्या अनेक अभंगांत स्पष्ट दिसत आहे. मी देवाची सेवा आजवर करीत आलों आहें ती बरोबर आहे कां कोठें चुकली आहे हें देवालाच मी विचारीन !

स्वमुखें जी तुह्मी सांगा मज सेवा । ऐसें माझें देवा मनोगत ॥१॥

मीं देवाजवळ चित्त वित्त घरेंदारें यांबद्दल गोष्टसुद्धा काढणार नाहीं. देवाच्या सेवेचा प्रकार खुद्द देवाला विचारीन. माझी वासना काय आहे तें मी देवा ! तुझ्या चरणांची शपथ घेऊन सांगतों. ऐक–

बोलें परस्परें वाढवावें सुख । पहावें श्रीमुख डोळेभरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्य बोलतों वचन । करूनी चरण साक्ष तूझे ॥ ४ ॥

देवा ! तूं म्हणशील कीं ' अरे ! तूं शास्त्रें धांडोळलीं आहेस, पुराणें पाहिलीं आहेस, संतसमागम केला आहेस, कथा पुराणें ऐकून व ब्रह्मज्ञानाचे ग्रंथ पाहून ब्रह्मज्ञान काय तें तुला पुरतें कळलें आहे, मग आतां माझें व्यापक रूप सोडून माझी घाकुटी मूर्ति पाहण्याची आवड कां धरतोस ? ' देवा ! हें तुमचें भाषण समजलें, पण माझें मनोगत ऐका !

कासयासी आम्हीं व्हावें जीवन्मुक्त । सांडुनीयां थीत प्रेमसुख ॥१
सुख आह्मांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण ह्मणे लाथा २

देवा तुला माझी उत्कंठित वासना काय आहे ती एकवार स्पष्ट सांगतों.

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥१॥
दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवूं दे चरणावरी माथा ॥ ध्रु० ॥
पाहेन श्रीमुख देईन आलिंगन । जीवें लिंबलोण उतरीन ॥ २ ॥
पुसतां सांगेन हितगुजमात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ३ ॥
तुका ह्मणे यासी न लावी उशीर । माझें अभ्यंतर जाणोनीयां ॥४॥

' मज अनाथाकारणें ' देवा ! आतां तुह्मी याच एकदां. काय सांगूं?

जीव झुरे तुजसाठीं । वाट पोटीं पाहतसें ॥ २ ॥
चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥ ३ ॥

देवाच्या भेटीची अशी अत्यंतात्यंत उत्कंठा लागली. देवाला आ-ळवितां 'आळवितां कंठ शोषला,' आयुष्य व्यर्थ जात चाललें याबद्दल चित्त अधीर झालें तेव्हां "अवस्था राहिली रूपाची अंतरीं" याशिवाय बाकीचे सर्व संकल्प नष्ट झाले. शेवटीं तो शेष, त्या लक्ष्मीआई व तो गरुड हे ध्यानावर उभे राहिले. तुकोबा त्यांची प्रार्थना करितात:—

गरुडाचे पायीं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥ १ ॥
वेगीं आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरी ॥ ध्रु० ॥
पाय लक्ष्मीच्या हातीं । तिसी यावें काकुळती ॥ २ ॥
तुका ह्मणे शेषा । जागे करा हृषीकेशा ॥ ३॥

* * * *

कैसा तीं देखिला होसील गोपाळीं । पुण्यवंतीं डोळीं नारायणा॥१॥
तेणें लोभें जीव झालासे बराडी।आम्हीं ऐसी जोडी कई लाभों ध्रु०
असेल तें कैसें दर्शनाचें सुख ।अनुभवें श्रीमुख अनुभावितां ॥ २ ॥
तुका म्हणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते॥ ३ ॥

**अर्थ**:—नारायणा ! तुला त्या गोपाळांनीं आपल्या पुण्यवंत डोळ्यांनीं पाहिलें असेल तेव्हां त्यांना केवढें अपार सुख झालें असेल ! त्या सुखाच्या लोभानें माझें चित्त आशाळभूत झालें आहे. मला असा लाभ केव्हां मिळेल बरें ? तुझ्या मुखमंडलाकडे टक लावून पाहतां होणारें सुख कसें असेल ! तें अनुभव आल्यावांचून मला कसें कळणार ! तुझें रूप डोळ्यांना केव्हां दिसेल, तुझ्या आलिंगनाचें सुख मला केव्हां मिळेल अशी उत्कंठा, हुरहूर मला क्षणक्षणीं वाटत आहे.

**भावार्थ**:—ह्या मधुर अभंगांतील भाव किती तरी गोड आहे!

त्या गोपाळांनीं तुला कैसा पाहिला असेल ह्यांतील ' कैसा ' हें पद क्षणभर तादस्थ्य उत्पन्न करणारें आहे. ' कैसा ' ह्या पदानें गोपाळांच्या सुखाचा व ' पुण्यवंतीं ' पदानें त्यांच्या डोळ्यांचा तुकोबांना मोठा हेवा वाटत होता हें तर उघडच आहे, पण 'कैसा' ह्या क्रियाविशेषणाला ह्या टिकाणीं काय विलक्षण अर्थगांभीर्य प्राप्त झालें आहे ! तो सांवळा घननीळ, तो कासेचा सोनसळा, तीं मुकुटकुंडलें, ती चंदनाची उटी, तो निर्मळ कौस्तुक व ती वैजयंती माळा, तें सुखाचें ओतलेलें श्रीमुख, असा तो ' राजस सुकुमार मदनाचा पुतळा' श्रीकृष्ण पुढें उभा आहे, व त्याचे सवंगडी गोपाळ " पपौ निमेषालसपक्ष्मपंक्तिरुपोषिताभ्यामिव लोचनाभ्याम् ( रघुवंश सर्ग २—१९ ) ह्या कालिदासोक्तीप्रमाणें अनिमिष लोचनांनीं त्याच्या मधुर मुखकमलाकडे सुखानुभवानें तटस्थ होऊन पहात आहेत—असा सर्व देखावा तुकोबांच्या मनश्चक्षूपुढें उभा होता असें ' कैसा ' ह्या शब्दानें सूचित होतें असें मला वाटतें ! शिवाय असें भाग्य माझें कधीं उघडेल असा तुकोबांचा भावही त्या शब्दानेंच प्रगट होतो. गोपाळांच्या सुखाचा लोभ वाटून असा लाभ मला कधीं होईल, मी आपल्या डोळ्यांनीं श्रीकृष्णाचें रूप पोटभर कधीं पाहीन, श्रीकृष्ण आपल्या बाहूंनीं मला केव्हां पोटाशीं धरतील अशी, तुकोबा म्हणतात, मला क्षणक्षणा उत्कंठा वाटत आहे.

ही त्यांची उत्कंठा खरी जिव्हाळ्याची आहे असें जाणून श्रीकृष्णानें त्यांची भेट लवकरच घेतली.

---

# प्रकरण दहावें.



# श्रीविठ्ठलस्वरूप.

धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथी । परब्रह्म क्षितीं उतरलें ॥ १ ॥
उत्तम हें नाम रामकृष्ण जगीं । तरावयालागीं भवनदी ॥ २ ॥

*  *  *  *

देवकीनंदनें । केलें आपुल्या चिंतनें ॥ १ ॥
मज आपुलिया ऐसें । मना लावूनियां पिसें ॥ २ ॥

१ तुकोबांचें उपास्य विठ्ठल हें श्रीकृष्णाचें बालरूप होय. २ ज्ञानेश्वरनामदेव-नाथांचा हाच अभिप्राय आहे. ३ श्रीकृष्णाच्या बाललीला. ४ तुकोबांनीं बाललीला कशा वर्णिल्या आहेत त्याचें दिग्दर्शन. ५ श्रीपंढरीच्या विठ्ठल-मूर्तीचें स्वरूप.

१ तुकोबांना देवाच्या सगुणरूपाचें दर्शन पाहिजे होतें हें आपण मागील प्रकरणांत पाहिलें, आतां कोणत्या रूपाविषयीं तुकोबांना अत्यंत प्रेम होतें तें पाहूं. ज्याला ज्या रूपाचें ध्यान असतें त्याच रूपानें भगवान् त्याला भेट देतात हा सिद्धांत आहे. मग तुकोबांना कोणत्या रूपाचें ध्यान होतें, कोणतें रूप त्यांना अत्यंतप्रिय होतें, कोणत्या रूपाचे, चरित्राचे व गुणांचें त्यांनीं पोवाडे गायिले; खातांपितां, उठतां बसतां, घरीं दारीं, समाधिव्युत्थानांत, जागृतिस्वप्नांत देवाच्या कोणत्या रूपाचा त्यांना निदिध्यास लागला होता हें आपण पाहूं. कित्येक वाचक ह्मणतील कीं तुकोबांना पांडुरंगाचा ( विठ्ठलाचा ) ध्यास होता हें सर्वत्र प्रसिद्ध आहे. मग आतां तुह्मी कोणता जावई-शोध लावणार आहांत ! तर यावर माझें ह्मणणें आहे कीं, हा खरो-खरीच शोध आहे. निदान हा शोध मला ज्या दिवशीं प्रथम

लागला त्या दिवशीं एक मोठें कोडें उलगडलें. कसें तें सांगतों. तुकोबांचें कुळदैवत विठ्ठल हें होतें, त्यांना बाळपासून विठ्ठलाची उपासना होती, त्यांच्या अभंगांतूनही सर्वत्र विठ्ठलाचा—पांडुरंगाचा-च—घोष केलेला आहे तेव्हां विठ्ठलाचा त्यांना ध्यास होता हें उघड आहे, आतां ‘ विठ्ठल ’ ह्या पदावरून कोणचा बोध होतो तें पाहूं. विष्णु विठु—विठ्ठल, विठोबा या व्युत्पत्तीवरून विठोबा ह्मणजे भगवान् विष्णुच होत हें सरळ आहे. विष्णु ह्म० व्यापक—‘ व्याप्नोतीति विष्णुः—’ सर्वव्यापी ‘ अत्यतिष्ठद्दशांगुलम् ’ असे भगवान् महाविष्णु. महाविष्णूची उपासना वेदांतही सांगितलेली आहे. विष्णुसूक्त वेदांत प्रसिद्धच आहे. महाराष्ट्रांत भगवद्भक्तांना विष्णु-दास, वैष्णव म्हणतात. ‘ आह्मीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें, ’ ‘ विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म, ‘ वैष्णव तो जया । अवघी देवा-वरी माया ’ इ० तुकोबांचीं वचनें प्रसिद्धच आहेत. तुकोबांनीं ‘ विठोबा ’ ह्या नांवाची व्युत्पत्ति गरुडवाहन, गरुडध्वज, अशी केलेली आपण पाहिली आहे. आतां—

होतासि क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं ।
ह्मणोनियां घरीं । गौळियांचे अवतार ॥ ३ ॥
केला पुंडलीकें गोवा । तुज पंढरीये देवा ।
तुका ह्मणे भावा—। साठीं हातीं सांपडसी ॥ ४ ॥

भगवान् विष्णु यांनीं युगायुगाचे ठायीं अनंत अवतार घेतले आहेत. ‘ बुद्धीचा जानिता लक्षुमीचा पति ’ असा हा पांडुरंग आहे. यांनीं अनेक अवतार घेतले पण ‘ कृष्णस्तु भगवान्स्वयम् ’ या श्रीभागवतीवचनाप्रमाणें (स्कंध १—३—२८) श्रीविष्णूचा पूर्णावतार श्रीकृष्ण हे होत. श्रीविष्णु हे शुद्धसत्वाच्या क्षीरसागरावर शयन करीत असतांना एकदा महीवर कंसादि असुरांनीं उत्पात मांडला, तेव्हां गोकुळांत त्यांनीं गवळ्यांचे ह्म० वसुदेवदेवकी यांच्या घरीं अवतार

घेतला, त्या श्रीकृष्णपरमात्म्यालाच पुंडलिकानें भावबळानें पंढरीस विटेवर उभें केलें आहे. वेदांनीं ज्यांचें वर्णन केलें तेच भगवान् नंद-गृहीं अवतरले:—

**निगमाचें वन । नका शोधूं करूं शीण ॥ १ ॥**
**या रे गौळियांचे घरीं । बांधलेसे दावेवरी ॥ २ ॥**

भगवान् विष्णूचे पूर्णावतार हे श्रीकृष्ण—हेच विठ्ठल होत. 'गीता जेणें उपदेशिली । ते हे विटेवरी माउली.' तेव्हां तुकोबांच्या हृदयींची प्रियमूर्ति म्हणजे विठ्ठलाची—कृष्णाची होय. त्याच्याच दर्शनाची त्यांना उत्कंठा लागली होती.

**उद्धव अक्रूरासी । आणिक व्यास अंबऋषी ।**
**रुक्मांगदप्रऱ्हादासी । दाविलें तें दाखवी ॥ १ ॥**
**तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण ।**
**उतावीळ मन । तया कारणें तेथें ॥ २ ॥**
**पांडवा आकांतीं । तेथें पावसी स्मरती ।**
**घातले द्रौपदी-लागीं बिरडें चोळीचें ॥ ४ ॥**
**करी गोपीचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख ।**
**दावी तेंचि मुख । दृष्टी माझ्या आपुलें ॥ ५ ॥**
**तरि तूं अनाथाचा दाता । मागतिया शरणागता ।**
**तुका ह्मणे आतां । कोड पुरवी हें माझें ॥ ६ ॥**

उद्धव व अक्रूर यांना नित्य दर्शन देणारे, पांडवांना आकांतीं पावणारे, द्रौपदीची लाज राखणारे, गोपींचें कोडकौतुक पुरविणारे, गाई-गोपाळांना संगसुख देणारे, जे श्रीकृष्ण त्यांच्याच दर्शनाची तुकोबांना उत्कंठा होती. 'सांवळें रूपडें चतुर्भुज मूर्ती। कृष्णनाम चित्तीं संकल्प हा' ते श्रीमुखचरण मला दाखव, ते पाहण्यासाठीं माझें मन उतावीळ झालें आहे, असें ते म्हणतात. 'विठ्ठल आमुचें जीवन। आगमनिगमांचें स्थान' व 'कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता' या दोन्ही अभंगांत पाहतां त्यांचें जीवींचें जीवन एकच—श्रीकृष्ण—होत. तुकोबांचें

ध्यान श्रीकृष्णाचें होतें आणि त्यांतही श्रीकृष्णाच्या बालरूपाचें होतें असें आतां आपणांस दिसेल. बालदशेचे तीन मुख्य भाग, सातवर्षांपर्यंत खरी बालदशा, चौदावर्षेपर्यंत कौमारदशा व एक-वीसवर्षांपर्यंत पौंगडदशा. श्रीकृष्णाच्या ज्या प्रेममय चरित्रांचें भक्तांना वेड लागतें तीं बहुतेक सगळीं चरित्रें पहिल्या सात वर्षांत झालेलीं आहेत.

'उंबरांतील कीटका' हा अभंग पहा. उंबरांतल्या किड्याला उंबर हेंच ब्रह्मांड वाटतें. अशीं उंबरें एका झाडाला असंख्य असतात. अशीं अगणित झाडें ह्या नवखंड पृथ्वीवर आहेत. आम्हांला जें ब्रह्मांड वाटतें अशीं असंख्य ब्रह्मांडें विराट् पुरुषाच्या एका रोमावर आहेत व असे अनंत केस विराटाच्या अंगावर आहेत. असे कोट्यवधि विराट् पुरुष ज्याच्या पोटीं सांठविले आहेत तो परमात्मा पाहायचा कोठें ?

तो हा नंदाचा बाळमुकुंद । तान्हा ह्मणवी परमानंद ॥ ६ ॥

दुसरा एक अभंग पहा:—

अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें धेंडें ॥ १ ॥
तो हा गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेका घरी॥धृ०॥
मारी दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ २ ॥
तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ३ ॥

तत्त्वज्ञानाची भूक असलेल्या विद्वान् लोकांसाठीं श्रीकृष्णानीं गीतोपदेश करून ठेवला आहे, व कथापरांसाठीं महाभारत आहेच, पण आजपर्यंत भरतखंडांत जे भगवद्भक्त व साधुसंत श्रीकृष्णावर बेहोष झाले आहेत ते सारे श्रीकृष्णाच्या बालपणींच्या दिव्य प्रेममय चरित्रांवर होत. तो आपणांला 'नंदाचा बाल' म्हणविणारा 'तान्हा' कान्हा, मुरलीधर, गोपगोपींना प्रेमाचें वेड लावणारा, गोपाळांच्या शिदोऱ्या खाणाऱ्या, दहिदूधलोणी चोरून नेणारा:—

विश्वाचा जनिता । ह्मणे यशोदेशी माता ॥

*   *   *   *

अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदाघरीं ॥ १ ॥
नवल केवढें केवढें । न कळे कान्होबाचें कोडें ॥ ध्रु० ॥
पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासी यशोदा भोजन घाली ॥२॥
विश्वव्यापक कमळापती । त्यासी गौळणी कडिये घेती ॥३॥
तुका ह्मणे नटधारी । भोग भोगुनि ब्रह्मचारी ॥ ४ ॥

*   *   *   *

नागर गोंडें बाळरूप । तें स्वरूप काळीचें ॥ १ ॥
गाईगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलीका ॥ ध्रु० ॥
तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर मिरविती ॥ २ ॥
तारावेसे मूढलोक । दिली भाक पुंडलीका ॥ ३ ॥
तुका ह्मणे वैकुंठवासी । भक्तांपाशीं राहिला ॥ ४ ॥

बाळरूप भक्तांना गोडच गोड झालें आहे. गाईगोपाळांच्या संगतींतलें बाळरूप हेंच तुकोबांचेंही जिव्हार होतें.

डोहांत कालिया सर्पाला मारणारा असा हा 'बाल' कृष्णच भक्तांच्या जीवींचें जिव्हार होऊन बसला आहे. 'पंढरीस घेडे' ह्या अभंगांत 'भोळी बाळमूर्ति पांडुरंग' असें तुकोबांनीं ह्मटलें आहे.

काग बग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥१॥
तो मज दावा तो मज दावा । नंदनंदन जीवा आवडे तो ॥ २ ॥

ह्याच 'भोळ्या बाळमूर्ति पांडुरंगाचा' तुकोबांना ध्यास लागला होता. 'पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥' 'आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें' ॥ इ० प्रकारें ह्याच बाळकृष्णानें त्यांना आपला छंद लाविला होता. तुकोबांच्या निदिध्यासाचा व कीर्तनाचाही विषय श्रीबालकृष्णचरित्रच होतें.

दीन आणि दुर्बळांसी । सुखराशी हरिकथा ॥ १ ॥
चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ २ ॥

सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचें विटेवरी ॥ १ ॥
डोळियांची धणी पाहतां न पुरे । तयालागीं झुरे मन माझें ॥ध्रु०॥
प्राण निघों पाहे कुडी ये सांडोनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥२॥
चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका ह्मणे येणें गरुडध्वजें ॥ ३ ॥

ह्या सर्व अभंगांवरून ' नंदाच्या नंदनाच्या सांवळ्या रूपड्यानें ' च तुकोबांचें मन मोहित केलें होतें व त्याच्याच दर्शनासाठीं त्यांचें मन झुरत होतें हें स्पष्ट होतें.

२ विठ्ठल म्हणजे श्रीकृष्णाचें बालरूप हें लक्ष्यांत ठेवलें म्हणजे आमच्या साधुसंतांनीं श्रीकृष्णचरित्रांतील त्याच्या ' बाललीलाच तेवढ्या विलक्षण प्रेमानें कां गाइल्या आहेत याचा उलगडा होतो. सूरदास, मीराबाई, नरसी मेहता हे उत्तरेकडील कृष्णभक्त व ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबाराय हे महाराष्ट्रीय कृष्णभक्त हे सर्व श्रीकृष्णाच्या बालचरित्राचेंच अत्यंत प्रेमानें वर्णन करणारे आहेत. आपल्या महाराष्ट्रीय कृष्णभक्तांनीं वर्णिलेल्या श्रीकृष्णाच्या 'बाललीला' वेगवेगळ्या गाथ्यांतून छापलेल्या आहेत. ज्ञानेश्वर व नाथ यांनीं अध्यात्माची दिशा दाखवीत दाखवीत बाल-लीलावर्णन केलें आहे त्यांनीं व नामदेव, तुकोबा व निळोबा यांनीं श्री-कृष्णाचें बालचरित कंसवधापर्यंत वर्णून श्रीकृष्ण द्वारकाधीश झाले हें सुचवून 'बाललीला' पुऱ्या केल्या आहेत. हरिहरांची एकात्मता व श्रीविष्णूच्या सर्व अवतारांची—त्यांतही रामकृष्णांची—भक्ति यांचें जरी या सर्वांनीं वर्णन केलें आहे तरी एकनिष्ठ सगुणोपासनेच्या बाजूनें बोलायचें ह्मणजे हे पांचही संत कृष्णोपासक आहेत व पुन्हां त्यांतल्या त्यांत श्रीकृष्णाच्या बालचरित्राचे (विठोबाचे) उपासक आ-हेत असें निर्विवाद दिसतें. ज्ञानेश्वरींत किंवा नाथभागवतांत प्रसंगो-पात्त कृष्णचरित्राचा उल्लेख कर्तव्य असतां बालचरित्रांतील कथांचेच उल्लेख आले आहेत. कसे तें आपण पाहूं:—

(वि) ज्ञानेश्वरमहाराजांच्या अभंगांत 'वसुदेवकुमरू, देवकीनंदनू,' किंवा 'वृंदावनीं ब्रह्म नंदनंदनु,' 'उपनिषदाचा गाभा । परि देहुडा पाउलीं उभा', ' रूप तरी डोळसू । सुंदर पाहतां गोपवेषु, ' ' तरु-घोस ठेवुनि शिरीं वेणु ठेवुनि अधरीं । नंदरायाचा खिल्लारी वोज काय सांगों गे माय,' 'रास वृंदावनीं खेळे । इंदुवदनमेळे' इ० प्रकारें ' परब्रह्म पुतळा कीं आनंदाची कळा ' अशा श्रीविठ्ठलाचें जें मनोहर वर्णन केलें आहे तें श्रीकृष्णाच्या बालवेषाला अनुलक्षूनच केलें आहे. ज्ञानेश्वरींतही ' वृष्णीनां वासुदेवोऽस्मि ' ( गीता अ० १०–३७ ) यावर महाराजांनीं जें भाष्य केलें आहे त्यांतही सर्व वर्णन श्रीकृष्णांच्या बाळपणचेंच आहे:—

जो मी देवकीवसुदेवास्तव जाहला । कुमारीसाठीं गोकुळीं गेला।
तो मी प्राणासगट पियालो । पूतनेतें ॥ २८८ ॥

नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मियां अदानवी सृष्टि केली ।
करीं गिरि धरुनि उमाणिली । महेंद्रमाहिमा ॥ २८९ ॥

कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें।जेणें मियां जळत गोकुळ राखिलें।
वासरुवांसाठीं लाविलें । विरंचीस पिसें ॥ २९० ॥

प्रथमदशेचिये पहांटे–। माजीं कंसाऐसीं अचाटें ।
महाधेंडीं अवचटें । लीळाचि नासिलीं ॥ २९१ ॥

ज्ञानेश्वरींत विठ्ठलनामानिर्देश नाहीं म्हणणारांनीं या ओव्यांचें नीट मनन करावें. यादवांत श्रीकृष्ण तो मी असें देव सांगत असतां व त्यावर भाष्य करायचा प्रसंग असतां ज्ञानोबारायांनीं कंसवधापर्यंतचेंच वर्णन करावें आणि पुढील चरित्र तुला माहीतच आहे तें कशाला सांगावें अशा सबबीवर तें वर्णन करूं नये यावरून त्यांची बाळकृष्णाविषयींच अधिक भक्ति होती हें सिद्ध नाहीं का होत ? हें वर्णन श्रीविठ्ठलाचें आहे व तेंच त्यांचें उपास्य होतें याविषयीं ज्ञानेश्वरींतला एवढाही पुरावा पुरेसा व्हावा असें मला वाटतें.

(ठ) नामदेवरायांच्या अभंगांतही विठ्ठलस्वरूपाचा असाच स्पष्ट बोध होण्यासारखे अनेक प्रसंग आहेत. 'अनिर्वाच्य ब्रह्म' असें निगम ज्याचें वर्णन करितात, जें उपनिषदांचें मथितार्थ, सारांचेंही सार, जो श्रवणांचा श्रवण, नयनांचा नयन, ज्ञानाचा दर्पण, सर्वांभूतीं व्यापक,' 'चित्ता चेतविता बुद्धीतें पाळिता । मनादि चाळिता इंद्रियांसी', जो निर्विकल्प, निराकार, निःशून्य, निराधार, निर्गुण, अपरंपार इ० प्रकारें श्रुतिशास्त्रपुराणांनीं गाइलेला परमात्मा—

**तोचि गोकुळांत होऊनि गोवळ । ह्मणवितो बाळ यशोदेचा ।**
**चिन्मय चिद्रूप अक्षय अपार । परेहून पर ह्मणती ज्यातें ॥**

* * * *

**तें हें समचरण उभें विटेवरी । पहा भीमातीरीं विठ्ठलरूप ।**

असें हें ज्ञानियांचें ज्ञेय व योगियांचें ध्येय तेथें कसें आलें ?

**गोकुळींहूनि देव पंढरी पातला । त्वरित पावला वेणुनादीं ।**
**तेथूनि परतला वाळवंटीं आला । तंव तो देखिला पुंडलीकें ॥**
**चतुर्भुज मूर्ति देखियली दृष्टी । पुंडलीकें ईट टाकियेली ॥**
**इटेवरी उभा राहिला विठ्ठल । ठसा मिरविला त्रिभुवनीं ॥**

वेदांनीं निर्गुणरूपानें ज्याचें वर्णन केलें तोच सगुणरूपानें पंढरीस प्रगट झाला आहे.

**निर्गुणाचें वैभव आलें भक्तिमिषें । तें हें विलष्ठवेषें ठसावलें ॥**
**भावाचें आळुकें भुललें भक्तिसुखें । दिधलें पुंडलीकें साधूनियां ॥**

* * * *

**तो हरी गोकुळीं वसुदेवाकुळीं । यशोदेजवळी बाळकृष्ण ।**

असें नामदेवरायांनीं विठ्ठलाचें वर्णन केलें असून त्याच्या स्तुतिस्तोत्रांतही—

**श्रीधरा अनंता गोविंदा केशवा । मुकुंदा माधवा नारायणा ॥**
**देवकीतनया गोपिकारमणा । भक्तउद्धरणा केशिराजा ॥**

* * * *

गोवर्धनधरा गोपीमनोहरा । भक्तकरुणाकरा पांडुरंगा ॥

अशा प्रकारें गोपालकृष्णाचें—बालकृष्णाचेंच स्वरूप दाखविलें आहे. श्रुतींशीं कानडें ( कठिण, दुर्बोध ) असें परब्रह्म सगुण कसें झालें म्हणाल तर ‘ जळीं जळगार दिसे जैशापरी । तैसा निराकारीं साकार हा ! ’ सगुण निर्गुण हा भेद उगीच समजुतीसाठीं करितात, तत्त्वतः पाहतां ‘ ऐसा पूर्णपणें सहजीं सहज ’ असा हा पांडुरंग आहे, तोच विटेवर भक्तांसाठीं उभा असून त्याच्या नामसंकीर्तनानें, नामदेव म्हणतात, आमचें अंग निवालें आहे. परब्रह्म अविनाश आणि आनंदघन आहे, पण त्यापेक्षां आम्हांला प्रेमपान्ह्यानें सर्वकाळ पान्हवणारी आमची विठोमाउलीच आवडली आहे.

(ल) एकनाथमहाराजांनीं भागवतांत बालकृष्णाच्या भक्तीची पराकाष्ठा केली आहे. पहिल्या अध्यायांतच ते म्हणतातः—

बहुतीं अवतारीं अवतरला देवो । परी या अवतारीचा नवलावो
देवां न कळे अभिप्रावो । अगम्य पाहा वो हरिलीला ॥ १८६ ॥
उपजतांचि मायेवेगळा । वाढिन्नला स्वयें स्वलीळा ।
बाळपणीं मुक्तीचा सोहळा । पूतनादि सकळां निजांगें अर्पी॥ १८७॥
बाळ बाळियातें मारी । अचाट जगादेखतां करी ।
परी बाळपणाबाहेरी । तिळभरी नव्हेची ॥ १८९ ॥
ब्रह्म आणि चोरी करी । देवो आणि व्यभिचारी ।
पुत्र कलत्र आणि ब्रह्मचारी । हेंही परी दाखविली ॥ १९० ॥
भक्ति भुक्ति मुक्ति । तिन्हीं केली एके पंक्ती ।
काय वानूं याची ख्याति । खाउनि माती विश्वरूप दावी १९४

जो चारित्रभाग मनुष्याला अत्यंत प्रिय असतो त्याचें मनसोक्त वर्णन केल्याशिवाय त्याला राहवतच नाहीं. श्रीकृष्णाच्या लावण्याचें व यशाचें अनुपम वर्णन याच अध्यायांत ( २३८ ते २७३ व २८९ ते ३०९ ) वाचकांनीं अवश्य पहावें. सकल लोकलालन असा हा

बाळकृष्ण कीं ' ज्याचिया अंगसंगप्रभा । आणिली शोभा जगासी ' मूर्त परब्रह्मच होय.

घृत थिजलें तेंचि विघुरलें । परी घृतपणा नाहीं मुकलें ।
तेवीं अमूर्त मूर्ती मुसावलें । परी तें संचलें परब्रह्म ॥ २८६ ॥
सकल सौंदर्या अधिवासु । धरोनि मनोहर नटवेषु ।
लावण्य कळान्यासु । आणि जगदीशु निजांगें ॥ २८९ ॥
नवल सौंदर्या बीक उठी । सर्वांगीं गुंतल्या जनादिठी ।
कृष्णस्वरूपीं पडे मिठी । हात लुलुबुटी डोळियां ॥ २९० ॥
नयन लांचावले लोभा । दृष्टीसी निघालिया जिभा ।
यापरी श्रीकृष्णशोभा । स्वानंदगाभा साकार ॥ २९२ ॥
तो श्रीकृष्ण देखिला ज्या दिठी । ते परतोनि मागुती नुठी ।
अधिकाधिक घाली मिठी । देखे सकळसृष्टी श्रीकृष्णु ॥२९३

* * * *

कांसे विराजे सोनसळा । आपाद रुळे वनमाळा ।
घवघवीत घनसांवळा । देखतां डोळां जीवूं निघे ॥२९-८७७

श्रीकृष्ण हे लीलाविग्रही होत. त्यांची तनु लोकाभिराम आणि ध्यानधारणमंगल अशी आहे. वेदांचें जन्मस्थान, षट्शास्त्रांचें समाधान, षट्दर्शनांची बुजावण असा हा श्रीकृष्णाचा पूर्णावतार आहे ( नाथ भाग० ३१–३६८ ) आणि ' त्याही माजी बाळचरित्र। मधुरसुंदर अतिपवित्र ' ( ३८२ ) असें असून तेंच सकल भक्तप्रिय झालें आहे. तीच श्रीकृष्णाची बाळमूर्ति पंढरीस विठ्ठलनामरूपानें विटेवर उभी असून आमच्या संतांचें उपास्य आहे.

श्रीकृष्ण हेच विठ्ठल होत हें संतांच्या वचनाधारें सिद्ध झालेंच आहे. पण या गोष्टीस एक ऐतिहासिक प्रमाणही मिळालें आहे. श्रीकृष्णांचा अवतार होऊन आतां ( गोकुळाष्टमीस १८४२ ) बरोबर ५००५ वर्षे झालीं ! श्रीकृष्णाचा जन्म शकपूर्व ३२६३ श्रावण वद्य ८ स रोहिणी नक्षत्रावर मध्यरात्रीं झाला. त्या दिवशीं

बुधवार होता असें ज्योतिषाचार्य चिंतामणराव वैद्यांनीं आपल्या 'श्रीकृष्णचरित्र' नामक ग्रंथाच्या पुरवणींत म्हटलें आहे. हें वाचतांच वारकऱ्यांना बुधवारीं पंढरींतून बाहेर जाण्याचा कां प्रतिबंध आहे व बुधवार विठोबारायाचा दिवस म्हणून तेथें पूज्य कां मानला जातो हें लक्ष्यांत येऊन मला फार आनंद वाटला ! पंढरीचा संप्रदाय रूढ करणाऱ्या मूळ प्रवर्तकास बुधवारीं कृष्णजन्म आहे हें खात्रीनें माहित असलें पाहिजे, एरवीं त्यांनीं बुधवार हा देवाचा वार म्हणून ठरविला नसता !!

३ ज्ञानेश्वर, नामदेव, नाथ, तुकोबा, निळोबा यांनीं वर्णिलेल्या 'बाललीला' पाहिल्या म्हणजे त्यांत श्रीकृष्णाच्या बालचरिताचें म्ह० बाल, व कौमार दशेंतील अद्भुत चरित्रांचेंच वर्णन केलेलें आढळतें. क्षीरसागरीं शयन करणाऱ्या श्रीविष्णूला कंसप्रमुख असुरांच्या भारानें दीन झालेली पृथ्वी शरण गेली, विष्णूनें अभय दिलें, वसुदेवदेवकीच्या विवाहसमयीं 'आकाशवाणी' होऊन देवकीचा आठवा पुत्र तुला मारील असें कंसाला समजलें, त्यानें तिचीं सात अपत्यें मारलीं, कारागृहांतच श्रीकृष्ण प्रगटले, वसुदेवानें कृष्णाला गोकुळांत नंदाकडे नेलें, वाटेंत लोहार्गळा तटातट तुटल्या व यमुनेनें वाट दिली, कृष्णाचें मनोहर बालरूप व त्याची मोहकता सर्वगोपगोपींचें चित्त आकर्षिती झाली, कृष्णाच्या नाशाकरितां कंसानें पाठविलेल्या पूतना, माभळभट, तृणावर्त, वत्सासुर, प्रलंब, अघासुर, बग, केशी, शकटासुर, धेनुकासुर, इत्यादि असुरांचा श्रीकृष्णानें बालपणींच लीलेनें नाश केला, करांगुलीवर पर्वत धरिला, यशोदेला मुखांत सर्व ब्रह्मांड दाखविलें, ब्रह्मदेवाचा गर्व हरिला, वृंदावनांत गोपांसमवेत श्रीकृष्ण नानाप्रकारचे खेळ खेळले, दहींदूधलोणी चोरून अनेक चेष्टांनीं त्यांनीं गोपींचें चित्त हरलें, श्रीकृष्णप्रेमासाठीं त्या पतिसुतगृह विसरल्या, गोकुळवृंदावनांतल्या लीलांनीं

आबालवृद्धनारीनर कृष्णप्रेमानें वेड झाले, मग कृष्णांनीं मथुरेंत जाऊन कंसाचे मल्ल व शेवटीं कंस या सर्वांना मारलें, कांहीं कालानें श्रीकृष्ण द्वारकाधीश झाले, हे सर्व प्रकार श्रीकृष्णाच्या बाळलीलेंत कृष्णभक्त संतांनीं अत्यंत प्रेमानें वर्णिले आहेत. काल्याचे अभंग, गौळणी, हमामा, हुतुतु इ० प्रकारचे खेळ यांवरील अभंगांचाही बाललीलेंत अंतर्भाव होत असल्यामुळें हा गोकुळवृंदावनांतला श्रीकृष्णच आमच्या भक्तमंडळाचा विठ्ठल होय यांत तिळमात्र शंका नाहीं. श्रीकृष्णाचें उत्तरचरित्र सर्वप्रसिद्धच आहे. 'गीता जेणें उपदेशिली । ते हे विटेवरी माउली ' ह्या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें अर्जुनाला भगवद्गीता व उद्धवाला उद्धवगीता सांगणारे, पांडवसाह्यकारी द्वारकाधीश श्रीकृष्ण हे कौरवपांडवांच्या युद्धप्रसंगामुळें महाभारतानें लोकांना राजकारणपटु म्हणून जरी माहीत आहेत तरी आमच्या भक्तमंडळाला जे श्रीकृष्ण परमप्रिय आहेत ते गोकुळांतलेच होत. गोकुळांतलेच कृष्ण भगवद्गीता सांगणारे होत, कृष्ण एकच आहेत; तथापि श्रीकृष्णांनीं जगदुद्धारक, भक्तिरसपोषक परमानंदकर ज्या लीला गोकुलवृंदावनांत केल्या त्यांचाच प्रेमा भक्तांना अधिक असल्यामुळें गोकुळांतले श्रीकृष्णच त्यांचे उपास्य होत. स्वामी विवेकानंदांनीं म्हटलें आहे ( प्रबुद्धभारत, जानेवारी १९१५ ) " श्रीकृष्ण सर्व मानवांचा उद्धार करण्यासाठीं अवतरलेला परमेश्वर होय व गोपीलीला हें धर्मांतर्गत भगवत्प्रेमाचें सारसर्वस्व होय. ह्या प्रेमांत जीवभावाचा लय होतो व परमात्म्याशीं पूर्ण तादात्म्य होतें. श्रीकृष्णांनीं गीतेंत ' सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ' म्हणून जो उपदेश केला आहे त्याचें प्रत्यंतर ह्या लीलेंत पाहण्यास सांपडतें. भक्तीचें रहस्य शिकायचें असेल तर जा आणि वृंदावनलीलेचा आश्रय करा. श्रीकृष्ण हे गरिबांचें, भिकाऱ्यांचें, पातक्यांचें, मुलाबाळांचें, स्त्रीपुरुषांचें सर्वांचें परम उपास्य आहेत. ते व्युत्पन्न पंडित

आणि शाब्दिक तत्त्वज्ञ यांपासून दूर आहेत व अज्ञ भोळ्यांना ते जवळ आहेत. त्यांना ज्ञान प्रिय नाहीं तर ते शुद्ध प्रेमाचे भुकेले व भोक्ते आहेत. गोपींना श्रीकृष्ण आणि प्रेम एकरसच झाले होते. द्वारकेंत श्रीकृष्णांनीं कर्मयोग शिकविला आणि वृंदावनांत भक्तिप्रेम शिकविलें. श्रीकृष्ण प्रेमाचा—दयेचा क्षमेचा सागर आहेत. ”

४ तुकोबांनीं आपल्या उपास्य विठ्ठलाच्या ज्या ‘ बालक्रीडा ’ गाइल्या आहेत त्यांतही गोपगोपींच्या अत्युत्कट भक्तीचें व श्रीकृष्णाच्या भक्तवत्सलतेचें अत्यंत जिव्हाळ्याचें वर्णन केलें आहे. बालक्रीडेचे, काल्याचे व गौळणींवरचे अभंग पहावेत.

**आलें अविनाश धरूनी आकार । दैत्यांचा संहार करावया ।। १ ।।**
**करावया भक्तजनांचें पाळण । आले रामकृष्ण गोकुळासी ।। २ ।।**
**गोकुळीं आनंद प्रगटलें सुख । निर्भर हे लोक घरोघरीं ।। ३ ।।**

गोपींच्या गाढ कृष्णभक्तीचा प्रकार पहा:—

**त्यांच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारी खेळाविला १**
**खेळविला जिहीं अंतर्बाह्य सुखें । मेळवूनि मुखें चुंबन दिलें ।। २ ।।**
**दिलें त्यांसी सुख अंतरींचें देवें । जिहीं एका भावें जाणितला ।।३।।**
**ज्यांचें कृष्णीं तन मन जालें रत । गृह पति सुत विसरल्या ।। ४ ।।**
**विष तयां जालें धनमानजन । वसविती वन एकांतीं त्या ।। ५ ।।**
**एकांतीं त्या जाती हरीसी घेऊनी । भोगइच्छा धणी फेडावया ।।६**
**वयाच्या संपन्ना तैसा त्यांकारणें । अंतरींच्या देणें इच्छाभोग ।।७ ।।**
**भोग त्याग नाहीं दोन्ही जयापाशीं । तुका ह्मणे जैसी स्फटिकशिळा**

ह्या गोड अभंगांत रासक्रीडेची कथा सरहस्य सांगितली आहे.

---

१ भक्तांना परमसुख देणाऱ्या ह्या दिव्यक्रीडेवर कित्येक भक्तिविन्मुख विद्वानांचे आक्षेप येतात. त्यांचें उत्कृष्ट खंडण चिपळूणकर मंडळींनीं प्रसिद्ध केलेल्या ‘हरिवंशाला’ आमचे मित्र रा. माधवराव मोडक यांनीं ‘ ग्रंथपरिचय ’ म्हणून ८० पृष्ठांचा जो सर्वांगसुंदर निबंध जोडला आहे त्यांत ( पृ० ६५—७२ ) जरूर तर पहावें.

चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । बांधवी तो हातीं गौळणींच्या
तया घरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतोनी शिरे माजी ॥३॥
जैसा तैसा आहे अंतर्बाह्याकारीं । ह्मणऊनी चोरीं न संपडे ॥ ५ ॥
वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसवील वाटा निरोधूनी ॥ ७ ॥
निवांत राहिल्या निःसंग होउनी । निश्चळ त्या ध्यानीं कृष्णाचिया
नये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणी भाविका त्या॥९
भाविका तयांसी येतो काकुळती । शहाण्या ह्मणती न सांपडे ॥१०

*　　*　　*

विसरल्या वरी देहाची भावना । तेचि नारायणा सर्व पूजा ॥ १०॥
पूजा भाविकांची न कळतां घ्यावी । न मागतां द्यावी निज ठाव ११

*　　*　　*

मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास या सुना गौळियांच्या ॥१॥
यांच्या भ्रतारांचीं धरूनियां रूपें । त्यांच्या घरीं त्यांपे भोग करी २
एक भाव नाहीं सकळांच्या चित्तीं । ह्मणउनि प्रीती तैसें रूप ॥४॥
लेंकरूं न कळे स्थूल कीं लहान । खेळे नारायण कवतुकें ॥ ६ ॥

*　　*　　*

आतां गोपांचें भक्तिभाग्य पहा:—

रामकृष्णें केलें कौतुक गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारि ॥ १।
गाई चारी मोहोरी पावा वाहे पाठीं । धन्य जाली काठीकांबळी ते
काय गौळियांच्या होत्या पुण्यरासी। आणीक त्या ह्मैसी गाई पशु३

*　　*　　*　　*

व्रत याग यांसीं फळलीं बहुतें । होतीं या संचितें गौळियांचीं ।
गौळियांचें सुख दुर्लभ आणिकां । नाहीं ब्रह्मादिकां तुका ह्मणे ॥

*　　*　　*　　*

नंद व यशोदा यांचें कृष्णभक्तिभाग्य पहा:—

करूनी सायास मेळाविलें धन । तेंही कृष्णार्पण केलें तिहीं ॥ ८ ॥
कृष्णासी सकळ गाई घोडे ह्मैसी । समर्पिल्या दासी जीवभावें १०
क्षणभरी होतां वेगळा तयांस । होती कासावीस प्राण त्यांचे ११

त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरी । देह काम करी चित्त त्यापें १२
त्यांचेंचि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण १३
कृष्ण गाती ओव्या दळणीं कांडणीं । कृष्ण हा भोजनीं पाचारिती
कृष्ण तया ध्यानीं आसनीं शयनीं । देखती त्या स्वप्नीं कृष्णरूप१६
कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चिता । धन्य मातापिता तुका ह्मणे१७

* * *

शेजारच्या गौळणींची कृष्णभक्ति पहा, व अंतर्यामीं तें सुख भोगून मुग्धपणें प्रेमाश्रु ढाळा:—

कृष्ण हा परिचारी कृष्ण हा व्यवहारी।कृष्ण च्यावो नारी आणिकीह्मणे
म्हणे कृष्णावीण कैसें तुह्मां गमे । वेळ हा करमे वायावीण ॥ २ ॥
वायांवीण तुह्मीं पिटितां चावटी । ध्यागे जगजेठी क्षणभरी ॥ ३ ॥
क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा। पहा एकवेळां घेऊनियां ॥४॥
याचें सुख तुह्मां कळालियावरी । मग दारोदारीं न फिराल ॥ ५ ॥
लटिकें हें तुह्मां वाटेल खेळणें । एका कृष्णाविणें अवघेंचि ॥ ६ ॥
अवघ्यांचा तुह्मी टाकाल सांगात । घेउनी अनंत जाल वना ॥ ७ ॥
न कराल मग हा जीवावेगळा । टोंकवाल बाळा आणिकांहीं ॥९॥
बाळा एकी घरा घेऊनियां जाती । नाहीं त्या परती तुका ह्मणे१३

* * *

तुका ह्मणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासी खेळतां दिवस गमे १
दिवस राती कांहीं नाठवे तयांसी । पाहतां मुखासी कृष्णाचिया २
तटस्थ राहिलें सकळ शरीर । इंद्रियें व्यापार विसरलीं ॥ ४ ॥
विसरल्या तान भूक घरदार । नाहीं हा विचार असों कोठें ॥ ५ ॥
विसरल्या आह्मी कोणी या जातीच्या । वर्णादी चहूंच्या एक झाल्या
खेळती भातुकें कृष्णाच्या साहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ९
भावना राहिली एकाचिये ठायीं । तुका ह्मणे पायीं गोविंदाचे १४

* * *

यांनीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वायां खेळतों तें ॥१४॥
व्याही भाई हरि सोयरा जावई । अवघियांच्या ठायीं केला एक ७
तयां ठावें आहे आह्मीं अवघीं एक । ह्मणोनी निःशंक खेळतील १६

काय खातों आह्मीं कासया सांगातें। कैसें हें लागतें नेणों सुखीं १८
नाइकती बोल आणिकांचे कानीं। हरि ध्यानीं मनीं बैसलासे २१

*　　　*　　　*

काल्याच्या अभंगांतही असाच अनुपम रंग भरला आहे. श्रीगोपाळकृष्ण सवंगड्यांसमवेत गाई चारायला मधुवनांत जात तेथें सर्वांनीं आपापल्या शिदोऱ्या सोडून जें भोजन केलें, विविध खेळ खेळले त्याचें बहारीचें वर्णन तुकोबांनीं केलें आहे. देव आधीं म्हणतात 'काय कोणाची शिदोरी ते पाहूं द्या मला,' कारण 'घेतल्यावांचून झाडा मी नेदी आपुलें कांहीं.' ताक दहीं भात भाकरी जें ज्यापाशीं होतें तें त्यानें बाहेर काढलें. कोणाच्या गाई स्थिरावल्या होत्या, तर 'एकांच्या फांकल्या वोढाळा फेरे भोंवतीं घेती!' सर्वांनीं देवास विनविलें कीं 'आतां आह्मांला वांटून द्या, आह्मांपाशीं आहे नाहीं तें तुज अवघोंचि ठावें' आहे. देवाला सर्व समान, 'कोणाचिया जीवा वाटों नेदी विषम तो—'

बैसवूनि फेरी। गडियां मध्यभागीं हरी।
अवघियांचें करी। समाधान सारिखें॥

कान्होबा निष्कपट, मोठा खेळिया. ज्याच्या त्याच्या भावनेप्रमाणें त्यानें वाटे केले.

पीडती आपल्या भावना। जैसी जयाची वासना।
कर्माचा देखणा। पाहे लीला कवतुक॥
खेळ खेळे न पडे डाईं। ज्याचा भार त्याचे ठायीं॥
कोणी पडतील डाईं। कोणी कोडीं उगविती॥

*　　　*　　　*

देती आपुलाला झाडा। गाई बैसविल्या वाडा।

सर्वांच्या शिदोऱ्यांत हरीनें आपली गोडी घातली. परस्परसंवादीं सर्व ब्रह्मानंदें धाले.

**भार वागविला खांदीं । नव्हती मिळाली तों मांदी ।**
**सकळांचे संदीं । ओझीं अवघीं उतरलीं ॥**

खडकावर मोटा सोडल्या, कोणी पावे वाजवूं लागले. हरी सर्वांच्या हातांवर व मुखांत घास घालूं लागले. देवाचे सवंगडी ते :

**ह्मणती गोड झालें । नाहीं आमुचे पोट धालें ! ।**
**एक एकाचे उच्छिष्ट । खातां न मानिती वीट ।**

काल्याचा तो परमानंद पाहून——

**गाई विसरल्या चार । पक्षिश्वापदांचे भार ।**
**जालें यमुनाजळ स्थिर । वाहों ठेलें ॥**
**देव पाहाती सकळ । मुखें घोटोनियां लाळ ।**
**धन्य ह्मणती गोपाळ । धिक् जालों आह्मी ॥**

कालादहीं पोटभर खाऊन गोपाळ ह्मणतात:——

**तुझा संग बरवा । नित्य आह्मां द्यावा ।**

मग ते सर्व काठीकांबळी घेऊन गाई चारावयास गेले. त्यांत कित्येक वांकडे, बोबडे, खुडे, मुडे, लुडे होते पण त्या सर्वांचा श्रीकृष्ण आवडता होता व देवही त्यांच्या भावाला भुलले होते. मध्येंच हमामा खेळूं लागले. देव ह्मणाले——

**मशीं पोरा घे रे बार । तुझें वुजाविन खालिल दार ॥**
**तरीच मशीं बोल । पोरा जिव्हाळ्याची ओल ॥**
**आमुचिये रंगीं । तुजें तगेना ये संगीं ॥**
**। पोरा हमामा रे हमामा ॥**

हुंबरी, फुगड्या, टिपऱ्या इ० खेळ सुरू झाले.

**दोन्ही टिपरीं एकचि नाद । सगुणनिर्गुण नाहीं भेद रे ।**
**कुसरीं अंगें मोडतिल परी । मिळविती एका छंदें रे ॥ १ ॥**

या बाळक्रीडेच्या अभंगांत तुकोबांनीं अध्यात्माचे ध्वनि सुचविले आहेत. गोपी रासरंगांत समरसता पावल्या त्याप्रमाणें आपण आपल्या चित्तवृत्ति कृष्णप्रेमांत रमवाव्या व तत्सम तन्मयतेचें सुख भो-

गावें हा बोध वरील अभंग वाचतां कोणाच्याहि मनांत उतरण्यसारखा आहे. शिदोरी ह्म० पूर्वसंचित तें पाहून त्यांत देव आपल्या प्रसादाची भर घालून जीवित गोड करितात व ' खालिल द्वार बुजवितात ' ह्म० अधोगति थांबवितात. असो. श्रीकृष्णभक्तीचा तुकोबांचा जिव्हाळा अपार होता हें कांहीं सांगावयास नको.

५ आणि पंढरीस श्रीविठ्ठलमूर्तीचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतांना ही बालमूर्ति आहे असेंच सिद्ध होतें. ही मूर्ति बुद्धांची आहे किंवा जैनांची आहे असा कित्येक अर्वाचीन पंडितांचा तर्क आहे पण तो तर्कच आहे, त्या तर्काला कांहीं प्रतिष्ठा नाहीं. ही मूर्ति श्रीमहाविष्णूचे अवतार जे गोपाळकृष्ण त्यांचीच आहे, यांत, तिळमात्र शंका नाहीं. भगवान् विटेवर उभे आहेत. विटेवर देवाचीं पाऊलें मृदु आहेत. या पायांवर कोट्यवधि भाविकांनीं आपलीं शिरें नमविलीं आहेत, प्रेमाश्रूंनीं तीं सहस्रशः भिजविलीं आहेत, त्यांना आपल्या जीवींचें निजगुज निवेदिलें आहे. या पायांनीं लक्षावधि जीवांचे हृत्ताप निवविले आहेत, त्यांच्या नेत्रांचीं पारणीं फेडलीं आहेत, त्यांचें जीवित धन्य केलें आहे. हजारो पामरांनीं आणि मुक्तांनीं, बद्धांनीं मुमुक्षूंनीं आणि सिद्धांनीं, रंकांनीं आणि रावांनीं, पतितांनीं आणि पतितपावनांनीं सर्वांनीं या पावलांच्या ध्यानभजनांत आपल्या आयुष्याची सफलता मानली आहे. लक्षावधि जीवांना हा दुस्तर भवसागर या पावलांच्या चिंतनबलानें गोष्पदतुल्य ( गाईच्या पावलाएवढा ) झाला आहे. अशीं हीं श्रीविठ्ठलाचीं पावलें विटेवर उभीं आहेत. देवाच्या डाव्या पायावर एक व्रण आहे. देवाची एक मुक्तकेशी नांवाची दासी होती. ह्या गोपीचें देवावर अत्यंत प्रेम होतें. ती अत्यंत सुकुमार होती व तिला आपल्या नाजुकपणाचा अभिमान वाटे. तिनें देवाच्या पायावर आपल्या उजव्या हाताचें बोट ठेवलें तों तें देवाच्या अति सुकुमार

पायांत रुतलें. देवाच्या सौकुमार्यापुढें आपण कःपदार्थ आहोंत असें समजून ती लज्जित झाली. तिचा गर्वपरिहार झाला. देवाच्या दोन्ही पायांमध्यें पीतांबराचा सोगा आहे तो नाजुक व बालरूपोचित आहे. पीतांबर बालाचा असावा असाच आहे. मोठेपणचा असता तर पायघोळ असता. पुरुषेंद्रियाचे जागीं करगोट्याची खूण आहे. सोन्याच्या करगोटयावर सोन्याचेंच इंद्रिय आहे; तें मूळचें नाहीं, अर्थात् मूर्ति नग्न नाहीं. जैनमूर्तीची शंकाच यावयास नको आहे. करगोटा पीतांबरावर आहे. देवाच्या उजव्या हातांत शंख व डाव्या हातांत पद्म आहे. उजव्या छातीवर भृगुलांछन आहे, भृगूच्या आंगठ्याची खूण आहे. गळ्यांत कौस्तुभमणि असून तो लोंबत छातीवर पडला आहे. बाहूंवर दंडपटया ( बाहुभूषणें ) आहेत. दोन्ही कानांत कानांपासून स्कंधापर्यंत लोंबणारीं मकराकार ( मत्स्याकृति ) कुंडलें आहेत. देवाचें मुख, नासिका व नेत्र प्रसन्न आहेत. मस्तकावर शिवाकार ( पिंडीसारखा ) मुकुट आहे. कपाळावर मुकुटाच्या मध्यें बारीक कंगोरा कपाळभर आहे, तो पाठीशीं सोडलेल्या शिदोरीच्या शिंकाळ्याच्या दोरीचा आहे. पंढरीचे गोपाळपूर, तेथील वस्तु, व काल्याचे समारंभ हे सर्व गोकुळांतले आहेत. अशा विठ्ठलरूपी बालकृष्णाला माझे अनंत प्रणाम असोत.



# प्रकरण अकरावें.



# सगुणसाक्षात्कार.

**भक्तसमागमें सर्वभावें हरी । सर्व काम करी न सांगतां ॥ १ ॥**
**सांठविला राहे हृदयसंपुटीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥ २ ॥**

१ सत्यसंकल्पाचा दाता नारायण. २ रामेश्वरभट व तुकोबा यांच्या विरोधाचें बीज, म्हणजे कर्मठ व भागवतधर्मी यांच्यांतला जुना वाद. ३ तुकोबांना देहूंतून उखडण्याचा विचार. ४ अभंगांच्या वह्या डोहांत बुडविल्या. ५ तेरा दिवस शिळेवर पडून राहिल्यावेळचे १९ अभंग. ६ इकडे रामेश्वरभटाच्या अंगाचा दाह झाला. ७ सगुणसाक्षात्कार, देव तुकोबांच्या वह्या उदकांत रक्षितात. ८ त्यावेळचे तुकोबांचे ७ अभंग. ९ ह्या गोष्टीचें महत्व. १० रामेश्वरभटांची शरणागति. ११ त्यांचे तुकोबांवर ४ अभंग. १२ श्रीविठ्ठलदर्शनानंतरचें समाधान. १३ मध्यखंडाचा उपसंहार.

१ श्रीतुकोबारायांस सगुणदर्शनाची किती तीव्र उत्कंठा लागली होती हें नवव्या प्रकरणांत आपण पाहिलें. आतां त्या उत्कंठेचें त्यांना प्रत्यक्ष फळ कसें मिळालें हें ह्या प्रकरणांत पाहावयाचें आहे. जीवमात्राला त्याच्या इच्छेप्रमाणें फळ मिळत असतें. ‘ वासना तसें फळ’ अशी म्हण आहे. मनुष्याची इच्छाशक्ति एवढी प्रबळ आहे, त्याच्या संकल्पाचा जोर असा विलक्षण आहे कीं तो जें कांहीं करूं म्हणेल तें होईल. ‘नर करनी करेसो नरका नारायन होय’ हें कबीरसाहेबांचें वचन सर्वांस ठाऊक आहे. जें जें व्हायची इच्छा करावी तें तें होतां येतें, जें जें मिळावें अशी इच्छा धरावी तें तें मिळतें, मात्र इच्छाशक्तीला शुद्धाचरणाचा, दृढनिश्चयाचा, सद्भावनेचा व

निदिध्यासाचा पाठिंबा पाहिजे. संकल्प सिद्धीस जाणें हें संकल्पाच्या शुद्धतेवर व तीव्रतेवर अवलंबून आहे. मनाची शक्ति फार प्रचंड आहे, मात्र तिचा एकनिष्ठतेनें पूर्ण उपयोग करून घेतां आला पाहिजे. थेंब थेंब पाणी पडतां पडतां चोहोंबाजूंनीं बांध घातले तर सरोवर बनतें. पैसा पैसा सांठवून व्यापारी लक्षाधीश होतो. सूर्यकिरणांचें केंद्रीभवन केलें तर अग्नि सिद्ध होतो आणि अशाच तऱ्हेनें वाफेवर गाड्या चालतात. त्याप्रमाणें मनाची शक्ति लहान नाहीं, फार प्रचंड आहे. हजार वाटांनीं तें धांवू दिलें तर दुर्बळ होतें, पण एका अधिष्ठानावर स्थिर केलें तर तेंच ब्रह्मपद हातांत आणून देतें. मन हेंच मनुष्याच्या बंधाला कारण आहे व मोक्षालाही कारण आहे. पंच विषयांच्या कुरणांत त्याला स्वैर सोडलें तर तें थकून दुबळें होऊन जातें, परमात्म्याच्या कासेला लावलें तर तेंच परमात्मरूप होतें. मन ह्म० इच्छाशक्ति पांगूं न देतां एकवटल्या पाहिजेत ह्मणजे एका ब्रह्मावर स्थिर केल्या पाहिजेत ह्मणजे त्याची शक्ति अफाट वाढते. परमात्मा सर्व भूतांत भरला आहे, जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं भरला आहे, भूजलतेजसमीरख ह्या पंचभूतांना व स्थिरचराला व्यापून राहिला आहे, त्यावांचून ब्रह्मांडांत दुसरी वस्तुच नाहीं असा शास्त्रसिद्धांत आहे व अशीच संतांची प्रतीति आहे. 'या उपाधिमाजि गुप्त चैतन्य असे सर्वगत' ( ज्ञाने० अ० २–१२६ ) असा प्राचीन ऋषिमुनींना व संतमहात्म्यांना प्रत्यय आलेला आहे व अर्वाचीन काळींही कलकत्त्याचे विद्वद्वर्य प्रो. जगदीश चंद्रबोस यांनीं नवीन उपकरणसामुग्रीच्या साह्यानें तोच सिद्धांत जगासमोर सिद्ध करून दाखविला आहे. वृक्षपाषाणांतही चैतन्य भरलें आहे. त्याचाच संत निदिध्यास घेत असतात, व निदिध्यासबलानेंच त्याचा साक्षात्कार होतो. त्याहून पवित्र, श्रेष्ठ, प्रियतम विश्वांत कांहीं नाहीं.

त्याच्याच ठिकाणीं सर्व इच्छाशक्ति एकवटून पवित्र जीव ब्रह्मपद गांठतात. श्रुतीनें त्याचेंच वर्णन केलें आहे. ज्ञानी, योगी व संत त्याच्याच ठिकाणीं रममाण होतात. इतर नश्वर पदार्थांवर मन पांगूं न देतां ह्मणजेच वैराग्यसंपन्न होऊन, ते त्याच्याच मननांत रंगवितात. त्याचें मनाला, वाचेला व इंद्रियांना आकलन होत नाहीं, पण त्याचा मनानें छंद घेतल्यावर वाटेल त्या प्रकारें मन त्याला रंगवीत असतें. शास्त्र त्याला चैतन्य ह्मणतें, श्रुति त्याला आत्मा म्हणते, भक्त त्यालाच नारायण म्हणतात. ‘ वेदपुरुष नारायण। योगियांचें ब्रह्म शून्य । मुक्तां आत्मा परिपूर्ण । तुका म्हणे सगुण भोळ्यां आम्हां॥’ तुकोबारायांनीं त्या अनाम अरूप अचिंत्य परमात्म्याला नामरूप देऊन चिंत्य केला. गोकुळांत गोपगोपींना रमवविणारी सांवळी बालमूर्ति चिंतनांत घेतली, मन त्यालाच वाहिलें, इंद्रियें त्याच्याच ध्यानसुखांत रंगविलीं, बाह्य शरीरही त्याच्याच सेवेंत राबविलें व ह्याप्रमाणें कायावाचामनानें ते कृष्णमय झाले. मग कृष्णरूप पाहण्याची उत्कट भावना त्यांनीं बाळगिली तर ती सफळ कां होऊं नये ? झालीच पाहिजे. ‘ निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ’ निश्चयाचें बळ म्हणजेच फळप्राप्ति होय. अहंकाराचा वारा लागूं नये म्हणून ‘ सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ’ असें भक्त म्हणत असतात आणि तेंहि खरें आहे, जीवाचा शुद्ध संकल्प किंवा निश्चयाचें बळ आणि नारायणाची कृपा ह्या दोहोंत अंतर अत्यल्प आहे ! तुकोबांनीं श्रीकृष्ण प्रगट व्हावे असा शुद्ध व तीव्रतम संकल्प धरिला आणि नारायणाला प्रगट होणें भाग आलें ! ह्यांत भक्ताचें गौरव करावें कां देवाची भक्तवत्सलता वानावी कां दोघांच्या लडिवाळपणांत जमाला कौतुकावह प्रसंग पाहण्यास मिळाला ह्मणून जगाचें भाग्य वाखाणावें हें ज्याचें त्यानें ठरवावें. असो. तुकोबांच्या उत्कंठेप्रमाणें

भगवंतानें केव्हां व कसें प्रगट होऊन त्यांचे मनोरथ पुरविलें हें आपण आतां पाहूं.

२ तुकोबांची दर्शनाची आवड देवाला पुरवायचीच होती, पण ती त्यांनीं एका प्रसंगाचें निमित्त करून पुरविली. रामेश्वरभटांनीं तुकोबांना अभंगांच्या वह्या बुडवायला सांगितलें, व त्या त्या सत्पुरुषानें ब्राह्मणाची आज्ञा शिरसावंद्य मानून बुडविल्या आणि पुढें त्या देवानें उदकांतून तारल्या ही गोष्ट लोकप्रसिद्ध आहे. ह्या गोष्टीच्या अनुषंगांत तुकोबांना सगुणदर्शन झाल्याचा अत्यंत मनोरम प्रसंग पुढें येणार असल्यामुळें आपण त्या गोष्टीकडेच वळूं. रामेश्वर भट हें लहान सहान प्रकरण नव्हतें. रामेश्वर भट हे थोर सत्पात्र व महाविद्वान् ब्राह्मण पुण्याच्या ईशान्येस ९ मैलांवर वाघोली येथें राहत होते. हे सच्छील, कर्मनिष्ठ व रामोपासक होते आणि धर्माधिकारीही होते. तुकोबांच्या गुणांची कीर्ति फांकत होती ती त्यांचेही कानांवर गेली होती. तुकोबा जातीनें शूद्र असून ब्राह्मणही त्यांच्या पायां पडतात व त्यांच्या कवनांत श्रुत्यर्थ उमटतात हें जनमुखें कळल्यापासून तुकोबांविषयीं व सामान्यतः वारकरी संप्रदायाविषयीं त्यांचा ग्रह प्रतिकूल झाला होता. तुकोबांच्या कीर्तीचा मत्सर वाटून कोणीकडून तरी त्यांचा पाडाव करावा अशा क्षुद्रबुद्धीनें प्रेरित होऊन त्यांनीं तुकोबांचा छळ केला असें मात्र नाहीं. आपणां सर्वांस तुकोबांविषयीं सादर व सप्रेम अभिमान वाटतो तरी कांहीं काळ त्यांचा प्रतिपक्षी ह्मणून पुढें आलेल्या सच्छील माणसाविषयीं आपण कुत्सित ग्रह करून घेऊं नये. वादविवादांत प्रतिपक्ष्याविषयीं मन कलुषित करून घेण्याचा सामान्य लोकांचा स्वभाव आहे, पण हें पक्षपातित्व बाजूला सारून विरुद्धपक्षाचे सुद्धां यथार्थ गुण असतील ते विचारी मनुष्यानें अवश्य घतले पाहिजेत व त्याच्या ह्मणण्यांत अविचाराचा भाग जेवढा असेल त्याचें खंडण करणें जरूर असल्यास

तेंही विचारानेंच केलें पाहिजे. रामेश्वरभट म्हणजे कांहीं मंबाजी बोवा नव्हत ! त्यांची बाजूही विचार करण्यासारखी आहे. तुकोबा ज्या भागवतधर्माच्या पताकेखालीं भक्तिप्रसाराचें काम करीत होते त्या भागवतधर्माशीं कांहीं बाबतींत त्यांचा प्रामाणिक विरोध होता. भागवतधर्माच्या प्रसारापासून हा विरोध थोडाबहुत चालत आला आहे व तो आजही निर्मूळ झालेला नाहीं! ज्ञानेश्वरमहाराजांचा आळंदीकर व पैठणकर ब्राह्मणांनीं किंवा एकनाथमहाराजांचा त्यांच्या हरिशास्त्री नामक पुत्रानें ज्या कारणांसाठीं छळ केला होता तींच कारणें तुकोबांशीं कठोरपणानें वागण्यांत रामेश्वरभटाच्या मनांत वागत होतीं. स्पष्ट सांगायचें म्हणजे ज्ञानोबारायांच्या वेळेपासून वैदिक कर्ममार्गी ब्राह्मणांना भागवतधर्म हा वर्णाश्रमधर्मबंधनें ढिलीं करणारा एक बंडखोर संप्रदाय आहे असें मनांतून वाटत असतें. वस्तुतः तो तसा नाहीं इतकेंच काय, पण वैदिकधर्माचें अत्यंत उज्ज्वल, व्यापक व लोकोद्धारक स्वरूप भागवतधर्मांतच पाहतां येते. या वादाचें उत्तर भागवतधर्मीय संतांच्या चरित्रांनींच दिलें आहे. वारकरी जातिभेद विसरून एकमेकांच्या पायां पडतात, संस्कृतांतील ज्ञानरहस्य प्राकृतांत सांगितलें जातें व त्यामुळें देववाणीची पायमल्ली होते, कर्ममार्गावर थोडाफार कटाक्ष ठेवण्यांत येऊन भक्तीचें व नामाचेंच माहात्म्य सर्वाधिक सांगितलें जातें या गोष्टी जुन्या वळणाच्या बऱ्याच शास्त्रीपंडितांस व वैदिक कर्मठांस आजही मान्य नाहींत. सर्वच शास्त्रीपंडित या मताचे होते किंवा आहेत असें नाहीं,तथापि या मताच्या अभिमान्यांकडून भागवतधर्मप्रचारक ज्ञानेश्वरांचा व नाथांचा पूर्वी जसा छळ झाला तसाच तुकोबांच्या वेळीं तुकोबांचा रामेश्वरभटांकडून झाला. हे दोन वेगवेगळे पंथ आहेत. संस्कृत भाषेंतच सर्व धर्मरहस्य राहिलें पाहिजे व तें ब्राह्मणांच्याच मुखांतून अन्य जातींनीं ऐकलें पाहिजे हा संस्कृताभिमानी कर्मठांचा

पक्ष व “ आतां संस्कृता अथवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा । ते पावनचि तत्त्वता । सत्य सर्वथा मानली ॥ ” ( नाथ भागवत १–१२९ ) हा भागवतधर्मीयांचा पक्ष. संस्कृत भाषा तेवढी देवानें केली व प्राकृत भाषा काय चोरानें केली असा नाथांनीं वैदिकांस प्रश्न केला आहे ! संस्कृत वंद्य व प्राकृत निंद्य हा अभिमानवाद आहे, असें सांगून नाथांनीं सिद्धांत सांगितला आहे तो असा: “ देवासि नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान । ज्या वाणीं जाहलें ब्रह्मकथन । त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ॥ ” ( अ० २९–१०२९ ). दुसरा मुद्दा जातिसंबंधाचा. वैदिकांना जातिबंधनें कडक राहिलीं पाहिजे असतात. अंत्यजांपासून ब्राह्मणांपर्यंतच्या उच्चनीच भेदाचेंच त्यांच्यांत प्रस्थ असतें. भागवतधर्मानें जातिभेदाचें प्रस्थही माजविलें नाहीं व त्यावर हत्यारही उपसलें नाहीं. मनुष्य कोणत्याही जातींत जन्मला असो, जर तो शुद्धाचरणी व भगवद्भक्त आहे तर तोच सर्वांस वंद्य व श्रेष्ठ आहे असा भागवधर्माचा सिद्धांत आहे. “ हो कां वर्णामाजी अग्रणी । जो विमुख हरिचरणीं । त्याहूनि श्वपच श्रेष्ठ मानीं । जो भगवद्भजनीं प्रेमळु ॥” (नाथभागवत अ० ५–६०) यामुळें श्रेष्ठता सर्वांशीं जातींस न राहता भगवद्भक्त तो सर्वश्रेष्ठ असा सिद्धांत ठरून शंभरनंबरी सोन्याचा कस जातीवर न लागतां संतपणावर लागूं लागला. यामुळें हा संप्रदाय ब्राह्मणांचें महत्त्व घालविणारा आहे असा जुन्या मतवाद्यांचा ग्रह झाला. ज्ञानेश्वरनाथांच्या छळाला हे दोनच मुद्दे पुरेसे होते. तुकोबांच्या छळाच्या वेळीं तिसरा एक मुद्दा पुढें आला. संत सर्वश्रेष्ठ ठरल्यावर श्रेष्ठत्वही केवळ ब्राह्मणांकडे न राहतां तें साहजिकच संतांकडे गेलें. तुकोबांचें संतपण जसजसें सिद्ध होऊं लागलें, त्यांच्या शुद्धाचरणाचा, उपदेशाचा, भक्तिप्रेमाचा लोकांच्या मनावर जसजसा पगडा बसूं लागला तसतसा लोकसमूह त्यांच्या भ-

जनीं लागला. ह्या मुमुक्षु लोकांत देहूचा कुळकर्णी महादाजी पंत, चिखलीचा कुळकर्णी मल्हारपंत, पुण्याचा कोंडोपंत लोहोकरे, तळेगांवचा गंगाराम मवाळ इत्यादि कित्येक ब्राह्मणही होते. तुकोबांची अमृतवाणी ऐकून ते भ्रमरांसारखे तुकोबांच्या चरणीं लीन झाले. ज्याला जें पाहिजे असतें तें त्याला ज्यापासून मिळतें त्याच्या चरणीं त्यानें लीन व्हावें हें साहजिक आहे. लोकांना शुद्ध धर्मज्ञान पाहिजे होतें, खरें प्रेमसुख पाहिजे होतें, देवाच्या गोष्टी जिव्हाळ्याच्या भक्तीनें सांगणारा गुरु पाहिजे होता, तो त्यांना तुकोबा भेटला व ते त्याच्या भजनीं लागले. लोकांना खऱ्या खोट्यांची निवड करितां येतें. तुकोबांच्या शेजारींच मंबाजीबोवा आपलें गुरुत्वाचें दुकान मांडून बसला होता, पण त्याच्यापाशीं लोकांना पाहिजे होतें तें नव्हतें म्हणून त्याच्या भजनीं कोणी लागले नाहींत. मंबाजी व तुकोबा—एक खोटें नाणें व एक खरें नाणें. लोकांनीं दोघांची पारख बरोबर केली. तुकोबांचे गुण व प्रेम त्यांना आवडलें. तुकोबा जातीचे शूद्र होते, पण ते ब्राह्मण असते तरी लोकांना इतकेच आवडले असते, व अतिशूद्र असते तरी इतकेच आवडले असते ! मंबाजी ब्राह्मण म्हणून त्याचें प्रस्थ कोणीही—ब्राह्मणांनीं सुद्धां—वाढविलें नाहीं. तेव्हां तुकोबांच्या छळाच्या वेळीं तिसरा मुद्दा पुढें आला तो त्यांच्या जातीसंबंधाचा होय. हे शूद्र असून ब्राह्मण यांच्या पायां पडतात व यांना गुरु मानतात हें जुन्या मतवाद्यांना खपलें नाहीं. इतक्या विवेचनावरून तुकोबा शूद्र असून धर्मरहस्य प्राकृत भाषेंत सांगतात व ब्राह्मण त्यांच्या पायां पडतात यांत त्यांच्या रामेश्वरभटानीं केलेल्या छळाचें सर्व रहस्य आलें. जुन्यांच्या अभिमानानें तुकोबांशीं लढायला रामेश्वरभट पुढें आले नसते तर दुसरा कोणी तरी वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण पुढें आलाच असता. प्राकृत भाषेंत धर्मरहस्य सांगायला हरकत नाहीं ही गोष्ट ज्ञानेश्वरनाथांनीं छळ सोसून सिद्ध करून दिली व तशी रूढी



इंद्रायणीचा डोह व भामनाथ.

A. B. PRESS, POONA.

पाडली. आतां प्राकृत भाषेंत अधिकारसंपन्न शूद्रालाही धर्मरहस्य सांगायला हरकत नाहीं—कारण धर्मरहस्य भगवत्कृपेनें कोणत्याही जातीच्या शुद्धचित्त मनुष्यांत प्रगट होतें—ही गोष्ट सिद्ध करून देण्याला तुकोबाचा छळ होऊन ते त्यांत यशस्वी व्हावयास पाहिजे होते व ह्या छळाचा कस होण्याचा मान रामेश्वरभटास मिळाला ! ज्ञानेश्वरनाथांच्या अलौकिक सामर्थ्यानें त्यांची छाप आळंदीकर, पैठणकर व काशीकर ब्राह्मणांवर बसून भागवतधर्माचा महाराष्ट्रभर जयजयकार व प्रसार झाला, तो जयजयकार व प्रसार आणखी करून भागवतधर्माचें एक पाऊल पुढें टाकण्याचें श्रेय पांडुरंगाच्या मनांत तुकोबांच्या पदरांत टाकायचें होतें. ही गोष्ट कशी घडून आली तेंच आतां आपण पाहूं.

३. रामेश्वरभटांला तुकोबांच्या भागवतधर्माचीं तत्त्वें अमान्य झालीं, पण त्यांनीं सरळ मार्गानें न जातां आडरानांत पाऊल टाकलें. तुकोबांचा देहूस भजनकीर्तनांचा रंग जमतो व तेथेंच त्यांच्या प्रिय विठ्ठलाचें स्थान आहे तर त्यांना देहूंतूनच काढून द्यावें असा कुविचार त्यांनीं मनांत आणला. 'देशधडी करावा तुका' असा त्यांचा विचार ठरला. महिपतबावा (भक्तिलीलामृत अ० ३५)म्हणतात:—

**ऐसें म्हणोनियां मनांत । भीड खचिली दिवाणांत ।**
**ह्मणे तुका शूद्रजातीचा निश्चित । श्रुतिमथितार्थ बोलतो ॥३६॥**
**हरिकीर्तन करूनि तेणें । भाविक लोकांसि घातलें मोहन ।**
**त्यासी नमस्कार करिती ब्राह्मण । हें आह्मांकारणें अश्लाघ्य॥३७॥**
**सकळ धर्म उडवूनि निश्चित । नाममहिमा बोले अद्भुत ।**
**जनांत स्थापिला भक्तिपंथ । पाखांड मत हें दिसे ॥ ३८ ॥**

---

१ मनुस्मृति अ० २ श्लोक २३८–२४१ पहावेत. विद्या, रत्नें, धर्म, शिल्पज्ञान हीं 'समादेयानि सर्वतः' म्ह० जेथें मिळतील तेथून घ्यावीत असें मनूचें वचन आहे.

असें त्यांनीं ग्रामाधिकाऱ्याच्या मनांत भरवून दिलें. रामेश्वरभटांचे आरोप वरील तीन ओव्यांत आले आहेत. त्यांनीं ग्रामाधिकाऱ्याला सांगून त्याच्याकडून देहूच्या पाटलास तुकोबाला देहूंतून हांकून देण्याविषयीं ताकीदपत्र पाठविलें. पाटलानें तें ताकीदपत्र तुकोबांस वाचून दाखविलें तेव्हां त्यांस मोठी काळजी पडली. त्या वेळचे त्याचे उद्गार पहा:—

**काय खावें आतां कोणीकडे जावें। गांवांत रहावें कोण्या बळें ॥१॥**
**कोपला पाटील गांवचे हे लोक। आतां घाली भीक कोण मज॥ध्रु॥**
**आतां 'येणें चवी सांडली' ह्मणती। निवाडा करिती दिवाणांत॥२॥**
**भल्यां लोकीं यांस सांगितली मात।केला माझा घात दुर्बळाचा॥३॥**
**तुका ह्मणे याचा संग नव्हे भला।शोधीत विठ्ठला जाऊं आतां॥ ४ ॥**

४.तुकोबा तसेच वाघोलीस गेले व रामेश्वरभट स्नानसंध्येंत बसले असतांना त्यांच्यापुढें जाऊन त्यांनीं दंडवत घातलें व सप्रेम नामगजर करून त्यांनीं त्यांच्यासमोर कीर्तनास प्रारंभ केला ! कीर्तनांत ते प्रासादिक अभंग तत्काळ स्फूर्तीनें म्हणूं लागले. तेव्हां रामेश्वरभ म्हणाले, "तुझ्या अभंगांत श्रुत्यर्थ उमटत आहेत व तूं शूद्र असल्यामुळें तुला श्रुत्यर्थ बोलण्याचा अधिकार नाहीं. तुझी वाणी शास्त्रविरुद्ध असल्यामुळें श्रोत्यावक्त्यांस नरकगति देणारी आहे, म्हणून तूं आजपासून कवित्व करूं नकोस." यावर तुकोबा म्हणाले, "पांडुरंगानें आज्ञा केल्यामुळें मी हें कवित्व करीत आलों. ही वाणी व्यर्थ खर्च झाली. आपण ब्राह्मण ईश्वरमूर्ति आहांत. आपल्या आज्ञेप्रमाणें मी यापुढें कवित्व करणार

---

१ रामेश्वरभटांला अनुलक्षून तुकोबांनीं 'भल्या लोकीं' असा शब्दप्रयोग केला आहे त्यावरूनच त्यांच्या स्वभावसौजन्याची कल्पना होते. प्रतिपक्षाविषयीं असा सौम्य व गोड उद्गार काढणारा वादी क्वचित सांपडेल; बाकी तुकोबांना पक्ष व प्रतिपक्ष हें कांहींच नव्हतें हें उघड आहे.

नाहीं, पण आजवर केलेल्या अभंगांचें काय करूं ? " यानंतर रामेश्वरभटांनीं सांगितलें कीं " तूं आपल्या अभंगांच्या सर्व वह्या नेऊन उदकांत बुडवून टाक ! " हें ऐकून ' आपली आज्ञा मान्य करितों ' असें म्हणून तुकोबाराय देहूस परत आले व अभंगांच्या वह्या खालींवर जड पाषाण घालून रुमालांत बांधून त्यांनीं तो रुमाल इंद्रायणीच्या डोहांत टाकून दिला ! पाण्यांत वह्या बुडवि-ल्याची बातमी हां हां म्हणतां चोहोंकडे फैलावली. प्रेमळ भाविक जे होते त्यांना अत्यंत दुःख झालें व कुटिल, निंदक, खळ आनं-दानें टिऱ्या बुडवूं लागले. ज्यांच्या जिभलीला दुसऱ्याचें उणें पहा-तांच निंदेचें अवसान चढतें ते तुकोबांकडे येऊन त्यांच्या तोंडावर त्यांचा उपहास करूं लागले. पूर्वीं भावाशीं विरोध करून खतें उदकांत बुड-विलीं व आतां रामेश्वरभटाच्या वादांत कविता बुडविली. याप्रमाणें धड प्रपंच ना परमार्थ अशी यानें आपली स्थिति करून घेतली आहे ! दुसरा कोणी असता तर त्यानें अशी दोहींकडे फजीती झाल्यावर लोकांस तोंड न दाखवितां जीवच दिला असता !" अशा प्रकारचीं दुरुत्तरें ऐकून ' तुकयाचें दुखंड झालें हृदय ! ' त्यांनीं आपल्या-शींच विचार केला कीं, ' हें लोकांचें म्हणणें खरें आहे. प्रपंचाला मी होऊनच आग लावून बाहेर पडलों आहें, तेव्हां प्रपंचांत फजीती झाली याची मला कांहीं क्षिती वाटत नाहीं. प्रपंच मुळींच फाटका आहे, पण हरीसाठीं एवढी यातायात करूनही जर हरी प्रत्यक्ष झाला नाहीं, आघाताचें सांकडें त्यानें वारलें नाहीं, दुर्ज-नांचीं तोंडें त्यानें बंद केलीं नाहींत व आपलें भक्तवत्सल हें ब्रीद खरें केलें नाहीं तर जिवंत राहून तरी काय करावयाचें आहे ? देवाच्याच पायीं अन्नपाणी सोडून त्याचें चिंतन करीत पडून रहावें, मग पुढें त्याचें उचित तो करील. " याप्रमाणें विचार करून तुकोबाराय देवालयासमोर तुळशीवृंदावनाशेजारीं एका दगडावर

तेरा दिवस पडून राहिले !

५ दगडावर पडतांनां त्यांच्या तोंडून १९ अभंग निघाले, त्यांत त्यांची त्या वेळची मनःस्थिति उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झाली आहे.

**भूतबाधा आह्मां घरीं । हें तों आश्चर्य गा हरी ॥ १ ॥**
**जाला भक्तीचा कळस । आले वसतीस दोष ॥ २ ॥**
**जागरणाचें फळ । दिली जोडानी तळमळ ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे देवा । आहाच कळों आली सेवा ॥ ४ ॥**

अहो हरि ! भूतीं भगवद्भाव ठेवून कोणाही भूताचा मत्सर न करितां भूतपति जो तूं त्या तुझें आम्हीं अखंड चिंतन करीत असूनही आह्मांला भूतबाधा ( दुसऱ्यापासून पीडा ) व्हावी हें आश्चर्य आहे ! आह्मी आजवर केलेल्या भक्तीचा आतां कळस झाला म्हणायचा ! देवा, तुझ्या भक्तीचें फळ आह्मांला हें मिळालें कीं, लोकांनीं द्वेष करण्यासारखे दोष आमच्या अंगीं उत्पन्न झाले ! एकादशीचीं व कीर्तनाचीं आजपर्यंत जागरणें केलीं त्याचें हेंच फळ काय कीं चित्ताला तळमळव्यथेची जोड व्हावी ! पण तुला दोष देण्यापेक्षां माझी सेवाच धड झाली नाहीं, ती आहाच ( वरपंग, पोकळ ) झाली हें खरें.

**नाहीं जों वेंचलों जीवाजिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलों ॥**
ह्म० तुझ्या सेवेकडे आह्मीं आपला सर्व जीवभाव अर्पण केला नाहीं तोंपर्यंत तुला दोष देणें युक्त होणार नाहीं. आतां ' तुमची जोडी तरी करीन किंवा जीवाचा नाश तरी करीन. ' आतां निवाड्याचा दिवस आला आहे ह्म० मीं कवित्व करावें कीं न करावें, तें लोकांना सांगावें कीं न सांगावें, तुला तें मान्य आहे कीं नाहीं याचा निकाल तुझ्याकडूनच लागणार आहे. बळेंच कवित्व मी करणार नाहीं, कारण'—

**करूं कवित्व काय नाहीं आतां लाज ? । मज भक्तराज हांसतील॥**
तुला पाहिजे असेल तर मात्र तुझ्या आज्ञेनें तुझ्यासाठींच कवित्व

करीन. " तुका ह्मणे आतां न धरवे जीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ " तुह्मीं ऐकावें यासाठींच मी कवित्व करीत आलों आहें.

**नाहीं आइकत तुम्ही माझे बोल । कासया हे फोल उपणूं भूस ? १**
**येसी तें करीन बैसलीया ठाया । तूंचि बुझावया जवळी देवा ॥२॥**

तुम्ही माझे बोल ऐकत नाहीं तर मी तरी व्यर्थ कवित्वाची उठाठेव कशाला करूं ? शब्दांचें भूस उगीच पाखडूं कशाला ? आतां एकाच जागीं बसून तूं स्वत: येऊन समजूत घालशील तो उपाय करीन. तुझें दर्शन व्हावें ह्मणून पुष्कळ उपाय केले. आतां अजून किती वाट पाहूं ! आशेचा शेवट आला आहे. सोक्षमोक्ष एकदांचा होऊं दे. देवा ! माझे शब्द तुह्मांला रुचत नाहींत मग बोलण्यांत काय अर्थ आहे ? " शब्दा नाहीं रुचि । मग कोठें तुका वेंची ?" तुमची साक्षात् भेट व्हावी हा माझा सत्यसंकल्प, तो पुरा न करितां प्रसाद केल्याची चुणूक मात्र दाखवून भेटण्याची टाळाटाळी आजवर करीत आलां ! " केल्यापुरती आळी । कांहीं होते टाळाटाळी ॥ १ ॥ सत्यसंकल्पाचें फळ । होतां न दिसेचि बळ ॥ २ ॥ " आतां असें करा:—

**यावावे संतोष । तुम्हा यासाठीं सायास ॥ १ ॥**
**करी आवडी वचनें । पालटूनि क्षणक्षणें ॥ २ ॥**
**द्यावें अभयदान । भूमीं न पडावें वचन ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे परस्परें । कांहीं वाढवी उत्तरें ॥ ४ ॥**

आजपर्यंत वेगवेगळ्या अभंगांतून तुमची विनवणी केली. तुमची प्रसन्नता व्हावी यासाठीं सायास केले. पण ते सारे शब्द फोल झाले. आतां मला एवढें अभयदान द्या कीं, माझा शब्द व्यर्थ जाऊं नये. प्रत्यक्ष भेटा आणि तुमचा आमचा प्रेमसंवाद होऊं द्या. ' समाधानासाठीं लावियेले कान ' तुमचा प्रेमाचा शब्द ऐकण्यासाठीं मी कान लावून बसलों आहें. ' तुका ह्मणे आह्मां तुम-

चेचि फंद । वरकड छंद कळों येती ॥ ' इतर छंद सोडून मीं तुमच्या भेटीचाच छंद धरिला आहे. तुम्हीं उदार आहांत, भक्त-वत्सल आहांत, अशा प्रकारें तुमचा डांगोरा पिटण्यासाठीं मीं भक्तीचें मोफत दुकान घातलें आहे, पण तुम्हीच माझा अव्हेर कराल तर मात्र ही दुकानदारी मी आटोपती घेतों ! एक्या जीवाचा उद्धार तुमच्या नामानें होईलच होईल, पण जन उद्धरावेत याचसाठीं मी हा पसारा केला आहे. माझ्या सायासाचा मला उबग आला नाहीं, पण भक्तावर आलेले आघात तुह्मीं निवारले नाहींत तर तुमच्या नामाची प्रतिष्ठा जाईल व तुमची निंदा होईल आणि ती मला कानांनीं ऐकवणार नाहीं.

**काशासाठीं बैसों करोनियां हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा॥१॥**
**काय आलें एका जीवाच्या उद्धारें । पावशीं उच्चारें काय हो तें॥२॥**
**तुका म्हणे आतां आव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥३॥**

* * * * *

**माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥**
**तुमच्या नामाची जतन । नव्हतां थोर वाटे शीण ॥२॥**
**न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे लाज । आम्हां स्वामीचें तें काज ॥ ४ ॥**

तुमच्या नामाची व तुमची निंदा दुनियेंत होऊं नये व तुमच्या-विषयीं लोकांची अश्रद्धा वाढूं नये याशिवाय माझें दुसरें कांहींएक मागणें नाहीं. ' कांहीं मागणें हें आम्हां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥ १ ॥' पूर्वीं जे अनेक ज्ञानीभक्त होऊन गेले, त्यांनीं निष्काम भजनाचा सुंदर कित्ता घालून दिला आहे तो मी जाणतों. तोच कित्ता मीही गिरवीत आहे, म्हणून मी कांहीं मागत नाहीं. 'देह तुच्छ झालें सकळ उपाधि । सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ' देहादि सर्व उपाधि तुच्छ करून तुझ्या सेवेच्या ठि-काणींच बुद्धि दृढ करून राहिलों आहें. ' तुका म्हणे देह फांकि-

ला विभागीं ! उपकार अंगीं उरविला ॥' हा छत्तीस तत्वांचा देह त्या त्या तत्वांच्या ठिकाणीं वाटून मी वेगळा झालों आहे व केवळ उपकारापुरता उरलों आहें.

तुमच्या ब्रीदाला व नामाला कमीपणा येऊं नये व लोकांची श्रद्धा दृढ व्हावी यासाठींच हें तुम्हांला प्रकट होऊन दर्शन देण्याची व आघातापासून कवित्व राखण्याची प्रार्थना करीत आहें. अशा सलगीनें तुम्हांला त्रास देण्याचा माझा अधिकार नाहीं काय ? मी तुमचा दास नाहीं का ?

**सांगा दास नोहें तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनी ॥१॥**
**कोणासाठीं केली प्रपंचाची होळी । या पायांवेगळीं मायाबापा॥२॥**
**नसेल तो द्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटें ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे आम्हां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं दुजें कांहीं॥४॥**

तुमच्या चरणांसाठींच मीं प्रपंचाची होळी केली ना ? सत्यत्वाच्या ठिकाणीं नसला तरी सुद्धां तुम्हीं धीर द्यावा, उलट बीं न रुजेल असा त्याचा नाश करूं नये. आह्मीं आपलें आहिक्य परत्र कुळ-गोत्र सर्व तुझे पायच केले आहेत. असे तुझ्याठायीं अनन्य असतां आमच्यावर देशधडी व्हायचा प्रसंग यावा हें योग्य आहे कां ? ' न पुरतां आळी देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ?॥ ' लेंक-राचा भार माउलीचे शिरावर आहे, तिनें त्याला दूर करूं नये. बापा पांडुरंगा ! भेट देऊन तळमळ निवीव. मी तुझा ह्मणवितों पण ' म्हणवावें त्याची खूण नाहीं हातीं ' म्हणून माझी ' अवकळा फजीती सावकाश ' होत आहे. 'स्तुति तरि करूं काय कोणापाशीं । कीर्ति तरी कैसी वाखाणावी ?॥ ' तुझी खूण हातीं नसल्यामुळें माझे बोल प्रचीतीचे आहेत असें या जनांस वाटणार नाहीं. आजपर्यंतची माझी सर्व बडबड फुकट गेली. ' बोलिलों वचन हारपलें नभीं ' ह्म० बोललेले सर्व शब्द आकाशांत (शून्यांत)

गेले, हें पाहून माझें चित्त चकित झालें आहे. तुमच्या पायीं माझें चित्त रमलें आहे, आतां भेटी द्या म्हणजे भवबंधाची गांठ सुटेल.

१९. रूपें गोंविलें चित्त । पायीं राहिलें निश्चित्त ॥ १ ॥
तुह्मी देवा अवघेचि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥ २ ॥
जाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडित ते होती ॥ ३ ॥
तुका ह्मणे भेटी । सुटली भवबंधाची गांठी ॥ ४ ॥

ह्याप्रमाणें पांडुरंगाच्या साक्षात् दर्शनाविषयीं उत्कंठित होऊन तुकोबाराय देहूस पांडुरंगाच्या देवळासमोर शिळेवर चिंतन करीत तेरा दिवस पडून डोळे झांकून राहिले. तेरा दिवसांत अन्नपाण्याचें त्यांना भानही राहिलें नाहीं. हृदयांत पांडुरंगाचें सतत ध्यान ध्रुव-बाळाप्रमाणें लागून राहिलें.

६ इकडे वाघोलीस रामेश्वरभट होते त्यांवर त्यांला भक्तद्रोह घडला म्हणून देव कोपले. देवाला स्वतःचा छल एक वेळ सोसवेल, पण भक्तच्छल बिलकुल सोसवत नाहीं. कंसरावणादि देवद्वेषी मोक्षपदाला गेले, पण भक्तद्वेषी अनुतापानें शुद्ध होऊन भक्तालाच शरण न आले तर निश्चयानें अधोगतीलाच जातात ! सर्व भूतांच्या हितार्थ कायावाचामनानें झटणाऱ्या महात्म्यांचें चित्त सर्व भूतांच्या अंतराला व्यापून राहणारें असल्यामुळें त्यांला दिलेला धक्का भूतपति जो परमात्मा त्याला लागून तो क्षुब्ध होतो. म्हणून साधुच्छलासारखें दुसरें पाप नाहीं. असो. रामेश्वरभट वाघोलीहून पुण्यास नागनाथाच्या दर्शनास यावयास निघाले. नागनाथ हें जागृत दैवत असून त्याच्याठायीं रामेश्वरभटांची श्रद्धा होती. वाटेंतच अनगडसिद्ध म्हणून एक अवलिया रहात असे. त्यानें आपल्या बागेंत एक विहीर बांधली होती. ही विहीर व अनगडशहाचा तक्या अजूनही येथें गूळआळींत पाहण्यास सांपडतात. त्या विहिरींत

रामेश्वरभटानें स्नान केलें, तों त्याच्या अंगाचा दाह होऊं लागला. कोणी म्हणाले, हा त्या फकीराच्या शापाचा परिणाम व कोणी म्हणाले तुकोबांचा छळ केल्याचा परिणाम. रामेश्वरभटाच्या अंगाचा नुसता भडका उडाला. शिष्यांनीं शीतलोपचार केले, पण फुकट. त्यांचें सारें अंग होरपळून गेलें. दुर्वासांनीं अंबरीषाचा छळ केला असतांना त्या महर्षींच्या मागें सुदर्शनचक्र लागलें व त्यांची तिरपिट उडाली ( भागवत स्कंध ९ अ० ४।५ ) तसाच प्रकार तुकोबांचा छळ केल्यावेळीं रामेश्वरभटाचा झाला. ' साधुषु प्रहितं तेजो प्रहर्तुः कुरुतेऽशिवम् ' म्ह० साधूवर कोणी आपला प्रभाव गाजवूं लागला तर उलट त्यावरच अनर्थ कोसळतो हा न्याय अंबरीषाख्यानांत भगवंतांच्याच मुखांतून निघाला आहे. भगवान् आणखी असेंही म्हणाले आहेत कीं:—

> **तपो विद्याच विप्राणां निःश्रेयसकरौ उभे ।**
> **ते एव दुर्विनीतस्य कल्पेते कर्तुरन्यथा ॥ ७० ॥**

तप आणि विद्या हीं दोन साधनें ब्राह्मणांना मोक्षद खरीं, पण ब्राह्मण जर दुर्विनीत असेल तर तीं त्याला उलट फल म्ह० अधोगति देतात. दुर्विनीत विप्र तपस्वी असूनही कसा संकटांत पडतो हें दुर्वासांच्या उदाहरणावरून समजतें व दुर्विनीत विप्र विद्यावंत असला तरी कसा फजीत पावतो हें रामेश्वरभटांच्या उदाहरणावरून लक्ष्यांत येतें. शेवटीं अंगाचा दाह शमावा म्हणून रामेश्वरभट आळंदीस जाऊन ज्ञानोबारायांच्या सेवेंत राहिले.

७ रामेश्वरभटांच्या छळामुळें तुकोबांवर देशधडी होण्याचा प्रसंग आला. पांडुरंगाचें घरचें मंदिर व देवाची मूर्ति यांचा वियोग होण्याचा प्रसंग आला. प्रपंचपरमार्थ दोन्ही बुडविल्याबद्दल लोकांचीं दुरुत्तरें खाण्याचा व आजवर केलेल्या कीर्तनपद्धतीवर व अभंगांवर बोळा फिरण्याचा प्रसंग आला, तेव्हां त्यांच्या वैराग्याचा

व भगवत्प्रेमाचा पारा पूर्ण अंशावर चढला. ते तेरा दिवस अन्नपाणी सोडून व देहावर उदार होऊन पांडुरंगाच्या भेटीची परमोत्कंटेनें वाट पहात शिलेवर पडून राहिले. ह्यावेळीं देवाला प्रकट होण्यावांचून गत्यंतरच नव्हतें. भक्तीच्या खरेपणाची परीक्षा व्हावयाची होती, तुकोबांची भक्ति कसाला लागावयाची होती. ' ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकार होऊनि अवतरे । ( ज्ञाने० ४-५१ ) ह्या देवाच्या प्रतिज्ञेची सत्यता जगाला पटायची होती, किंबहुना देवाच्या देवपणाचीच परीक्षा व्हावयाची होती! वेद, शास्त्र, पुराणें, संतवचनें व भक्तचरित्रें ह्यांची प्रतिष्ठा संभाळणें देवाला भाग असल्यामुळें देव सगुणरूपानें प्रगट होऊन या समयीं तुकोबांला भेटले व डोहांतल्या वह्या रक्षण करून भक्तांच्या कार्यासाठीं देव आपलें अजत्व परतें ठेवून अत्युत्कट भक्ताला भेटतात ही पूर्वी अनेकवार सिद्ध झालेली गोष्ट पुन्हां एकवार सिद्ध झाली. जग हें चिकित्सक आहे. अशा आपत्तींतही देवांनीं स्वतः रूप घेऊन तुकोबांचा संभाळ केला नसता तरी तुकोबांची निष्ठा अढळ राहती, पण लोकांची खात्री झाली नसती. देहूस तुकोबाराय शिळेवर तेरा दिवस पडून राहिले होते, त्यांना दर्शन देऊन त्यांचें संकट अखेर देवानें निवारलें. तुकोबांनीं त्रिभुवनींच्या देवाला भक्तिबळानें खेंचून आणलें व त्या निराकाराला आकार घ्यावयाला लावलें. ' देवा-हातीं रूप धरवूं आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ १ ॥ ' हें त्यांच्या निस्सीम भक्तीचें सामर्थ्य जगाच्या प्रत्ययास येण्याचा समय प्राप्त झाला, तेव्हां **श्रीहरीनें बाळवेष धरून त्यांना दर्शन दिलें, व आलिंगन देऊन त्यांचें पूर्ण समाधान केलें.** तुकोबांना देवाच्या सगुणरूपाचें दर्शन झालें. सगुणसाक्षात्कार झाला. ' प्रल्हादाचें मीं परोपरीनें रक्षण केलें, त्याप्रमाणें इकडे तुझ्या पाठीशीं नित्य उभा राहून तुझ्या कवितेच्या वह्या मीं उदकांत रक्षिल्या आहेत '

असें तुकोबांनीं देवाच्या तोंडून ऐकल्यावर ते समाधान पावले व देवही भक्ताच्या हृदयांत अंतर्धान पावले. यासमयीं तुकोबांचा देह बाहेरून मृतप्राय दिसत होता. श्वासोच्छ्वास मंद झाला होता, हालचाल खुंटली होती. कुटिलांना वाटलें कीं सर्व संपलें, पण भाविकांना त्यांच्या तोंडावर तजेला दिसत असून मध्यमावाणीनें नामस्मरण चालल्याचा मंद ध्वनि ऐकूं येत होता. याप्रमाणें तेरा दिवस लोटल्यावर चवदाव्या दिवसाच्या पहाटेस गंगाराममवाळप्रभृति भाविकांना दृष्टांत देऊन देवानें सांगितलें कीं, " अभंगांच्या वह्या उदकावर तरंगत आहेत त्या तुम्ही घेऊन या." सर्व भाविकांना आनंद होऊन ते डोहाकडे धांवले तों काय चमत्कार सांगावा ! वह्यांचें दप्तर तुंबीफलाप्रमाणें उदकावर तरंगतांना त्यांनीं पाहिलें ! सर्वांनीं आनंदाच्या आरोळ्या ठोकल्या व ' रामकृष्णहरी ' च्या गजरानें दशदिशा दणाणून टाकल्या. चारदोघांनीं तात्काळ पाण्यांत उड्या टाकून तें दप्तर हातोहात शाबूद बाहेर काढलें. इकडे तुकोबांनीं डोळे उघडले तों भक्तमंडळी आनंदानें बेहोष होऊन विठ्ठलाच्या नांवाचा घोष करीत त्यांच्याकडे येतांना त्यांनीं पाहिली. सर्वत्र आनंदीआनंद झाला. भाविकांच्या आनंदाला पारावार उरला नाहीं, कुटिलांचीं तोंडें काळीं पडलीं, वाऱ्याच्या हेलकाव्याबरोबर एकदां स्तुतीकडे व एकदां निंदेकडे आंदोलन पावणाऱ्या अर्धवटांच्या चित्तवृत्ति स्थिर होऊन प्रसन्नता पावल्या ! पांडुरंगाचें कौतुक स्मरून तुकोबांच्या हृदयांत प्रेमावेग मावेनासा होऊन त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रू वाहूं लागले.

८. ह्या प्रसंगावर त्यांच्या तोंडून सात अत्यंत मधुर अभंग निघाले आहेत. त्यांत देवाच्या सगुणदर्शनाची खूण स्पष्ट सांगितली असून देवाला शिणविल्याबद्दल अत्यंत खेद प्रकट केला आहे.

हे सात अभंग ह्मणजे अमृतानें भरलेले सात सरोवर आहेत. ते जसेच्या तसेच पुढें दिल्याशिवाय मला राहवत नाहीं.

१.

तूं कृपाळू माउली । आह्मां दीनांची साउली ।
न संवरीत आली । वाळवेषें जवळी ॥ १ ॥
माझें केलें समाधान । रूप गोजिरें सगुण ।
निववीलें मन । आलिंगन देऊनी ॥ ध्रु० ॥
कृपा केली जनांहातीं । पायीं ठाव दिला संतीं ।
कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ॥ २ ॥
तुका ह्मणे मी अन्यायी । क्षमा करीं वो माझे आई ।
आतां पुढें काई । तुज घालूं सांकडें ? ॥ ३ ॥

२.

थोर अन्याय केला । तुझा अंत म्यां पाहिला ।
जनाचिया बोला- । साठीं चित्त क्षोभविलें ॥ १ ॥
भागविलासी केला शीण । अधम मी यातिहीन ।
झांकूनी लोचन । दिवस तेरा राहिलों ॥ ध्रु० ॥
अवघें घालूनियां कोडें । तानभुकेचें सांकडें ।
योगक्षेम पुढें । तुज करणें लागलें ॥ २ ॥
उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद ।
तुका ह्मणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥ ३ ॥

३.

कापो कोणी माझी मान । सुखें पीडोत दुर्जन ।
तुज होय शीण । तें मी न करीं सर्वथा ॥ १ ॥
चुकी झाली एकवेळा । मजपासूनि चांडाळा ।
उभे करूनिया जळा- । माजी वह्या राखिल्या ॥ ध्रु० ॥
नाहीं केला हा विचार । माझा कोण अधिकार ।
समर्थासी भार । न कळे कैसा घालावा ॥ २ ॥
गेलें होऊनियां मागें । नये बोलों तें वाउगें ॥

पुढिलिया प्रसंगें । तुका ह्मणे जाणावें ॥ ३ ॥

४.

काय जाणे मी पामर । पांडुरंगा तुझा पार ।
धरिलिया धीर । काय एक न करिसी ॥ १ ॥
उताविळ जालों आधीं । मतिमंत हीनबुद्धी ।
परि तूं कृपानिधी । नाहीं केला अव्हेर ॥ ध्रु० ॥
तूं देवांचाही देव । अवघ्या ब्रह्मांडाचा जीव ।
आह्मां दासां कीव । कां भाकणें लागली ॥ २ ॥
तुका ह्मणे विश्वंभरा । मी तों पतितचि खरा ।
अन्याय दुसरा । दारीं धरणें वैसलों ॥ ३ ॥

५.

नव्हती आली सीस सुरी । अथवा घाव पाठीवरी ।
तों म्यां केला हरी । एवढा तुह्मां आकांत ॥ १ ॥
वांटिलासी दोहीं ठायीं । मजपाशीं आणि डोहीं ।
लागों दिला नाहीं । येथें तेथें आघात ॥ ध्रु० ॥
जीव घेती मायबापें । थोड्या अन्यायाच्या कोपें ।
हें तों नव्हे सोपें । साहों त्यांचे जाणितलें ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपावंता । तुजऐसा नाहीं दाता ।
काय वाणूं आतां । वाणी माझी खुंटली ॥ ३ ॥

६.

तूं माउलीहूनि मायाळ । चंद्राहूनि शीतळ ।
पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥ १ ॥
देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा ।
ओंवाळूनि नामा । तुझ्या वरूनी टाकिलों ॥ ध्रु० ॥
तुवां केलें रे अमृता । गोडी त्याही तूं परता ।
पांचा तत्वांचा जनिता । सकळ सत्तानायक ॥ २ ॥
कांहीं न वोलोनी आतां । उगाच चरणीं ठेवितों माथा ।
तुका ह्मणे पंढरिनाथा । क्षमा करी अपराध ॥ ३ ॥

७.

मी अवगुणी अन्यायी । किती ह्मणोन सांगों काई ।
आतां मज पायीं । ठाव देईं विठ्ठले ॥ १ ॥
पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर ।
राहों नेदी स्थिर । एके ठायीं निश्चळ ॥ ध्रु० ॥
अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग ।
धरूं जातां संग । तंव तो होतो बाधक ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । तोडीं माझी अवघी चिंता ।
येऊनीयां पंढरिनाथा । वास करीं हृदयीं ॥ ३ ॥

'न संवरित आली बाळवेषें जवळीं' 'निववीलें मन आलिंगन देऊनी' हे पहिल्या अभंगांतील महाराजांचे उद्गार श्रीकृष्णांनीं बालरूपानें त्यांना प्रत्यक्ष दर्शन देऊन आलिंगन दिलें, याबद्दल अगदीं स्पष्ट व निःसंदेह आहेत.

९ ह्या सात अभंगांतील 'सप्रेमरस अति अद्भुत असून तो संत प्रणिभरी सेवितात' असें महिपतबावांनीं ह्मटलें आहे तें सर्वथा योग्य आहे. बावा आणखीही म्हणतात कीं, देवानें स्वतः अभंगांच्या वह्या उदकांत रक्षिल्या ही मात देशोदेशीं प्रकट होऊन 'तुकयाची कीर्ति भूमंडळीं । होय ते वेळीं प्रख्यात.' बावांचें हें म्हणणें मार्मिकपणाचें असून विचार करण्यासारखें आहे. ही गोष्ट खरोखरीच इतकी महत्त्वाची आहे कीं, तिच्यामुळें तुकोबांची निस्सीम भगवद्भक्त म्हणुन सत्कीर्ति चोहोंकडे अवश्य फांकावी. प्रत्येक महात्म्याच्या चरित्रांत असा एक अत्यंत महत्वाचा प्रसंग येतो कीं, त्या प्रसंगामुळेंच त्या महात्म्याचे सर्व सद्गुण कसाला लागून तो ईश्वराला व जगाला मान्य होतो. आचार्यांनीं काशीक्षेत्रीं राहून शेंकडों मोठमोठ्या शिष्यांना आपला अद्वैतसिद्धांत शिकविला व आपलें भाष्यत्रय लिहिलें, पण मंडनमिश्रासारखें धेंड त्यांनीं बुद्धिकौशल्यानें वादांत जिंकून आपल्या पायांशीं आणलें तेव्हांच त्यांचें

जगद्गुरुत्व लोकांत सिद्ध झालें व सत्कीर्ति त्रैलोक्यांत फांकली. ज्ञानेश्वरमहाराजांनीं रेड्याकडून वेद बोलवून पैठणच्या विद्वन्मंडळास चकित केलें व जड भिंत चालवून चांगदेवासारख्या दीर्घायु तपःसिद्धास पायांशीं लोळविलें तेव्हां त्यांचीं धर्मसंस्थापक म्हणून संतमंडळांत मान्यता झाली. शिवाजीमहाराजांनीं अनेक किल्ले घेतले व लढाया मारल्या पण पैजेचा विडा घेऊन येणाऱ्या महाबलाढ्य अफजुलखानास प्रतापगडावर नामोहरम केलें, तेव्हांच त्यांची महापराक्रमी राज्यसंस्थापक ह्मणून स्वपरजनांवर छाप बसली. त्याप्रमाणेंच तुकाराममहाराजांच्या चरित्रांत त्यांची रामेश्वरभटाशीं झटापट होऊन रामेश्वरभटासारखा वेदवेदांतवेत्ता, षट्शास्त्री व कर्मठ ब्राह्मण त्यांचें अलौकिक भक्तिसामर्थ्य पाहून शेवटीं त्यांस शरण आला व ज्या सगुणभक्तीचा डांगोरा पिटीत त्यांनीं शेंकडों कीर्तनें व अभंग करून लोकांना भक्तिमार्गाला लावण्याचें कांकण बांधलें होतें त्या सगुणभक्तीच्या उत्कर्षार्थ देवानें स्वतः सगुणरूपानें प्रगट होऊन त्यांच्या वह्या स्वतः उदकांत रक्षिल्या व त्यांना प्रत्यक्ष दर्शन देऊन आपल्या पदरांत घेतलें, तेव्हांच त्यांचा व भागवतधर्माचा विजय होऊन महाराजांचें भक्तोत्तममालिकेंत शाश्वतचें नांव पडलें.

१० इकडे रामेश्वरभट आळंदीस ज्ञानोबारायांच्या पायीं सेवा करीत बसले होते त्यांना एके रात्रीं दृष्टांत झाला कीं, " महावैष्णव तुकारामाचा द्वेष केल्यामुळें तुझ्या सुकृताचा नाश होऊन तुला संतच्छलाच्या पापामुळेंच देहदुःख भोगावें लागत आहे, म्हणून तूं अंतरीं सद्भाव धरून त्याला शरण जा म्हणजे ह्या क्षुल्लक रोगापासूनच काय पण भवरोगापासूनही मुक्त होऊन उद्धरून जाशील " हा ज्ञानोबारायांचा दृष्टांत झाल्यावरून रामेश्वरभट अनुतापयुक्त झाले. इतक्यांत त्यांना देवानें उदकांत वह्या रक्षण केल्याची सर्व गोष्ट समजली, तेव्हां तुकोबाराय महान् भक्त असून

आपण त्यांचा वृथा छळ केल्याबद्दल त्यांस मनःपूर्वक पश्चात्ताप झाला. रामेश्वरभटांचे डोळे उघडले, त्यांचें भाग्य उदयास आलें. वेदाभ्यासाची व पांडित्याची महति भक्तीपुढें कांहींच नाहीं, तेव्हां नरदेहाचें मुख्य सार्थक संतसंगतींत राहून हरिप्रसाद जोडण्यांतच आहे असें त्यांच्या मनावर पक्कें ठसलें. तुकोबा ही देवाला प्रिय असलेली अत्यंत थोर विभूति आहे हें मनांत येऊन त्यांचा अहंकार गळून पडला. देव भक्तासाठीं साकार होऊन त्यांचें संरक्षण करितो व पंडिताच्या अंगाचा साधूच्या शापानें दाह झाला तरी तोही शमविण्याइतकी पांडित्यात पुण्याई नाहीं असें मनावर बिंबून त्यांचा अभिमान गळाला. चित्तांतला दुरभिमान गळाल्यामुळें तो ब्राह्मण मूळचाच शुद्ध होता तो शुद्धतर झाला. तुकोबारायांविषयीं त्याच्या मनांत परमादर उत्पन्न झाला. ते तुकोबारायास शरण गेले. त्यांनीं तुकोबांस एक पत्र लिहून आपला साकल्य वृत्तांत कळविला व त्यांची मनःपूर्वक स्तुति केली. तुकोबांनीं त्यांस अल्प उत्तरादाखल पुढील अभंग लिहून पाठविलाः—

**चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥१॥**
**विष तें अमृत आघात तें हित। अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ध्रु०॥**
**दुःख तें देईल सर्वसुखफळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ २ ॥**
**आवडेल जीवां जीवाचिये परी। सकळां अंतरीं एक भाव ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे कृपा केली नारायणें। जाणिजेतें येणें अनुभवें ॥ ४ ॥**

**अर्थ**:—आपलें चित्त शुद्ध ठेवलें तर शत्रु असतात ते मित्र होतात, व्याघ्रसर्पासारखे सहजक्रूर प्राणी सुद्धां दुष्टभाव सोडतात, विष अमृत होतें, आघात कल्याणपरिणामी होतो, छल व हेळणा नीतिबोध देणाऱ्या होतात, दुःख तें सुखदायक होतें, अग्निज्वाळा शीतल होतात ! हें सर्व होतें, पण दृढाभ्यासानें आपलें चित्त मात्र आपण शुद्ध, निष्पाप, निर्विकल्प ठेवलें पाहिजे. ज्याचें चित्त

शुद्ध आहे त्यावर जीव आपल्या जीवांसारखें प्रेम करितात, कारण सर्वांच्या अंतर्यामीं एकाच वासुदेवाचा वास आहे. अशाच आपत्तींत नारायणानें मजवर कृपा केली आहे ( हें तुह्मांला कळलेंच आहे ) व या माझ्या अनुभवावरून तुह्मांला वरील सिद्धांत चांगला पटेल.

हा अभंग रामेश्वरभटांनीं मननपूर्वक वाचला. त्यांतील बोध त्यांना पटला. अनुतापानें दग्ध झालेल्या त्यांच्या मनोभूमींत हें बोधाचें बीज रुजलें. त्यांच्या अंगाचा व मनाचाही दाह शमला. रामेश्वरभट पूर्वींचे राहिले नाहींत. ते तुकोबारायांच्या चरणकमळीं लीन झाले. त्यांच्याच संगतींत निरंतर राहावयाची त्यांनीं इच्छा दर्शविली व ती त्या अजातशत्रु महात्म्यानें पूर्ण केली. छळ करावयाला निघालेले रामेश्वरभट शिष्य झाले. तुकोबा परीस होते, त्यांवर घाव घालावयाला निघालेल्या रामेश्वरभटरूपी लोखंडाचें सोनें झालें. " अगा वरी फोडावयाचि लागी । लोहो मिळो कां परिसाचे आंगीं । कां जे मिळतिये प्रसंगीं । सोनेंच होईल ॥ " ( ज्ञानेश्वरी अ० १०–४६४.)

११ रामेश्वरभटांनीं तुकाराममहाराजांवर केलेले चार अभंग प्रसिद्ध आहेत. एका अभंगांत "माझी मज आली रोकडी प्रचीत । होऊनि फजीत दुःख पावें ॥१॥ काहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत झाली ॥ २ ॥" असें सांगून पुढें ज्ञानोबारायांनीं दिलेल्या दृष्टांताप्रमाणें मी तुकोबारायांला शरण गेलों आहें, त्यांच्या कीर्तनास नित्य जात असतों व ' ह्मणे रामेश्वर त्यांच्या समागमें । झालें हें आराम देह माझें ॥ ९ ॥ ' ह्याप्रमाणें स्वच्छ सांगितलें आहे. दुसऱ्या अभंगांत भक्ताची जातगोत कोणीं पाहूं नये, तो कोणत्याही वर्णाचा असला तरी त्याच्या पायां पडण्यांत

दोष नाहीं, गुरु परब्रह्म त्याला मानव ह्मणूं नये—कारण जे नामीं रंगले ते देवरूपच आहेत असें सांगितलें आहे.

**उंचनीच वर्ण न ह्मणावा कोणीं । जे कां नारायणीं प्रिय झाले ॥१॥**
**चहूं वर्णांसी हा असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥२**

असें शेवटीं रामेश्वरभटांनीं मोठ्या आनंदानें कबूल केलें. तिसऱ्या अभंगांत तुकोबारायाची योग्यता वाखाणली आहे. ' ब्रह्मानंद-तूकें तुळें आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ' याप्रमाणें तुकोबांना ' विश्वसखा ' म्हणून त्यांची लोकप्रियता वर्णिली आहे. धर्माला क्षयरोग लागला होता तो या धन्वंतरीनें दूर केला असें त्यांचें यथार्थ वर्णन केलें आहे.

**शास्त्र श्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । तुह्मी भक्तराया देखियेली**

तुकोबाची क्रिया शास्त्र व श्रेष्ठाचार यांशीं अविरुद्ध आहे असें रामेश्वरभटांना पुढें सहवासानें कळून आलें. ' ब्रह्मऐक्यभावें भक्ति विस्तारली ' ह्म० अद्वैतसिद्धांताला धरून तुकोबांनीं भक्तिमार्गाचा प्रसार केला. 'पूजिले देवद्विज सर्व भावें' देवब्राह्मणांची मोठ्या भक्तिभावानें त्यांनीं सेवा केली, शांतिपतिव्रतेशीं त्यांनीं लग्न लावलें, क्षमा मूर्तिमंत अंगीं दाखविली व दया जीवविली,जगाचा अज्ञानांधकार दूर करण्यासाठीं संतग्रहमेळांत तुकोबा हे प्रत्यक्ष सूर्य उगवले आहेत इत्यादिप्रकारें रामेश्वरभटांनीं ह्या अभंगांत स्तुति केली असून मीं ' देहबुद्धि व जात्यभिमान ' यांच्या अधीन होऊन तुमचा छळ केला पण ' आतां मी उपेक्षिलों न पाहिजे ' अशी तुकोबांची प्रार्थना केली आहे, आणि शेवटच्या चरणांत ' न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार' ह्म० तुकोबाविषयीं माझा जो हा शुद्धभाव उत्पन्न झाला आहे याला खंड पाडूं नका असें आपलें उपास्य श्रीरामचंद्र यापाशीं मागणें मागितलें आहे.

**ह्या तीनही अभंगांवरून रामेश्वरभटांचें रूपांतर कसें झालें तें**

दिसतें. हा विद्वान् कर्मनिष्ठ ब्राह्मण तुकोबांची योग्यता जाणून त्यांना शरण आला व त्यांच्या पाठीमागें टाळकरी होऊन राहण्यांत धन्य मानून राहिला. त्यांची बुद्धि मूळची शुद्ध होती, ती अहंकारानें मध्यें मलिन झाली, पण योग्य गुरूची मध्यें गांठ पडतांच डोळे उघडले. त्यांचा चौथा अभंग तुकाबांचें प्रयाण झाल्यानंतरचा आहे. रामेश्वरभटांनीं तुकोबांचे पाय धरले ते अखेरपर्यंत सोडले नाहींत. १०।१५ वर्षे तुकोबांच्या संगतींत राहून त्यांचा तुकोबांविषयीं जो ग्रह झाला तो चवथ्या अभंगांत व्यक्त झाला आहे. ' अमृताची वाणी वरुषला शुद्ध ' हें जग जाणतच आहे. 'भक्ति ज्ञान आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला' हा रामेश्वरभटांचा अखेरचा अभिप्राय सर्व जगास मान्य झालेला आहे. श्रीकृष्णदर्शनानंद अखंड भोगणारे श्रीतुकाराममहाराज व त्यांचे स्वरूपीं समरस झालेले रामेश्वरभट या उभय गुरुशिष्यांस अनन्यभावानें वंदन करून मी हा कथाभाग येथेंच समाप्त करितों.

१२ वरील प्रसंगानंतर ' मीं देव पाहिला आहे ' असें तुकोबांना स्वानुभवानें म्हणतां येऊं लागलें. एकदां श्रीकृष्णानें बालवेषानें त्यांना दर्शन दिल्यावर मग तें हवें तेव्हां हवें तेथें होऊं लागलें हें कांहीं सांगायला नकोच. ' बोलावितां यावें रूपा । सदा निर्गुणींच लपा ' असे देव त्यांचे अंकित झाले. मग निदिध्यासाचा चढता रंग कायम अंगीं मुरून राहिला. ' कृपा झाली मग नलगे अंगसंग । निजध्यासें रंग चढता राहे ' देवाचें दर्शन झाल्यानंतर मला देव भेटले, माझा प्राणविसांवा मला भेटला, तुम्हीही माझ्यासारखाच देवाच्या चरणांशीं हट्ट धरून बसा म्हणजे तुम्हांसही देव भेटेल असें स्वानुभवानें त्यांना कीर्तनांत लोकांना सांगतां येऊं लागलें. जनाबाई, नामदेवराय, नाथ वगैरे संतांना देव भेटले तसे मलाही भेटले, आतां माझा शीणभाग गेला, आतां संतमेळ्यांत

उजळ माथ्यानें जायला हरकत नाहीं असें त्यांस वाटलें असल्यास त्यांत नवल नाहीं. देवाच्या भेटीनंतर देव भेटल्याचा आनंद त्यांच्या कित्येक अभंगांत व्यक्त झाला आहे:—

**आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलिया ॥ १ ॥**
**भाग गेला शीण गेला । अवघा झाला आनंद ॥ ध्रु० ॥**

* * *

**न व्हावें तें झालें देखियेले पाय । आतां फिरूं काय मागें देवा ॥१**
**बहु दिस होतों करीत हे आस । तें आलें सायासें फळ आजि ॥२**

* * *

श्रीकृष्णदर्शनानंतर त्यांचे ' कृष्णांजनें जाले सोज्ज्वळ लोचन.' जें बाळरूप पाहिलें तेंच नेत्रीं स्थिर झालें. ' बैसलें तें रूप डोळां। वेळोवेळां आठवे.' त्या रूपाच्या स्मरणाचा, निदिध्यासाचा आनंद वाढता झाला, निदिध्यासानें तन्मयता इतकी झाली कीं, ' तुका ह्मणे वेध झाला । अंगा आला श्रीरंग. ' तुकोबांनीं नाटाच्या अभंगांत एके ठिकाणीं ' मज तों पडली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोंवी केली । दृष्टि उघडली बरें झालें, ॥ ' इतर जीवांप्रमाणें मलाही भूल पडून माझें चित्त विषयांच्या आडमार्गांत शिरलें होतें व मी प्रपंचरूपी मृगजळांत गुंतून फसलों होतों, पण बरें झालें अखेर देवानें माझे डोळे उघडले असें ह्मटलें आहे ! चार दोन अभंग टाकून पुढें एके ठिकाणीं ते म्हणतात: ' तुह्मांसी पावविली हाक । तेणें निरसला धाक ।' ह्म० तुह्मांला मीं हाक मारली आणि ती तुह्मीं ऐकली यामुळें मी निर्भय झालों आहें.

ह्यानंतर लोकांना भक्तिमार्गाचा उपदेश तुकोबांनीं स्वानुभवाचा दाखला देऊनही केला आहे.

**धीर तो कारण । साह्य होतो नारायण ।**
**होऊं नेदी शीण । वाहे चिंता दासांसी ॥ १ ॥**

सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचे गुण ।
वारी सुदर्शन । आपणाचि कळिकाळा ॥ ध्रु० ॥
जीव वेंची माता । बाळां जडभारी होतां ।
हा तों नव्हे दाता । प्राकृतां या सारिखा ॥२॥
हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें ।
तुका ह्मणे सत्य व्हावें । आहाच नये कारण ॥ ३ ॥

धैर्य व दृढविश्वास ठेवून हरीच्या प्राप्तीचा उद्योग निरलसपणें करावा ह्मणजे तो दयाघन हरि साह्य होतो, तोच भक्ताची चिंता वाहतो, त्याचीं सर्व दुःखसंकटें निवारितो, त्याचें सुदर्शन परभारेंच कळिकाळाचें निवारण करितें व भक्ताला कांहीं जडभारी पडलें तर आईहून अधिक कळवळ्यानें धांवत येतो—ही गोष्ट मी स्वतः च्या अनुभवानें तुह्मांला सांगत आहें, तुह्मी फक्त निष्ठेनें त्याचें नामसंकीर्तन करा. पुढील बहारीच्या अभंगांत सर्व संसारिकांना भक्तिमार्गाचें वर्म थोडक्यांत सांगितलें आहे:—

अवघ्या दशा येणेंचि साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति ।
प्रगटे हृदयींची मूर्ती । भावशुद्धि जाणोनियां ॥ १ ॥
बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म ।
सकळां कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥ ध्रु० ॥
जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास ।
सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥ २ ॥
येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें ।
आपणाचि येती तयाचे गुणें । जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥ ३ ॥
नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म ।
आणीक न करावे श्रम । पुरे एक नाम विठोबाचें ॥ ४ ॥
वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य ।
मुक्ता आत्मा परिपूर्ण । तुका ह्मणे सगुण भोळ्या आह्मां ॥ ५ ॥

वेदांचा प्रकृतीपलीकडचा नारायण, योग्यांचें शून्य ब्रह्म व मुक्तांचा आत्मा तोच आमचाही देव आहे; पण आह्मां भोळ्या

भाविकांसाठीं तो सगुण झाला आहे. श्रीहरीच्या ह्या सगुण स्वरूपाची भक्ति हीच मुख्य उपासना आहे. त्याचें नामस्मरण हें सकळ पुण्य, धर्म व फळांचें बीज आहे व फळही आहे ! त्याच्या निर्लज्ज नामसंकीर्तनांत सर्व रसांचा आनंद एकदम मिळतो व सर्व संसारबंधनें तुटतात. ज्याच्या हृदयांत देवानें ठाण मांडून वास्तव्य केलें आहे त्याच्या अंगीं ज्ञान्याचीं लक्षणें सहज जडतात. आपला आश्रम, आपले कुळधर्म न सोडतां केवळ हरीच्या नामानें उद्धार होतो व आपल्या चित्ताची भावशुद्धि जाणून हृदयींची ह्म० ज्याचें आपण चित्तांत अखंड ध्यान करूं ती मूर्ति तेंच रूप घेऊन **प्रत्यक्ष प्रगट होते.**

रामेश्वरभट तुकोबांचे सांप्रदायी झाले तरी तुकोबांची विनीतता तिळमात्र सुटली नाहीं. ते त्यांना लोटांगण घालीत. (भक्तलीलामृत ३७)

**रामेश्वरापेसा ब्राह्मण पाही । ह्मणवी तुकयाचा सांप्रदायी ।**
**त्यासी लोटांगण घालितसे विदेही । महंती नाहीं किंचित॥१८८**
**आपुला शिष्य देखोनी । तयासी देवासमान मानी ॥**
**तोचि जगद्गुरु पूर्ण ज्ञानी । अद्वैतभजनीं निवाला ॥ १८६ ॥**

१३ श्रीतुकोबारायांच्या चरित्राचा हा मध्यखंड येथें संपला-याला उपासनाखंड असेंही ह्मणतां येईल. येथें थोडेसें सिंहावलोकन करून मग उत्तरखंडाला प्रारंभ करावा हें बरें. पूर्वखंडांत मंगलाचरणानंतर कालनिर्णय, पूर्वपीठिका व संसाराचा अनुभव हीं तीन प्रकरणें आलीं असून यांत महाराजांच्या २१ व्या वर्षापर्यंतचें चरित्र सांगण्यांत आलें. तुकोबांना संसाराचा कटु अनुभव येऊन वैराग्य उत्पन्न झालें येथपर्यंतचा भाग पूर्वखंडांत आला असून त्यांचा परमार्थसाधनाचा इतिहास ह्या मध्यखंडांत आपण पाहिला. महाराज कोणत्या मार्गानें सगुणसाक्षात्काराच्या पायरीपर्यंत चढले हें साधकांना स्वच्छ समजावें व हा खंड त्यांना मार्ग-

दर्शक व्हावा म्हणून हा अंमळ विस्तारानें सांगितला आहे. चरित्रांतला हाच खंड मुमुक्षुसाधकांना अधिक बोधप्रद होईल असें जाणून महाराजांच्या वचनाधारें याचा विस्तार केला आहे. चवथ्या प्रकरणांत ' याती शूद्र वैश्य केला वेवसाय ' हा अभंग आधाराला घेऊन ह्मणजे तोच बीजाध्याय करून त्यावर १ वारकरी संप्रदायाचा साधनमार्ग २ ग्रंथाध्ययन ३ गुरुकृपा व कवित्वस्फूर्ती ४ चित्तशुद्धीचे उपाय ५ सगुणभक्ति व दर्शनोत्कंठा ६ श्रीविठ्ठलस्वरूप आणि ७ सगुणसाक्षात्कार ह्या सात प्रकरणांची सप्तपदी उभी केली आहे. ५ व्या प्रकरणांत वारकरी संप्रदायाचें स्वरूप आपण पाहिलें व एकादशीव्रत,पंढरीची वारी,कीर्तनप्रसंगाचा आनंद, शुद्धभावाचें मर्म व परोपकाराचा अभ्यास या गोष्टींचा ऊहापोह केला. ६ वे प्रकरणांत तुकोबांनीं कोणकोणत्या ग्रंथांचें अध्ययन केलें होतें तें अंत:प्रमाणांवरून आपण पाहिलें व अध्ययनाचें महत्व सांगितल्यावर मूळगीता, मूळ भागवत, कांहीं पुराणें, विष्णुसहस्रनाममहिम्नादि स्तोत्रें, ज्ञानेश्वरीनाथभागवतादि प्राकृत ग्रंथ यांचें तुकोबांनीं किती आस्थेनें व सूक्ष्म अध्ययन केलें होतें व त्यांचें पाठांतर किती जिव्हाळ्याचें होतें हें आपण अंत:प्रमाणांवरून निर्विवाद सिद्ध झालेलें पाहिलें व शेवटीं समारोपांत तुकोबांना ज्ञानेश्वरनाथांपासून फोडण्याचा अर्वाचीन पंडितांचा प्रयत्न कसा फोल आहे तेंही दाखविलें. ७ वें प्रकरणांत गुरुकृपा व कवित्वस्फूर्ति या दोन गोष्टींचा विचार केला आहे. प्रथम सद्गुरुकृपेचें महत्व, व तुकोबांची गुरुदर्शनाची तळमळ, बाबाजी चैतन्यांचा स्वप्नांत उपदेश हे प्रकार पाहिले आणि नंतर तुकोबांच्या त्रयीची हकीकत देऊन दोन भिन्न परंपरा, केशव व बाबाजी एक नव्हत हा प्रकार, व बंगाल्यांतील कृष्णचैतन्यांच्या संप्रदायाशीं तुकोबांचा बिलकूल संबंध कसा येत नाहीं या तीन गोष्टींची चर्चा केली आहे. ८ वें ' चित्तशुद्धीचे उपाय ' हें प्रकरण

मुख्यतः साधकांसाठीं सविस्तर लिहिलें आहे. तुकोबांची विरागता व सावधानता, त्यांच्या साधकस्थितीचें मर्म व त्यांच्या लोकप्रियतेचें बीज या गोष्टींचा प्रथम ऊहापोह करून तुकोबांनीं मनोजय कसकसा केला, जनसंगाचा व वादकलहकांच्या कटकटीचा वीट येऊन एकांतवास कसा धरिला व एकांताचें सुख कसें भोगलें, स्वदोषांचें देवाला निवेदन करून त्याला कसें आळविलें, व सत्संग आणि नामसंकीर्तन या साधनांत साधनांची परिसमाप्ति कशी झाली तें आपण पाहिलें. हें सर्व प्रकरण साधकांना अत्यंत बोधप्रद होईल. ९।१०।११ ह्या प्रकरणांत सगुणसाक्षात्काराचा अत्यंत मनोरम वृत्तांत सांगितला आहे. ९ वे प्रकरणांत प्रथम ईश्वरप्राप्तीच्या उपायांत भक्तिमार्गच श्रेष्ठ कां व सगुण व निर्गुण एकच कसें हें सांगून तुकोबांची सगुणनिष्ठा किती दृढतम होती तें आपण पाहिलें. तुकोबांचे उपास्य श्रीविठ्ठल. तेव्हां विठ्ठल शब्दाची व्युत्पत्ति कशी करितात, ज्ञानेश्वरींत विठ्ठल—नामनिर्देश नाहीं या गोष्टीवर भर देऊन अर्वाचीन पंडित ज्ञानेश्वरी वारकरीसंप्रदायापासून तोडण्याचा प्रयत्न करितात तो कसा निष्फल आहे, तुकोबा मूर्तिपूजक कसे होते व सगुणपूजेचा आनंद कसा आहे या मुद्द्यांचा ऊहापोह करून मग तुकोबाची दर्शनोत्कंठा, त्यांचे देवाशीं झालेले प्रेमकलह, व भेटीचे मनोरथ हे गोड प्रसंग आपण अनुभविले. १० व्या प्रकरणांत श्रीविठ्ठलस्वरूपाचा विचार केला आहे. श्रीविठ्ठल म्ह० बालकृष्णच कसे, याबद्दल संतांचे अभिप्राय काय आहेत, संतांनीं बाललीलाच कां व कशा वर्णिल्या तें आपण पाहिलें व शेवटीं पंढरपूरच्या विठ्ठलमूर्तीचें सूक्ष्म वर्णनही केलें. १० व्या म्ह० प्रस्तुत प्रकरणांत ज्या रामेश्वरभटांच्या छलाचें निमित्त करून श्रीकृष्णानें बालरूपानें तुकोबांना साक्षात् दर्शन दिलें त्या मनोरम कथेचें सविस्तर वर्णन आलें आहे. प्रथम रामेश्वरभटांची योग्यता व त्यांच्या विरोधाचें

वर्म सांगून कर्मठांच्या विरोधानें भागवतधर्माचाच कसा जयजयकार होत आला आहे त्याचें विवेचन केलें. नंतर तुकोबांनीं वह्या डोहांत बुडविल्या व देवानें त्या तारल्या ही सर्वप्रसिद्ध गोष्ट तुकोबांच्याच वचनाधारें वर्णिलेली आपण पाहिली. तुकोबांचा ह्म० भागवतधर्माचा विजय झाला व रामेश्वरभट शरण आले. ह्या सात प्रकरणांत सत्संग, सच्छास्त्र, गुरुकृपा व सगुणसाक्षात्कार या चारें टप्प्यांनीं तुकोबा कृतार्थ कसें झाले तें आपण पाहिलें. आतां वाचकांनीं या मध्यखंडाचें पहिलें 'आत्मचरित्र' हें प्रकरण पुन्हां वाचावें व विशेषतः 'याति शूद्र वैश्य केला वेवसाव' ह्या अभंगाचें विवरण पहावें ह्म०तें प्रकरण या मध्यखंडाचा बीजाध्याय कसा आहे हें त्यांस समजून येईल. रामेश्वरभटांनीं केलेल्या छलप्रसंगीं तुकोबांना सगुणसाक्षात्कार झाला.

**निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मधें चित्त दुखविलें ॥ १४**
**बुडाविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १५ ॥**

ह्या चरणाचें वर्म आतां समजून येईल. तो अभंग तुकोबांनीं सदर प्रसंगानंतर व बहुधा लवकरच केला असावा. यापुढें तुकोबा म्हणतातः—

**भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें ॥ १९ ॥**
**आतां आहे तैसा दिसतो प्रकार । पुढील विचार देव जाणे ॥ १८ ॥**

पुढील प्रकराणांचा इतिहास आपणांस उत्तरखंडांत पाहावयास मिळेल.

—:o:—

# प्रकरण बारावें

—:*:—

# मेघवृष्टि.



शैलेयेषु शिलातलेषुच गिरेः शृंगेषु गर्तेषुच
श्रीखंडेषु बिभीतकेषु च तथा पूर्णेषु रिक्तेषुच ।
स्निग्धेन ध्वनिनाखिलेऽपि जगतीचक्रे समं वर्षतो
वंदे वारिदसार्वभौम ! भवतो विश्वोपकारि व्रतम् ॥ १ ॥

" डोंगराळ मुलखांवर त्याचप्रमाणें मैदानांवर, पर्वतशिखरांवर तसेंच दऱ्याखोऱ्यांवर, चंदनवृक्षांवर आणि बिब्याच्या झाडांवर, समृद्ध सरिता-सागरांवर आणि रिक्त नदीनाल्यांवर—सर्व भूमंडळावर आपल्या हृदयहारि गर्जनांनीं समवृष्टि करणाऱ्या मेघसार्वभौमा ! विश्वावर उपकार करणाऱ्या तुझ्या या महाव्रताचें मी अभिवादन करितों ! "

१ गुरुत्वाचा अधिकार. २ मेघवृष्टीनें करावा उपदेश. ३ तुकोबांची उपदेशपद्धति. ४ हरिभक्तीचा सर्वसामान्य उपदेश. ५ संसारांत सावधानता. ६ संसारिकांस उपदेश. ७ दंभस्फोट. ८ धरणेकरी ब्राह्मणांस बोध. ९ तुकोबा आणि शिवराय. १० शिवरायास ९ अभंगांचें पत्र. ११ पाइकीचे अभंग. १२ संत नेभळे आणि पंगु आहेत या आक्षेपाचें खंडण.

१ सगुणसाक्षात्काराचें तेज अंगावर फांकलेलें, इंद्रियें उपशम पावलेलीं, प्रखरतर वैराग्याचीं लक्षणें देहावर उमटलेलीं, प्राप्तव्य प्राप्त झाल्यानंतरचें समाधान नेत्रांत चमकून राहिलेलें—अशी ती तुकोबारायांची श्याममूर्ति ज्या नेत्रांनीं पाहिली असेल ते नेत्र धन्य होत ! सतत १५ वर्षें तुकोबारायांच्या मुखांतून जी अमृताची गंगा वाहिली तिच्यांत निमज्जन करण्याचें महद्भाग्य ज्यांना

लाभलें असेल ते श्रोते धन्य होत ! देवाच्या ऐकीव गोष्टी सांगणारे पुष्कळ मिळतात; पण देव पाहिलेला, देवाचा वरदहस्त मस्तकावर घेतलेला, देवाशीं एकांत केलेला, असा स्वानुभवी महात्मा भगवद्भीला गातांना व अधिकारी वाणीनें जनांस भक्तिमार्गाचा, सदाचाराचा, ज्ञान वैराग्याचा बोध करीत असलेला ज्या स्त्रीपुरुषांनीं पाहिला असेल ते धन्य होत ! देहूचें, पुण्यप्रांताचें, महाराष्ट्राचें भाग्य उदेलें, आणि तुकोबाराय आपल्या विठ्ठलमंदिरांतून मुक्तीवरील भक्तीचीं सणगें भराभर तयार करून तीं पंढरीच्या बाजारांत पाठवूं लागले ! त्यांच्या वाणीला स्वानुभवाचा रंग चढला, भक्तिसुखाच्या अनुभवाच्या गोष्टी ते सांगूं लागले, उपदेश करण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे अशी लोकांची निष्ठा बसत चालली, त्यांच्या खरेपणाच्या राहणीची सर्वांवर छाप बसल्यामुळें दांभिकदुर्जनांवर ते त्यांच्या कल्याणासाठीं व लोकांना सावध करण्यासाठीं जे तडाखे उडवीत त्यांची सत्यता पटून असत्याचे बाजार ओस पडूं लागले व सर्वत्र तुकोबांचा बोलबोला झाला.

**आपण जेऊन जेववी लोकां । संतर्पण करी तुका ॥ १ ॥**

या त्यांच्या उद्गाराचा खरेपणा लोकांस कळून चुकला. देहूस परमार्थाचें नवीन विद्यापीठ निघालें व त्याचे चालक व सूत्रधार जे तुकोबा त्यांच्या उपदेशासाठीं गांवोगांवचे लोक धांवून येऊं लागले. देहु, लोहगांव, तळेगाव, पुणें, पंढरपूर व वाटेतल्या मुक्कामाचीं ठिकाणें येथें तुकोबांच्या कीर्तनांची झड उडून राहिली. लोकगुरुत्व त्यांजकडे सहजच आलें. इंद्रियजयी, विरक्त, निरपेक्ष, स्वानुभवी असा लोकगुरु या स्वार्थपरायण जगांत क्वचितच लाभत असतो. तृप्तीचा हा धर्म आहे कीं सर्वांनीं आपल्यांसारखें तृप्त व्हावें, आपणांसारखें सुखी व्हावें, अशी तृप्त पुरुषाला सहज वासना उत्पन्न व्हावी. स्वतःचें आत्यंतिक कल्याण साधल्यावर लोककल्या-

णार्थ झटावें हा तुह्मांचा स्वभाव आहे. ' तुका ह्मणे आतां । उरलों उपकारापुरता '

२ गुरुत्वाची योग्यता अंगीं आली असूनही स्वत:ला गुरुत्वाचा स्पर्श होऊं नये व आपण कोणाला आपला शिष्य ह्मणूं नये अशी तुकोबांची दृढतर भावना असल्यामुळें त्यांनीं आपल्या उपदेशाला मेघवृष्टि असें नांव दिलें आहे, व तेंच नांव आपण कायम करूं.

**नेणे फुंकों कान । नाहीं एकांतींचें ज्ञान ॥ १ ॥**

आह्मी एकांतींचा उपदेश कोणाला करीत नाहीं. चिंतनसुख आह्मी भोगीत आहों त्याचे वांटेकरी तुम्हांला करूं, आह्मी या गुरुत्वाला आतळत नाहीं.

**कपट कांहीं एक । नेणे भुलवायाचे लोक ॥**
**तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥**

ह्या अभंगांत तुकोबांनीं सामान्यत: लौकिक गुरूंचे प्रकार निषेधिले आहेत. ते म्हणतात कीं मी जडीबुटी दाखवीत नाहीं, उठाउठी चमत्कार करीत नाहीं, चाहुरांची वृत्ति चालविणारा मी मठपति नाहीं, मी देवतार्चनाचें दुकान मांडणारा नाहीं, ' करणें सांगणें आणिक ' असला मी पुराणिक नाहीं, घटपटांचा वाद करणारा मी पंडित नाहीं, अंबाबाईचा उदो म्हणून मस्तकावर भंडे जाळणारा मी नाहीं, चार अजागळ मिळवून गोमुखींत हात घालून मी माळ जपत नाहीं, जारणमारणादि डंग्यांत पडणारा मी नाहीं, देवा ! ' तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ' एवढेंच मला ठाऊक आहे. आमचा देव उघडा आहे, रामकृष्ण हरि मंत्र उघडा आहे, माझा उपदेशही उघडा आहे, मला सांगायचें तें मी कीर्तनांत सांगतों, मजपाशीं झाकातापा कांहीं नाहीं असें तुकोबांचें सांगणें आहे कारण:—

गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥ १ ॥
भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दूसरा ॥ ध्रु० ॥

सर्वभूतीं नारायणाचा वास आहे, तो माझ्या तसाच दुसऱ्यांच्याही हृदयांत असल्यामुळें मी गुरु व पैल शिष्य असा नस्ता भेद नको असा माझा निश्चय आहे, मी गुरुत्वाच्या नात्यानें कोणाला उपदेश करीत नाहीं. नारायण अंतर्यामीं प्रेरणा करून मला बोलवितो म्हणून मी बोलतों आणि तें मेघवृष्टीनें बोलतों—

मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरूनें न करावा शिष्य ।
वांटा लाभे त्यास । केल्या अर्थ कर्माचा ॥ १ ॥

ज्याला उपदेश करायचा तो बुडाला ओल नाहीं असा खडक निघाला तर पेरलेलें बी फुकट जाऊन पीक हातास न येतां फुकट सरकारसारा मात्र भरण्याची पाळी यायची ! त्यापेक्षां—

एकमेकां साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥

तुह्मी आह्मी एकमेळीं नारायणाचें अमृतगुण गाऊन उद्धरून जाऊं. ‘ नसतां अधिकार । उपदेशासी बलात्कार ’ करणारे गुरु आणि शिष्य शेवटीं पस्तावा पावतात.

उपदेशी तुका । मेघवृष्टीनें आइका ।
संकल्पासी धोका । सहज तें उत्तम ॥ ४ ॥

मेघवृष्टीनें उपदेश केला ह्मणजे तो सहजपणाचा रंग घेऊन उठतो. वृष्टि कोठें खडकावर पडेल, कोठें भाजून नांगरलेल्या जमीनींत पडेल, पीक येईल वा न येईल—त्याची मेघ खंती बाळगीत नाहीं. परमार्थ ज्याचा त्यानेंच करायचा आहे. जो कंबर कसून लढेल तो फत्ते पावेल, गांळ्या पराभूत होईल, त्याला आम्हीं काय करावें ? मेघवृष्टीच्या उपदेशानें सर्वांना सारखा मार्ग दाखविण्याचें काम आह्मीं करितों. ज्याचें स्वहित त्यानेंच आचरलें पाहिजे.

**चोराचिया घुडका मनीं। वसे ध्यानीं लांछन ॥ १ ॥**
**ऐसा आह्मीं करणें काय। वर्षों न्यायें पर्जन्य ॥ २ ॥**

ज्याचे दोष त्याला कळत असतात. आह्मी गुणांची स्तुति व त्यागार्थ अवगुणांची निंदा बोलूं. कोणाच्या वर्मी घाव लागल्यास आह्मांकडे बोल नाहीं. कोणा व्यक्तीला उद्देशून आह्मी बोलत नाहीं. हरिगुण गातांना—

**परम अमृताची धार। वाहे देवाही समोर ॥ १ ॥**
**ऊर्ध्ववाहिनी हरिकथा। [illegible] सकळां तीर्थां ॥ २ ॥**

हरिकथा ऊर्ध्ववाहिनी ह्म० सात्विक भावांचा विकास करणारी सर्वतीर्थांवरिष्ठ आहे. आमच्या मुखांतून येणाऱ्या अमृताचा अभिषेक देवाला होत असतो. बरें, लोकांना उपदेश ह्मणून जेव्हां आह्मी बोलतों तेव्हां—

**नाहीं विचारीत। मेघ हगणदारी शेत ॥ १ ॥**

पाणी शेतांत पडून सार्थकीं लागतें का गटारांतून वाहून जातें याचा विचार मेघ करीत नाहीं, त्याची सर्वांवर समान वृष्टि असते. गंगा पुण्यवंत व पापी या दोघांनाही आपल्या उदकांत स्नान करूं देते. अग्निद्वारें देवांना हविषान्न मिळतें व खांडववनेंही भस्म होतात, पण अग्नीला दोहींचा विटाळ नाहीं. या न्यायानें आमची उपदेशपद्धती मेघवृष्टीसारखी समान आहे. आमचे शब्द सज्जनांना सुखवितील व ते स्तुति करितील आणि दुर्जनांच्या टाळक्यांत घाव बसल्यामुळें ते आमची कुटी खातील, पण ' मज हेंहि नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहींपासूनी ' तात्पर्य—

**पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें। आपुलाल्या दैवें पिके भूमी ॥**

३ सर्वांना सारखा बोध करणें ह्मणजे प्रत्येकास एकच उपदेश करणें नव्हे. हरिभजनाचा उपदेश सर्वांस एक आहे, बाकी—' अधिकार तैसा करूं उपदेश ' ह्या न्यायानें

ज्याला; जें ओझें उचलवेल तेंच त्याच्या डोक्यावर ठेवूं. मुंगीच्या पाठीवर हत्तीचें पालाण कोणी ठेवील नाहीं. पारध्यापाशीं फांसे ( पाश ), वागुरा ( जाळीं ) व कुऱ्हाडी हीं सर्व असतात, पण तीं तारतम्यानें उपयोगांत आणावयाचीं असतात. खळांस, नष्टांस, कृपणांस, संसारिकांस, विरक्तांस, राजास, शूरास, पामरांस व ब्राह्मणादि जातींस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें उपदेश करावयाचा असतो. शिवाय प्रत्येक जीवाचा अधिकार जो सिद्ध असेल त्याप्रमाणें त्यास उपदेश करावा लागतो. ‘ नेजा इशारती । तट्टा फोकावरी घेती ’ म्ह० घोडा उमदा व जातिवंत असेल तर तो इशारतीनें चालतो, सामान्य तट्टांना सारखे फोक मारीत सुटले तरी तीं पाय उचलीत नाहींत ! धर्मनीतिव्यवहाराचा कांहीं उपदेश सार्ववर्णिक असतो, तो सर्वांनींच सर्वकाळीं घ्यावयाचा असतो. कोणता उपदेश कोणाला लागू पडतो हें ज्याचें त्यानेंच ठरवावें ! असो. तुकोबांनीं कोणता अभंग कोणाला उद्देशून कोणत्या प्रसंगीं सांगितला हें समजण्यास आज कांहींच मार्ग नाहीं, तथापि तुकोबांच्या श्रोत्यांत सामान्यतः ज्या प्रकारचे लोक होते त्याच प्रकारचे विविध लोक आजही आहेत व सर्व काळीं असणारच. ज्यानें त्यानें आपला अधिकार ओळखून बोध घ्यावा. संत हे सद्वैद्यासारखे आहेत, त्यांजजवळ सर्व रोगांवरचीं औषधें व मात्रा असतात. ज्यानें त्यानें आपल्या रोगाच्या व प्रकृतीच्या मानानें लागेल तें औषध घ्यावें, पथ्य पाळावें व निरोगी होऊन जावें. संत भवरोगी दुरुस्त करितात. वैद्य तरी अर्थाचे भुकेले असतात, पण संत परोपकारी व निष्कामभक्त असल्यामुळें त्यांचा यांत कोणताही स्वार्थ साधायचा नसतो, उलट तेच चतुर्विध पुरुषार्थांचें दान करावयास निघालेले असतात. तुकोबाच्या उपदेशपद्धतींत अगदीं सौम्य उपायांपासून तों ‘ तुका म्हणे लासूं फांसं देऊं डाग ’ येथपर्यंत सर्व प्रकार भरले आहेत. त्यांच्या

अभंगरूप आरशांत ज्यानें त्यानें आपलें तोंड पाहून आपला रोग ठरवावा, औषध घ्यावें, पथ्य सांभाळावें व आरोग्याचें अमृतपान करावें. वैदिक ब्राह्मणाला व स्वराज्यस्थापनेच्या महत्कार्यांत गुंतलेल्या शिवराजाला, सिद्धाला व पामराला, जातिवंत भक्ताला व दांभिकाला, भल्याला व बुऱ्याला, शूराला व भ्याडाला, सर्वांना त्यांत उपदेश आहे. निवृत्तिमार्गीयांना व प्रवृत्तिमार्गीयांना सर्वांना तुकोबांनीं बोध केला आहे, ब्र० विवेकाचे मुख्य सिद्धांत सांगितले आहेत. संत व तत्त्ववेत्ते तपशील सांगत नाहींत, तो मनुष्याला व्यवहारानें व दुसऱ्याचें पाहून समजत असतो, ते मुख्य सिद्धांत तेवढे सांगतात. संतांचें मुख्य कार्य जीवांना मायेच्या निद्रेंतून जागे करायचें असतें. ते उत्कृष्ट जागले असतात. संत जीवांना जागवितात, त्यांची मोहानिद्रा उडवितात, धर्माचें रहस्य सांगून उद्धाराचा मार्ग दाखवितात, भक्तिज्ञानवैराग्याचा बोध करून त्यांची देहबुद्धि उडवितात, त्यांचें जीवपणाचें दारिद्र्य घालवून त्यांना स्वात्मपदीं अढळ बसवितात, जीवांना अभयदान देतात आणि आपल्या पुण्यचारित्र्यानें व उज्ज्वल प्रबोधशक्तीनें संत जीवांचें रंकपण काढून टाकन त्यांना स्वानंदसाम्राज्यपटावर आरूढ करितात. संतांचे उपकार मायबापांहूनही अधिक आहेत. सर्व लहानमोठे ओहोळ आपल्या नामरूपांसगट समुद्रांत नाहींसे होतात त्याप्रमाणें संतांच्या बोधमहार्णवांत त्रिभुवनींचीं सुखदुःखें गडप होऊन जातात. असो. अशा विश्वोद्धारक महाविभूतींपैकींच तुकोबाराय अग्रगण्य असल्यामुळें त्यांच्या उपदेशाच्या मेघवृष्टीखालीं आपण सर्वजण नम्र होऊन त्या अमृतासरी मस्तकांवर घेऊन आराम पावूं.

४ हरिभक्तीचा सर्वांस उपदेश एकच आहे:—

**उघडी उघडी डोळे। तरि कां अद्यापी न कळे।**
**काय मातेचिये खोळे। दगड आला पोटासी॥१॥**

मनुष्यदेहा ऐसा निध । साधेल तो साधी विध ।
करूनि प्रबोध । संत पार उतरती ॥ २ ॥

*            *            *            *

बहुतां जन्मांअंतीं । जोडी लाधली हे हातीं ॥ १ ॥
मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ २ ॥

*            *            *            *

आईकें रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा ।
पंढरीचा राणा । मनामाजीं स्मरावा ॥ १ ॥
मग कैचें रे बंधन । वाचे गातां नारायण ।
भवसिंधु जो जाण । येचि तीरीं सरेल ॥ धृ० ॥
सकळ शास्त्रांचें सार । हें वेदांचें गव्हर ।
पाहतां विचार । हाचि करिती पुराणें ॥ ३ ॥
ब्राह्मण क्षेत्री वैश्य शूद्र । चांडाळाही अधिकार ।
बाळें नारी नर । आदी करूनि वेश्याही ॥ ४ ॥
तुका ह्मणे अनुभवें । आह्मीं धांडियेलें ठावें ।
आणिकही दैवें । सुख घेती भाविकें ॥ ५ ॥

मनांत आणालतें प्राप्त होईल. अभ्यासाला असाध्य काय आहे ?

असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥

हरिला शरण जा, त्याचे व्हा, त्याच्या गुणानुवादांत मग्न व्हा, संसाराचा बागूल पळवून लावा. ‘ येचि देहीं येचि डोळां । भोगीं मुक्तीचा सोहळा. ’ हरिनामसंकीर्तनानें भवसिंधु येथेंच आटून जातो, हें आह्मी आपल्या अनुभवानें सांगतों. हरीचें सुख घेणारे आणिक भाविक आहेत तेही हेंच सांगतील. वेदशास्त्रपुराणांचें हेंच सार आहे. नामस्मरणाचा सर्वांना अधिकार आहे. हरिभजनाचें माझें सुख तुह्मी पाहतांना ?

न कळे दिवसराती । अखंड लागलीसे ज्योती ।
आनंदलहरीची गती । वर्णूं किती तया सुखा ? ।

हरिप्रसादानें सर्व दुःखांची हानी होते:—

**हेंचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध ।**
**आणिक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥ १ ॥**
**सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा गोळा**
**पदर लागों नेदी खळां । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र २**

हें जन्ममृत्युभय, आधिव्याधिभय, षड्रिपूंचें भय सर्व प्रकारचीं भयें करून अभय देणारें औषध आहे. सहा शास्त्रें, चार वेद व रा पुराणें यांचें सारसर्वस्व असें हें पांडुरंगाचें श्यामरूप डोत सांठवून घ्या व मुखानें विष्णुसहस्रनामाचे पाठ चालू द्या.

**नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नेदी वारा ।**
**बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥ ३ ॥**

स्वरूपाच्या घरांतून बाहेर पडूं नका, आत्मचिंतन विसरूं , देहबुद्धीचा वारा अंगावर घेऊं नका; वायफळ बोलायचें न द्या व अनात्म्याचा संग करूं नका. प्रपंचाचें दहीं घसळून ल सारभूत हरि तेवढा घ्या.

**ाये अनुतापें पांघरी दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा ।**
**ासिल आधीं होतासि तैसा । तुका ह्मणे दशा भोगी वैराग्य ५**

नुतापाचें स्नान करून अंगांतला आशेचा सारा घाम निघून र्यंत दिशारूपी वस्त्र पांघरून बै ह्मणजे भवरोग पार जाऊन पहिारखा—मूळचा सच्चिदानंदरूप आहेस तसा होशील. ह्मानंसारांत असलास काय आणि नसलास काय तूं मुक्तपणाचा ोहळाच भोगशील—मात्र वैराग्यदशा क्षणभरही सोडूं नकोस! णाला शरण जाऊन प्रत्यहीं आळवीत जा ह्म० 'तो या ील वाटा.' अनुतापपूर्वक देवाला ह्मण:—

**व अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धी ।**
**ी नाहीं आठविलें कधीं । वाचे कृपानिधी मायबापा ।**

नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित ।
नावडे पुराणा बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ २ ॥
नाहीं केला करविला परउपकार । नाहीं दया आली पीडितां फार
करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥ ३ ॥
नाहीं केलें तीर्थांचें भ्रमण । पाळिला पिंड करचरण ।
नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तींचें ॥ ४ ॥
असंगसंगें घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय ।
न कळे हित करावें तें काय । नये बोलूं आठवूं तें ॥ ५ ॥
आपआपणां घातकर । झालों शत्रु मी दावेदार ।
तूं तव कृपेचा सागर । उतरीं पार तुका ह्मणे ॥ ६ ॥

आपल्या सर्व दुष्कृतांचा, अपराधांचा सद्गदित कंठानें पश्चात्ताप-पूर्वक देवापुढें पाढा वाचावा, त्याची करुणा भाकावी, त्याचें साह्य मागावें, त्याला शरणागत व्हावें, झालेले दोष पुन्हां न घडतील याविषयीं सावध रहावें व त्यांतही देवाला आठवावें, गावें, ध्यावें ह्मणजे तो कृपेचा सागर उद्धरील. शुद्धचित्तानें देवाचे गुणानुवाद गावे, संतांच्या चरणां लागावें, दुसऱ्यांच्या गुणदोषांची उठाठेव करूं नये, शरीर कारणीं लावावें—देवाचा प्रसाद जोडण्याचा हा मार्ग आहे.

.... .... .... ....

भवसागर तरितां । कां रे करितसां चिंता ।
पैल उभा दाता । कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥
त्याचे पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी ।
भावा एकासाठीं । खांदा वाहे आपुल्या ॥ २ ॥
भक्तिमुक्तीची चिंता । नाहीं दैन्यदरिद्रता ।
तुका ह्मणे दाता । पांडुरंग वोळलियां ॥ ४ ॥

५ 'आह्मी संसारी लोक, आह्मांला संसार सुटत नाहीं !' सुखा-नें संसार करा पण हरीला न विसरतां नीतिपंथानें जाऊन करा—हरिस्मरणानेंच संसार सुखाचा होतो. 'देवधर्म सांदीं पडला सकळ

विषयीं गोंधळ गाजतसे ' याला काय संसार म्हणतात ? हा पशूंचा संसार, माणसांचा नाहीं ! या संसारांत सुख नाहीं. 'सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वता एवढें ' हा संसाराचा सर्वांचा अनुभव आहे. आईबाप, स्त्रीपुत्र, स्नेहीसोबती, धनवित्त, देशीचा राजा हे कोणी मृत्युपासून सोडवायला समर्थ आहेत काय याचा विचार करा. ' देह मृत्यूचें भातुकें । कळों आलें कवतुकें. '

(१) **धन मेळवूनि कोटी । सवें न ये रे लंगोटी ॥ १ ॥**
(२) **चालिलें सोबती । काय मानिली निश्चिंती ॥ १ ॥**
**काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥ २ ॥**
**कांहीं सावध तो बरवा । करीं आपुला कढावा ॥ ३ ॥**
(३) **देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ॥ १ ॥**
**अजुनि तरी होईं जागा । तुका ह्मणे पुढें दगा ॥ ४ ॥**

याचें स्मरण ठेवून अंतर्यामीं सावध राहून संसार करा.

**जोडोनीयां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करीं १**
**परउपकारीं नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणीमाई ॥२॥**
**भूतदया गाई पशूंचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ३**

याप्रमाणें वागाल तर गृहस्थाश्रम हाच परमार्थाला पोंचविणारा होईल. बरें, असें वागणें कठिण आहे काय ?

**पराविया नारी माउलीसमान । मानिलियां धन काय वेंचे ? १**

परद्रव्याभिलाष, परनिंदा नाहीं करावयाची असें ठरविलेंत तर ' काय तुमचें यास वेंचे सांगा ?' बैसलिया जागीं रामराम ह्मणायचा अभ्यास ठेवलांत, संतवचनांवर विश्वास ठेवलांत, सत्यभाषणाचें व्रत पाळलेंत तर कोणती हानी होणार आहे ?

**तुका ह्मणे देव जोडे याजसाठीं । आणिक ते आटी न लगे कांहीं ६**

संसार करितांना एकमात्र विसरूं नकोस:—

**नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगूर ॥ ३ ॥**
**अंतकाळींचा सोइरा । तुका ह्मणे विठो धरा ॥ ४ ॥**

तुकोबांचा मुख्य उपदेश हा आहे. 'मुख्य उपासना सगुणभक्ती' संबंधानें मागें (पृ. ३९७) विस्तृत विवेचन झालेंच आहे. वस्तुतः तुकोबांचे सारे अभंग हीच मेघवृष्टि आहे, ह्या अमृताच्या सरी अंगावर घेऊन कृतार्थ होण्याचा प्रत्येकानें मार्ग शोधावा, देव, संत आणि नामस्मरण 'देव भक्त आणि नाम'—याविषयीं तुकोबांचे उपदेश आपण मागें अनेकवार ऐकले आहेत तेव्हां त्यांची पुनरुक्ति येथें न करितां सर्वसामान्य व्यवहारनीतिसंबंधानें विविध प्रकारच्या लोकांना त्यांचे उपदेश कशा प्रकारचे आहेत हें आपण पाहूं.

६ निष्काम भक्तीचा डांगोरा पिटण्यासाठीं तुकोबांचा अवतार व तो पिटतांना भक्तिविरोधी लोकांचा व मतांचा त्यांना समाचार घ्यावा लागला इतकेंच काय पण भक्तिपंथांतलीं अनेक सोंगेंढोंगेंही त्यांना उखडून काढावीं लागलीं. भक्तपंथानें जातों म्हणणाऱ्यांतही कैक अभिमानी, विषयासक्त, अनाचारी, पोटपुजे, दांभिक लोक होते. त्यांना शुद्धभक्तीचा मार्ग दाखविणें जरूर झालें, व तो दाखवितांना त्यांच्यांतल्या दोषांचा त्यांनीं निषेध केला.

**देवाचे ह्मणोनी देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ १ ॥**
**आतां येरां जनां म्हणावें तें काई । जया भार डोई संसाराचा॥२॥**

देवाचे भक्त ह्मणवितात; पण देवाचा आदर कसा ठेवावा, तेथें हात जोडून नम्रतेनें कसें वागावें, देवासमोर गलबल न करितां त्याची पूजाअर्चा व भजनपूजन शुद्धभावानें व लीनतेनें कसें करावें, उत्तम उत्तम वस्तु देवाला कशा वहाव्या, देवापुढें जातांना तरी मनांतले मलिन विचार दूर करून अंतर्बाह्य शुचिर्भूत होऊन कसें जावें, या साध्या गोष्टीही यांना कळूं नयेत हें मोठें आश्चर्य आहे ! कीर्तन पुराणांत जेठा मारून गप्पासप्पा झोडणें, मोठ्यानें बोलणें, संतांच्या आदरांत कुचराई करणें, तोंड रंगवून किंवा अशुचि स्थितींत देवासमोर जाणें, पूजनाला कुचक्या सुपाऱ्या ठेवणें,

हलके तांदूळ व वाशेरें तूप होमहवनाला आणणें, इ० असंख्य प्रकार जाणून नेणून लोक करीत असतात ! देव पाहिजे तर मग चित्त अशुद्ध कां ठेवतां? अभिमान, ताठा, आळस, लज्जा, बुद्धीचें चांचल्य, वर्तनाची सदोषता, मनाचें मालिन्य ही सर्व घाण देवाचे भक्त म्हणविरांनीं तरी दूर करायला नको काय? केवळ बाह्य वेषानें कोणी भक्त होतो काय ?

जळालें तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडलियां ॥ १ ॥

चिरगुटें घालून पोट वाढविलें, गर्भारपणाचा बोभाट केला, लटके डोहळे दाखविले, पण 'दूध स्तनीं पोर पोटीं नाहीं' तर या बाह्यात्काराचा उपयोग काय? जनांत फजीती मात्र होते !

इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं नाम म्हणोनि काई ? ।
जेवी माशीसवें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥

* * *

पिंड पोसावें हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करोनिया ॥ १ ॥
क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळों सत्ता नाहीं हातीं ॥२॥

एवढाही विचार मनांत नसावा ? शुकजनकांसारखे अत्यंत विरक्तपणानें वागले म्हणूनच त्यांस थोर लाभ झाला नां? सर्व संसारविषयक आशा व वासना यांचा त्याग केल्याशिवाय देव मिळणार नाहीं.

आशा ही समूळ खणोनी टाकावी । तेव्हांची गोसावी व्हावें तेणें
नाहीं तरी सुखें असावें संसारीं । फजीती दुसरी करूं नये ॥ २ ॥

हरीशीं योग पाहिजे तर आशेचें आधीं शून्य करावें.

लोभावरी ठेवूनि हेत । करी असत्य न्यायनीत ।
त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥ २ ॥

* * * *

अभिमानाचें तोंड काळें । बळें दावी अंधार ॥ १ ॥
लागलीसे पाठीं लाज । झालें काज नासाया ॥ २॥

दंभ, आशा, तृष्णा, अभिमान, भजन करण्याची लाज इ० दोषांपासून देवाचे म्हणविणारे तरी दूर राहिले पाहिजेत ! मनापासून ज्यांना देव पाहिजे त्यांनीं आपलें प्रेम संभाळून रहावें, प्रतिष्ठेला विष्ठे सारखें मानावें, नस्त्या वादांत पडूं नये, अहंकारी तार्किकांच्या संगा-पासून दूर रहावें व कसल्याही ढोंग धतुऱ्याचे पोकळ फुगे उभारूं नयेत

सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥ १ ॥
शुद्धभावाविण । जो जो केला तो तो शीण ॥ २ ॥
तुका ह्मणे कळे । परी होताती आंधळे ॥ ३ ॥

* * * *

बहुतां छंदांचे बहु असे जन । वाटों नये मन त्यांच्या संगें ॥ १ ॥
करावा जतन आपुला विश्वास । पाहों नये वास आणिकाची ॥२॥

* * * *

राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सांपडे ॥ १ ॥
तुका ह्मणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ॥ २ ॥

देवभक्तानें वादाच्या फंदांत पडूं नये, सर्वरसांत मिळून जावें आपला हरिचरणीं विश्वास बळकट धरावा. कुचर दाणा अन्नाच्या परिपाकांत जसा मिळून जात नाहीं त्याप्रमाणें अविश्वासी न भक्तांच्या मेळ्यांत समरसता पावत नाहीं !

करावी तें पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ?॥१॥
कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा अंगीं ॥२॥

पूजा अवश्य करावी पण बाह्य डंभ माजवूं नये. हरिप्रेम अंतरंगा पासून असलें पाहिजे.

भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥

* * * *

नये नेत्रीं जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥ १ ॥
तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥ ध्रु० ॥

न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥ २ ॥
तुका ह्मणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ३ ॥

नेत्रीं प्रेमाश्रु वाहत नाहींत, अंतरीं कळवळा नाहीं, परमात्मा सन्मुख झाला नाहीं, तोंवर त्याच्या गोष्टी दुसऱ्याला सांगणें व्यर्थ आहे. हे चावटीचे बोल क्षणभर जनरंजन करितील, पण स्वामी सादर झाला नाहीं तोंवर यांचा कांहीं उपयोग नाहीं. 'अनुभव येथें पाहिजे साचार.' अहंता गळाली पाहिजे, भावावीण पाठांतर वांझें आहे, म्हणून हरिचरणीं निष्ठावंत भाव धरा.

सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा

अशी देवधर्मगुरूंची आज्ञा निष्ठेनें पाळून खरोखर देवाचे व्हा. ज्ञानजड व तार्किक यांपेक्षां अडाणी पण भाविक माणसें पत्करलीं! 'एक परी बरें वेडें । तार्किक कुडें जळो तें.'

तुकोबांच्या कीर्तनाला व दर्शनाला येणाऱ्या लोकांत बहुतेक भरणा संसारिकांचाच असे यांत नवल नाहीं. तुकोबांनीं प्रपंचाची होळी केली, नाथांचा संसार अनुकूल भार्येच्या संगतींत सुखाचा झाला, व समर्थ प्रपंचांत पडलेच नाहींत. हे तीनही महात्मे विरक्त होते. तिघेही अंतस्त्यागी होते, बाह्यसंगाचा विचार केव्हांही गौण आहे. पण बहुजनसमाज यांच्या कोटीचा कोठून असणार? बायकापोरें, घरदार, उद्योगधंदे यांत गुरफटलेले शेंकडा शंभर लोक, अपवाद विरळ! तेव्हां या महात्म्यांनीं जग आहे असें घेऊन त्यांना उपदेश करावा यांत नवल नाहीं. संसार सुखानें करा पण देवाला विसरूं नका, हरि हरि ह्मणा व सदाचारानें रहा, वेदशास्त्रपुराणोक्त धर्माप्रमाणें चाला, यापेक्षां त्यांना सामान्य उपदेश काय करितां येणार? देवासाठीं सर्वस्वाला आंचवण्याची तयारी पूर्वपुण्याशिवाय होत नसते. आतां तुकोबांनीं लोकांना परोपरीनें बोध कसा केला, कधीं आळवून व कधीं कठोर बोलून त्यांना सावध कसें केलें, रूढांवरून

उखडलेली समाजाची गाडी धर्मनीतीच्या मार्गाला कशी लावली, त्यांचीं सदोष आचरणें त्यांनीं सुधरावें ह्मणून निर्भीडपणें त्यांच्या पुढें कशीं मांडलीं व वेळोवेळीं देव, धर्म व संत यांविषयीं त्यांच्या चित्तांत प्रेम उत्पन्न करण्याची कशी शर्थ केली हें आपण पाहूं.

आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥१॥
देह हें देवाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ॥ २ ॥
देता देवविता नेता नेवविता । तेथें याची सत्ता काय आहे ॥ ३ ॥
निमित्ताचा धनी केला असे प्राणी । माझें माझें ह्मणोनि व्यर्थ गेला
तुका ह्मणे कांरे नाशिवंतासाठीं । देवासवें आटी पाडितोसी॥५॥

शाहणा असशील तर हें एकच वचन तुला पुरें आहे. चंचळचित्ताच्या मागें न जातां 'आवडीनें गाई सर्वकाळ.' नामापरतें जगीं सुलभ साधन नाहीं या निश्चयाचा मेरु हो. सर्वांना हात जोडून हाच उपदेश आहे कीं 'आपुलालें चित्त शुद्ध करा.'

हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन शुद्ध भावें ॥१॥
तुका ह्मणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील॥२॥

कथापुराण ऐकतां याला झोप येते आणि खाटेवर पडतां हा संसाराची चिंता तळमळ करीत जागतो! 'ऐसी गहन कर्मगती । काय तयासी रडती?' हेंच जागरण व चिंता हरीकडे कां लावीत नाहींस. काय तुला इंद्रियें नाहींत? देवानें दिलीं आहेत ना?

मुखीं वाणी कानीं कीर्ती । डोळे मूर्ती देखाया ॥ २ ॥
तुका ह्मणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥ ४ ॥

* * * * *

संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥ १ ॥
हागों जातां दगड सांची । अंतरींही संकल्प ॥ ध्रु० ॥
लाज तेवढी नारायणीं । वांकडी वाणी पोरापें ॥ २ ॥
तुका ह्मणे बेशरमा । श्रमांवरी पाडिभरू ॥ ३ ॥

अशा अत्यंतासक्त संसारिकाला तुकोबा उपदेशितात:—

हरीच्या जागरणा । कांरे जातां नये मना ॥ १ ॥
कोठें पाहसील तुटी । आयुष्य वेंचे फुकासाठीं ॥ ध्रु० ॥
ज्याची तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ॥ २ ॥
तुका ह्मणे बरा । लाभ काय तो विचारा ॥ ३ ॥

* * * *

परद्रव्य परनारीचा अभिलाष । तेथोनियां ऱ्हास सर्व भाग्या ॥१॥
स्त्रिया धन बहु खोटें । नागवले मोठे मोठे ॥
ह्मणोनि हे सांडा दोनी । सुख पावाल निदानीं ॥

हा उपदेश तुकोबांनीं बहुत ठिकाणीं केला आहे. स्वस्त्रीच्या छंदानें नाचून लंपट स्त्रैण होऊं नये व परस्त्रीचा विटाळ धरावा—ह्मणजे संसार उदासीनतेनें करून सर्व लक्ष परमार्थाकडे लावतां येतें. संसारांतही कार्याकारण विधिपालनापुरता स्त्रीसंबंध जो ठेवील त्याच्याच हातून कांहीं पुरुषार्थ होईल. 'स्त्री राखावी जैसी दासी' असें तुकोबांनीं एके ठिकाणीं याच अर्थानें ह्मटलें आहे. भागवतांतही स्त्री आणि स्त्रैण यांचा संग हानिकर आहे ह्मणून सांगितलें आहे.

विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥

विषयीपणा पुरुषांच्या व स्त्रियांच्या उभयतांच्या हितास मारक आहे.

* * * *

अहिंसेवर तर भागवतधर्माचा मोठा भर आहे. वारकऱ्यांत कोणी मांसाहारी मिळायचाच नाहीं, असल्यास तो लबाड चोरटा समजावा. भूतीं भगवंत पहा ही तर संतांची मुख्य शिकवण आहे. 'भूतमात्रीं हरीवीण । न पाहेचि दूजेपण' ही पायरी पोंचली पाहिजे तर हिंसा सुतरां त्याज्य समजली पाहिजे. 'धिक् तो दुर्जन नाहीं भूतदया' हा अभंग पहा. सर्व जीव आपल्या प्राणासारखे जो मानीत नाहीं त्या चांडाळाला काय ह्मणावें ?

तुका ह्मणे सुखें कांपीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥

सेंदऱ्या दैवतांपुढे नवस फेडण्यानिमित्त अगर पोटासाठीं—

आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥ १ ॥
करिती बेटे उसनवारी । यमपुरी भोगावया ॥ २ ॥

जीवें जीव नेणे पापी सारिखाची । नळी दुजियाची कापूं बैसे ॥
आत्मा नारायण सर्वांघटीं आहे । पशूंमध्यें काय कळों नये ? ॥
देखत हा जीव हुंबरे वरडत । निष्ठुराचे हात वाहती कैसे ? ॥ ३ ॥

अशा चांडाळाला आपण पुढील जन्मासाठीं एक वैरी करून ठेवीत आहोंत हें देखील कळत नाहीं !

मांस खातां हौस करी । जोडुनि वैरी ठेविला ॥ १ ॥
पुढिलासाठीं पाजवी सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ २ ॥
तुका ह्मणे फुटती हाडें । आपुल्या नाडें रडतील ॥ ३

* * * *

कन्या, गाय आणि हरिकथा यांचा विक्रय करून नरकाला जवळ करणारे जे अधम आहेत त्यांचा तुकोबांनीं धिक्कार केला आहे. ‘ गायित्री विकोनी पोट जे जाळिती, कन्येचा जे नर करिती विकरा, व नाम गाऊनियां द्रव्य जे मागती’–ते जाती अघोरा नरकपाता व आह्मांसी संगती नलगे त्यांची ! त्यांना तुकोबांनीं सुणें ह्म. कुत्रें ह्मटलें आहे, चांडाळ ह्मटलें आहे. ‘ साळंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान ’ हें आपलें शास्त्र सांगत असतांना जे कन्येचा विकरा करितात, गाईचें पाळण हा आपला धर्म असतांना जे तिच्या विक्रीवर पोट जाळतात, हरिकथामाउलीचा व नामामृताचा जे विक्रय करितात ते अधमाधम होत.

* * * *

स्त्रीवर्गाला तुकोबांचा सामान्य बोध एवढाच असे कीं त्यांनीं पतिव्रता धर्मानें चालावें; शील संभाळावें; धर्मकार्यांत पतीला अनुकूल वागावें; सडासंमार्जन, तुळशीची व गाईची पूजा, पाहुण्यांचें आगत्य, ब्राह्मणांचा सत्कार, कीर्तनश्रवण हे सर्व करून घर स्वच्छ व शांत ठेवावें; हरिभजनानें आपला गळा उगवून घ्यावा व मुलाबाळांना हरिभजनाचें वळण लावावें. ‘ जातीची

शिंदळी ' या अभंगांत ' तुका ह्मणे अस्सल जाती । जातीसाठीं खाती माती ' असा चरण आहे, ह्म० कुलवती स्त्री आपली शुद्धता राखण्यासाठीं मरून जाईल पण भ्रष्टपणा करणार नाहीं !

स्त्री शांत समाधानी असावी हें सांगतांना कोपिष्ठ स्त्रीचें वर्णन करितात:—

जळो तिचें तोंड । ऐसी कां ते व्याली रांड ॥ १ ॥
सदां भोंवयांसी गांठी । क्रोध घडघडीत पोटीं ॥ ध्रु० ॥
फोडिली गोवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥ २ ॥
तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ३ ॥

' पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण ' या दृष्टांतद्वारें सतीचें मुख्य व्रत पातिव्रत्य हेंच सांगितलें आहे. तुकोबांनीं स्वस्त्रीस जो पूर्ण बोध केला आहे त्याचा विचार पुढें होईलच, पण—

सडासंमार्जन तुळशीवृंदावन । अतीथिपूजन ब्राह्मणांचें ॥
वैष्णवांची दासी होईं सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥
आपुला तूं गळा घेईं उगवोनी । चुकवीं जाचणी गर्भवास ॥
किंचित हें सुख टाकी वो थुंकोनी । पावशील धणी परमानंद ॥

ही चारचरणी गळसरी सर्व स्त्रियांनीं तुकोबांचा प्रसाद म्हणून नित्य गळ्यांत घालावी !

* * * *

बाइल्या नवरा, जारिणी स्त्री व गुर्वाज्ञाभंग करणारे कुपुत्र यांनाही तुकोबांनीं तुच्छ केलें आहे. ज्याची बाईल ' आपलीच करवी सेवा । पूजवी देवासारिखें ' अशी वरचढ असेल नवऱ्याला ' हातसोका कुतरा ' करीत असेल व हाही ' गाढव पशु ' बनून कामांध होऊन तिच्या भोंवतीं फेऱ्या घालीत असेल व तिच्या छंदानें जिवलगांना दूर करीत असेल तर तो आपल्या आयुष्याचा व्यर्थ नाश करून घेतो—

**बाईले आधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या दर्शनें पडिजे द्वाड ॥**
**कासया ते जंत जिताति संसारीं । माकडाच्या परी गारोड्याच्या ॥**

बाईलेच्या मिष्ट भाषणाला भुलून कामी पुरुष आप्तेष्टांचा कसा त्याग करितो हें त्यांनीं ३।४ अभंगांत विनोदी भाषेनें सांगितलें आहे!

एक लाडकी बायको आपल्या नवऱ्यास म्हणते, ' काय करूं हो मला अन्न जात नाहीं. तीन सांजा मिळून सारे पायलीभर गहूं लागतात ! परवा तुह्मीं साखर आणलीत पण सात दिवसांत अवघी दहा शेर खपली ! पोटाची व्यथा म्हणून दूध भात खाऊन व तूपसाखर पथ्याला घेऊन मी कसे तरी दिवस काढतें! 'नीज नये खालीं घाली फुलें । जवळी न साहातीं मुलें ' पोरें सांभाळा म्ह० मला जरा झोंप तरी येईल. कपाळशूळाची व्यथा ह्मणून चंदनाची उटी लावावी लागते ! तुह्माला कशाला माझी माया असेल ? ' हाड गळोनि आलें मांस ' अशी माझी दुर्दशा झाली आहे !

**तुका म्हणे जिता गाढव केला । मेलियावरी नरका गेला ॥**

कामी पुरुषाचे कान त्याची वरचढ बायको कसे भरवते व एकत्र नांदणाऱ्या घरांत फूट पाडते हें ' भ्रतारासी भार्या बोले गुजगोष्टी। मज ऐसी कष्टी नाहीं कोणी ' या अभंगांत पहा. तुमची आई, जावा, दीर, दुष्टवृत्ति नणदुली, साऱ्यांनीं कसा माझा छळवाद मांडला आहे, ' नांदो कोण्याखालीं आतां ' हें तरी सांगा !

**ढाकतें ठमकतें जीव मुठी धरोनी । परी तुह्मी अजुनी न धरा लाज॥**
**वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥ ९ ॥**

लाडकी बायको इतकी निकराला आल्यावर तो कामाचा अंकित असा मूढ बाइल्या नवरा म्हणतो ' तू दुश्चित होऊं नकोस, तुझ्यासाठीं मी मायबाप बंधु बहीण यांचा उद्यां त्याग करतों पहा':—

**वेगळे निघतां घडीन दोर चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥५**

तुला ताईत, सांकळी, गळांची दुलडी, बाजुबंद सर्व करितों.

**तुका म्हणे केला रांडेनें गाढव ॥ मनासवें धांव घेतलीसे ॥ ९ ॥**

बाइल्या पुरुषाचें जिणें व्यर्थ होय. त्याला 'परलोक मान नाहीं दोन्ही' ह्म० प्रपंचांत किंवा परमार्थांत त्याच्या हातून कांहींच पुरुषार्थ होणार नाहीं. हिंदुसमाज प्राचीनकालापासून अविभक्त कुटुंबपद्धतीला मान देणारा आहे. आईबाप, बहीणभाऊ, दीरजावा, नणदा, पहीपाहुणे,अतिथि यांनीं घर गोकुळासारखें गजबजलेलें असणें हें आपण संसारांतील मोठें भाग्य मानतों. घरांतला एक पुरुष बाइल्या निघाला कीं तो घराण्याची इभ्रत, डौल, बस घालवितो, परंपरा मोडतो, वडिलांची रीत नष्ट होते, कुळधर्म कुळपरंपरेला धक्का बसतो व हें अनिष्ट आहे ह्मणून तुकोबांसारखे समाजनायक बाइलेपणाचा धिक्कार करितात हें योग्यच आहे. 'मिठ्या बिब्बी'चा तुटपुंजा संसार बहुधा धर्महीन होतो.

**बाइल सवासीण आई । आपण पितरांचे ठायीं ॥ १ ॥**
**थोर वेंच झाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥ २ ॥**

लाडकीला श्रम होतील ह्मणून देवधर्म, श्राद्धपक्ष सर्वांना काट देऊन हा लंड बनतो. पक्ष आला कीं बायको आईच्या ठिकाणीं व हा पितरांच्या ठिकाणीं होऊन दोघे यथेच्छ मिष्टान्नावर ताव मारतात व कांहीं करीत नाहीं ! या नष्टाचा खर्च होतो ! श्राद्धपक्षांतच आपण अपसव्य करितों, पण याच्या सर्वच चेष्टा अपसव्य, डाव्या, धर्महीन, त्याज्य चालत असतात. देवलंड, धर्मलंड, संतनिंदक अशांचा तुकोबांनीं धिक्कार केला आहे !

* * * *

पर्वकाळीं भटजोशी घरीं आला तर त्याला विन्मुख जाऊं देणें, एकादशीस यथेच्छ जेवणें, ब्राह्मणाला खांडही न देतां राजद्वारीं मात्र नटून जाणें, कीर्तन डावलून सोंगट्या खेळणें किंवा नटांचे खेळ व नाच पहाणें, संतांची हेळणा—निंदा करणें व भेटतां कुचरपणानें अंग चोरणें, गाईची सेवा न करितां घोड्याची चाकरी

करणें, दारीं तुळशीवृंदावन न ठेवणें, देवाची पूजा व अतिथिसत्कार न करतां पोटभर जेवणें, दाराशीं भिकारी ओरडत असतां त्याला गोळाभर अन्न न देणें, कन्याविक्रय करणें, बाईलीला कथेस जाण्यास प्रतिबंध करणें इ० अनेक धर्मलंडपणाच्या कृत्यांचा तुकोबांनीं अत्यंत कडक शब्दांनीं निषेध केला आहे. पतित, दुराचारी, दांभिक कोठेंही आढळला कीं त्याला ठोकायला तुकोबांनीं कमी केलें नाहीं. ब्राह्मणांतही जे दुराचार, ढोंगें, लबाड्या, दुष्टपणाचे प्रकार त्यांना आढळले त्यांवरही त्यांनीं यथान्याय कोरडे ओढले आहेत, व त्याबद्दल कोणाही सद्ब्राह्मणाला बिलकूल विषाद वाटत नाहीं, व वाटेल तर तो ब्राह्मणच नव्हे. दोष कोणाचेही असले तरी ते निंद्यच होत. ' उत्तम कुळीं जन्म क्रिया अमंगळ ' अशा खिस्तीचा व्यापार करणाऱ्या ब्राह्मणांचा, अंत्यजांच्या घरीं जाऊन त्यांची खिचडी मागून खाणाऱ्या व त्यांशीं देणें घेणें करितांना त्यांचा थुंका तोंडावर घेणाऱ्या आणि गलिच्छ शिव्या देणाऱ्या, स्वाचारविन्मुख ब्राह्मणांचा त्यांनीं सडकून समाचार घेतला आहे. तुकोबांनीं जे प्रहार केले आहेत ते दुर्गुणांवर आहेत, जातींवर नव्हेत हें विसरूं नये. ब्राह्मणांविषयीं तुकोबांचा आदर होता हें त्यांच्या शेंकडो उद्गारांवरून स्पष्ट दाखवितां येईल. धर्मकर्मांत ते ब्राह्मणांना अग्रपूजेचाच मान देत व सर्व जातींनीं ब्राह्मणांचें धर्मगुरुत्व सांभाळावें असा त्यांचा उपदेश आहे, हें कोणाही ' सत्य ' शोधकास सहज कळून येणार आहे. जाति देवानें केल्या आहेत व सर्व जाति नारायणाच्याच आहेत असें त्यांनीं म्हटलें आहे. ' द्विजा नमस्कारितां मनीं नाहीं भाव ' आणि परधर्मीयांशीं मात्र वागतांना ' तुर्काचे दासीचा लेक जैसा ' अशाप्रकारें त्यांनीं ब्राह्मणविरोधी व ब्राह्मणविद्वेषी जनांचा धिक्कार केला आहे.

७ संसारी जीवांना ' हरीला भजा व सदाचारानें रहा ' असा

बोध करितांना तुकोबांनीं हरिभजनाचें मिष करून दुराचार पिक-वणाऱ्या दांभिकांचा दंभस्फोट अगदी निर्भीडपणानें केला आहे. सरळ मार्ग सांगतांना कंटकांना दूर करावें लागतें, आणि असे कंटक केवळ संसारी जीवापेक्षां परमार्थाचें सोंग पांघरणाऱ्या व कोणत्या तरी मिषानें उपदेशक व गुरु म्हणून पुढें येणाऱ्या लोकां-तच अधिक सांपडतात! देवऋषी, भगत, जोगी, मौनी, मानभाव, शाक्त, नाथपंथी, बैरागी, गोसावी, अतित्यायी, साधक, भिक्षाव्य-वसायी, वितंडवादी वगैरे बहुरूपी बहिरंगी लोकांना त्यांनीं खूप झोडलें आहे. या नानाविध पंथांत जीं ढोंगेंसोंगें बोकाळलीं होतीं, फसवेगिरी माजली होती, त्या सर्वांवर तुकोबांनीं स्पष्ट कोरडे ओ-ढले आहेत. त्यांना ' सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ' असें सांगून, 'तुका ह्मणे ऐसे मायेचे मईंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं' म्हणून या पोटभऱ्या 'संतांच्या' नादीं लागन फसूं नका असें त्यांनीं जनतेस वारंवार बजावलें आहे. हे लोक तर असोतच, पण अब्रूदार व समाजांत बऱ्याच मान्य असलेल्या कीर्तनकार, पुराणिक, गुरु, कवि, विद्वान्, संत या वर्गांतही जो जो खोटेपणा त्यांना आ-ढळला तो तो त्यांनीं चव्हाट्यावर आणला आहे! या उपदेशक वर्गाचा समाजाला उपयोग आहे, जरूरी आहे ह्मणून त्यांविषयीं लोकांचा पूज्यभाव असतो; पण म्हणून तर यांनीं अगदीं निमळ व निर्दोष राहिलें पाहिजे. पण ही जाणीव, कळकळ व सत्यानिष्ठा फार थोड्या लोकांत असते. बहुधा यांत बाजारीच फार सांपडतात; म्हणून तुकोबांनीं त्यांना सोंगाडेपणा टाकून द्या, हरिप्रेम जिव्हा-ळ्याचें धरा, सदाचार सोडूं नका असा उपदेश केला आहे. आपण थोडेसे मासले पाहूं. कीर्तनसंप्रदायाविषयीं तुकोबांची अत्यंत प्रीति, ह्मणून कीर्तनांत कोणी ढोंगी हरिदास असूं नयेत असें त्यांना स्वा-भाविक वाटे. पोटासाठीं कीर्तन करूं नये, कीर्तन हा धंदा करूं

नये, ' तुका ह्मणे द्रव्य देती घेती । तेही दोघे नरका जाती ' असा तुकोबांचा कडक निर्बंध आहे. कीर्तनकार व पुराणिक हे समाजाचे गुरु आहेत, यांनीं निर्लोभ व निर्दंभ होऊन लोकांस हरिभक्ति व सदाचार शिकवला पाहिजे, बोलल्याप्रमाणें वागलें पाहिजे. हरिदास, पुराणिक, पंडित, शास्त्री, गुरुत्व मिरविणारे, संतपणानें वावरणारे, वेदज्ञ, कर्मठ, जपी, तपी, संन्यासी या सर्वांस तुकोबांचें खडखडित सांगणें असे कीं "ढोंगधत्तुरे करून लोकांस लुबाडूं नका, इंद्रियांचा जय करून तीं आधीं स्वाधीन करून घ्या, तुह्मी स्वतः न्यायनीतीनें व रहणीनें चाला, बोलण्याप्रमाणें तरी चाला, पोटभरी विद्या आणि परमार्थ यांचा काला करूं नका, स्वतःस फसवूं नका व लोकांस वंचूं नका, निष्काम भजनानें हरीला जोडा व मग निष्कामबुद्धीनेंच त्याचे मनांत व जनांत गुणानुवाद गा, ज्ञानाचा अधिक आव आणून दंभ माजवूं नका, सगुणभक्ती किंवा उपासना करा व ती सिद्ध झाल्याशिवाय अद्वैतज्ञानाच्या गोष्टी लोकांस सांगून ठकवूं नका, तुह्मी स्वतः तरा व जनांस तारा " हा उपदेश तुकोबांनीं कोठें सौम्य शब्दांनीं व कोठें कठोर शब्दांनीं पण सर्वत्र अत्यंत कळकळीनें केला आहे.

**आधारावांचुनी । काय सांगसी काहणी ॥ १ ॥**
**ठावा नाहीं पंढरिराव । तोंवरी अवघेंचि वाव ॥ ध्रु० ॥**
**मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥**

* * * *

**अद्वैतीं ता नाहीं बोलाचें कारण । जाणिवेचा शीण करिसी वाया ॥**
**गासी तरी एक विठ्ठलचि गाई । नाहीं तरि ठायीं राहे उगा ॥ १ ॥**

अद्वैत हा विषय सांगायचा नाहीं, स्वतः होऊन जायचा आहे. ग्रंथांचे आधार देऊन, पांडित्य मिरवून अद्वैत प्रतिपादन केलें तरी त्याचा श्रोत्यावक्त्यांना कांहीं लाभ नाहीं. हरीचें नामस्मरण करावें,

देवाला भजावें यांत तूं मार्गाला तरी लागशील, उगीच वरच्या गोष्टी सांगून वाचा शिणवणें योग्य नाहीं.

**रामकृष्ण नामें उच्चारीं सरळें। आठवी सांवळें रूप मनीं।**

शांति, क्षमा, दया हे अळंकार अंगावर घाला, नारायणाचें भजन करा, कामादि षड्ऊर्मी जिंका ह्मणजे अंगानें ब्रह्म व्हाल. ब्रह्माच्या गोष्टी सांगन कोणी ब्रह्म होत नाहीं, लोखंडाचे चणे खावे लागतात तेव्हांच ब्रह्मपदीं नाचायला मिळतें!

**तुका ह्मणे जैसी लांचासाठीं ग्वाही। देतील हे ठावी नाहीं वस्तु॥**

लांचासाठीं साक्ष देणाऱ्या लोभ्यांप्रमाणें सांगोवांगीचें ब्रह्मज्ञान काय कामाचें? आधारावांचून बोलण्यांत रसस्वार्थ नाहीं.

**ब्रह्मज्ञानाची सरोभरी। पुढीला सांगे आपण न करी॥ १॥**
**थू थू त्याच्या तोंडावरी। व्यर्थ शिणवी वैखरी॥ २॥**
**लावी अनुसंधान। कांहीं देईल ह्मणऊन॥**
**अवघें पोटासाठीं ढोंग। तेथें कैचा पांडुरंग॥**

* * * *

आपल्या मतीनें प्रसाद चिवडणारे व 'सोन्याशेजारीं तों लाखेची जतन' या न्यायानें प्रासादिक कविवचनांच्या शालजोडीला आपलीं ठिगळें लावणारे 'कवीश्वर'—

**उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा। दाखविती कळा कवित्वाची॥**

अशा कवींना व त्यांच्या वाचकांना 'काय हातीं लागे भुसाचे कांडणीं' असें तुकोबांनीं विचारावें! त्यांनीं काकळुतीनें ह्मणावें—

**सेव्यसेवकता न पडतां ठावी। तुका ह्मणे गोवी पावती हे॥**

उपासनेचा रंग यांना ठाऊक नाहीं तोंवर हे शब्दचावटींत असेच गुंतून रहायचे! हरीचा प्रसाद जोडावा, स्वानुभवी संतांच्या ग्रंथांत रमून आपली हृदयग्रंथि उकलावी हा प्रांजळ मार्ग सोडून 'कवि' ह्मणून हे लोक कां पुढें येतात कोण जाणे!

**घरोघरीं झाले कवी । नेणे प्रसादाची चवी ॥ १॥**
**काढावें आइतें । तेंची जोडावें साहितें ॥ २ । ।**

तुकोबांच्या वेळीं सालोमालो ह्मणून एक चोरटे 'कवि' होते ! त्यांनीं तुकोबांच्या अभंगांतील त्यांचें नांव काढून आपलें नांव घालावें व ही माझी कविता ह्मणून लोकांस भासवावें ! तुकोबांनीं त्या चोरट्या ठक कवीचा ९ अभंगांत स्पष्ट निषेध केला आहे.

**मोडुनी संतांचीं वचनें । करिती आपणां भूषणें**
**तुका ह्मणे कवी । जगामध्यें रूढी दावी ॥**

* * * *

तरुण काय किंवा पोक्त काय पण विद्वानांकडे पहावें तर जो तो ताठ्यानेंच चालतो व साधुसंतांच्या टवाळ्या करण्यांत आपल्या विद्वत्तेची सार्थकता मानीत आहे !

**विद्या अल्प परी गर्वशिरोमणी । मजहूनि ज्ञानी कोण आहे ?॥ १**
**अंगीं भरला ताठा कोणाचें मानीना । साधूची छळणा स्वयें करी॥२**
**तुका ह्मणे ऐसे मायेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥३॥**

पण हे मायेचे मैंद मानाचे अभिलाषी असले तरी 'मान इच्छी तो अपमान पावे' या न्यायानें त्यांना मान तर मिळत नाहींच, पण अल्पविद्येच्या ताठ्यांत व तोऱ्यांत राहून व संतनिंदा करून हे अपमान पावतात. गुरुपणाचा धंदा करणारे पोटपोशे लबाड तुकोबांच्या वेळीं होतेच तुकोबांना भ्रष्टपणा अनाचार खपत नव्हता:—

**गुरुमार्गामुळें भ्रष्ट सर्वकाळ । ह्मणती याती कूळ नाहीं ब्रह्मीं ॥१॥**
**पावित्र्याला ह्मणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका**
**नसता करुनि होम खाती एके ठायीं । ह्मणती पाप नाहीं मोक्ष येणें**
**नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणें । उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥७॥**
**तुका ह्मणे ऐसे गुरुशिष्य पूर्ण । विठोबाची आण नरका जाती॥८॥**

दाटून उपदेश देती, रांडापोरांतें गोविती, वर्षासन लाविती, निरूपणीं बोलती तैसी करणी न करिती, अशा मोंदू गुरूंचे व खोटा

संतपणा मिरवणाऱ्या दांभिकांचे तुकोबांनीं सडकून कान उपटले आहेत !

**ऐसे पोटभरे संत । तयां कैचा भगवंत ॥ १ ॥**

परस्त्री, मद्यपान, असत्य, दंभमान यांच्या पाठीस लागून परमार्थाचीं दुकानें मांडणारे पुरुष ' पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ! ' वेदांती, गुरु व संत म्हणविणाऱ्या लोकांत कित्येक बोकड असतात व अद्वैताचा दुरुपयोग करून विषयवनांत ते पशूंसारखेच चरतात !

**विषयीं अद्वय । त्यांसीं आम्हां सिवों नये ॥१ ॥**
**देव तेथूनी निराळा । असे निष्कम वेगळा ॥ २ ॥**
**वासनेची बुंथी । तेथें कैंची ब्रह्मस्थिती ? ॥ ३ ॥**

* * * *

**जगीं कीर्ती व्हावी । ह्मणोनि जालासी गोसावी ॥ १ ॥**
**बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलेसें दूर ॥ २ ॥**
**चित्तीं नाहीं अनुताप । लटकें भगवें स्वरूप ॥ ३ ॥**
**तुका म्हणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ४ ॥**

विद्वानांत नाना मतें, नाना तर्क, नाना पंथ असतात, पण अनुतापयुक्त होऊन भगवंताच्या कांसेला लागणारे विरळा !

**शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥१॥**
**पंडित हे अर्थ कारितील कथा । न मिळती अर्थी निजसुखा ॥ २ ॥**

* * * *

**उदंड शाहणे होत तर्कवंत । परि या नेणवे अंत ।                ॥**
**उदंड अक्षरां करोत भरोवरी । परि ते नेणवे थोरी विठोबाची॥२॥**

* * * *

**नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ती । पाठांतरें होती वाचाळ ते ॥१॥**
**माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ? ध्रु०**
**यज्ञ याग जपतप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान ऐलीकडे ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ॥ ४ ॥**

नुसतें शाब्दिक ज्ञान, अहंकारी ज्ञान, देहबुद्धि कायम ठेवणारें ज्ञान प्रेतावरच्या अलंकारासारखें व्यर्थ होय ! वेदवाणी शोधा, त्याचीं वांजट बोलणीं सारून सार ग्रहण करा, वेदीं सांगितलें तें करा, शास्त्रार्थ पहा पण त्यांचें वर्म समजून घ्या, चित्ताला उपरति होऊं द्या, जाणिवेचें मूळ खंडून काढा आणि सप्रेमभरित होऊन माझ्या पांडुरंगाला भजा हेंच त्यांचें पंडितांना सांगणें असे. ' जेविलियावीण शून्य ते शृंगार ' तसीं हरिप्रेमावांचून सर्व ज्ञानें वांझट होत. 'ज्या कारणें वेदश्रुति हीं पुराणें'—त्या नारायणाला जाणाल, भजाल तर तें ज्ञान सार्थकीं लागलेसें होईल; नाहीं तर अंगावर कोड फुटलेल्या माणसाप्रमाणें हा अहंकारी विद्वान् सर्वांना चिळसवाणा त्याज्यच वाटेल ! पंडित होऊन पोटासाठीं नरस्तुति करणें व वाग्वादांत वाणी खर्चणें हें बरें नाहीं असें तुकोबा नम्रतेनें त्यांस सांगतात:—

**ऐका पंडितजन । तुमचें वंदितों चरण ॥ १ ॥**
**नका करूं नरस्तुती । माझी परिसा हे विनंती ॥ ध्रु० ॥**
**अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा आधीन ॥ २ ॥**
**तुका ह्मणे वाणी । सुखें वेंचा नारायणीं ॥ ३ ॥**

तुकोबासारखे हरिमय झालेले सत्पुरुष आणि त्यांनीं दुर्जन व दांभिक यांजवर कठोर वाग्बाण सोडावे हें कोणांस चमत्कारिक वाटेल, पण यास तुकोबांनीं उत्तरही दिलें आहे; ' भूतीं भगवंत हा तों जाणतों संकेत ' पण वाट चुकून आडरानांत चाललेल्यांना त्यांचे दोष दाखवूनही त्यांच्या हितार्थ मी सावध करीत असतो. ' निंदावें हें जग । ऐसा आला खरा भाग ' पण काय करावें ? ' दुसऱ्याच्या मतां । झालें मिळेनासे चित्ता ! ' गोडीनें जेव्हां ऐकत नाहींत, ' मुखीं देतां घांस पळविती तोंडें ' तेव्हां जरा हिसका द्यावा लागतो. रोग्याची माया करून चालत नाहीं, कठो-

रच व्हावें लागतें. यांची दया कींव येते व राहवत नाहीं ह्मणून ' अनुभवें अंगा । तें या जगा देतसें ' मला भाविक लोक गळ्यांत माळा घालतात, पायां पडतात, मिष्टान्न ( मेजवान्या ) देतात पण त्यानें माझें समाधान होत नाहीं, ' चिंता मनीं पाय विठोबाचे ' हेंच कळवळून यांच्या हितार्थ सांगतों व ऐकत नाहींत तेव्हां कडु औषध बळेंच पाजावें लागतें !

बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा ह्मणऊनि ॥
मानदंभासाठीं मी कोणाला छळीत नाहीं हें विठोबाची आण वाहून सांगतों.

जगीं तरी आह्मां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥
येतो हिताचा कळवळा । पडती हातीं ह्मणोनि काळा ॥२॥

इतकेंही करून मी दोषांचा स्फोट करितों ह्मणून कोणाला वाईट वाटत असेल तर 'मीच दुष्ट सकळ चांग' ह्मणून सर्वांची क्षमा मागतों!

८ एक ब्राह्मण आळंदीस धरणें धरून बसला होता, त्याला ज्ञानोबारायांनीं तुकोबांकडे पाठविलें. तुकोबांना मोठेपणा नको होता तरी त्यांनीं ज्ञानोबांची आज्ञा म्हणून त्याला उपदेश केला. तो ब्राह्मण उपदेश व महाफळ टाकून गेला. त्या प्रसंगावर तुकोबांचे ३१ अभंग आहेत[1]. मूळांत ष आहे तेथें ख समजावा.

---

1 हे अभंग सर्व गाथ्यांतून आहेतच, पण हे ठाण्याचे रा. भावे यांनीं संताजी जगनाडे यांच्या अस्सल वहीवरहुकूम छापलेल्या गाथ्याच्या दुसऱ्या भागांत आहेत तेच मूळ धरून त्यांतील महत्वाचा भाग वर दिला आहे. 'अळकापुरीस ज्ञानदेवाचे देउळी घरने बैसला ब्राह्मण : त्याबद्दल तुकोबानें अभंग केले: ।। ३१ येकतीस : " पुढें " देवाचा धावा अभंग ७ उपदेस अभंग ११ " असें म्हटलें असून शेवटीं " ज्ञानदेवी ब्राह्मण धरणे बैसला होता; दीवस ४२ ॥ बेतालीस : या कारणें तुकावा गोसांवीं याणीं अभंग केलें येकतीस ३१ हें लीहीं सही : ॥ हस्त अक्षर : संताजी तेळी जगनाडे : कसबे चाकण : वीठल " असा संताजीचा हातचा लेख आहे.

९४३

नको कांहीं पडों ग्रंथांचीये भरीः ॥ सीघ्रवत करीं हेंची आतांः ॥
॥ १ ॥ धृ ॥ देवाचीये चाडे आळवावें देवाः वोस देहेभावाः ॥
पाडूनीयां ॥ छ ॥ साधनें घालीती काळाचीये मुषीः ॥ गर्भवासा
सेषीः न चुकतीः ॥ २ ॥

९४४

देवापासी नाहीं मोक्षाचें गांठोळें ॥ आणुनी निराळेंः द्यावें हातींः
॥ १ ॥ धृ॥ इंद्रियांचा जये साधुनीया मन ॥ नीर्वीष कारण
आहे तेथेंः ॥ छ ॥ .........तुका ह्मणे फळ आहे मूळापासींः ॥
शरण देवासीः जांईं वेगीं ॥ ५ ॥

९४५

आळवावें देवा भाकुनी करुणाः ॥ आपुलीया मना साक्ष करींः ॥
छ ॥ नाहीं जावें यावें दुरुनी लांगतः ॥ आहे साक्षभूत अंतरीचाः॥
॥२॥ तुका ह्मणे हा आहे कृपासींधुः ॥ तोडी भवबंधुः तात्काळः ३

९४६

पाहोनीयां ग्रंथ करावें कीर्तनः ॥ तेव्हां आलें जाण फळ त्यासींः
॥ १ ॥ धृ ॥ नाहीं तरी वायां केली तोंडपीटीः उरी ते सेवटीं
उरलीचः ॥ छ ॥ तप तीर्थाटण तरी कार्येसीधीः स्थीर राहे
बुधीः हरीचा नामींः ॥ तुका म्हणे नको काबाडाचे भरीः ॥
पडों सार धरीं हेची येकः ॥ ५ ॥

९४७

गोवींद गोवींद मना लागलीयां छंदः ॥ १ ॥ धृ ॥
मग गोवींद ते कायाः ॥ भेद नाहीं देवा तयाः ॥ छ ॥
अनंदलें मन प्रेमें पाझरती लोचनः ॥ २ ॥
तुका म्हणे अळीः जेवी नुरेची वेगळीः ॥ ३ ॥

९४८

ज्यांचे जया ध्यानः ॥ तेंच होये त्याचें मनः ॥ १ ॥ ध्रु० ॥
ह्मणउनी अवघें सारा ॥ पांडुरंग द्रुढ धराः ॥ छ ॥

* * * *

९४९

संकोचोन काय जालासी लाहानः ॥ घेईं आपोशण ब्रह्मांडाचें ॥१॥ करुणीं पारणें : आंचवे संसार : ॥ उसीर उसीरां लाऊं नको ॥छ॥ घरकुलानें होता पाडिला आंधार : ॥ त्याणें केलें फार कासावी-: स : ॥ २ ॥ झुगारून दूर लपवीलें कार्षे : ॥ तुका म्हणे वाषे : कवतुकाचे : ॥ ३ ॥

९५५

अवीस्वासीयांचें शरीर सुतकी : वीटाळ पातकी भेद आहे : ॥१॥ त्याचा वेल काये जाइल मांडवा : होता तैसा ठेवा आला पुढें : ॥ छ ॥ तुका म्हणे जैसा कुचराचा दाना : ॥ परपाकीं जाणा : षोटा तैसा : ॥ ३ ॥ छ ॥

तुकोबांच्या वेळचा मराठी भाषेचा नमुना, त्यांचा शिष्य व लेखक संताजी याच्या लेखनाचा नमुना या दृष्टीनें त्याच्या मूळ वहीबरहुकूम दिलेले अभंग महत्वाचे आहेतच, पण त्यांतील बोध अत्यंत महत्त्वाचा आहे. आळंदीस ज्ञानेश्वरांच्या समाधीपाशीं ४२ दिवस अन्नपाणी सोडून ज्ञानेश्वरांनीं कृपा करावी ह्मणून ब्राह्मण धरणें धरून बसला होता. ज्ञानोबारायांनीं त्याला स्वप्नदृष्टांत देऊन तुकोबांकडे पाठविलें. तुकोबांना लौकिक उपाधीचा वीट आला होता ‘ नव्हे दास खरा । परी जाळा हा डांगोरा ’ याचेंच त्यांना वाईट वाटत होतें. तरी ज्ञानोबांची आज्ञा अमान्य करवेना ह्मणून त्यांनीं त्यास ११ अभंगांत उपदेश केला. तो वेडा ब्राह्मण तो उपदेश टाकून गेला. परमार्थ ह्मणजे अद्भुत किमया आहे, कोणी तरी एकदम घबाड आणून द्यावें, आपल्यास कांहीं करायला नको अशी ज्यांचीं कल्पना असेल ते त्या ब्राह्मणाप्रमाणें वरील उपदेश वाचून निराश होण्याचा संभव आहे, पण या उपदेशांत परमार्थाचें सारसर्वस्व आहे. त्याचा पाल्हाळ करीत नाहीं, वाचकांनीं तें स्वबुद्धीनें ग्रहण करावें.

९ शिवछत्रपतींचा जन्म शक १५४९ मध्यें झाला अशी आ-जवर समजूत होती, पण इतिहाससंशोधनाच्या नवीन प्रकाशांमुळें तो शके १५५१ च्या फाल्गुनांत ह्म० तुकोबांच्या वयाच्या २१ वे वर्षी जो घोर दुष्काळ पडला त्या दुष्काळाचे वर्षी झाला असें ठरत आहे. शिवाजी राजे यानीं आपल्या वयाच्या १७ वे वर्षी तोरणा किल्ला घेऊन त्यावर स्वराज्याचें तोरण बांधलें व यानंतर ३ च वर्षांनीं ( शके १५७१ ) तुकोबांचें प्रयाण झालें, ह्मणजे शिवराय २० वर्षांचे असतांच तुकोबांचें प्रयाण झालें, समर्थ रामदासस्वामीं-चा जन्मही शके १५३० चा असून ते आपलीं पुरश्चरणें व तीर्थ-यात्रा संपवून शके १५६७ मध्यें प्रथम कृष्णातीरीं आले. तेव्हां समर्थ, तुकोबा व शिवराय यांच्या भेटी शके १५६८ ते १५७१ च्या दरम्यान झाल्या असण्याचा पूर्ण संभव आहे. तुकोबांचीं कीर्तनेंही शिवरायानें या शेवटच्या ३ वर्षांत ऐकलीं असावींत. शिवरायांची मातोश्री जिजाबाई व गुरु आणि कारभारी दादाजी कोंडदेव यांच्या देखरेखीखालीं व उत्तेजनानें स्वराज्यस्थापनेचें कार्य चालू झालें. तुकोबा अवतारी तसेंच शिवरायही अवतारी, दोघांचें मुख्य कार्यक्षेत्र पुणें प्रांत. तुकोबांनीं धर्मजागृतीचें कार्य लोकोद्धाराच्या कळकळीनें चालविलें होतें व हें कार्य ऐन रंगांत आलें असतांनाच स्वराज्य-स्थापनेचा उद्योग सुरू झाला. भरतखंडांतल्या सर्व अवतारी पुरुषांचें मुख्य ध्येय स्वधर्मरक्षण हेंच असतें. ‘ धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आह्मांसी ’ हें तुकोबांचें कार्य, ’ व ‘ हिंदवी स्वराज्य श्रीनें आह्मांस दिलें आहे, ’ ‘ हिंदुधर्मरक्षणासाठीं आह्मीं फकीरी घेतली आहे’ हें शिवरायाचें ध्येय, दोघांचें ध्येय एकच. राष्ट्राचा अभ्युदय आणि निःश्रेयस् (मोक्ष) दोन्ही कार्यें धर्माच्या रक्षणानेंच होतात. धर्मरक्षणांत वर्णाश्रमधर्माचें रक्षण हें मुख्यांग आहे कारण कीं आप-ल्या सनातनधर्माचा वर्णाश्रमधर्म हा पाया आहे. तुकोबा, शिव-

राय व समर्थ यांचे अवतार वर्णाश्रमधर्माची विसकटलेली घडी नीट बसविण्यासाठीं झाले. तुकोबांनीं कलिप्रभावाच्या अभंगांत सर्व वर्ण आचारभ्रष्ट कसे झाले आहेत हें सांगितलें असून—

**वर्ण धर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥**

याप्रमाणें संकराचा निषेध केला आहे.

**तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥**

लोक देवधर्माला पारखे झाले असून ' देह तोचि देव भोजन ते भक्ति ' याप्रमाणें केवळ पिंडपोषी कर्तृत्वशून्य झाले आहेत व 'चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्ती' याप्रमाणें सह-भोजनप्रेमी बनले आहेत याबद्दल त्यांनीं खेद प्रगट केला आहे. ते ह्मणतात:—

**ऐसे धर्म झाले कळी । पुण्य रंक पाय बळी ॥ ध्रु० ॥**
**सांडिले आचार । द्विज चाहाड झाले चोर ॥ २ ॥**
**टिळे लपविती पातडी । लेती विजारा कातडीं ॥ ३ ॥**
**बैसोनीयां तक्का । अन्योवीण पीडिती लोकां ॥ ४ ॥**
**नीचाचे चाकर । चुकलियां खाती मार ॥ ५ ॥**
**राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुखितांसी ताडी ॥ ६ ॥**
**वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ ७ ॥**
**अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वरी सोंग ॥ ८ ॥**
**तुका ह्मणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥ ९ ॥**

लोकांची दैना धर्मभ्रष्टतेमुळें झाली आहे हें पाहून त्यांना कळ-वळा येई. लोकांच्या दुःस्थितीबद्दल त्यांना खेद वाटे.

**न घडे यावरी न धरवे धीर । पीडितां राष्ट्र देखोनि जग ॥**

पण धर्माची घडी नीट बसविण्यास राष्ट्रांत क्षात्रबळही उदय पावलें पाहिजे, स्वधर्माच्या जागृतीस स्वराज्याचा दुजोरा पाहिजे हें त्यांस माहीत होतें. त्यांनीं—

**दया तिचें नांव भूतांचें पालन । आणिक निर्दळण कंटकांचें ॥**

याप्रमाणें दयेचें लक्षण केलें आहे तें ' परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ' असेंच केलें आहे. 'मामनुस्मर युद्धयच' असें गीता सांगते, 'पहिलें तें हरिभजन। दुसरें तें राजकारण' असें समर्थही ह्मणतात. सर्वांचें तात्पर्य एकच आहे. ब्रह्मतेज व क्षात्रतेज दोन्ही प्रगट व एकवट झाल्यावांचून राष्ट्राचा अभ्युदयनिःश्रेयसरूप धर्म उदय पावत नाहीं. ' शापादपि शरादपि' असें उभयविध सामर्थ्य जेव्हां राष्ट्राच्या अंगीं येतें तेव्हांच त्यावेळींच राष्ट्रधर्माचा विजय होतो. तुकोबांनीं दोन कार्यांपैकीं एक कार्य अंगावर घेतलें व तें उत्कृष्ट प्रकारें पार पाडलें. त्याला स्वधर्मीय राजसत्तेचा पाठिंबा पाहिजे होता हें ते जाणून होते. लोक स्वाचारविन्मुख झाले आहेत त्यांला ताळ्यावर आणायला दंडशक्ति पाहिजे होती.

**काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति। दंडूनी पुढती लावूं वाटे ॥**

असें त्यांनीं ह्मटलें आहे. तुकोबांची देवाला प्रार्थना होती त्याप्रमाणें त्यांच्या हयातींतच घडून आलें. शेवटच्या ३।४ वर्षांत तरी त्यांना स्वराज्यासाठीं झगडणारा क्षात्र वीर डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहतां आला. शिवरायांना धर्माविषयीं तसें धर्मप्रसारक साधुसंतांविषयीं जिव्हाळ्याचें प्रेम होतें. साधुसंतांच्या कृपाशीर्वादाचा पाठिंबा असल्यावांचून तुझ्या राजकारणाला यश येणार नाहीं अशी त्यांस जिजाबाईची व दादाजींचीही शिकवण होती. रामायणभारतांतील वीरांच्या व भक्तांच्या कथा ऐकण्याची त्यांस अत्यंत गोडी होती. साधुसंतांच्या भेटी घेणें, त्यांस सत्कारानें बोलावून आणून त्यांच्या समागमाचा लाभ घेणें हा त्यांच्या धर्मशील प्रकृतीचा स्वभाव बनून राहिला होता. त्यांनीं अखेर समर्थांचा समागम केला व त्यांचा उपदेश घेतला ही गोष्ट प्रसिद्धच आहे, पण तत्पूर्वी चिंचवडचे चिंतामणि देव, पुण्याचे अनगडशहा, यांच्या दर्शनास ते गेले होते. मौनीबोवा आणि बावा याकूब या सत्पुरुषांची शिवाजीवर कृपादृष्टि होती

असें ब्रह्मेंद्रस्वामींनीं ह्मटलें आहे ( म. इ. सा. खंड ३ पहा. ) नाथांचे शिष्य चिदानंदस्वामी व त्यांचे शिष्य स्वानंद—'तया आपुलिया कल्याणकामें । शिवभूपतिनें प्रार्थूनि प्रेमें । रायदुर्गीं स्थापिलें नेमें । सेवानुक्रमें तोषविलें' असें कृष्णदयार्णवांनीं हरिवरदाग्रंथांत ( अ० ९०—१०६६ ) ह्मटलें आहे. असो. असे संतसमागमप्रेमी शिवराय तुकोबारायांच्या भेटीस गेल्याशिवाय राहिले असतील हें शक्यच नाहीं.

१० शिवबांनीं प्रथम तुकोबांकडे ते लोहगांवास असतांना दिवट्या छत्री घोडे कांहीं कारकुनांबरोबर देऊन व जवाहीर देऊन तुकोबांस पुण्यास बोलावूं पाठविलें. पण तुकोबा पडले महाविरक्त. त्यांनीं जवाहीराकडे न पाहतां तसेंच तें शिवबाकडे परत पाठविलें व बरोबर ९ अभंगांचे एक पत्र दिलें.

*   *   *

दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ १ ॥
आतां येथें पंढरिराया । मज गोंविसी कासया ॥ ध्रु० ॥
मानदंभचेष्टा । हे तों सूकराची विष्ठा ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । माझे सोडवणें धांवा ॥ ३ ॥

हें ऐश्वर्य नारायणा ! मजकडे कशाला धाडतां ? यांचा स्वीकार कल्याणकर नव्हे. परमार्थाची यांत हानि व पायमल्ली होणार आहे. सूकराच्या विष्ठेसारखा मी मानदंभचेष्टांना त्याज्य समजतों हें तुम्हांला माहीत नाहीं काय ? मग हे असले सामान्यांना भुलवणारे प्रसंग मला कां दाखवितां ? माझें अंतरंग माहीत नाहीं ?

नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥
कां रे पुरविली पाठी । माझी जीवें केली साटी ॥ ध्रु० ॥
न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ २ ॥
सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥

जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥
तुका ह्मणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

रिद्धिसिद्धींचे मामले तोंडावर टाकून तूं पुष्कळांचीं करकर आजवर टाळली आहेस. पण असल्या अघेवटांतला मी नाहीं! मी तुझ्या पायांवांचून ब्रह्मांडांत कांहीं ओळखीत नाहीं!

जाणोनी अंतर । टाळिसील करकर ॥ १ ॥
तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ ध्रु० ॥
उठाविसी दारीं । धरणें बैसादिया परी ॥ २ ॥
तुका ह्मणे पाय । कैसे सोडीन ते पाहें ॥ ३ ॥

आपल्या निश्चयाचीही बैठक कायम राखून तुकोबाराय शिवरायास लिहितात:—

मुंगी आणि राव । आह्मां सारिखाचि जीव ॥ १ ॥
गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ ध्रु० ॥
सोनें आणि माती । आह्मां समान हें चित्तीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आलें । घरा वैकुंठ सगळें ॥ ३ ॥

आमच्या आशा व मोह पार गेले आहेत, व ते नसल्यामुळें आह्मांला मुंगी आणि राव किंवा माती आणि सोनें सारखेंच झालें आहे. आमच्या घरीं नारायणानें वास केल्यामुळें आह्मांला कांहींएक कमी नाहीं. आह्मी दरिद्री आहोंत असें समजून आह्मांला साह्य करूं पाहतां पण आह्मी रंक नहोत. आमचें ऐश्वर्य फार मोठें आहे.

तिहीं त्रिभुवनीं । आह्मी वैभवाचे धनी ॥ १ ॥
हाता आला धावडाव । आमचा मायबाप देव ॥ ध्रु० ॥
काय त्रिभुवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ २ ॥
तुका ह्मणे सत्ता । अवघी आमुचीच आतां ॥ ३ ॥

त्रिभुवनाचा स्वामी आमच्या स्वाधीन असल्यामुळें त्याचें बळ आमच्या अंगीं आलें आहे. आतां आमचीच सत्ता जगावर चालणार आहे.

काय दिला ठेवा । आह्मां विठ्ठलाचि व्हावा ॥ १ ॥
तुह्मी कळलेती उदार । साटी परिसाची गार ॥ ध्रु० ॥
जीव देतां तरी । वचना माझ्या नये सरी ॥ २ ॥
गोमांसासमान । तुका ह्मणे आह्मां धन ॥ ३ ॥

अन् तुह्मी आह्मांला ऐश्वर्य तरी कोणतें देणार ? धन तर आह्मी गोमांसासमान वर्ज्य मानतों. तुमचें औदार्य चांगलें समजलें ! परिसासाठीं गारगोटी देणें ( आंवळा देऊन भोपळा काढणें ) याला कां औदार्य ह्मणावें ? धनाच्या मोबदल्यांत आमचा परमार्थ वांछितां काय? विठ्ठल आमच्या मुखांतून जीं अमृताचीं वचनें बोलवतों त्यांतल्या एका वचनाची सुद्धां बरोबरी जीव देऊनही कोणाला करवणार नाहीं ! तुह्मीं आम्हाला देणार तर एकच दान द्याः–

आह्मीं तेणें सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥
तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ ध्रु० ॥
कंठीं मिरवा तुळशी । व्रत करा एकादशी ॥ २ ॥
ह्मणवा हरिचे दास । तुका ह्मणे मज हे आस ॥ ३ ॥

ह्या सात अभंगांशिवाय आणखी दोन अभंग आहेत. एक ‘ सोन्याचे पर्वत करवती पाषाण ’ हा व दुसरा ‘नाहीं विचारीत। मेघ हागणदारी शेत ॥ ’ मोठाले डोंगर सोन्याचे करवतील, रानोरानचे वृक्ष कल्पतरू करतां येतील, नद्या व समुद्रही अमृतानें भरवेल, मृत्यूलाही थोपवून धरवेल, भूत भविष्य वर्तमान सांगतां येईल, रिद्धिसिद्धी प्रसन्न करवतील, योग मुद्रा साधतील, प्राणवायु ब्रह्मांडीं नेववेल—हें सर्व साधेल, फार काय पण मोक्षही प्राप्त करून घेतां येईल, पण विठोबाचे चरण जोडणें दुर्लभ आहे ! ! ते वरील सर्व साधनांनींही जोडणें दुर्घट आहे. असा पहिल्या अभगाचा भावार्थ आहे. ‘ परी हे दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न

सरती,' हें या अभंगाचें ध्रुवपद आहे. असे हे विठोबाचे दुर्लभ पाय आह्मांला मिळाले आहेत तेव्हां आतां ह्या महल्लाभापुढें राजानें पाठविलेल्या 'दिवट्या छत्री घोडे' यांची किंमत काय? दुसऱ्या अभंगांत मेघाचा व गंगेचा दृष्टांत देऊन सुचविलें आहे कीं हागणदारी व शेत या दोघांवर मेघाची वृष्टि सारखीच होते किंवा गंगा पुण्यवंताला व पाण्याला सारखीच तारते त्याप्रमाणें आम्हीं कीर्तनें करितों त्यांत अधिकारी किंवा अनाधिकारी अथवा राजा किंवा रंक ह्यांपैकीं कोणीही श्रोते आले तरी आम्हांला सारखेच!

पुढील अभंगही शिवरायाला उद्देशूनच सांगितला असावा:—

मैत्र केले महाबळी। कामा न येती अंतकाळीं ॥ १ ॥
आधीं घे रे रामनाम। सामा भरीं हा उत्तम ॥ ध्रु० ॥
कामा न ये हा परिवार। सैन्य लोक बहु फार ॥ ४ ॥
तंववरी तुमचें बळ। जंव आला नाहीं काळ ॥ ५ ॥
तुका ह्मणे बापा। चुकवी चौऱ्याशीच्या खेपा ॥ ६ ॥

११[1]यानंतर शिवराय आपण होऊन तुकोबांच्या दर्शनासाठीं लोहगांवास गेले. कीर्तन ऐकून फार प्रसन्न झाले. त्यांना तुकोबांच्या कीर्तनाचा छंदच लागला. रात्रीं भोजनोत्तर घोड्याला टांच मारून त्यांनीं जी दौड ठोकावी ती तुकोबा देहूस, किंवा लोहगांवास असतील तेथें जाऊन कीर्तन ऐकावें व पांहटेस आरती झाल्यावर दौडत पुण्यास

---

1 ह्या नवही अभंगावरून तुकोबाचें प्रखर वैराग्य व दिव्य आत्मनिष्ठा हे गुण व्यक्त होतात. त्यांच्या त्यागी वृत्ताचा पुण्याच्या राजमंडळावर व भाविकांवर उत्कृष्ट परिणाम झालाच असला पाहिजे. काहीं गाथ्यांतून या ९ अभंगांशिवाय आणखी ५ मोठाले अभंग दिलेले आहेत. त्यांत छत्रपती, अष्टप्रधान, रामदासस्वामी यांचा उल्लेख आहे. पण हे अभंग वारकरी मंडळांत प्रक्षिप्त मानले जातात व मलाही ते तसेच वाटतात म्हणून मी त्यांचा विचार करीत नाहीं. वरील नऊ अभंग मात्र तुकोबांचेच आहेत यांत शंका नाहीं.

परत यावें असा क्रम कित्येक दिवस चालला. एकदा शिवबांच्या मनांत पूर्ण वैराग्य उत्पन्न झालें व पुण्यास न जातां ते देहूसच तुकोबांच्या संगतींत राहिले. शिवबा राजकारण सोडून साधुसंगतींत साधुच होऊन राहतो कीं काय असें जिजाबाईस भय वाटलें. त्या पुण्याहून देहूस गेल्या. तुकोबांनीं कीर्तनांत वर्णाश्रमधर्म सांगितले व क्षत्रधर्म राजधर्म यांचें उत्कृष्ट प्रतिपादन करून शिवबांस स्वकर्तव्यारूढ केलें. एकदां तुकोबांच्या कीर्तनास शिवराय बसले असतां हजार पठाणांनीं पाळत ठेवून मंदिरास वेढा दिला, तेव्हां तुकोबांच्या पुण्यप्रतापानें ह्मणा शिवबांच्या सावधगिरीनें ह्मणा मंदिरांतून एक हजार पुरुष—शिवबांसारखे दिसणारे—बाहेर पडले, त्यामुळें खरा शिवाजी त्यांस सापडला नाहींच! या गोष्टी सर्वप्रसिद्ध आहेत व महिपतबाबांनीं त्या सविस्तर वर्णिल्या आहेत ह्मणून मी त्यांचा पाल्हाळ करीत नाहीं. एक प्रसंग मात्र सांगतों. एकदा तुकोबांचें कीर्तन चाललें असतां त्यांचे 'वीर विठ्ठलाचे गाढे' ह्म० वारकरी श्रवणास बसले होते त्यांतच शिवबा व त्यांचे शूर मुत्सद्दी, वीर व शिपाई बसले होते. तुकोबांच्या मनांत दोघानांही-विठ्ठलभक्त वारकऱ्यांना व स्वराज्यसाधकांना—एकदम बोध द्यावा असें आलें! त्यावेळीं त्यांनीं ' पाइकीचे ११ अभंग ' रचत रचत ह्मटलें. वीरपण हे राजकारणांत काय किंवा परमार्थांत काय दुर्मिळच आहे. प्रपंच, राजकारण व परमार्थ या तीनही प्रकारांत सामान्यांचाच भरणा जास्त असायचा. सामान्य जीव सर्वत्र विपुल. वीरत्वास उचित अशा गुणांचे पुरुष दुर्मिळ. वीरत्वाचे गुण एका जातीचेच आहेत. गावाळ आणि वीर, पामर आणि संत एक नव्हत. पशूंत वीर एकच, सिंह-मनुष्यांत वीरत्वाचे गुण समान असले तरी प्रकार भिन्न आहेत. एकांतविध्वंसी ह्म० केव्हां तरी नाश पावणारा हा पिंड व तत्संबंधी सर्व विकार याहून जो वेगळा तो वीर! देह व देहसंबंधी यांच्या क्षुद्र विचा-

रांत गुरफटलेला तो गाबाळ व याहून अंतरंगानें वरच्या वातावरणांत वावरणारा तो वीर. बुद्धिमत्ता, उद्योगपरता, उच्चध्येय, पराक्रम, धाडस, लोककल्याणकारित्व हे जातिवंत वीराचे सहजगुण होत. इंग्रज ग्रंथकार कार्लाईल व अमेरिकन तत्त्ववेत्ता इमरसन यांनीं वीर पुरुषांचे वर्ग केले आहेत. आपल्या इकडील उदाहरणें घेऊन बोलायचें ह्मणजे तत्त्ववेत्ता व धर्मसंस्थापक हा एक जातीचा वीर (शंकराचार्यज्ञानेश्वरादि). महाकवि हा दुसऱ्या जातीचा वीर ( वाल्मीकि, व्यास, कालिदास, तुळशीदास इ०). राज्यसंस्थापक हा तिसऱ्या जातीचा वीर (विक्रमादित्य, शिवाजी ). पंडित व ग्रंथकार हा चवथ्या जातीचा वीर ( अप्पयादीक्षित, मोरोपंत, निबंधमालाकार ). संतसाधु हे पांचव्या जातीचे वीर ( नाथसमर्थतुकोबारायादि ). हे सर्व वीर पुरुष होत. तुकोबाराय, समर्थ व शिवबा हे तिघेही वीर पुरुषच. हे शिपाई गडी, पोटांत डोई खुपसून रडणारे नव्हत, असाध्य तें साध्य करून दाखविणारे हे. असो. विषयावर येऊं. शिवबांनीं स्वराज्य मिळवून दाखविलें, तुकोबांनीं देव आपलासा केला. तुकोबांनीं पाइक ह्म० शिपाईगडी, शूर वीर कसा असावा हें सांगण्यासाठीं पाइकीचे अभंग सांगितले. तुकोबांचे शिष्य व शिवबांचे अनुयायी, धर्मवीर व युद्धवीर, या उभतांना त्यांत उपदेश होता. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें देतों. जाणते मर्म जाणतील. विवरण केल्यास विस्तार होईल.

पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूर धरी मात वचन चित्तीं ॥ १ ॥
पाईकीवांचूनी नव्हे कधीं सुख । प्रजामध्यें दुःख न सरे पीडा॥ध्रु.
तरि व्हावे पाईक जीवाचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे
पाइकीचें सुख जया नाहीं ठावें । धिग् त्यांनीं जावें वांयांवीण ॥३
तुका म्हणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥ ४ ॥

* * * *

येतां गोळ्या बाण साहिले माडिमार । वर्षतां अपार वृष्टी करी ॥१

स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण। मग त्या मंडण शोभा दावी ॥२॥
पाइकांनीं सुख भोगिलें अपार । शूर आणि वीर अंतर्बाहीं ॥ ३ ॥

*　　*　　*　　*

आपणां राखोनी ठकावें आणीक। घ्यावें सकळीक हिरोनियां ॥२
येऊं नेदी लाग लागों नेदी माग। पाईक त्या जग स्वामी मानी ३
तुका ह्मणे ऐसे जयाचे पाईक। बळिया तो नाईक त्रैलोक्यींचा ४

*　　*　　*　　*

पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा। पारख्याचा सांठा मोडोनिया १
पारखिये ठायीं घेवोनियां खाण। आपुले ते जन राखियेले ॥ २ ॥
सांडितां मारग मारिती पाईक। आणिकांसी शीक लागावया ॥३
तुका म्हणे विश्वा घेउनी विश्वास। पाईक तयांस सुख देती ॥४॥

*　　*　　*　　*

तृणवत तनू सोनें ज्या पाषाण। पाईक त्या भिन्न नाहीं स्वामी ॥
विश्वासावांचूनी पाइकासी मोल। नाहीं मिथ्या बोल बोलिलियां

*　　*　　*　　*

जीवाचे उदर शोभती पाईक। मिरवती नाईक मुकुटमणी ॥
कमाईचीं हिंणें पडलीं उदंड। नाहीं तयां खंड येती जाती ॥

*　　*　　*　　*

एकाच स्वामीचे पाईक सकळ। जैसें तैसें बळ मोल तया ॥ १ ॥
तुका म्हणे मरण आहे या सकळां। भेणें अचकळा अभयें मोल २

*　　*　　*　　*

जातीचा पाईक ओळखे पाइका। आदर तो एका त्याचे ठायीं ॥ १
धारितील पोटासाठीं हतियारें। कळती तीं खरें वेठीसीचीं ॥ २ ॥
जातीचें तें खरें असे घायडाय। पारखिया काय पाशीं लोपे? ॥३॥
तुका म्हणे नमूं देव म्हूण जना। जालियांच्या खुणा जाणतसों ४

अशा तेजस्वी वाणीनें तुकोबांनीं देवभक्तांस व देशभक्तांस, वारकऱ्यांस व धारकऱ्यांस उपदेश केला आहे. पाईक ( शिपाई गडी, वीर ) जीवाचा उदार असतो, तो तनु तृणवत् व सोनें पाषाणासमान मानतो, पाइकीवांचून प्रजांच्या दुःखक्लेशांचें नि-

वारण होत नाहीं, ' देह मी नव्हे ' असा एका क्षणाचा निर्धार करून पाईक अविनाशी सुखाचा धनी होतो, पाईक स्वामीपुढें सत्याचें भांडण करण्यास कचरत नाहीं, पाईक अंतर्बाह्य शूर असतो म्ह० मनाशीं व जनासी धैर्यानें लढत असतो, परक्यांचा सांठा मोडून म्ह० कामक्रोधादि आगांतुकांना घुडकावून लावून तो स्वजनांचें म्ह० आत्मधर्मांचें रक्षण करितो, स्वामीवर अचल विश्वास ठेविल्यानेंच पाइकाला मोल चढतें, जातीचा पाईक खऱ्या पाइकांना ओळखतो असे जे झालेले म्ह० पूर्ण बनलेले निर्भय पाईक त्यांच्या खुणा सांगितल्या आहेत! ' कमाईचीं हीनें ह्म० गाबाळ उदंड आहेत त्यांचें वर्णन करायला नको !

या वरील प्रसंगाशिवायही तुकोबांच्या अभंगांत असले वीरश्रीचे उद्गार कित्येक ठिकाणीं आले आहेत:—

शूर तो ओळखे घायडाय हात । येरा होईल मात सांगायाची ॥
तुका म्हणे होई शूर । किंवा निसूर मजूर ॥

शूरपणाचीं कामें करवत नसतील तर मजुरी करून रहा! हेंच समर्थांनीं ' जयांस जिवाचें वाटे भय । तेणें क्षात्रकर्म करूं नये । कांहीं तरी करूनि उपाये । पोट भरावें ' या शब्दांत सांगितलें आहे. तुकोबा सांगतात: ' भांडायचें—लढायचेंच झालें तर निर्भयपणानें मुख्याशींच गांठ ठेवावी, गाबाळांच्या नादीं लागूं नये '—

भांडणेंचि झालें । मग जीवाचें काय चालें ? ॥ १ ॥
येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥ ध्रु० ॥
कारितां सरोबरी । कांहीं न ठेवावी उरी ॥ २ ॥
नये मरों लंडीपणें । काय यापुढें तें जिणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे शूर । व्हावें घुरेसींच धूर ॥ ४ ॥

अशा सत्पुरुषाला ' पंगु, नेभळे ' ह्मणून त्याची निंदा करणारांचा समाचार घेऊन हें प्रकरण पुरें करितों.

१२ तुकोबांनीं ह्या वरील पाइकीच्या अभंगांत आपल्या तेजस्वी वाणीनें अत्यंत स्पष्ट व निर्भीड शब्दांत जे राजकारणाचे सिद्धांत सांगितले आहेत त्याहून अधिक वीर्यवती वाणीनें कोणीं कोठें उपदेश केला आहे ? त्यांची वाणी मेघगर्जनेसारखी गंभीर, आकाशासारखी निर्मळ, सूर्यासारखी ओजस्वी आहे. त्यांनीं जो जो बोध केला आहे तो स्पष्ट, खणखणित व अत्यंत परिणामकारक असाच आहे. देवाला आळविण्यांत, संतांचें व नामाचें गौरव करण्यांत, दांभिकांचा स्फोट करण्यांत, विविध प्रकारच्या लोकांना उपदेश करण्यांत त्यांच्या वाणींत जी तेजस्विता आहे तीच वरील राजकारणविषयक उपदेशांत ही आहे, आणि हा उपदेश वयाच्या १९ व्या वर्षी स्वराज्यसाधनाच्या महत्कार्यारंभीं शिवरायाला व त्यांच्या सवंगड्यांना तुकोबांनीं भरकीर्तनांत केला आहे ! ज्याचा सारा जन्म ' रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन 'ह्याप्रमाणें अंतर्बाह्य दुर्दमनीय अशा रिपूंशीं झगडण्यांत व त्यांवर आपलें स्वामित्व स्थापन करण्यांत गेला, ' परस्त्री ती आम्हां रखुमाईसमान ' असें म्हणून ज्यानें परस्त्रीला ' माते ' म्हणून संबोधून वाटेला लावलें, ज्यानें राजाकडून आलेल्या बहुमोल जवाहिराचा ' तुका म्हणे धन । आम्हां गोमांसासमान ' याप्रमाणें आपला निर्धार सांगून त्याग केला, रामेश्वरभटासारखें घेंड ज्यानें आपल्या आध्यात्मिक तेजानें बारा दिवसांत आपल्या पायांशीं आणलें, शिवबाकासारासारख्या धनलोभ्याला ज्यानें एका सप्ताहांतल्या कीर्तनरंगानें रंगवून सकलविभव परित्याग करावयास लावलें, शिवरायासारख्या कार्यकर्त्या महापुरुषाला ज्यानें आपल्या निर्मळ प्रबोधशक्तीनें भक्तिभावसमुल्लासानें नाचायाला लावलें, ज्यानें साक्षात् परमेश्वराला आपलें निर्गुणत्व बाजूला सारून सगुणसाकार व्हायला लावलें व ज्याची छाप लक्षावधि लोकांवर आज तीन शतकें निर्बाध रीतीनें पडली

आहे त्या भक्तशिखामणीची वाणी वीर्यवती आहे हें नवल नाहीं. नवल हें आहे कीं अशा विजयवीर्यशाली महापुरुषाला तत्तुल्य व तद्गुरुस्थानीय ज्ञानेश्वरएकनाथादि साधुवृंदाला व सर्व वारकरी संप्रदायाला ' पंगु, नेभळे, राष्ट्रकार्याला निरुपयोगी, राष्ट्रविघातक' इ० दुष्ट विशेषणें लावून त्यांची निंदा व कुटाळकी करण्यांत कित्येक अर्वाचीन ' देशभक्त ' स्वतःस धन्य समजत आहेत व ' वंदिले वंदावे निंदिले निंदावे । एक जातो जावें त्याच्या मार्गें ' या अंधपरंपरान्यायानें कित्येक तरुणांचा बुद्धिभ्रंश होत आहे ! संतांची निंदा देवाला आवडत नाहीं, समाजाला मानवत नाहीं. ज्ञानेश्वरनाथतुकोबादि भक्तांनीं व वारकरी संप्रदायानें काय या लोकांचें घोडें मारलें आहे कोण जाणे ! सांप्रतच्या देशभक्ति-संप्रदायाला संतनिंदेचें, अकारण विरोधाचें व धर्मद्रोहाचें असें वळण लागणें कोणत्याही तऱ्हेनें इष्ट नाहीं. संतांची महाराष्ट्रीयांवर एवढी जबरदस्त छाप बसली आहे कीं ती कोणालाही ढिलावतां येणें शक्य नाहीं. शिवाय ज्ञानेश्वरनाथतुकोबांचें वाङ्मय वगळलें तर मराठी भाषेचें वैभव काय उरतें बरें ? या साधुसंतांनीं महाराष्ट्रांत प्रचंड धर्म-जागृति केली, राष्ट्राची मनोभूमि शुद्ध करून ठेवली, लोकांस धर्म-नीतिसदाचाराचे धडे घालून दिले, परधर्मीय राजसत्तेखालीं चिरडलेल्या जनतेस धर्मसंजीवन देऊन उठवलें, वेदधर्माचें रक्षण केलें, हिंदुधर्म व हिंदुसमाज यांचें अत्यंत बिकट परिस्थितींत संगोपन केलें, मराठी भाषेचें ऐश्वर्य वाढविलें, स्वतःच्या उज्ज्वल चारित्र्यानें व दिव्य प्रबोधशक्तीनें महाराष्ट्रास सर्वतोपरी जिवंतपणा आणला व म्हणूनच येथें शिवरायास स्वराज्यस्थापना करितां आली हें सूर्यप्रकाशासारखें स्वच्छ दिसत असतांना जे लोक पाश्चात्यांच्या देशभक्तीच्या कल्पनांनीं भ्रांत होऊन या लोकोपकर्त्या संतांची अवहेळणा करण्यास प्रवृत्त होतात त्यांना काय नांव द्यावें हें सम-

जत नाहीं ! मनोजयाचे मूर्तिमंत पुतळे, निश्चयाचे मेरु, ज्ञानवैराग्याचे सागर, भूतकल्याणासाठीं ज्यांचे अवतार, जे अखिल राष्ट्राला मातापित्यांहूनही अत्यंत पूज्य, ज्यांच्या चरणांपाशीं बसून सकल लोककल्याणेच्छूंनीं आशीर्वाद मागावेत अशा थोर योग्यतेचे ईश्वरतुल्य जे महात्मे त्यांना जे नेभळे म्हणतात व त्यांनीं राष्ट्राचें मनोबल नष्ट केलें म्हणून त्यांची निंदा करितात त्यांनीं या संतांचे समग्र ग्रंथ तरी निर्मत्सरबुद्धीनें वाचून पहावेत अशी त्यांस माझी सविनय प्रार्थना आहे. या संतांनीं राष्ट्र बुडविलें व समर्थांनीं तारलें असा या लोकांचा एक कोटक्रम आहे. समर्थांची-रामदासांची-स्तुति कराल तेवढी आह्मांला प्रियच आहे, पण त्यासाठीं इतर संतांची निंदा कशाला करितां? शिवबांना समर्थांचे आशीर्वाद व साह्य मिळालें हें कोण ना म्हणतो? शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यसाधनाला जे कार्यकर्ते, न्यायी, सदाचारी, निग्रही, व शीलवंत पुरुष येऊन मिळाले व त्यांच्या झेंड्याखालीं राष्ट्रकार्यार्थ सर्वस्व अर्पित झाले ते नाथतुकोबादि संतांची छाप पडलेल्या महाराष्ट्रांतून मिळाले कां हे सारे देशभक्त आकाशांतून एकदम् कोसळले ? संतांनीं महाराष्ट्र नेभळा बनविला होता तर तुकोबांच्या मेघगर्जनेनें निनादित झालेल्या पुण्यप्रांताच्या दऱ्याखोऱ्यांतून शिवबांना मावळे मिळाले कां परदेशांतून ते पार्सलांनीं बोलावून आणले होते? डोंगरी मुलखांतल्या कंटक, इमानी, व शूर अशा मावळ्यांच्या एकनिष्ठ साह्यामुळेंच शिवरायांना स्वराज्यस्थापना करितां आली हें सर्व इतिहासज्ञांस कबूल आहे. मावळे म्हणजे बहुतेक शेतकरी असतात व सर्व देशांतल्या शेतकऱ्यांप्रमाणें यांनाही लावण्या व पोवाडे गाण्याचा पहिल्यापासून छंद आहे, तथापि आजही कोणी मावळप्रांत सहज हिंडून पाहील तर त्याला तुकोबारायांचे परंपरेनें आलेले कित्येक अभंग व अभंगपाद मावळ्यांच्या तोंडून ऐकायला मिळतील ! मावळ्यांना धर्मवाङ्मय

कोणतेंही मार्गांत असलें तर तें तुकोबांचे अभंगच होत. शिवबांची बारा मावळें एकमेकाला लगटलेलीं असून त्यांची एकजूट आहे. तानाजी मालुसऱ्याचा प्रसिद्ध शेलारमामा देहूपासून दीडकोसावर असलेल्या शेलारवाडी ( आतां स्टेशन )मध्ये राहत असे. पुढें रामदासस्वामींची छाप मुख्यत: शिवरायांच्या पांढरपेशा पाईकांवर पडली यांत संशय नाहीं पण तत्पूर्वी मावळ्यांना धर्मनीतिव्यवहाराचें मोठें शिक्षण तुकोबांच्या कीर्तनांतून मिळालें होतें हें नाकबूल करणें शक्य नाहीं. समाज हा विराट् पुरुष आहे व विराट झालेल्या महात्म्यावांचून त्याला गदगद हालवायला कोणीही समर्थ होत नाहीं ! हें लुंग्यासुंग्यांचें काम नाहीं. कलिकालप्रभावानें राष्ट्रावर धर्मग्लानीचे ढग मधून मधून येतात, व यावेळींच लोक दुबळे होतात. हे ग्लानीचे ढग जेव्हां महात्म्यांचे धर्मरक्षणार्थ अवतार होतात तेव्हां वितळून जातात व त्यांच्या प्रभावानें राष्ट्रांत सर्व प्रकारचे कर्ते पुरुष उत्पन्न होऊन राष्ट्राची सर्वांगीण उन्नति होते. समाजाला संतमहात्म्यांवांचून इहपरलोकीं तारक दुसरे कोणीच नाहींत. त्यांच्या नेतृत्वावांचून व कृपाशीर्वादावांचून उभारलेलें राजकारण कागदाच्या फुग्यासारखें टिचकीबरोबर नाश पावतें. समर्थांनींही 'पहिलें तें हरिभजन । दुसरें तें राजकारण' असेंच म्हटलें आहे ना ? साधुसंतांनीं जग 'मिथ्या नाशिवंत' आहे असें शिकवल्यामुळें लोक नेभळे झाले असा आक्षेप घेणारांस मी विचारतों कीं समर्थांनीं काय जग 'सत्य अविनाशी' आहे म्हणून सांगितलें आहे ? त्यांच्या ग्रंथांत असें कोठें म्हटलें आहे? 'अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्वमाम्' ही भगवान् श्रीकृष्णांचीच शिकवण आहे ना ? वेदशास्त्रें व स्वत:चा अनुभव काय सांगतो तें तरी पहा. उपासांनीं लोक नेभळे बनतात का ? आण्णासाहेब पटवर्धन व महात्मा गांधी यांचे अनुभव घ्या! खरे देशभक्त शिवाजीमहाराज हे संतांचें सामर्थ्य पुरें ओळखीत होते

म्हणूनच ते त्यांच्या चरणीं लीन असत ! राजकारण धर्मविवेक सोडून वावरेल तर तें फसेल. राजस चळवळींच्या थपडा खाऊन व हताश होऊन राष्ट्रांत पूर्ण नैराश्य उत्पन्न झालें म्हणजे तें देव-धर्मसाधुसंतांकडे वळतें व सात्विकतेचें प्रेम, ऐक्य व तेज त्यांत उत्पन्न होऊन तें यशस्वी होतें. समाज धर्मशून्य, विवेकहीन, व मूढ बनतो तेव्हां त्यांतल्या सर्व भागांत अतिशय घाण सांचते. ती पावसाच्या सामान्य सरींनीं वाहून जात नाहीं, तिला मुसळधार धों धों पड-णारी मेघवृष्टीच लागते. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, श्रीरामदास हे महात्मे आपल्या मेघगर्जनांनीं सारा समाज हादरून सोडतात; त्यांच्या मेघवृष्टींनीं समाजांतील सारी घाण वाहून जाऊन कूप, नद्या, नाले पाण्यांनीं तुडुंब भरतात; खडकाळ भाग सोडून बाकीची जमी-न भिजते आणि मग अशा सुपीक जमीनींतून शिवबासारखा कुश-ल व समर्थ शेतकरी हवें तें पीक काढून घेतो, व सर्व राष्ट्र सुख-समृद्धींनीं भरून त्याचें आनंदवनभुवन होतें ! महाराष्ट्राची अशी सुस्थिति तुकोबांच्या प्रयाणानंतर एकदोन तपांतच झाली. त्या सुख-समृद्धीकडे पाहून जमीनीची व तिची मशागत करणाऱ्यांची, भर-भरलेल्या पिकाची व भोक्त्यांच्या भाग्याची हवी तेवढी तारीफ करा—ती योग्यच आहे आणि तिच्यांत भाग घेणार नाहीं असा करंटा कोण आहे ? पण त्या मदानें तर्र होऊन मेघांचे उपकार विसरूं नका एवढेंच प्रेमाचें सांगणें आहे ! मेघवृष्टीच्या पाठोपाठ हताश, परवश व धर्मशून्य झालेल्या महाराष्ट्राचें आनंदवनभुवन झालें. त्याचें गौर-वही समर्थांच्या मेघगर्जनेनेंच ऐकून आपण या मेघसंघाताला नम्र-भावानें वंदन करूं. समर्थ शिवराज्यारोहणाच्या परम मंगल प्रसंगानंतर आनंदानें म्हणाले:—

**उदंड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ।**
**जप तप अनुष्ठानें । आनंदवनभूवनीं ॥**

लीहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभूवनीं ॥
बंड पाखंड उडालें । शुद्ध अध्यात्म वाढले ।
राम कर्ता राम भोक्ता । आनंदवनभूवनीं ॥
देव भक्त एक जाले । मिळाले जीव सर्वही ।
संतोष पावले येथें । आनंदवनभूवनीं ॥
स्वर्गीची लोटली जेथें । रामगंगा महानदी ।
तीर्थासी तुळणा नाहीं । आनंदवनभूवनीं ॥
स्वधर्माआड जे विघ्नें । तें तें सर्वत्र उठिलीं ।
लाटिलीं कुटिलीं देवें । दापिलीं कापिलीं बहू ॥
बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभूवनीं ॥
गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें ।
निर्मळ जाहली पृथ्वी । आनंदवनभूवनीं ॥

---

# प्रकरण तेरावें.

—:o:—

# चातकमंडळ.

पिपासाक्षामकण्ठेन याचितं चाम्बु पक्षिणा ।
नवमेघोज्झिताचास्य धारा निपातिता मुखे ॥

**तुकोबांचे मुख्य शिष्य.** १ महादाजीपंत कुळकर्णी, २ गंगाराम मवाळ, संताजी जगनाडे, ४ गवरशेट वाणी, ५ मालजी गाडे, ६ बंधु कान्होबा, ७मल्हारपंत चिखलीकर, ८ कोंडोपंत लोहोकरे, ९ रामेश्वरभट, १० शिवबा कासार, ११ नावजी माळी, १२ अंबाजीपंत, १३ कोंडपाटील, **लोहग्रांवचें वर्णन.** १४कचेश्वर, १५बहिणाबाई, १६निळोबाराय, १७संप्रदायाचा विस्तार.

तुकोबांनीं आपल्याकडे गुरुत्व न घेतां मेघवृष्टीनें उपदेश करण्याचा परिपाठ ठेवला तथापि मेघाकडे अनन्यगतिकत्वानें पाहणारे चातक नारायणाच्या सृष्टींत निर्माण होत असतात याला मेघानें तरी काय करावें ? तुकोबांच्या कीर्तनश्रवणास हजारो लोक आले व तात्कालिक समाधान पावून गेले, पण त्यांतून कित्येक पूर्व सुकृतानुसार तुकोबांस कायावाचामनानें अनुसरते झाले. अशा समाप्त जीवांचीं पुण्यप्रद नामें व त्यांच्या संक्षिप्तकथा ह्या प्रकरणांत पाहूं.

देहूस एका जुन्या वाडावर तुकोबांच्या प्रमुख शिष्यांचीं नांवें एकत्र दिलेलीं आढळलीं तीं येणेंप्रमाणें:—

१ निळोबाराय पिंपळनेरकर.
२ रामेश्वरभट वाघोलीकर.
३ गंगाराम मवाळ कडूसकर.
४ महादाजीपंत कुळकर्णी देहूकर.

५ कोंडोपंत लोहोकरे.
६ मालजी गाडे येलवाडीकर.
७ गवरशेट वाणी सुदुंब्रेकर.
८ मल्हारपंत कुलकर्णी चिखलीकर.
९ आंबाजीपंत लोहगांवकर.
१० कान्होबा बंधू देहूकर.
११ संताजी जगनाडे तळेगांवकर.
१२ कोंडपाटील लोहगांवकर.
१३ नावजी माळी लोहगांवकर.
१४ शिवबा कासार लोहगावकर.

हीं नांवें चौदा आहेत. यांत प्रथम निळोबारायांचें नांव घातलें आहे तें निळोबा तुकोबांच्या टाळकऱ्यांपैकीं एक होते ह्मणून नसून तुकोबांच्या शिष्यमंडळांतले अग्रणी म्हणून होय. निळोबा तुकोबारायांचे वेळीं हयात नव्हते, पण तुकोबांचा भक्तिसंप्रदाय चालविणारे त्यांचे अधिकारी शिष्य होते. या १४ शिष्यांत ७ ब्राह्मण व ७ ब्राह्मणेतर होते हें लक्ष्यांत ठेवलें ह्मणजे 'तुकोबांचा ब्राम्हणांनीं छळ केला' हें म्हणणें किती लंगडें पडतें हें समजून येईल, या भेदवादाचा विटाळ वारकरीसंप्रदायाला केव्हांही शिवला नाहीं. सर्व शिष्य तुकोबांच्या कृपाछत्राखालीं आनंदानें भगवत्कथालापांत गुंग होते व त्यांचें परस्परप्रेमही अवर्णनीय होतें. निळोबांशिवाय बाकीचे १३ ही शिष्य पुणे प्रांतांतले व देहूच्या पंचक्रोशींतले होते. कान्होबा बंधु व मालजी गाडे जावई हे तर घरांतलेच होते. या १४ शिष्यांशिवाय कचेश्वर ब्रह्मे व बहिणाबाई यांची माहिती या दहा वर्षांतच लागली असल्यानें त्यांचाही या प्रकरणांत समावेश केला पाहिजे. प्रथम तेराजणांचा समाचार घेऊं. तेरांपैकीं चारजण लोहगांवचे आहेत; लोहगांवीं तुको-

बांचें आजोळ होतें व तेथील लोकांचा तुकोबांवर प्रेमाही अतिशय होता म्हणून तेरा शिष्यांची ओळख करून घेतल्यावर आपण लोहगांवचें वर्णन पाहूं. नंतर कचेश्वर व बहिणाबाई यांचा परिचय करून घेऊं व शेवटीं निळोबांच्या चरित्राचा विचार करून समारोप करूं. ह्या सोळा शिष्यांपैकीं निळोबा, कान्होबा, व बहिणाबाई यांनीं अभंग केले आहेत. रामेश्वरभटाचे ४ अभंग व २ आरत्या आहेत.

१ **महादाजीपंत कुळकर्णी देहूकरः**—हा देहूचा जोशी कुळकर्णी तुकोबांचा पहिल्यापासून निस्सीम भक्त होता. याच्या व तुकोबांच्या घराण्याचा स्नेहसंबंध पूर्वापार होता. महाराजांच्या संसाराकडे काळजीकाळ्यानें पाहणें, जिजाईला प्रसंगविशेषीं दाण्यागोट्याची किंवा पैशाची मदत करणें, हरतऱ्हेची पूसतपास करून तिला आपत्काळीं साह्य करणें हें वडीलपणाच्या नात्यानें महादाजीपंत करीत असे. इंद्रायणीच्या तीरावर ' करंजाया मावल्या " म्हणून देवीच्या मूर्ति आहेत तेथें तुकोबा भजनांत दंग होऊन बसत. शेजारच्या एका शेतकऱ्यानें तुकोबांना एकदा शेतावर राखण बसवून आपण परगांवीं गेला. तुकोबा सदा भजनांत निमग्न व पक्षी दाणे टिपायला आले तरी त्या नारायणाच्या मूर्ति भावायच्या, यामुळें त्यांनीं पक्षी निवारले नाहींत! तुकोबांना शेतकऱ्यानें अधमण दाणे देऊं केले होते, पण तो परत येऊन पाहतो तों कणसें काळीं व दाणा नाहीं! त्यानें संतापून पंचांकडे फिर्याद नेली. पंच येऊन पाहतात तों दहा खंडी दाणा निघाला. मग पांच खंडी दाणे तुकोबांस देवविले. तुकोबा अधमणावर घेईनांत, तेव्हां बाकीचा दाणा महादाजीपंतांनीं लोकसंमतीनें आपल्या घरीं सांठविला व श्रीविठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धाराच्या कार्यांत तो इमानानें सर्व खर्च केला.

२ **गंगाराम मवाळ कडूसकरः**—तुकोबांचे पहिले धृपदी व

मुख्य लेखक दोन: एक गंगाराम मवाळ कडूसकर व दुसरे संताजी तेली चाकणकर. गंगाराम मवाळ हे वत्सगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण दाभाड्यांच्या तळेगांवीं रहात असत. यांच्या वडिलांचें नांव नाभाजी. यांचा वडिलोपार्जित धंदा सावकारी सराफीचा असून हे घरचे सुखवस्तु होते. हे देहप्रकृतीनेंच सात्विक, शांत, सोशिक व प्रेमळ होते. यांचें आडनांव महाजन असून गंगारामबोवांना त्यांच्या 'मवाळ म्हणजे मृदु—सौम्य ' स्वभावामुळें तुकोबा प्रेमानें ' मवाळ ' म्हणूं लागले. गोपाळबुवांनीं ' मेणाहूनि अंतर मवाळ ' असें यांचें वर्णन केलें आहे. गंगारामबोवांसारखाच संताजी तेली यांचा स्वभाव होता, स्वभावसादृश्यामुळें त्यांचें परस्पर प्रेमही फार होतें. असे प्रेमळ, निष्ठावंत व दुराशाशून्य धृपदे—प्रेमभरानें नाचणारे, व मंजुळस्वरानें ठेका देणारे व तुकयाला जीवें भावें अनुसरणारे धृपदे—मागें सर्वकाळ सांथ देण्यास तयार असल्यामुळें तुकोबांच्या कीर्तनास अद्भुत रंग वोढवत असे, मवाळांचे वंशज तळेगांव, पुणें व कडूस येथें आहेत. गंगारामबोवांची व तुकोबांची गांठ प्रथम भामनाथ डोंगरावर पडली, मवाळ एकदा चुकलेली म्हैस शोधण्यास डोंगरावर गेले होते. तुकोबा तेव्हां भजनप्रेमांत रंगले होते, ते सहज म्हणाले 'घरीं जा, तुमची म्हैस तुमच्या वाडम्यांत बांधलेली आहे,' घरीं जातात तों खरेंच! चार दिवस न सांपडणारी म्हैस घरीं आली हा त्या साधुपुरुषाच्या वचनाचा महिमा असें त्यांस वाटलें, आणि भक्ताच्या सहजवाणीला सिद्धशक्ति येतेही. गंगारामबोवांनीं दुसरे दिवशीं घरीं पुरणपोळीचा उत्तम स्वयंपाक केला व सिद्धान्नाचें ताट स्वतः डोक्यावर घेऊन ते तुकोबांकडे डोंगरावर गेले. तुकोबा जेवले पण ही उपाधी टाळण्यासाठीं ते पुढें लवकरच भंडाऱ्यावर गेले. गंगारामबोवा तुकोबांच्या साधुत्वाला मोहून गेले. तीर्थयात्राप्रसंगीं व सर्वकाळ गंगारामबोवा व संताजी ही जोडी तुकोबांजवळ छायेसारखी असायची. तुकोबांस माघ

शुद्ध १० स गुरूपदेश झाला. तन्निमित्त तुकोबांच्या आज्ञेवरून कद्रूस येथें गंगारामबोवांनीं जो उत्सव सुरू केला तो अद्याप त्यांचे वंशज १५ दिवस करीत असतात. या उत्सवाचे दिवसांत मवाळांना सोयरसुतक येत नाहीं व त्यांचे घराण्यांत मूल देवी येऊन मरत नाहीं! हा तुकोबांचा प्रसाद आहे अशी मवाळांची श्रद्धा आहे. दशमीपासून चार दिवस पालखी, छबिना, भजन वगैरे सोहळा होतो. गंगारामाचा पुत्र विठ्ठल. त्याचे वंशांत रामकृष्ण नामक एक सत्पुरुष झाले व ते परमहंसवृत्तीनें पंढरीस राहत असत.

३ संताजी तेली जगनाडे:—संताजीची कांहीं हकीकत वर आलीच आहे. याचें अडनांव सोबवणे, राहणार चाकणचे. याचा पुत्र बाळाजी. त्याचे वंशज तळेगांवीं आहेत. तुकोबांच्या अभंगांच्या संताजीच्या हातच्या वह्या तळेगांवीं आहेत. त्याबद्दल प्रस्तावनेंत लिहिलेंच आहे व मेघवृष्टि प्रकरणांत त्याच्या लेखनाचा मासलाही दिला आहे. असें सांगतात कीं, संताजी व तुकोबा यांची आपसांत अशी आणभाक झाली होती कीं, आपणांपैकीं ज्याचा मृत्यु आधीं होईल त्यास जो मागें राहील त्यानें मूठमाती द्यावी! तुकोबा अदृश्य झाल्यावर कित्येक वर्षांनीं संतोबा वारले. त्यांस त्यांचे आप्तेष्ट मूठमाती देण्यास तयार झाले, पण वर कितीही माती टाकली तरी तोंड झांकेना. अखेर मध्यरात्रीं तुकोबा स्वतः प्रगट झाले, त्यांनीं मूठमाती दिली व बाळाजीस १३ अभंग दिले. त्यापैकीं एक अभंग असा आहे:—

**चारितां गोधनें । माझें गुंतलें वचन ॥ १ ॥**
**आह्मां येणें झालें । एका तेलियाकारणें ॥ २ ॥**
**तीन मुष्टी मृत्तिका देख । तेव्हां लोपाविलें मुख ॥ ३ ॥**
**आलों म्हणे तुका । संत न्यावया विष्णुलोकां ॥ ४ ॥**

भंडाऱ्याच्या पायथ्याशीं सुदुंब्रें गांवीं संताजीची समाधि आहे.

**४ गवरशेटवाणी सुदुंबेकर**:—हा कानडा लिंगाईत वाणी सुदुंबें येथें राहत असे. प्रपंचव्यवहाराकडे दुर्लक्ष करूनही हा तुकोबांच्या सेवेंत रत असे. हा मोठा सत्त्वस्थ असे. तुकोबांच्या प्रयाणानंतर हा मृत्यु पावला. तत्पूर्वी त्यानें रामेश्वर भट व कान्होबा यांस बोलावून जवळ आणलें व त्यांच्या तोंडून तुकोबांचे अभंग ऐकत यानें सुखानें प्राण सोडला. ते वेळीं तुकोबांच्या रूपाच्या ध्यासांत हा इतका मग्न झाला होता कीं शेवटीं तुकोबा प्रगट झाले. यानें स्वहस्तानें त्यांचे कपाळीं बुका लावला व गळयांत हार घातला. तुकोबा दुसऱ्या कोणास दिसले नाहींत, पण सर्वांनीं अधांत्रीं हार लोंबतांना पाहून तुकोबांच्या नांवाचा जयघोष केला व तत्क्षणींच गवरशेटनें देह ठेवला !

**५ मालाजी गाडे येवलवाडीकर**:—हा तुकोबांचा जावई म्ह० भागीरथीचा पति. उभयतांची तुकोबांवर अत्यंत भक्ति होती व देहूस गोपाळपुरा येथें भागीरथीची मूर्ति प्रयाणस्थानाजवळ स्थापिलेली अद्याप आहे. तुकोबांनीं मालजीस पाठास गीता दिली होती.

**६ तुकयाबंधु कान्होबा**:—प्रथम हा तुकोबांपासून वेगळा निघाला होता, पण पुढें तुकोबांची छाप त्याचे मनावर बसली व तो त्यांचा शिष्य झाला. गाथ्यांत या तुकयाबंधूचे बरेच उत्कृष्ट अभंग असून तुकोबांच्या प्रयाणानंतर यानें जो शोक केला व देवाशीं भांडण केलें त्याबद्दलचे अभंग तर अत्यंत करुणारसपूर्ण आहेत.

**७ मल्हारपंत चिखलीकर**:—हाही तुकोबांच्या नेमनिष्ठ टाळकऱ्यांपैकीं एक होता.

**८ कोंडोपंत लोहोकरे पुणेंकर**:—हाही धृपद धरीत असे. त्यानें एकदां आपला काशीयात्रेस जाण्याचा बेत तुकोबारायांस कळविला व ' तुमचें वचन मानणारे पुष्कळ सुखवस्तु गृहस्थ आहेत तरी त्यांजकडून मला देशावर करून द्या ' अशी त्याची प्रार्थना

केली. तेव्हां तुकोबांनीं आसनाखालीं हात घालून एक होन काढून त्याला दिला व सांगितलें कीं, 'हा होन मोडून साहित्य घेत जा, मात्र त्यांतील एक पैसा शिल्लक ठेवीत जा म्हणजे त्याच पैशाचा दुसऱ्या दिवशीं होन होईल.' कोंडोबानें पहिल्याच दिवशीं त्याची प्रचीत पाहिली. तेव्हां पैशाचा होन होतो हें पाहून त्याचें समाधान झालें. ही गोष्ट कोणास कळूं देऊं नकोस असें तुकोबांनीं त्यास बजाविलें व त्याच्याबरोबर तीन अभंग पाठविले ते अभंग हे:—

१

**परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ १ ॥**
**भागीरथी महादोषनिवारिणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥२॥**
**जिता मुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तीरीं । आहिक्यपरत्रीं सुखरूप ॥३॥**
**तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ४ ॥**

२

**तुह्मी विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ॥ १ ॥**
**कृपा कराल ते थोडी । पायां पडिलों बराडी ॥ २ ॥**
**काय उणें तुह्मांपाशीं । मी तों अल्पचि संतोषी ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥ ४ ॥**

३

**पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ १ ॥**
**माझें झालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥ २ ॥**
**केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ४ ॥**

ह्या तीन अभंगांत भागीरथी, काशीविश्वेश्वर व विष्णुपद यांस तुकोबांनीं प्रार्थना केली आहे. कोंडोबानें त्यास मिळालेल्या होनाच्या आधारावर सर्व यात्रा पार पाडली. कोंडभटानें चतुर्मास काशीवास केला. कोंडभट यात्रा करून परत लोहगांवीं आला, व तुकोबांस वंदन करून त्यानें सर्व हकीकत सांगितली, मात्र होन परत मागतील या भीतीनें त्यानें होन हरवला असें तुकोबांस खोटेंच

सांगितलें! घरीं परत येऊन धोतराच्या ज्या पदरांत त्यानें तो होन बांधून ठेवला होता तो पदर सोडून पाहिलें तों त्यांत होन नाहीं! हें पाहतांच तुकोबांचें सिद्धिसामर्थ्य त्याच्या लक्ष्यांत आलें व त्यानें तुकोबांची क्षमा मागितली !

९ रामेश्वरभटः—रामेश्वरभट पूर्वी छलक होते तेच तुकोबांचे एकनिष्ठ भक्त कसे झाले हें मागें एका प्रकरणांत सविस्तर सांगितलें आहे. वाघोलीस रामेश्वरभटांच्या बंधूंचे वंशज आहेत, व बहूळ येथें खुद्द रामेश्वरभटांचे वंशज राहतात. दोन्ही ठिकाणीं शोध करून मला विशेष माहिती मिळाली नाहीं. रामेश्वरभटांचे पणजे कानभट हे कर्नाटकांत बदामी येथें राहत असत. तेथून ते पुणें प्रांतीं राहण्यास आले. हें घराणें मूळचें कानडी असून चार पिढ्यांत महाराष्ट्री झालें असावें. कानभट-चौंडवा-कानभट-रामेश्वरभट अशी यांची वंशावळ आहे. रामेश्वरभटांचे पुत्र विठ्ठलभट यांचा वंश बहुळगांवीं आहे. वेदविद्या रामेश्वरभटांच्या घरची होती व त्यांचें संपूर्ण अध्ययन त्यांच्या वडिलांपाशींच झालें. ते रामोपासक होते व त्यांच्या पूजेंतली राममूर्ति अद्याप बहुळ येथें आहे. वाघोलीस व्याघ्रेश्वराचें स्थान आहे; ह्या जुनाट शिवदेवतेपाशीं त्यांनीं अनुष्ठानें केलीं होतीं. घरची पूजाअर्चा संपली ह्मणजे हे प्रत्यहीं व्याघ्रेश्वराच्या मंदिरीं जाऊन एकादष्णी करीत. त्यांच्या वंशजास ‘ बहुळकर ’ ह्मणतात. त्यांच्याकडे वाघोली, भावडी, बहुळ, चिंचोली व शिंदेगव्हाण हीं पांच गांवें जोशीपणाच्या वतनाचीं अजून चालत आहेत. रामेश्वरभट तुकोबांचे शिष्य झाल्यापासून वारकरी मंडळींत त्यांची मान्यता झाली. हे तुकोबांच्या मागें टाळ धरीत, व तुकोबांच्या समागमें यांनीं १०।१२ वर्षे काढलीं. तुकोबांच्या प्रयाणसमयीं हे देहूसच होते व शेवटीं शास्त्रार्थ यांनींच काढून दिला. यांची समाधि वाघोली-

सच आहे. मार्गशीर्ष शुद्ध १४ ला यांची पुण्यतीथ बहुळकर करीत असतात.

१० शिवबा कासार:—तुकोबांचें आजोळ लोहगांवीं असल्यानें व लोहगांवकरांची तुकोबांवर अत्यंत निष्ठा असल्यानें त्यांचें तेथें जाणें वारंवार होत असे. तेथें तुकोबांच्या कीर्तनास फार रंग चढे. सारा गांव व आसपासचे शेंकडो लोक येत, पण शिवबा येत नसे—उलट घरीं बसून तुकोबांची यथेच्छ निंदा करी. त्याचा नष्ट, कृपण व कुटिल स्वभाव प्रसिद्ध होता, पण असाही मनुष्य कीर्तनगंगेंत शुद्ध होऊन तरून जावा असें तुकोबांच्या दयार्द्र अंत:करणास वाटे. पहिल्या दिवशीं तो भिडेनें आला, दुसरे दिवशीं अर्धवट खुषीनें, तिसरे दिवशीं आवडीनें व पुढील चार दिवस अत्युत्कटतेनें आला आणि सातवे दिवशीं त्यांचा भक्त बनला! तुकोबांच्या जिवंत वाणीचा प्रताप केवढा लोकोत्तर कीं तिनें सातच दिवसांत एका कृपण नष्ट जीवास भगवत्प्रेमरंगांत मिळवून घेतलें!

**गाढवाचें घोडें । आह्मी करूं दृष्टीपुढें ।**
**तुका ह्मणे खळ । करूं समर्थी निर्मळ ॥**

या त्यांच्या बाण्याप्रमाणें त्यांनीं ह्या पाषाणाला पाझर फोडले! तुकोबांच्या संगतीनें शिवबाचें रूपांतर झालें. त्यामुळें शिवबाची बायको फार चिडली. आपला नवरा पैशाचा निदिध्यास करायचा सोडून विठोबाचा निदिध्यास करूं लागला हें त्या संसाररत स्त्रीस आवडलें नाहीं! तिनें तुकोबांचा सूड उगवण्याचा निश्चय केला. शिवबानें तुकोबांस सत्कारानें घरीं बोलावलें तेव्हां त्यांच्या स्नानाचे वेळीं ह्या कृत्येनें त्यांच्या अंगावर अधणाचें कढत पाणी ओतलें. लगेच त्यांचे अंगावर फोड आले, तेव्हां त्यांनीं धावा केला:—

**जळे माझी काया लागला वोणवा । धांवरे केशवा मायबापा ॥ १ ॥**
**पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन झालें ॥ २ ॥**

फुटोनियां दोन्ही आग होऊं पाहे । पाहतोसी काय कृपा माझे ३
घेऊनी जीवन धांव लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ४॥
तुका ह्मणे माझी तूं होसी जननी । आणिक निर्वाणीं कोण राखे? ५

पुष्पाहून किंवा लोण्याहून ज्यांचें चित्त मृदु त्या लोकोपकारार्थ झटणाऱ्या महात्म्यांचा दुर्जन किंवा अज्ञजन जेव्हां असा छळ करितांना आपण पाहतों तेव्हां क्षणभर तरी ह्या मनुष्यलोकींच्या वस्तीचा वीट येऊन जातो. त्या सटवीनें या करुणानिधीच्या अंगावर कढत पाणी ओतल्याचें ऐकतांच आपल्या अंगाला चटका बसल्याचा भास होतो ! असो. तुकोबांच्या मनांत शिवजीच्या बायकोबद्दल क्रोध आला नाहीं तर करुणा आली, पण देव तिच्यावर रागावले, तिच्या अंगावर कोड फुटलें. त्या व्यथेनें ती तळमळत पडली, रामेश्वरभटांच्या सूचनेवरून तुकोबांस स्नान घातलें होतें, तेथील चिखल शिवजीनें तिच्या सर्वांगास चोळला तेव्हां ती बरी झाली! यानंतर तिलाही अनुताप झाला व शिवजीप्रमाणें तीही तुकोबांची भक्त झाली.

**११ नावजी माळीः**—हाही लोहगावचा राहणारा. तुकोबांवर त्याची भक्ति असल्यानंतर सुवासिक पुष्पांच्या उत्तमोत्तम माळा गुंफून त्या त्यांच्या गळ्यांत तो घालीत असे. " नावजी माळी भक्त भोळा । अखंड गुंफून सुमनमाळा । घालीत तुकयाच्या गळां । सप्रेमकळा त्या अर्पिली ॥ " असें गोपाळबोवांनीं ह्मटलें आहे. ' सूत कांतूनि गोंवरीवर । पुष्पांच्या माळा करीतसे फार । कीर्तनीं बैसती द्विजवर । तयांसी हार ते घाली ॥ ' असें महिपतबावा म्हणतात. सुमनांच्या माळा गुंफून त्या विठोबाच्या, तुकोबांच्या व प्रेमळ श्रोत्यांच्या गळ्यांत घालणें नावजीस प्रिय असे. तो जातीचा माळी असल्यामुळें बागेंतून तुळसीफुलांचीं झाडें त्यानें लाविलीं होती, व खुरपतांना, झाडांस पाणी घालतांना, फुलें तो-

डतांना व त्याचे हार गुंफतांना विठोबाची मूर्ति चित्तांत व नाम मुखांत ठेवून हा सच्छील नावजी आपल्या आयुष्याचें सार्थक करीत असे. हा भजन फार प्रेमानें करी. नावजीचें प्रेमळ नृत्य व भजन पाहून तुकोबांची त्यावर प्रसन्नता होती. नावजी कीर्तनास आला कीं तुकोबांनीं 'हा आमचा प्राणविसांवा आला' असें ह्मणावें!

१२ **आंबाजीपंत लोहगांवकरः**—हा लोहगांवचा जोशी कुळकर्णी तुकोबांच्या चरणीं लागून कृतार्थ झाला. सर्व श्रोत्यांत तो मोठा एकाग्र होत असे. तो लोहगांवीं कीर्तनांत गुंग झाला असतांना एकदां मध्यरात्रीं त्याच्या घरीं मुलानें राम म्हटला! मुलाच्या आईला दुःखाचा उमाळा येऊन तिनें प्रेत कीर्तनांत आणून टाकलें व नवऱ्यावर व तुकोबांवर सडकून पुष्पांजळी वाहिली! तेव्हां तुकोबांच्या तोंडून अभंग निघालाः—

**अशक्य तों तुम्हां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया १**
**मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ध्रु०**
**थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे । म्हणवितों दास काय थोडे २**
**तुका ह्मणे माझे निवचावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ३॥**

एक प्रहर कडाक्याचें भजन झाल्यावर तुकोबांच्या प्रेमळ विनवणीप्रमाणें देवाला तो मृतपुत्र उठवणें भाग पडलें. भक्ताच्या चरित्रांत असले चमत्कार होतात, पण त्यांचें हें बीज लक्षांत ठेवलें पाहिजे कीं हें मीं केलें किंवा माझ्यामुळें सिद्ध झालें अशा अभिमानाची लहरीही त्यांच्या चित्तला स्पर्शत नाहीं, आणि भक्त जेव्हां पूर्ण निरभिमानी होतो व सर्व कार्य नारायणाचेंच समजतो तेव्हांच त्याची वाणी देवाला खरी करून दाखवावी लागते!!

१३ **कोंड पाटील खांदवेः**—तुकोबा लोहगांवास जेव्हां जेव्हां जात तेव्हां तेव्हां त्यांचें बिऱ्हाड याचे घरीं असे. हा टाळ धरणारा उत्कृष्ट होता. " ज्याचे घरीं तुकयाचें बिढार । जो टाळ धरित्यांत

परम. चतुर । तो कोंड पाटील लोहगांवकर । ठेवून माथा कर पूर्ण केला ॥ " असें गोपाळरावांनीं ह्मटलें आहे.

**लोहगांवः**—शिवबा कासार, नावजी माळी, अंबाजीपंत व कोंड पाटील हे चौघेही शिष्य लोहगांवचे होते. तुकोबांचा विशेष निकट संबंध दोन गांवांशींच होता, एक देहू व दुसरें लोहगांव. देहू त्यांचें राहण्याचें गांव, व लोहगांवीं त्यांचें आजोळ. देहूकरांपेक्षांही लोहगांवकरांचें तुकोबांवर अधिक प्रेम होतें,

**मथुरेसी कृष्ण जन्मला पाहीं । परी गोकुळींच्या सुखासी पार नाहीं तैसा तुकयाचा प्रेमा सर्वही । लोहगांवीं लुटिला ॥ १०४ ॥**

असें महिपतबावांनीं ( भक्तलीलामृत अ० ३६ ) मोठ्या सहृदयपणानें म्हटलें आहे. हें लोहगांव पुण्याच्या नागझरीच्या काठीं एक खेडें होतें तेंच होय असें राजवाडे यांनीं एक मनःकल्पित विधान ठोकून दिलें होतें ! त्याचें खंडण[1] मीं ५ वर्षांपूर्वीं केलें असून खरें लोहगांव कोणतें तें सप्रमाण दाखवून दिलें आहे. त्याचा उताराच येथें देतोः—

" तुकोबांचे लोहगांव पुण्याच्या ईशान्येस एरवड्याच्या पलीकडे ९ मैलांवर असून हें गांव वारकरी मंडळांत प्रसिद्ध आहे ! तुकोबांचें आजोळ या लोहगांवीं होतें व त्यांच्या आईचे माहेरचें आडनांव ' मोझे ' असें होतें. येथील गांवकऱ्यांचे कागदपत्र मीं पाहिले आहेत. त्यांतील उल्लेख व गांवाची रचना पाहतां शंकाच उरत नाहीं, तुकोबांच्या आजोळच्या घरांत जिच्यावर बसन तुकोबा ध्यानभजन करीत अशी एक शिळा आहे. ही शितुकोबांचे पश्चात् एका वृंदावनावर ठेविली असून वारकऱ्यांचें

---

१ भारत इतिहास संशोधक मंडळाचें तृतीय संमेलन वृत्त पहा. त्यांत माझा लोहगांवावरील लेख पृ० १४१ ते १४२ मध्यें दिला आहे.

तेथें हमेष भजन होतें. पंढरीहून वारकरी आळंदीस जातांना येथें कार्तिक वद्य ९ स थांबतात. येथें मोझे यांचे घराण्याकडे परवांपर्यंत जमीन होती, या घराण्यांतला कृष्णा मोझे हा मुंबईस एका फ्रूटवाल्याकडे नोकरीस आहे. शिवबाकासाराचा वाडा मोठा असावा असें वाड्याच्या पडक्या भिंतीवरून वाटतें. वाडा पश्चिमाभिमुख होता. वाड्यासमोर महादेवाचें एक पडकें देऊळ आहे, त्या देवळांत तुकोबा अनेकवार शिवाजीबरोबर बोलत बसत असें सांगतात. शिवजीजवळ ५०० बैल होता व तो कथील, शिसें व भांडीं यांचा मोठा व्यापार करीत असे. तुकोबांचे वेळीं पुनवाडी (पुणें ) कसेब लोहगांवाखालीं होती. लोहगांवचीं अनेक पडकीं घरें, तेथला विस्तृत महारवडा, तेथील माळी व कासार यांचीं जुनीं घरें, व एकंदर गांवाचा डौल पाहतां तुकोबांच्या काळीं लोहगांव मोठा कसब्याचा गांव होता हें स्पष्टच दिसतें. लोहगांवाहून पायवाटेनें आळंदी २॥ कोस, देहू ७ कोस, व सासवड ९ कोस आहे. लोहगांवीं कासार, मोझे, खांदवे, व माळी यांची वस्ती पुरातन आहे. कोंडपाटील खांदवे, नावजी माळी, शिवबा कासार हे तुकोबांचे शिष्य लोहगांवचेच. माळी लोकांचीं भाळेकर, घोरपडे, गरुड व भुकण अशीं चार बुडें म्ह० वेतनें आहेत. .........गांवांत तुकोबांचें देऊळ आहे, याशिवाय तुकोबांचें स्वतंत्र असें देऊळ अन्यत्र कोठेंही नाहीं. या मंदिराची स्थापना गुंडोजीबावाचे शिष्य इराप्पा यांनीं केली असें समजतें. पुनवाडीच्या बाजूनें गांवांत शिरतांच 'कासारविहिर' लागते. ती मोठी भव्य व रमणीय आहे. विहिरीच्या पूर्व, पश्चिम व दक्षिण ह्या तीनही बाजूंस तीन तीन कोनाडे असून पन्नास ब्राह्मण स्नानसंध्या करावयास बसतील अशी सुंदर चौफेर जागा विहिरींतच आहे. विहिरींत दक्षिणच्या बाजूस एका शिलालेख कोरला आहे. तो

शके १५३४मधील आहे. शिलालेखावर तागडीचे निशाण आहे. मुख्य मधला शिलालेख सुवाच्य आहे, बाजूचीं कांहीं अक्षरें दगडाचे कोन फुटले असल्यामुळें लागत नाहींत. तो शिलालेख असा—

**॥ श्रीगणेशायनमाश्रकाळीकायेन्म........**
**श्री शाळीवाहन शके १५३४ परीध.......**
**वीशंवशरे कारतीक वदी तीज आत......**
**र तदीनी सीउजी व काळोजी पीता केशो**
**जी माता रंभाई वंश थीटे शोमवंशी**
**कासार कसभे लोहोगावं श्रीरस्तुः**

ह्या शिलालेखावरून सदर गांव शके १५३४ मध्यें 'कसबे लोहो-गांव' होता हें स्पष्ट आहे, "

तुकोबांचें लोहगांव हें होय, येथील एका गांवकीच्या पत्रांत 'सदरहू कान्होजी रायेगडास महाराजापाशीं चाकरीस होता तो मरावयास गांवीं आला' असें वाक्य आढळलें त्यावरूनही तुकोबांच्या कीर्तनगजरांनीं निनादित झालेल्या मावळ प्रांतांतून शिवरायाला त्याचे शूरवीर मिळाले असें जें मागें ( पृ०४४९ ) मीं म्हटलें आहे त्याला बळकटी येते.

१४ कचेश्वर ब्रह्मेः—भारत इतिहास मंडळाच्या १८३५च्या वार्षिक इतिवृत्तांत ( पृ० २४१ ते २५६ ) या कवीच्या आत्मचरित्रपर १११ ओंव्या, कांहीं कागदपत्रें व दोन आरत्या पांडुरंगपंत पटवर्धन यांनीं प्रसिद्ध केल्या आहेत. आरत्या मला पूर्वींच मिळाल्या होत्या, आत्मचरित्र मात्र नवीन व महत्त्वाचें आहे. कचेश्वर ब्रह्मे हे चाकण येथील प्रख्यात वैदिक ब्रह्मे घराण्यांतले होत. कचेश्वर बाळपणीं फार उनाड व कुटाळ होते. जीर्णपुरा( जुन्नर ) पासून विजापुरापर्यंत स्वारी फिरून आली. कचेश्वर ह्मणतात—

**चमत्कार कांहीं माझा मज आला । जीवासी लागला गीताछंद**

मग विष्णुसहस्रनाम पाठही करूं लागले. त्यांना मध्यें कोणी विषप्रयोग

केला त्यानें घाप लागली. कोणीं सांगितलें कीं अंत्राजीपंताच्या घरीं ' सर्वही संग्रह तुकोबांच्या वह्या ' आहेत तेथें जा ह्मणजे तुकोबांचे अभंग पाठास मिळतील—यावरून ते देहूस आले—

**देखोनिया देव आनंदलें मन । देखिलें कीर्तन संतांमुखें ॥ ५० ॥**
**प्रत्यक्ष तुकोबा करीतसे कथा । आनंदें सर्वथा डोलतसे ॥ ५१ ॥**
**कर्दळी हेलावे जैसी चंडवातें । तैसें तुकोबातें देखियेलें ॥ ५२ ॥**

कचेश्वर ह्मणतात कीं तुकोबा कीर्तनांत आनंदानें इतके डोलत कीं ते खालीं पडतील कीं काय असें वाटून मीं त्यांना खांदा देऊन बळें आंवरिलें ! दुसरे दिवशीं तुकोबांच्या आज्ञेवरून कचेश्वर कीर्तनास उभे राहिले. त्यांची सर्व व्यथा गेली. त्यांच्या वडिलांनीं हा शूद्रांच्या मेळयांत मिळतो व नाचतो ह्मणून त्यांना घराबाहेर घालविलें, ' सांडी करूनियां वेगळें घातलें ' पुढें कचेश्वरांना मोकासा मिळाला, जमीनजुमला झाला, योगक्षेम चालला, कथाकीर्तनें चाललीं, व त्यांचें चित्तही परमार्थांत बरेंच रंगलें. कचेश्वरांची कांहीं कविताही प्रसिद्ध आहे. त्यांचा एक चमत्कार नमूद आहे. शके १६०७ मध्यें चाकणचौऱ्यायशींत पाऊस न पडल्यानें सर्वत्र भयाण दुष्काळ पडला असतां व अनुष्ठानादि इतर दैवी उपाय थकले असतां सर्व लोकांच्या आग्रहावरून कचेश्वर कीर्तनास उभे राहिले व त्यांनीं आपल्या सामर्थ्यानें पाऊस पाडला अशी दंतकथा आहे व तत्संबंधीं कागदपत्रही प्रसिद्ध झाले आहेत. ' हनुमंताचे देवळीं आनंदगिरीचे मठीं हरिकथेस मंडप (देणें) कथा परमेश्वराची करूं व देवाचा धांवा करूं ह्मणिजे पर्ज्यन्य पडेल संशय नाहीं ' अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली तेव्हां 'समस्त मिळोन कथा आरंभितांच पर्जन्य अहोरात्र पडला पुरे पुरें केलें ' व समस्त जन सुख पावले. या गोष्टीस ऐतिहासिक पुरावाही आहे. कचेश्वरांचे वंशज पुणें व सातारा प्रांतीं इनामदार आहेत.

१५ बहिणाबाई:—तुकोबांच्या शिष्यमंडळांत बहिणाबाईचें महत्त्व विशेष आहे. यांनीं आपल्या आयुष्याचीं कांहीं वर्षें देहूस तुकोबांच्या संगतींत घालविलीं, त्यांचीं कीर्तनें ऐकिलीं व तुकोबांच्या कृपेनें स्वानुभवसंपन्न होऊन आत्मचरित्रपर व उपदेशपर अनेक अभंगही लिहिले. निळोबा व महिपतबाबा यांच्यापेक्षांही बहिणाबाईच्या वचनांला एका दृष्टीनें अधिक महत्त्व येतें, कारण तुकोबांच्या गोष्टी व त्यांचें वर्णनस्तवन त्यांनीं तुकोबांना पाहून व त्यांच्या समागमाचा आनंद स्वतः भोगून अधिकारी वाणीनें केलें आहे. बहिणाबाईच्या अभंगांचा गाथा शके १८३५ मध्यें खामगांव येथील रा. उमरखाने यांनीं अभंगांच्या नकलेवरून छापला, पण मला अभंगांची मूळ वही बहिणाबाईच्या गांवीं म्ह० शिवपूर उर्फ शिऊर येथें बहिणाबाईचे वंशज श्रीराम यांजकडून मिळाली आहे. शिऊर येथें बहिणाबाई व निळोबांचे शिष्य शंकरस्वामी यांच्या समाधि आहेत व त्यांचे वंशजही तेथेंच राहतात. बहिणाबाईचें नांव तुकोबांच्या शिष्यांत आहे व रामदासस्वामींच्या शिष्यांतही आहे; तेव्हां बहिणाबाई वारकरी कां रामदासी, कां बहिणाबाई दोन, अशा शंका निघाल्या होत्या; पण मी स्वतः शिऊर येथें तीन दिवस राहून सर्व पोथ्या व कागदपत्र पाहून आलों असून हा निश्चितार्थ सांगतों कीं बहिणाबाई एकच आहेत. ह्यांना तुकोबांचा उपदेश होता व उत्तरवयांत त्या समर्थांच्या संगतीला असून समर्थांनीं त्यांना दिलेली प्रादेशमात्र (वीतभर) दास—मारुतीची मूर्तिही त्यांच्या राममंदिरांत पूजेंत आहे. बहिणाबाईच्या अभंगांत तुकोबांचा अनुग्रह कसा झाला तें त्यांनीं सविस्तर वर्णिलें आहे. बहिणाबाईच्या मूळ गाथ्यांतही ‘ सद्गुरु तुकारामसमर्थ ’ ‘ श्रीतुकाराम ’ ‘ रामतुका ’ असें बऱ्याच ठिकाणीं लिहिलें आहे.

बहिणाबाईचा जन्म शके १५५० मध्यें झाला असून त्यांना

वयाच्या १२ वे वर्षी कोल्हापुरीं तुकोबांचा स्वप्नांत अनुग्रह झाला. त्यांच्या गाथ्यांत आत्मचरित्राचे ५३ अभंग व निर्याणाचे ३४ अभंग आहेत व याशिवाय भक्ति, वैराग्य, ब्रह्म आणि माया, विठ्ठल, पंढरि, त्रिगुण, अनुताप, संत, सद्गुरु, ज्ञान, मनोबोध, ब्रह्मकर्म, पतिव्रताधर्म, प्रवृत्ति इ० विषयांवर त्यांचे अभंग असून त्यांची वाणी निळोबांच्या तोडीचीच प्रासादिक आहे यांत शंका नाहीं. त्या योगभ्रष्ट होत्या व पूर्व सुकृतबलानें या जन्मीं त्यांना तुकोबांचा अनुग्रह व समर्थांचाही समागम घडून त्या मुक्तकोटीस पोंचल्या. तुकोबांचा अनुग्रह झाला तेवढ्यापुरता भाग येथें प्रथम घेऊं. कोल्हापुरास जयरामस्वामींच्या कीर्तनांत त्यांनीं तुकोबांचे अभंग वारंवार ऐकिलें व त्या अभंगवाणीचा ठसा त्यांच्या पुण्यसंस्कार झालेल्या विमल मनावर बाळपणींच उमटला. तुकोबांच्या भेटीचा त्यांना ध्यास लागला—

तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्धें । तयाच्या अनुवादें चित्त झुरे ॥
ऐसीं ज्याचीं पदें तो मज भेटतां । जीवास या होता तोष बहु ॥
तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदांसी कथेमध्यें ॥
तुकोबाचीं कानीं ऐकेन हरिकथा । होय तैसें चित्ता समाधान ॥
तुकोबाचें ध्यान करूनी अंतरीं । राहे त्या भीतरीं घरामाजी ॥
बहेणी ह्मणे तुका सद्गुरु सहोदर । भेटतां अपार सुख आहे ॥

* * * *

मत्स्य जैसा जळावांचुनी चरफडी । तैसी ते आवडी तुकोबांची ॥
अंतरींचा साक्ष असेल जो प्राणी । अनुभवें मनीं जाणेल तो ॥
संचितासी दग्ध करी ऐसा कोण । सद्गुरूवांचून जाण मना ॥
बहेणी ह्मणे माझा जाऊं पाहे जीव । कां बा न ये कींव तुकोबा रे ॥

आर्त चातकाची कींव करुणामेघाला येणार नाहीं असें कसें होईल ? सात अहोरात्र तुकोबांचें ध्यान चाललें तेव्हां कार्तिक

वद्य ५ रविवार ( शके १५६२ ) ते दिवशीं तुकोबांनीं त्यांना स्वप्नांत उपदेश दिला, व गीता हातीं दिली—

आनंदलें मन चिद्रूप कोंदलें । उठोनि बैसले चमत्कारें ॥
मंत्र आठवती तुकोबास्वरूपें । स्वप्नामाजी कृपा पूर्ण केली ॥
अमृत पाजिलें चवी अनारिसी । साक्षी ज्याची त्यासी मनामाजी
बहेणी ह्मणे ऐसी कृपा सद्गुरूची । तुकारामें साची पूर्ण केली
तयाचिया पदें होतसे विश्रांती । त्याची देहाकृति विठ्ठलाची ॥
तुकोबाचीं सर्व इंद्रियें चालक । पांडुरंग देख सत्य आहे ॥

बहिणाबाईंना दुसऱ्यांदा तुकोबांचें स्वप्नदर्शन झालें, पुढें त्या पतिसह देहूस आल्या. तेथें तुकोबांची साक्षात् भेट झाली.

मायबापबंधु भ्रतारासहित । इंद्रायणी जेथ तेथ आलों ॥
करूनियां स्नान पांडुरंगीं भेटी । आनंदली सृष्टि अंतरंगें ॥
तुकोबा आरती करित होते तेथें । नमस्कारें स्वस्थ चित्त केलें॥
स्वप्नीं जो देखिला तेंचि ध्यान तेथ । देखिलें नेमस्त पूर्णदृष्टी ॥

बिऱ्हाड कोठें ठेवावें या विचारांत असतां सहज मंबाजीचें ‘ प्रशस्त घर ’ पाहिलें व ही मंडळी आंत शिरली, तों ‘ तो अति-चंचळ क्रोध जैसा ’ असा प्रसिद्ध मंबाजीबावा ‘ मारावया उठे घातलें बाहेरी ’ मग काय करितात बिचारे ? त्यांनीं प्रार्थना करून त्याच्या ओवरींत बिऱ्हाड ठेवलें व बाहेर पडले. बाहेर पड-तांच कोंडाजी लोहोकरे भेटले व त्यांनीं सर्वांस भोजनास बोलाविलें, तो त्यांस ह्मणाला !—

नित्य हरिकथा होतसे देउळीं । तुकोबा माउली वैष्णवांची ॥
रहा येथें तुह्मां भक्षावया धान्य । देऊं हेंही पुण्य आह्मां घडे ॥
बहेणि ह्मणे मग राहिलों देहूस । धरूनी हव्यास तुकयाचा ॥

तुकोबांच्या दर्शनकीर्तनसहवासाचा परमानंद भोगणाऱ्या भाग्य-शाली बहिणाबाई म्हणतात:—

देउळांत कथा सर्वकाळ होत। श्रवण करित दिनराती ॥ १ ॥
तुकोबाची कथा वेदांतील अर्थ। पावे माझें चित्त समाधान ॥ २ ॥
तुकोबाचें ध्यान पूर्वी कोल्हापुरीं। जें स्वप्नामाझारीं देखियेलें ॥३॥
तेंच ज्ञान डोळां प्रत्यक्ष देखोनी। आनंद लोचनीं हेलावत ॥ ४ ॥
दिनरात्रीं निद्रा नये तिळभरी। तुकोबा अंतरीं प्रवेशला ॥ ५ ॥
बहेणी ह्मणे येती सुखाचे डोलावे। जाणती अनुभवें जाणती ते ६

मंबाजी—बहिणाबाई याप्रमाणें तुकोबारायांचें दर्शन व कीर्तनश्रवणसुख इतर श्रोत्यांसमवेत भोगीत असतां त्यांना ज्या पुरुषापासून मनस्वी ताप झाला त्या प्रसिद्ध मंबाजी गोसाव्याकडे थोडेंसें वळूं! ह्या प्रकरणांत सर्वच तुकोबांचे भक्त त्या करुणमेघश्यामावर कसें नितांत प्रेम करीत होते तें आपण पाहिलें. या गोड प्रकाराला थोडें गालबोट पाहिजे, नाहीं तर हें जग ' जग नव्हेल ! ' मंबाजीपासून तुकोबांनाही मनस्वी त्रास होत होता. तुकोबांचें होतें निष्काम भजन व मंबाजीनें मांडली होती परमार्थाची दुकानदारी! तुकोबा लोकांचें हृदय हरिप्रेमानें भरीत होते, मंबाजी लोकांच्या पैशानें आपलें घर भरीत होता. मी एवढा प्रतिष्ठित महंत येथें असतांना सारे लोक तुकोबांच्याच भजनीं लागतात यामुळें मंबाजी मत्सरानें पोटांत जळतच होता, पण त्यांच्यामुळें याचा धंदा नीट चालेना ह्मणून तो त्यांचा द्वेषही करूं लागला. मंबाजी तुकोबांचा द्वेष करी पण तुकोबांच्या तें ध्यानींमनींही नव्हतें. तो महात्मा ' वासुदेवः सर्वमिति ' या कोटींतला, भूतमात्रीं हरि पाहणारा, प्रशांत आणि भूतदयान्वित. पण नारायणाची लीला ही कीं त्यानें तुकोबांच्या शांतीची परीक्षा पहाण्यासाठीं मंबाजीरूप कस त्यांच्या अगदीं घराशेजारीं पाठीशीं आणून ठेवला! दुर्जनाशिवाय सज्जनांचें भलेपण जगास कळत नाहीं. 'बाईटांनीं भले। हीनें दाविलें चांगलें ॥' तुका ह्मणे भले। ऐसें नष्टांनीं कळलें ॥ ' मंबाजीनें तुकोबांचें

शत्रुत्व मनीं धरिलें पण भक्तीचें वर्म तुकोबांच्या अंगांत इतकें भिनलें होतें कीं अजातशत्रुत्वाच्या बैठकीवर ते अखंड विराजमान झाले होते. मंबाजी एकादेवेळीं कीर्तनास आले नाहींत तर तुकोबा त्यांच्या-करितां थांबत, त्यांना बोलावूं पाठवीत व त्यांचा लोकांत मोठा सत्कार करीत ! पण पालथ्या घागरीवर पाणी, मंबाजी उमगला नाहीं. तो मनांत द्वेषाग्नि पेटवीत राहिला, व त्यानें अखेर एक प्रसंग साधला.

तुकोबांच्या विठ्ठलमंदिरालगतच मंबाजीचा वाडा होता, त्या वाड्याच्या व मंदिराच्या प्रदक्षिणेच्या वाटेंत दरम्यान मंबाजीनें कांहीं फुलझाडें लावून एक लहानशी बाग तयार केली होती व त्या बागेभोंवतीं चांगला कूड घातला होता. एकदां असा प्रकार झाला कीं तुकोबांस त्यांचा सासरा अप्पा गुळवे यानें दिलेली म्हैस कुडाला रेटून मंबाजीच्या बागेंत घुसली व तिनें झाडपाला खाऊन तुडवून बागेची नासधूस केली ! मंबाजीनें तुकोबांवर शि-व्यांचा वर्षाव केला व कांटे लावले होते ते प्रदक्षिणेच्या वाटेवर आले, एकादशी हरिदिनीं म्हणून लोकांची देवदर्शनास गर्दी व्हायची यास्तव तुकोबांनीं त्या कांट्या उपटून वाट मोकळी केली. मंबाजीच्या द्वेषाला प्रगट व्हायला निमित्त सांपडलें. सर्पाच्या पाठीवर चुकून पाय पडला तर तो जसा प्राण घ्यायला धांवतो, त्याप्रमाणें मंबाजी चवताळून तुकोबांच्या अंगावर धावून गेला, त्यानें त्याच कांट्या घेऊन तुकोबांना अत्यंत त्वेषानें झोडपलें. तोंडानें शिव्यां-चा वर्षाव व हातानें काठ्यांचा सपासप मार, याप्रमाणें त्यानें तुको-बांस मरेमरेतों मारलें. तुकोबांच्या अंगची शांतिक्षमा कसोटीला लागण्याचा प्रसंग आला व या कसाला तुकोबा पूर्णपणें उतरले. तुकोबांनीं मंबाजीच्या हातचा मार निमूटपणें खाल्ला, ते मंबाजीला चकार शब्द बोलले नाहींत किंवा त्यांनीं त्याचा प्रतीकारही केला नाहीं! महिपतबाबा ह्मणतात कीं, मंबाजीनें त्यांच्या अंगावर दहा,

बीस कांट्या फोडल्या! तुकोबांनीं आपलें गाऱ्हाणें देवळांत येऊन देवाला सहा अभंगांत सांगितलें त्यांतला एकच अभंग पहा:—

बरवें बरवें बरवें। केलें विठोबा बरवें ॥ १ ॥
पाहोनीयां अंत क्षमा। अंगीं कांटीवरी मारविलें ॥ ध्रु० ॥
शिव्यागाळी नीत नाहीं। बहु फार विटंबिलें ॥ २ ॥
तुका ह्मणे क्रोधाहातीं। सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

'कंटकवाटा भावें सोज्ज्वळ करूं जातां' कांटीवरी मारविलें याबद्दल तुकोबांना 'थोडी खंती' वाटली तरी 'क्रोधाहातें सोडविलें' याचेंच त्यांना समाधान वाटलें. जिजाईनें ममतेनें नाच कंड हातीं घेऊन सर्व कांटे काढले व तुकोबांना बिछान्यावर निजविलें. असो. एकादशी आली. मंबाजी कीर्तनाला आला नाहीं. आमचे सत्वधीर तुकोबा स्वत: मंबाजीच्या घरीं गेले व त्याला साष्टांग दंडवत घालून त्याचे पाय रगडीत त्याच्या पायांशीं बसले! मंबाजीचें चित्त न दुखवतां व तो खजील होईल असा एकही शब्द न बोलतां तुकोबा सरळपणें व नम्रपणें ह्मणाले: "सर्व दोष माझाच आहे. मीं झाडांस उपद्रव दिला नसता तर तुमच्या मनांस विक्षेप कां झाला असता? असो. या श्रमामुळें तुमचें अंग व हात दुखून आले असतील!" असें मधुरवाणीनें ह्मणत तुकोबा मंबाजीचें अंग रगडीत बसले! या सौजन्याचा मंबाजीच्या मनावर अल्पकाळ तरी सुपरिणाम झाला. त्याचें अंतर लज्जित झाले—तो तुकोबांबरोबर कीर्तनास गेला. तुकोबांच्या या शांतिक्षमादयादिगुणांचा लोकांच्या मनांवर कायमचा ठसा उमटला.

मंबाजीची ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे, पण त्याच्या कोपिष्ट व मत्सरी स्वभावाचा चटका बहिणाबाईच्याही अंगाला लागला. आपणांस एका समकालीन व्यक्तीची साक्ष मिळते ती आपण पाहून हें पुरें करूं.

बहिणाबाईचें बिऱ्हाड मंबाजीच्या घरीं पडलें याचा फायदा घ्यायचें त्या कुटिल स्वार्थी मनुष्यानें मनांत आणलें. तो ' माझा उपदेश घ्या, तुकोबाच्या कीर्तनास जाऊं नका, तो काय शूद्र आहे व शूद्राला ज्ञान कोठचें ? ' ह्मणून त्यांच्या मागें लागला. ' आह्मी अनुग्रही आहों जी पूर्वींचे ' हें उत्तर ऐकतांच त्याच्या मनांत द्वेषाचा संचार झाला. त्यानें बहिणाबाईची गाय कोंडून ठेवून तिला सोटे मारले ते इकडे तुकोबांच्या पाठीवर उठले ! शेवटीं महादाजीपंत कुळकर्ण्यानें त्यांना आपल्या घरीं बिऱ्हाड दिलें. याप्रमाणें हकीकत सांगून बहिणाबाई ह्मणतातः—

**तुकोबाचा पार वर्णीलसा कोण । कलियुगीं जाण प्रऱ्हाद हा ॥१॥**
**सर्वांतर साक्षी करूनियां स्तुती । स्वसुखें रमती आपुलिया ॥२॥**
**बहेणी ह्मणे लोक बोलती सकळ । तुकोबा केवळ पांडुरंग ॥ ३ ॥**

१६ **निळोबाराय पिंपळनेरकर**—तुकोबांच्या शिष्यमंडळांत निळोबांच्या योग्यतेचा पुरुष दुसरा नाहीं. बहुतेक शिष्य भोळे, भाविक, व निष्ठावंत होते व सर्वांचें तुकोबांवर नितांत प्रेम होतें रामेश्वरभट विद्वान् होते व बहिणाबाई थोर अधिकाराच्या होत्या, पण संप्रदाय चालवून तिहीं लोकीं झेंडा फडकविणारा सच्छिष्य एकच आणि तो ह्मणजे निळोबा हे होत. तुकोबांना तीन पुत्र झाले व त्यांत नारायणबोवा बरे होते, पण तुकोबांच्या ज्ञानभांडाराचा वारसपणा निळोबांकडेच आला. मांसवंशापेक्षां विद्यावंशाचें महत्व केव्हांही अधिक आहे. निळोबांचा अधिकार तुकोबांच्या कृपेनेंच पण त्यांच्या तोडीचाच होता, तुकोबारायांच्या चरित्राची पुनरावृत्ति म्हणजे निळोबारायांचें चरित्र होय. वारकरी संप्रदायांत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकोबा व निळोबा हे पंचायतन सर्वमान्य व सर्वप्रिय आहे. अनिवार भगवत्प्रेम, प्रखर वैराग्य, अलौकिक ज्ञानभाग्य हे गुण गुरुप्रमाणें शिष्याच्याही ठायीं विलसले व ' ते न

ते एकच ' असा लोकांचा अभिप्राय झाला व तो यथार्थही आहे. निळोबांच्या गुरुपरंपरेचा अभंग मागें (पृ० २४५) दिलाच आहे. गुरुकृपेविषयीं ते ह्मणतात—

**येऊनियां कृपावंतें । तुकया स्वामी सद्गुरुनाथें ॥ १ ॥**
**हात ठेविला मस्तकीं । देऊनि प्रसाद केलें सुखी ॥ ध्रु० ॥**
**माझी वाढाविली मती । गुण वर्णावया स्फूर्ती ॥ २ ॥**
**निळा ह्मणे मी बोलता । दिसे परि हे त्याची सत्ता ॥ ३ ॥**

निळोबांचें स्वतंत्र चरित्र आजवर उपलब्ध नव्हतें. महिपतबावांनीं (भक्तविजय अ० ५६) त्यांच्या दोन गोष्टी सांगून गुरुबंधूचे गुणगौरव केलें आहे. मला निळोबांचें सविस्तर हस्तलिखित ओवीबद्धचरित्र त्यांच्या वंशजांकडून मिळालें आहे. या ' निळाचरित्राचे' अध्याय वीस असून ओवीसंख्या सुमारें ३४०० आहे. या चरित्रावरून असें दिसतें कीं निळोबा तुकोबांच्यावेळीं हयात नव्हते, त्यांची परस्पर भेटही अर्थात् झाली नव्हती व तुकोबांच्या प्रयाणानंतर २५।३० वर्षांनीं ह्म० शके १६०० च्या सुमारास त्यांना तुकोबांचा स्वप्नानुग्रह झाला. पिंपळनेर हें नगर जिल्ह्यांत पण पुणें जिल्ह्याच्या सीमेजवळ आहे तेथें हे पुढें राहिले, पण यांचें मूळचें गांव तेथून नैर्ऋत्य कोनावर पुणें परगण्याच्या हद्दींतलें शिरूर हें होय. हे शिरूरचे जोशी कुळकर्णी. यांचें आजे गणेशपंत व पिते मुकुंदपंत. हे घरचे सुखवस्तु होते. हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण.

**घरीं असे धनधान्य । गाईवृषभें भरलें गोठण ।**
**वृत्तिप्राप्ती थोर वेतन । सर्व अनुकूळ तयासी ॥१-४२॥**

निळोबांच्या अंगावर वयाच्या १८ व्या वर्षी संसार पडला. त्यांच्या स्त्रीचें नांव मैनाबाई, ती साध्वी, सुशील व अनुकूल अशी धर्मचारिणी होती. निळोबांना वैराग्य प्राप्त झाल्याची गोष्ट मोठी मनोवेधक आहे. प्रातःस्नान करून रामलिंगाचें पूजन हे नित्य भक्तिभावानें करीत,

व नंतर कुळकर्ण पाहत. एकदा देवतार्चन चाललें असतां देवडी-वरचें बोलावणें आलें. पूजा झाल्यावर येतों म्हणून यांनीं निरोप पाठविला. चारदा उलट निरोप आले व शेवटीं त्यांना धरून नेले! हिशेब दिला, व परत फिरले ते पारावर बसून सेवाधर्माचा वीट येऊन त्याचा त्याग करायचा त्यांनीं निर्धार केला.

अंतरीं विवेकें निरखून। पाहे ज्ञानदृष्टी करून।
ह्मणे जळो संसार लागो अग्न। परमार्थ पूर्ण न घडे कीं ४७
असतो आपलें स्वाधीन। तरी कां विसर्जतें देवार्चन।
धिक् जिणें परस्वाधीन। लाजिरवाणें संसारीं ॥ ४८ ॥
असत्य कर्म करावें। बापडे कृषीवळ नाडावें।
नष्टपणें धन हरावें। तें लावावें संसारीं ॥ २-४९ ॥

या नष्ट वृत्तींचा त्याग करावा व संसारदारिद्र्य फेडण्यास साधुसंग धरावा म्हणजे अमूप परमार्थधन मिळेल असा त्यांनीं मनाचा निश्चय केला. ‘ अनुतापें संतप्त झाला। कंठ सद्गदीत दाटला। नेत्रकमळींहून सुटला। लोट अश्रुधारांचा ( ३-१५ ). कांतेला निश्चय सांगतांना ते ह्मणाले, ‘मी तर देवाची जोड करण्यासाठीं सर्वस्वत्याग करून घराबाहेर पडणारच, पण मी तरून जावें व तूं मायेंतच लोळत पडावेस हें मला उचित दिसत नाहीं. तुला अखंड परमार्थसुख पाहिजे असेल तर मजबरोबर चल. ’ मैनावती सलज्ज अधोवदन करून ह्मणाली, ‘ कायावाचामनानें मी आपल्या चरणांची दासी आहे. आपण आज्ञा करावी व मीं ती पाळावी हा माझा धर्म. मोहाच्या सागरीं मी बुडत असतां आपण हात देऊन वर काढतां हेंच माझें सुकृत आहे. तुह्मांवीण येथें राहणें हें लाजिरवाणें जिणें मला नको. तुह्मी जाल तेथें मी संतोषानें येतें. देवावीण देऊळ किंवा जीवनावीण कमळ तशी मी मागें राहणार नाहीं. दीपज्योतीप्रमाणें तुह्मी आम्ही अतुट आहोंत! ’ हें ऐकून निळोबा हर्षले व गृह गुरें ढोरें

सर्व दान केलें, घर लुटाविलें व उभयता घराबाहेर पडले! फिरत फिरत पंढरीस आले व तेथील अपार प्रेमानंद लुटला. तुकोबांची कीर्ति सर्वत्र विस्तारली होतीच, ती ऐकून आळंदी करून देहूस आले, तेथें तुकोबांचे पुत्र नारायणबुवा होते. दोघांचें प्रेम जमलें. तुकोबांचें संपूर्ण चरित्र ऐकून त्यांचे चित्त तुकोबांचे पायीं स्थिर झालें, दोघेही तीर्थयात्रेस बाहेर पडले, अनेक तीर्थक्षेत्रें पाहिलीं, ज्ञानेश्वरी, नाथ-भागवत, तुकोबांचे अभंग यांचें श्रवण मनन होऊन निदिध्यास झाला.

तुका ध्यानीं तुका मनीं। तुका दिसे जनीं वनीं।
तुका तुका म्हणोनी। निशीदिनी बोभाट ॥ ४-१३४ ॥

तुकयाच्या दर्शनाला मन अत्युत्कंठित झालें. 'दाखवी दाखवी निज चरण' असा एकच छंद लागला, शेवटीं अन्नपाणी त्यजून बसले असतांना स्वप्नांत तुकोबांचा उपदेश झाला,

मस्तकीं हस्त तेधवां ठेविला। उठोनि बैसाविलें तयाला।
ह्मणे सावध होई रे निळा। उघडी डोळा भ्रांतीचा॥५-५४॥
मंत्र सांगून तयेवेळां। बुका चर्चिला त्याचे भाळां।
आपुले कंठींची तुळसीमाळा। निळोबाचे गळां घातली ६९

तुकोबांनीं निळोबांचे गळा संप्रदायमाळा घातली व 'आबाळवृद्ध नरनारी। भक्तिमार्गें लावावें' अशी आज्ञा केली.

आपुला ठेवा संपूर्ण। पिता देत पुत्रालागून।
तैसें निजज्ञान पूर्ण। सद्गुरूंनीं दीधलें ॥ ५-७८ ॥

निळोबांवर तुकोबांचा पूर्ण प्रसाद झाला. त्यांची पंढरीची वारी चालू राहिली. कीर्तनप्रसंगानें त्यांची श्रोत्यांवर जबर छाप पडली. प्रासादिक स्फूर्तिदायक वाणीचा थोर परिणाम झाला. अभंगवाणीही मुखांतून स्रवूं लागली. पांडुरंगकृपा पूर्ण झाली. पिंपळनेरचा पाटील त्यांच्या आशीर्वादानें रोगमुक्त झाला तेव्हां त्यानें मोठ्या सत्कारानें

त्यांना पिंपळनेरीं नेलें व राहवून घेतलें. साधु ह्मणून त्यांचा मान झाला. भजनी सांप्रदाय वाढला. निळोबांच्या मुलीच्या लग्नाचें साहित्य देवानें केलें इ० चमत्कार प्रसिद्ध झाले. नगरांत एकदां दोन महिने सतत कीर्तनें झालीं, दोनप्रहर रात्रीनंतर कीर्तन वगैरे बंद व्हावें असा तेथील कायदा होता त्याप्रमाणें तेथील कोतवालानें हुकूम सोडले, पण तो कीर्तन बंद करण्यास आला तों स्वतःच कीर्तनश्रवणांत दंग होऊन यांचा शिष्य झाला (अ० ११). यांचीः—

मूर्ति ठेंगणी गौरवर्ण । सरळ नासिक विशाळ नयन ।
हृदय थोर कटि सान । शोभायमान दिसतसे ॥ १७—११९

गळ्यांत तुळशीच्या माळा व मनगटीं माळा बांधलेल्या—' ऐसें स्वरूप अद्भुत । त्यावरी कीर्तनीं अद्भुत. ' यांचें कीर्तन आबाळवृद्धांस व तेल्यातांबोळ्यांसही समजत असे. एक क्रूर वंजारी यांच्या एका कीर्तनानें अनुतप्त होऊन यांना शरण आला व वारकरी झाला. त्यानें निळोबांस घरीं नेलें व सेवेनें तोषविलें. त्याच्या बायकोनें निळोबांस खूप शिव्या दिल्या. ' तुह्मी लबाड ढोंगी लोक! माझ्या नवऱ्यास आडमार्गाला लावलेंत. तुह्मी कुटिल, लोभी, पापी आहांत ' इ०—

ऐसें ऐकूनि लवलाहो । स्वामी धांवोनि धरिती पाय ।
जें जें बोलसी माये । सत्य आहे सर्वही तें ॥ १७-२०६ ॥
मज अल्पमतीतें । बरा उपदेश केला मातें ।
आतां उमजे चित्तातें । मनीं धरीन तें जननीये ॥ २०७ ॥

निळोबांचा अधिकार फार मोठा होता हें त्यांच्या अभंगवाणीवरून स्पष्ट दिसतें. त्यांचें वैराग्य, शांति, उपदेशपद्धति यांची सर्वांवर फार छाप बसली. तुकोबांच्या पाठीमागें वारकऱ्यांच्या भक्तिपंथाचा प्रसार निळोबांइतका कोणी केला नाहीं. त्यांनीं भागवतधर्माचा झेंडा खरोखरीच महाराष्ट्रभर नाचविला.

—:०:—

**समारोपः**—निळोबांचे मुख्य शिष्य शंकरस्वामी शिऊरकर. औरंगाबादेकडे शिऊर आहे तेथील राहणारे हे यजुर्वेदी गर्गगोत्री ब्राह्मण. यांच्या पणतूचे नातु हयात आहेत. यांचें उपनांव लाखे. यांचे पूर्वज लक्षाधीश सराफ होते. शंकरस्वामी पुण्यास असतांना आळंदीपंढरीस निळोबांबरोबर जात. त्यांचा पुढें पूर्णप्रसाद झाल्यावर हे शिऊरला गेले. शंकरस्वामींचे शिष्य मल्लापा वासकर हे लिंगाईत वाणी होते. मोगलाईत भालकी गांवचे राहणारे. मल्लाप्पा वासकर ( शके १६३१–१७२१ ) यांनीं वारकऱ्यांत फड प्रथम काढला व आषाढीला आळंदीहून ज्ञानोबांची पालखी भजनी समारंभानें पंढरीस नेली. हा वासकरांचा पहिला फड होय. तुकोबांचे पुत्र नारायण बोवा यांनीं शाहूमहाराजांकडून तीन गांव इनाम मिळवल्यावर त्यांचे पुत्र इनामदारीच्या थाटानें राहूं लागले. असें सांगतात कीं मल्लाप्पांचें कीर्तन पंढरीस चालू असतां तेथें तुकोबांचे पणतु गोपाळबुवा आले. मल्लाप्पानीं त्यांना वंदन करून कीर्तन पुढें चालूं ठेवण्यास विनंति केली; पण त्यांस दोन अभंगही पाठ येत नव्हते ! त्यांची सर्वत्र फजीती झाली व मल्लाप्पांनींही निस्पृहवाणीनें कानउघाडणी केली. मग गोपाळबुवा भंडाऱ्यावर ६ वर्षे राहिले,अभंग व ज्ञानेश्वरी वगैरे ग्रथांचें अध्ययन केलें, व मग कीर्तन करूं लागले. त्यांनीं देहूकरांचा फड काढला. वासकरांचा व देहूकरांचा असे वारकऱ्यांत दोन मुख्य फड आहेत पण त्यांत गुरुपरंपरेनें आलेल्या वासकरांच्या फडाची योग्यता अधिक समजली जाते तें युक्तच आहे. वारकरीसंप्रदायांत गेल्या शेंदोनशें वर्षांत अनेक थोर पुरुष सर्व जातींत होऊन गेले आहेत. संतचरित्रकार व तुकोबांचे अनुग्रहीत महिपतबावा ताहराबादकर (शके १६३७–१७१२) यांचें विस्मरण होणें शक्य नाहीं. लहानमोठे मतभेद असूनही वेगवेगळ्या फडांतून सखारामबोवा अंमळ-

नेरकर, बाबा अझरेकर, नारायणआप्पा, प्रल्हादबुवा बडवे, चातुर्मासे बोवा, त्र्यंबकबुवा भिडे, हैबतरावबाबा, गंगुकाका, गोदाजी पाटील, ठाकूरबोवा, भानुदासबोवा, भाऊ काटकर, साखरेबुवांचे मूळगुरु केसकर बोवा, बाबा पाध्ये, ज्योतिपंत महाभागवत, पुण्याचे खंडोजी बोवा इ० अनेक पुरुषांचीं नांवें घेण्यासारखीं आहेत. साखरेबुवा, विष्णुबुवा जोग, व्यंकट स्वामी वगैरे मंडळींनींही संप्रदायाची चांगली सेवा केली आहे. तात्पर्य, पंढरीचा भागवतधर्म गेल्या सहाशें वर्षांत महाराष्ट्रभर चांगला पसरला आहे. कोल्हापूर, सातारा, सोलापूर, नगर, पुणें, नाशीक, खानदेश, वऱ्हाड, नागपूर व मोगलाईतील सर्व मराठी प्रांत या सर्व मुलखांत ज्ञानेश्वरमहाराज, नामदेवराय, नाथ, तुकोबा, व निळोबा हें पंचायतन व इतर अनेक सत्पुरुष यांनीं भागवतधर्माचा अतिशय प्रसार केला आहे. ज्ञानोबारायांनीं ज्याचा पाया रचिला, नामदेवांनीं ज्याचा विस्तार केला, नाथांनीं ज्यावर भागवताचा ध्वज उभारला, व शेवटीं तुकोबाराय हे ज्याचा कळस झाले त्या भागवतधर्माची अखंड व अभंग इमारत पंढरपूरच्या वाळवंटांत श्रीविठ्ठलाच्या कृपाछत्राखालीं उभारली आहे. या आमच्या भागवत धर्माचा जयजयकार असो !

---

## प्रकरण चवदावें.

—:❀o❀:—

# तुकोबा व जिजाई.



जरी जाहली स्त्रीपुत्रगृहास्थिती । तरी न धरावी त्यांची आसक्ती।
सावध राखावी चित्तवृत्ती । परमात्मयुक्तिसाधनें ॥ ४९३ ॥

—— श्रीनाथभागवत अ. १७

१ जिजाईचा संसार. २ देवाच्या पाठराखेपणाच्या गोष्टी. ३ दोषी कोण ? जिजाई का तुकोबा ? ४ जिजाईस पूर्णबोध. ५ मुलेंबाळें.

१ तुकोबांची पहिली बायको रुक्मिणीबाई दुष्काळाच्या वेळींच वारली व तेथपासून तुकोबांचा संसार ह्मणजे जिजाईचा संसार असाच खरा प्रकार होता. तुकोबांच्या वयाच्या १७ व्या वर्षापूर्वींच जिजाई तुकोबांशीं विवाहानें बद्ध झाली व महाराजांचें प्रयाण झालें तेव्हां ही पांच महिन्यांची गरोदर होती अर्थात् उभयतांचा समागम सुमारें २६ वर्षे होता. या मुदतींत जिजाईला मुलेंबाळें झालीं व तिचा संसार चारचौघांच्या संसाराप्रमाणें ओढगस्तपणांत कसाबसा झाला. तकोबांना २२ वे वर्षी संसाराचा वीट येऊन त्यांनीं एकदा जी संसाराकडे पाठ फिरविली ती पुनश्च संसारवृत्तीची व त्यांची कधीं गट्टी जमली नाहीं ! लोकाचारासाठीं मी संसार करितों पण त्यांत माझें चित्त नाहीं, माझ्या देहाचीच मला शुद्ध नाहीं तेथें लौकिकाप्रमाणें 'या बसा' करून लोकांचा मानसन्मान मी कोठें पाळूं इ० प्रकारचे वैराग्याचे उद्गार त्यांचे अभंगांत अनेक सांपडतातः—

**माझिया वेशाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥**

त्यांनीं खतपत्रें प्रथम इंद्रायणीला समर्पिल्यापासून यावज्जीव धनाला स्पर्श केला नाहीं, तेव्हां त्यांच्या संसाराचा लोकदृष्टीनें बोजवारा उडाला असल्यास त्यांत नवल नाहीं! जिजाईचे आई बाप व भाऊ पुण्यास राहत असून घरचे चांगले सुखवस्तु होते या-मुळें जिजाईनें त्यांच्या साह्यानें पहिल्या पहिल्यादां तुकोबांच्या प्रपंचाला टेका देण्याची पुष्कळ खटपट केली. आपल्या भावाला मध्यस्थी घालून तिनें कित्येक वेळ तुकोबांना व्यापाराला भांडवल मिळवून दिलें, कित्येकवेळां स्वतःच्या हिकमतीवर सावका-रांला कर्जरोखे लिहून पैसे काढून ते त्यांच्या स्वाधीन केले, पण तुकोबांच्या साधुवृत्तीमुळें व साधुवृत्तीचा फायदा घेणाऱ्यांचा ज-गांत सुकाळ असल्यामुळें त्यांनीं जो जो उद्योग केला तो तो त्यां-च्या अंगावर आला (पृ० ८४) आणी पुढें कान्होबा त्यांच्यापासून विभक्त झाल्यावर तर जिजाईला संसार चालविणें फारच कठीण जाऊं लागलें. तशांत जिजाईला मुलेंबाळेंही झालीं. नवरा पैसे मि-ळवीत नाहीं व घरीं मुलाबाळांची कचकच अशा स्थितींत जिजा-ईचा स्वभाव जास्त त्रासिक व भांडखोर झाला असल्यास फारसें नवल नाहीं. तिचा स्वभाव इतका त्रासिक नसता तर तुकोबा क-दाचित् उठपळ वारंवार भंडाऱ्यावर गेले नसते, व घरीं अन्नवस्त्रा-ची टंचाई पडून सारा प्रपंचभार एकटीच्या अंगावर पडला नसता तर जिजाईही कदाचित इतकी कटकटी व भांडखोर झाली नसती! पण ‘ असती नसती ’ च्या तर्कांत पडण्यापेक्षां आहे तेंच घेऊन चालावें हें बरें! प्रारब्ध ह्मणा किंवा ईश्वरी नेमानेम ह्मणा पण आ-जन्म दोघांना परस्परसंगतींत संसार करावा लागला. पाश्चात्य तत्ववेत्ता व साधुपुरुष साक्रेटीस याला जशी झांटिपी मिळाली होती तशी तुकोबांना जिजाई मिळाली अशी लोकभाषा आहे, तथापि जिजा-

ईत अनेक थोर गुण होते व तुकोबांच्या सत्संगतींत तिचा जन्म गेला असल्यामुळें तिच्या जीवाची उत्तरोत्तर उन्नतीच होत गेली. तुकोबांच्या वैराग्याला व अभ्यासालाही असली संगतीच अवश्य असल्यामुळें नारायणानें योग्य व अवश्य तीच योजना केली असें ह्मटलें पाहिजे. तुकोबा व जिजाई यांचा समागम घडवून आणण्यांत तो ‘ अच्युत ’ चुकला असें कसें ह्मणतां येईल? समुद्रांत लांकडाचे दोन ओंडके दोहींकडून वाहत येतात, कांहीं काळ एकत्र राहतात व पुन्हां भिन्नमार्गाला जातात त्याप्रमाणें जीवांचा संयोगवियोग होत असतो. प्रत्येक जीवाचें प्रारब्धकर्म स्वतंत्र आहे, प्रत्येक जीव आपल्या कर्माप्रमाणेंच सुखदुःखदशा भोगीत असतो, सुखदुःख कोणी कोणाला देत नाहीं हा जर शास्त्रसिद्धांत आहे, जीव जर स्वकर्मसूत्रग्रथित आहे तर जिजाई व तुकोबा ( जीवकोटींतले धरून चालल्यास ) यांच्या परस्परसमागमाला व सुखदुःखाला कारण त्यांचें प्राक्कर्मच होय असें मानावें लागतें. जिजाईच्या स्वभावांत थोडा तिखटपणा होता व तो परिस्थितीमुळें वाढला हें खरें असलें तरी तिच्या बलवत्तर सुकृतामुळेंच तिला या जन्मीं लोकोत्तर भववद्भक्ताचा समागम घडला, व देवधर्मसंतांच्या पुण्यप्रद वातावरणांत राहतां आलें.

२ भक्ताच्या संसारास परमात्मा कसा जपतो व त्याचें उणें कसें पडूं देत नाहीं यासंबंधीं महिपतबाबांनीं कांहीं गोष्टी प्रेमळपणानें वर्णिल्या आहेत. तुकोबांनीं जिजाईचें एकच एक लुगडें एका अनाथ स्त्रीस देऊन टाकल्यामुळें तिची धांदल उडाली तेव्हां स्वतः पांडुरंगानें तिच्या अंगावर शाल घालून तिची व त्यांची अब्रू वांचविली! प्रथम पुत्र महादेव यास मुतखड्याचा आजार झाला तेव्हां उपाय करून थकलेली जिजाई मुलास विठोबाच्या पायावर आपटायला देवळांत गेली तों देवळांत पाऊल पडतांच मूत सुटून मुलगा क्षणांत मोकळा

झाला. मी आणखी एकच गोष्ट सांगतों. संसाराची सगळी दगदग सोसायची आणि भाकरी पोंचविण्यास डोंगरावर येरझारा घालायच्या यामुळें जिजाई कधीं कधीं फार कावून जात असे. एकेदिवशीं एक भाकर व भोपळाभर पाणी घेऊन जिजाई डोंगरावर चालली होती. ऊन कडक पडलें होतें. पायीं पायतन नव्हतें. खडे रुतत होते. जिजाईचा जीव कासावीस झाला होता. तोंच करवंदीचा भला जंगी कांटा तिच्या पायांत शिरला व फुटून वर आला! जिजाईला तिरमिरी आली, पाणीही सांडून गेलें. पायांतून रक्त भडभडां वाहूं लागलें. कांहीं वेळानें ती शुद्धीवर आली, व कांटा काढूं लागली पण तो कांहीं केल्या निघेना. कांहीं आपल्या प्रारब्धाला दोष देत, कांहीं असल्या पिशाच्या पदरीं बांधल्याबद्दल बापाला नांवें ठेवीत पण मुख्यतः काळ्यावर लाखोली मोजीत जिजाईनें कांटा काढायची खूप खटपट केली पण व्यर्थ! बापानें कोण थाटानें व श्रीमंतीनें आपलें लग्न केलें, भावानें महायात्रेला केवढ्या सुखानें नेऊन आणलें व तुलाही केली, ते श्रीमंतीचे माहेरचे सुखसोहळे आठवून व तुकोबांच्या संगतींत होणाऱ्या हालअपेष्टांशी त्यांची तुलना करीत जिजाई पोटभर रडली. इकडे तुकोबांची भूक विठोबाला लागली व त्यांना जिजाईचीही दया आली, कां कीं, जिजाईही आपला स्वधर्म-पतिव्रताधर्म-जागवीत होती. स्वधर्माचरण करणाऱ्यांवर देवाचें प्रेम असतें. जिजाईपुढें पीतांबरधारी रुक्मिणीवर प्रगट झालें, आपल्या संसाराचें वाटोळें करणारा म्हणून कां होईना पण तिला विठोबाचा ध्यास लागला होता व ध्यासानें नारायण वश होतो. विठोबांची श्यामसुंदर सगुणमूर्ति पुढें पाहतांच जिजाईला समाधान वाटण्याऐवजीं शतपट संताप तिच्या अंगांत संचरला, माझा भ्रतार वेडा करणारा हा काळ्या येथें कशाला आला म्हणून

तिनें पश्चिमेकडे तोंड केलें ! जिजाईचा तो बाणेदारपणा व निग्रह पाहून देवालाही थोडी मौज करावीशी वाटली !

तो लीलानाटकी जगदीश । तिकडेही तैसाचि सन्मुख दिसे ।
अष्टदिशा भोंवतें चुकवितसे । परी न्यून नसे कोठेंही ॥ ९१ ॥

रावण, कंस, शिशुपाल इत्यादिकांना जो देव द्वेषामुळेंही तारक झाला तो लीलानाटकी कृष्ण परमात्मा आपल्या परमभक्ताच्या भार्येभोंवतीं फिरून तिची दृष्टि त्यानें आपल्याकडे वेधून घेतली यांत नवल काय ? कोणत्याही मिषानें चित्त देवाकडे लागलें कीं, जीवाचें कार्य होतें. जिजाईनें जिकडे डोळे फिरविले तिकडे तिला श्रीकृष्णच दिसूं लागले. शेवटीं या मेल्या काळ्याचें तोंड पाहणें नको म्हणून तिनें दोन्ही हातांनीं डोळे घट्ट मिटून घेतलें तों तो जगदात्मा आंतही दिसूं लागला ! कन्येप्रमाणें तिच्या अंगावरून देवांनीं आपला पद्महस्त फिरवला. यानंतर देवांनीं आपल्या मांडी-वर जिजाईचा पाय घेतला व यत्किंचित् दुःख न देतां तो कांटा चटकन् काढून टाकला. देव आणि जिजाई तुकोबांकडे गेले. त्यांना एकत्र पाहून आज रजनी आणि गभस्ती एकत्र आल्यासारखें तुकोबांस आश्चर्य वाटलें. ते तिघेही एकत्र जेवले. देवांनीं हातांनीं चीप काढली तों आंतून निर्मळ झरा वाहूं लागला !

३ दुसऱ्याच्या कर्माची उठाठेव करण्याचा मनुष्यमात्राचा स्वभाव आहे तो लक्ष्यांत आणतां तुकोबाजिजाईप्रकरणांत ' तुकोबा दोषी कां जिजाई दोषी ' हा प्रश्न उपस्थित करून त्याची चर्चा कित्येक विद्वान् करीत असतात यांत आश्चर्य नाहीं. कित्येकांच्या मतें विवाहित स्त्री व मुलेंबाळें यांचें संगोपन करणें तुकोबांचें कर्तव्य होतें व हें कर्तव्य त्यांनीं बरोबर नीट न बजावल्यामुळें दोष सर्वस्वी त्यांचाच आहे ! आपणही या प्रश्नाचा थोडासा विचार करूं. जगाला उपदेश करणाऱ्या तुकोबांना या कर्तव्याची जाणीव नव्हती असें

ह्मणतां येणार नाहीं. तुकोबांचें व जिजाईचें पटलें नाहीं यांत दोष कोणाचाच नाहीं. तुकोबांच्या गाथ्यांतून ' तुकोबांस त्यांच्या स्त्रीनें केलेलीं कठिण उत्तरें ' या सदराखालीं ७ अभंग दिले आहेत. ते कोणी मानतात व कोणी मानीत नाहींत. कसेंही असो. त्यावरून जिजाईचे तुकोबांवर मुख्य आक्षेप कोणते होते अगर असावेत तें अजमावतां येतें. जिजाईचें ह्मणणें:—

( १ ) हे स्वतः कांहीं धंदा करून चार पैसे मिळवीत नाहींत. हे लग्न करून माझे नवरे झाले पण यांची व मुलांच्या पोटापाण्याची सारी व्यवस्था मलाच पाहवी लागते. मी बायको माणूस सर्वकाळ किती दुःख सोसूं व लोकांपुढें किती तोंड वासूं ?

( २ ) यांच्या पोटाची यांना काळजी राहिली नाहीं, पण हे आमची मुळींच फिकीर करीत नाहींत.

( ३ ) हे स्वतः मिळवीत नाहींत, पण दाणे घरीं आले तरी पोरांना खाऊं देत नाहींत. धान्य काय किंवा वस्त्र काय, यांच्यापाशीं जो जें मागेल तें त्याला पोराचा विचार न करितां देऊन टाकतात. दुसऱ्यांचीं पोटें भरतात पण माझी किंवा पोरांची काळजी वाहत नाहींत. स्वतः मिळवीत नाहींत व घरांत संग्रह टिकूं देत नाहींत.

( ४ ) घरांतही ठरत नाहींत, उठपळ रानांत जातात. यांना धुंडून आणावें लागतें !

( ५ ) सगळे टाळकुटे जमा करून कोल्हाळ करितात, स्वस्थ निजूंही देत नाहींत. यांच्या संगतीनें चेलेही आपल्या संसारावर उदास झाले आहेत व त्यांच्याही बायका माझ्याच सारख्या घरीं रडत आहेत !

जिजाईचे सर्व आक्षेप हे आहेत. हे खोटे आहेत असें तुकोबाही म्हणत नाहींत ! ह्या सात अभंगांच्या शेवटच्या चरणांतून तुकोबांनीं याला उत्तरें दिलीं आहेत त्यांत 'वाहूनियां भार कुंथे माथा',

' खोटा संचिताचा वांटा, ' इतकेंच म्हटलें आहे. जिजाईचें ह्मणणें तिच्या दृष्टीनें बरोबर आहे, सामान्य जनांच्या दृष्टीनें बरोबर आहे, संसार सत्य मानल्यास व संसाराचीं कर्तव्यें प्रत्येकानें केलीं पाहिजेत हें त्यांचें कर्तव्य आहे असें पत्करल्यास बरोबर आहे. जिजाईला एकटीला संसारभार वाहावा लागल्यामुळें त्रासिकपणानें ती जें जें म्हणाली तें तें सर्व खरें आहे व संसारी जीवांना तिनें दुःखक्लेश भोगले याबद्दल सहानुभूति वाटणेंही साहजिक आहे ! आतां तुकोबांकडे पाहिलें तर त्यांचेंही कोठें चुकलें असें दिसत नाहीं! संसार मिथ्या हें कळून त्याला मन विटल्यावर त्याच्या संबंधाचीं कर्तव्यें व सुखदुःखें याविषयीं ते उदासीन झाले यांत त्यांचा तरी काय दोष आहे ? सूर्यापुढें अंधार ठरला नाहीं, जागृतींत आल्यावर स्वप्नगत वस्तूंचें भान राहिलें नाहीं, नदीपार झाल्यावर लाटांच्या धक्क्यांनीं कपडे भिजले नाहींत व जीव खालवर झाला नाहीं तर यांत सूर्याचा, जागृतीचा व उत्तीर्ण झालेल्या पुरुषाचा दोष आहे असें कोणताही विवेकी पुरुष म्हणणार नाहीं. जागा झालेला पुरुष व स्वप्नांत बरळणारी स्त्री दोघे एकत्र आले तर जो प्रकार व्हायचा तोच तुकोबाजिजाईच्या संसाराचा झाला. निद्रित स्त्रीच्या बरळण्याचा जागृत पुरुषावर कांहीं परिणाम होत नाहीं, उलट जागृत पुरुष मात्र त्या स्त्रीला जागें करण्याचा प्रयत्न करितो, व तसा प्रयत्न तुकोबांनीं ' पूर्णबोध ' प्रकरणांत केला आहे. तुकोबा व जिजाई यांचा तंटा ह्मणजे सत्वगुण व रजोगुण यांचा तंटा आहे, हा परमार्थ व प्रपंच यांच्यातला कलह आहे, हा ब्रह्म आणि माया यांचा वाद आहे. प्रकृतिमंत जीवाला प्रकृतीचें सर्व करणें खरें वाटतें, पण प्रकृतिपर पुरुषाला प्रकृतिच दिसत नाहीं मग तिचें कार्य कोठून दिसणार व त्या कार्याचा अभिनिवेश कोठून होणार ? पुरुष हा मूळचाच ' अनंग तो पैं ग्रा । निकवडा नुसधा । जीर्ण अ-

तिवृद्धापासूनि वृद्ध ॥ तो तरी अकर्ता । उदास अभोक्ता । परी इया पतिव्रता । भोगविजे ॥ तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींच नाहीं । ' अशा असून ही प्रकृति मात्र ' कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥ तया अनार्ताची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती । तया अकुळाची जाती । गोत होय ॥ ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्वव्याप्ती । तया अविकारातें विकृती-। माजीं कीजे ॥ ॥ १००७ ॥ ( ज्ञानेश्वरी अ० १३ ) अशा प्रकारची आहे ! तुकोबा पुरुष व जिजाई प्रकृति यांच्यांतला हा वाद अनादि आहे. असो. ही अध्यात्मदृष्टि बाजूला सारून लोकदृष्टीनें पाहिलें तरी तुकोबांच्या मार्गाचें समर्थन होतें. संसार करून परमार्थ करावा हें ह्मणणें सोपें आहे, पण ' दोन्हीं डगरींवरी ठेवूं जातां हात । एकही निदानीं आढळेना ' या तुकोबांच्या सिद्धांताप्रमाणेंच सर्व ज्ञात्यांचें ह्मणणें आहे. समर्थ रामदासस्वामींनींही ( जुना दासबोध स० १८ ) हेंच सांगितलें आहे. असो. वडिलांनीं बाळपणीं लग्न करून दिलें, पुढें वैराग्य झालें, यानंतर तुकोबा वागले असाच कोणीही खरा साधक वागला असता. बायकापोरांचें पोट भरणें व त्यासाठीं उद्योगधंदे नोकरीचाकरी करणें हें काम सर्वच करीत असतात, तसेंच तुकोबा करते तर जें परमार्थभांडार त्यांच्या हस्तगत झालें व जें आजन्म त्यांनीं जगाला वांटलें तें त्यांना मिळालें असतें काय ? कांहीं सोडल्याशिवाय दुसरें कांहीं मिळत नाहीं. प्रपंचलोभ सोडल्याशिवाय परमार्थाचा ठेवा मिळत नाहीं. तुकोबांना समूळ प्रपंचाचा वीट आला म्हणनच परमार्थाचें मूळ त्यांच्या हातीं लागलें. महल्लाभासाठीं अल्प लाभ सोडले पाहिजेत. दोन कर्तव्यांचा झगडा चालेल तेथें उच्चतर कर्तव्यासाठीं खालचीं कर्तव्यें सोडलीं पाहिजेत, त्यागी झालें पाहिजे, स्वार्थत्याग केला पाहिजे असें आपण अर्वाचीन भाषेंत सांगत असतों; मग सर्व ला-

भांतला लाभ, सर्व सुखांतलें सुख, सर्व ध्येयांतलें ध्येय असा जो परमात्मा त्याच्या प्राप्तीसाठीं केव्हांतरी नाश पावणाऱ्या प्रपंचाचा त्याग केला यांत तुकोबा चुकले कोठें? शिंप टाकून परीस घेणें हें ज्ञात्याचें कर्तव्यच आहे. नारायणासाठीं संसाराची होळी करण्यानेंच त्यांनीं संसाराचें सोनें केलें आहे. संसारांत सोनें सांठवितात त्यांच्या संसाराचें सोनें होत नाहीं तर जे नारायण हृदयसंपुटीं सांठवितात त्यांच्या संसाराचें सोनें होतें; त्यांचे अनंत जन्मींचे संसारबंध सुटल्यानेंच संसार सुखाचा होतो! तुकोबांच्या संसाराचा बोजवारा उडाला असें अज्ञजीव ह्मणोत, त्यांच्या स्वतःच्या दृष्टीनें व देखण्यांच्या दृष्टीनें त्यांचा संसार अत्यंत सुखाचा, लाभाचा व भाग्याचा झाला. कसा तें आपण पुढील प्रकरणांत पाहूं.

४ निद्रिताला जागें करणें, वाट चुकलेल्यास वाट दाखविणें, आपलें सुख दुसऱ्यास देणें हा खरा परोपकार आहे. तुकोबांनीं जगाला जागें केलें यांत जिजाईही आलीच, तथापि स्वतंत्रपणें जिजाईला पूर्णबोधाचे १२ अभंग सांगून लोकदृष्टीनेंही तुकोबा आपल्या कर्तव्यांतून मुक्त झाले, जिजाई भजन करणाऱ्या वारकऱ्यांच्या गडबडीला त्रासून जीं दुरुत्तरें बोले त्याबद्दल तुकोबा तिला सौम्यपणानें सांगत:—

**कोण घरा येतें आमुच्या काशाला। काय ज्याचा त्याला नाहीं धंदा**
**देवासाठीं झालें ब्रह्मांड सोइरें। कोमलया उत्तरें काय वेंचे? ॥२॥**
**मानें पाचारितां नव्हे आराणूक। ऐसे येती लोक प्रीतीसाठीं ॥२॥**

पूर्णबोधाचा पहिला अभंग बराच बिकट आहे. तो असा:—

**पिकल्या शेताचा आह्मां देतो वांटा। चौधरी गोमटा पांडुरंग ॥१॥**
**सत्तर टक्के बाकी उरली मागे तो हा। मागें झडले दहा आजिवरी**
**हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज। माजघरीं बाजे बैसलासे ॥ ३ ॥**
**मज यासी भांडतां जाब नेदी बळें। ह्मणे एक वेळे घ्याल वांटा ॥४**

तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ? ॥ ५

पांडुरंग हा क्षेत्राचा मालक आहे, हा भला आहे, यानें हा नरदेह आमच्या वहिवाटीला दिला आहे. दयाळू सावकाराप्रमाणें तो आपल्या कुळाला उपाशीं मरूं देत नाहीं. आमच्याकडून याला ८० टक्के वसूल करावयाचे आहेत, मीं आजवर १० दिले आहेत. बाकी ७० टक्के हा मागत आहे. ह्म० देह हा ८० तत्वांचा असून या तत्वांचा झाडा करून दिला पाहिजे. यांपैकीं ५ टक्के ह्म० कर्मेंद्रियें व ५ टक्के ह्म० ज्ञानेंद्रियें त्याच्या भजनांत राबवून मी तेवढ्यांतून मुक्त झालों आहें. दिवाणधारा ८० चा आहे पण त्यांतले १० झडले आहेत, बाकीबद्दल त्याचा तगादा लागला आहे. हा बाजेवर म्ह० हृदयांत बसून झडती मागत आहे.

गीतेंत तत्वसंख्या ३६ दिली आहे ( अ. १३ श्लोक ५।६ ) भागवतांत ( स्कंध ११ अ. २२ ) ह्या तत्वांच्या संख्येचा स्वतंत्र विचार सांगितला असून ४ पासून २८ पर्यंत वेगवेगळ्या संख्या दिल्या आहेत. दासबोधांत ( दशक १७ स० ८।९ ) तत्वांची संख्या ८२ दिलीं असून त्यांपैकीं कारण व महाकारणदेह हे सोडले तर ८० च भरते. अंत:करणपंचक, प्राणपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक व विषयपंचक अशीं २५ तत्वें होतात. २५ सूक्ष्माचीं व २५ स्थूळाचीं मिळून ५० तत्वें झालीं. यांत स्थूळ व सूक्ष्म देह धरले ह्म० ५२ झालीं. त्यांत ४ स्थानें, ४ अवस्था, ४ अभिमानी, ४ भोग, ४ मात्रा, ४ गुण व ४ शक्ति मिळून २८ होतात तीं मिळवावीं म्हणजे तत्वांची एकंदर संख्या ८० होते. ८० तत्वांचा झाडा झाला ह्मणजे ‘ एको विष्णुर्महद्भूतं ’ ची गांठ पडायची व वैकुंठाची प्राप्ति व्हायची !

देहू येथें एका जुन्या बाडांत वरील अभंगाचा अर्थ सुचविला आहे तो असा:—“ पीक=स्वरूप. शेत=भक्ति. आह्मां=चार

खाणी चार वार्णींच्या जीवांस. वांटा=अधिकार. चौधरी=स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चौदेहांचा धर्ता, गोमटा=पुरुषोत्तम. पांडुरंग=सगुण, सत्तरटके=सत्तर तत्वें. दहा=दशप्राण.झडले=सगुण-भक्तीस समर्पिले. हंडा=अहंकार. भांडीं=पंच भूतें. गुरें=इंद्रियें. माजघर=हृदय. बाज=पर्यंक. यासी भांडतां जाब नेदी वळें=ह्म० सगुणभक्ती मानसपूजेस दशप्राण समर्पितां जीवभाव दिसेनासा जाला शीव मी ऐसें तुकोबास बाणलें तेव्हां देवासी तुकोबा भांडले. आह्मांकडे कांहीं बाकी राहिली नाहीं ऐसीं ८० तत्वें झडलीं "

वरील अभंगांत पंचीकरण सुचविलें आहें. सद्गुरु शिष्यास उप-देश कारितांना एकांतांत प्रथम पंचीकरण समजावून देतात. तुको-बांनीं जिजाईस पंचीकरण तोंडीं समजावून दिलें असलें पाहिजे. यावरून जिजाईचा अधिकार समजतो. तुकोबा पुढें सांगतात:—

**कारितां विचार अवघें एकराज्य। दुजा कोण मज घाली पाठीं?**

देवावांचून दुसरा आहेच कोण? त्याची मीं कुळवाडी केली 'आतां हा न सोडी जीवें आह्मां' याची बाकी याच देहांत फेडावी असा आमचा निर्धार झाला आहे. असा हा हरि नाग-वितो या भयानें याच्या वाऱ्यालाही कोणी उभे राहत नाहींत! कित्येकांना यांनीं नागवे केले व कित्येकांस जमाने( हवाले )घेऊन संतांच्या माथीं मारलें. याच्या कडकपणामुळें याला लोक हंस-तात.( देव भक्तालागी करूं नेदी संसार—हा अभंग पहा. ) 'सरले तयासी घालितो वैकुंठीं' ह्म० बाकी पूज्य होतांच हा वैकुंठाला नेतो. आह्मी याचे हातीं पुरे सांपडलोंत. तूं माझ्या विचाराला येऊन मिळशील तर आपल्यांतला विरोध मिटेल. 'तुज मज तुटी नव्हे या विचारें.' देवाची माझी गट्टी जमली आहे. हें माझ्या करणीचें फळ नव्हे, त्याच्या हुकुमानें झालें. तुला उपदेश हाच—

**नको धरूं आस व्हावें या बाळास । निर्माण तें त्यांस त्यांचें आहे१**
**आपुला तूं गळा घेईं उगवोनी । चुकवी जाचणी गर्भवास ॥ २ ॥**

वासना सोड, संचयाची बुद्धि सोड. वासनेमुळें यमदूत फांस घालतात. त्यांचा मार आठवितांच ' कांपे थरथर जीव माझा. ' माझी चाड असेल तर तूं आपलें चित्त वाड ( विशाळ ) कर.

**भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ती जगामाजी ॥ १ ॥**
**ह्मणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें झालीं मज ॥ २ ॥**
**आस निरसूनी कठिण हें मन । करीं वो समान वज्र तैसें ॥ ३ ॥**
**किंचित हें सुख टाकी वो थुंकोनी । पावसील धणी परमानंद॥४॥**
**तुका ह्मणे थोर चुकती सायास । भवबंधपाश तुटोनियां ॥ ५ ॥**

मी तर लवकरच वैकुंठीं जाणार आहें. तूंही मजबरोबर चल. आपला तेथें आदर होईल. घरादारांवर तुळशीपत्र ठेवून ब्राह्मणांस दान देऊन मोकळी हो कशी (पृ० १७ पहा). पहा विचार करून पहा, मी–माझें हें सर्वस्वी सोड, भुकतान, द्रव्यलोभ, ममत्व पार सोडून मी कसा सुखी झालों आहें तें पहा:–

**भूक तान कैशी राहिली निश्चळ । खुटलें चंचळ मन ठायीं ॥**

' गुरुकृपें मज बोलविलें देवें ' तें तुला मी सांगत आहे.

**सत्य देवें माझा केला अंगिकार । आणीक विचार नाहीं आतां २**
**होईं बळकट घालूनियां कास । हाचि उपदेश तुज आतां ॥ ३ ॥**

तुकोबांनीं जिजाईस हा अखेरचा उपदेश केला. हा उपदेश वायां गेला नाहीं, आणि सिद्धाची वाणी वायां कां जाईल ? जिजाईचें आचरण निष्कलंक, पवित्र व पातिव्रताधर्मास अनुसरून होतें. पतीला खावूं घातल्याखेरीज ती माउली कधीं जेवली नाहीं. लौकिक बाबतींत नवऱ्याशीं तिचें भांडण झालें असलें तरी तिचा पतिप्रेमनिर्झर स्वच्छ होता, तिचें तुकोबांवर जिव्हाळ्याचें प्रेम होतें, पतिविषयक तिचा कळवळा निष्कपट व निर्मळ होता. तुकोबांच्या

उपदेशाचा तिच्या मनावर उत्कृष्ट परिणाम झाला. तिनें दुसरे दिवशीं ब्राह्मणांस घरदार सर्व दान केलें व ती सकलपाशांपासून मुक्त झाली. तुकोबांसारख्या महात्म्याची संगती व्यर्थ कशी होईल? तुकोबाही देवाशीं कडोविकडीनें भांडले, तथापि त्यांचें हरिप्रेम अवर्णनीय होतें, तसाच जिजाईचा प्रकार समजावा. प्रेमावांचून भांडण होत नाहीं, भांडणांतल्या खरेपणावरून निष्कपट प्रेमाची, शुद्धाचरणाची, जिव्हाळ्याची सत्यता मात्र प्रतीतीस येते.

५ जिजाबाईस काशी, भागीरथि व गंगा ह्या तीन कन्या आणि महादेव, विठ्ठल व नारायण हे तीन पुत्र अशीं एकंदर सहा अपत्यें झालीं. त्यांत काशी सर्वांत वडील व नारायण बुवा सर्वांत धाकटा, म्हणजे सर्वांच्या मागून झालेला. तुकोबांच्या प्रयाणसमयीं जिजाबाई गरोदर होत्या, अर्थात् प्रयाणानंतर नारायणाचा जन्म झाला. तुकोबा व नारायणबोवा यांनीं एकमेकांस पाहिलें देखील नाहीं! काशी, महादेव, भागीरथी, विठ्ठल, गंगा व नारायण या क्रमानें हीं मुलें जिजाईच्या पोटीं जन्मास आलीं. तान्ह्या गंगूला संभाळायला बुवाई नामक दासी घरांत ठेवली होती. तुकोबा भंडारा किंवा भामनाथ डोंगरावर जाऊन पांडुरंग भजनांत रंगले ह्मणजे त्यांना भुकेतान्हेची आठवण ही नसे, तथापि त्यांना जेऊं घातल्याशिवाय जिजाई कधींही जेवल्या नाहींत. कधीं त्या स्वतः अन्न घेऊन तुकोबांस रानावनांत धुंडीत जात, कधीं शिदोरी बरोबर देऊन काशीस पाठवीत. महादेव व विठ्ठल हे खेळण्यांत ज्यास्त दंग होऊन जात असल्यामुळें नेहमीं जिजाईचें ऐकतच असें नाहीं. मुलींचीं लग्नें गरीबीनेंच झालीं. एकदा तुकोबांची स्वारी घराबाहेर पडली, व मुलें खेळत होतीं त्यांत स्वयातीचीं दोन मुलें पाहून तीं त्यांनीं घरात आणलीं व चार ब्राह्मण बोलावून लगेच 'हळदी लावूनि वधूवरांतें। लग्न त्वरित लाविलें।' जावयांना कांहीं मेजवान्या, कांहीं अहेर,

कांहीं रुसणीं फुगणीं ? छे ! ‘ दूधभात करूनि घरांत । जेऊं घातलें पंचामृत. ’ त्या मुलांचे आईबाप चांगले होते व साहित्य करायला तुकोबांचे भक्त तयार होते म्हणून मग पुढें चार दिवस सोहळा बरासा होऊन जिजाईला अमळ समाधान वाटलें. गंगूचें लग्न मागून झालें. तुकोबांच्या या जावयांचीं उपनांवें मोसे, गाडे व जांबुळकर अशीं होतीं. तुकोबांची मधली कन्या भागीरथि ही मोठी पितृभक्त व भगवद्भक्त होती. तुकोबांनीं प्रयाणानंतर ज्यांस दर्शन दिलें त्यांत भागीरथि होती. तुकोबांच्या पुत्रांत नारायणबोवा विशेष कर्तृत्वाचे निघाले, देहू वगैरे गांव त्यांनींच मिळविले. नारायण बोवांस देहूचे पाटील इंगळे यांची कन्या दिली होती असें समजतें. नारायणबोवांनंतरही तुकोबांचे वंशज आंबळे व देहूचे पाटील इंगळे यांच्यांत सोइरिकी झाल्या आहेत असें देहूस चौकशींत समजलें. सांप्रत देहूस तुकोबांच्या औरस वंशाचींच बहुतेक घरें आहेत.

---

## प्रकरण पंधरावें.

—:०:—

# धन्यता आणि प्रयाण.

तो मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरिला ।
योगबळें आवरला । सज्ज होवोनी ॥ ९६ ॥
तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम ।
तें माझें निजधाम । होवोनि ठाके ॥ ९९ ( ज्ञाने० अ० ८ )
जे स्वरूपीं नाहीं च्युती । ते कृष्णस्वरूप निश्चितीं ।
भक्त तद्रूप स्वयें होती । कृष्ण कीर्ती वर्णितां ॥ (नाथभागवत अ० ३१).

१ परमार्थसुख, २ आत्मसुखाचे ढेकर, ३ प्रयाण, ४ सदेह कसे गेले ?

१ परमार्थ हा परमसुखासाठीं करायचा असतो, तुकोबांनीं प्रपंचाची होळी करून परमार्थ साधला म्ह० अल्प, क्षणिक सुखाचा त्याग करून अखंड अविनाशी सुख जोडलें, प्रपंच म्ह० पंचविषयांचा सांघात, शब्दस्पर्शरूपरसगंध या विषयांपासून सुखाची अपेक्षा करणें व त्यासाठीं धांवाधांव करणें हा प्रपंच. सर्व जीव प्रपंची आहेत व म्हणून दुःखी आहेत. नरदेह हा जसा सर्व देहांत श्रेष्ठ आहे तसे या देहांत सर्वसुखांतले अत्यंत सुख जें अन्यनिरपेक्ष, अखंड, अमूप आहे तें मिळवितां येतें, नराचा नारायण होतां येतें, सच्चिदानंदपदवी प्राप्त करून घेतां येते. मनुष्यदेहांत चार अर्थ साधतां येतात; धर्म, अर्थ, काम व मोक्ष, अर्थ व काम हे पुन्हां क्षणभंगुर व विनाशी आहेत, धर्म ही त्यावरची पायरी आहे व या पायरीनें चढून जाऊन परम अर्थ जो मोक्ष तो साधा-

यचा असतो, परमार्थ=परम अर्थ. परमार्थ ह्म० मोक्ष. परमार्थांत सकलदु:खविध्वंस होतो व परमसुखावाप्ति होतो. जीवमात्र सुखासाठीं धडपडत असतो, परमार्थीही सुखासाठींच अट्टहास करितात! विषयसुखापासून आत्यंतिक सुख होत नाहीं ह्मणून त्यांचा त्याग करून, किंवा त्यांविषयीं उदासीन राहून अखंड सुखासाठीं त्यांचे सायास असतात. देह, इंद्रियें व विषय यांच्या संनिकर्षानें जें सुख होतें त्याला विटून देहातीत, इंद्रियातीत व निर्विषय अशा सुखाच्या मार्गे लागतो तो परमार्थी. हा परमार्थमार्ग चालूं लागल्यापासून सुखाचाच आहे. श्वासोश्वासीं जशी तृप्ती तशा परमार्थसंगतींत सदा चढता आनंद मिळत असतो. परमार्थाविषयीं पुष्कळांच्या कल्पना विलक्षण असतात. परमार्थ हा रडका नाहीं, रडकेपणा थांबविणारा आहे, अमरपद देणारा आहे, सुखसमुद्र हस्तगत करणारा आहे. परमार्थांत सकल दु:खांना कायमची समाधी मिळते, निरतिशय अखंड आनंदाचा भोग मिळतो. जीवाचें खरें स्वहित, खरा लाभ, खरी शांति, खरें सुखसमाधान हें परमार्थांतच आहे. परमार्थी खुळे, नेभळे, आंधळे नव्हेत; खरें स्वहित त्यांनाच कळतें व त्यांनाच मिळतें. परमार्थाचीं साधनें भिन्न असतील, ध्येयाच्या कल्पना भिन्न असतील, पण सकलदु:खनिर्मुक्त अशा अखंड आनंदानुभवांतच सर्वांचें पर्यवसान होतें. तुकोबांनीं प्रथम परमार्थांत पाऊल टाकलें तेथपासून तों अखेर वैकुंठगमनापर्यंत त्यांचें सर्व चरित्र ह्मणजे या आनंदानुभवाच्या भरतीचा इतिहास होय. भरतीची सीमा होते, ओहोटीभरतीची भाषा खुंटते, याहून अधिक आनंद, अधिक लाभ उरत नाहीं तो मोक्ष व तेंच वैकुंठ. विषयसंबंधाचा निर्धारानें त्याग करून पुढें पाऊल टाकलें कीं आनंदसागराला जी भरती येऊं लागते ती वाढत वाढत आतां पुढें वाढणें नाहीं व मागें हटणें नाहीं अशी पदवी मिळाली कीं कृतकृत्यता झाली.

तुकोबांनीं हा परमानंद मिळविला व ते त्रिलोकीं धन्य झाले. त्यांचा जन्म दुःखकष्टांत हालअपेष्टेंत गेला, त्यांच्या संसाराचा फजीता उडाला ही बहिर्मुखांची दृष्टि; पण माझ्या साधनांचें मला फळ मिळालें, केलेले श्रमसायास सफळ झाले; आतां अवघा आनंद, अवघें सुख, अवघें ज्ञान, अवघी भक्ति हाताला आली, पांडुरंग अंगा आला, मी धन्य झालों, भवनदी पार उतरलों हा त्यांचा अनुभव ! साधनें आचरित असतां व साध्य हाताला आलें असतां त्यांनीं जे जे तृप्तीचे ढेकर दिले, ते आपण ऐकलेच आहेत. आतां त्यांनीं अबोलणें सुख बोलून दाखविलें त्याचाही थोडासा रंग पाहूं. सकळ साधनांचें पर्यवसान अखंड नामस्मरणांत कसें झालें व नामाचा आनंद तुकोबांनीं कसा भोगला हें आपण मागें ( पृ० ३०६ ते ३११ ) पाहिलेंच आहे. नाम व नामी, सगुण व निर्गुण, देव व जीव यांच्या एकरूपतेचा आनंद भोगीत ' तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोनि जाये '

२ तेथें साधनें, संप्रदाय, देवभक्त, वर्णधर्म, पापपुण्य, धर्माधर्म सर्व एकपणांत लीन होतात. ' याजसाठीं केला होता अट्टहास—' सर्व आटाटीचें फळ मिळालें. विसांवा पावलों. ' खुंटलीया धांवा तृष्णेचिया. '

**लज्जा भय कांहीं आह्मां चिंता नाहीं । सर्व सुखें पायीं घोळंगती ॥**

*  *  *  *

**भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥ १ ॥**
**पुसिलें पडळ तिमिर विठ्ठलें । जगचि भरलें ब्रह्मानंदें ॥ २ ॥**

*  *  *  *

**अवघियांचा झाला विसर या मागें । वेध श्रीरंगें लावियेला ।**
**स्वादलेंचि खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥ १ ॥**
**वीट नाहीं पांडुरंगीं । वाटे अंगीं आर्त तें ॥ ध्रु० ॥**
**इंद्रियांची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥ २ ॥**

तुका ह्मणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ॥ ३ ॥
येथें सुखाचिया अमूपचि राशी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥
सुखाचें ओविलें साजिरें श्रीमुख । शोक मोहदुःख पाहतां नासे।

* * * *

सगुण निर्गुण एकाचि आवडी । चित्तें दिली बुडी चिदानंदीं ॥
वृत्तिसहित मन रिघे प्रेमडोहीं । नाठवती देहीं देहभाव ॥

श्रीरंगाचा वेध लागला, त्याच्या चिंतनाचें सुख अवीट आहे व पुनः पुन्हा तेंच तें भोगतांही पुरेसें वाटत नाहीं, संसारचिंता किंवा कळिकाळाचें भय राहिलें नाहीं, मोह, दुःख, शोक कांहीं एक उरलें नाहीं, आमचे देहभाव नष्ट झाले आहेत व एक हरिच आंत बाहेर भरून राहिला आहे. ( ‘ तत्र को मोह कः शोकः एकत्व-मनुपश्यतः ’ ह्या ईशावास्य उपनिषदांत हा आनंद वर्णिला आहे.)

तुकोबांचे ‘ विराण्याचे ’ ऊ० विहरिणीचे अभंग २५ आहेत. अध्यात्माचा रंग शृंगाराच्या भापेंत पहावयाचा असेल तर हे जरूर पहावेत! आधिला भ्रतार प्रपंच, त्याच्या संगतीं कामसुख मिळेना ह्मणून मी ‘ परपुरुषाशीं ’ व्यभिचार केला, हा जनांस ठाउका झाल्यामुळें ते माझा छळ करूं लागले, मी तर परपुरुषाशीं रत झाले, रंगलें व आतां जाहीर करते कीं मी हा व्यभिचार कालत्रयीं सोडणार नाहीं—असें तुकोबांनीं स्त्रीत्व अंगिकारून यांत मौजेनें सांगितलें आहे! ब्रह्म स्त्री, पुरुष ना नपुंसक असल्यामुळें व त्याशीं सख्य व तादात्म्य झाल्यामुळें तुकोबांनीं मनोविनोदार्थ हा वाग्विलास केला आहे. यांत स्वानुभूतिप्रसाद पूर्ण भरला आहे.

वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबे ॥
सांडूनी लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥
रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्या निराळी न गमे घडी ॥
नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातले अनंता तुका
हाचि नेम आतां न फिरे माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥

घरारिघी झाले पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥
न देखे न बोले नाइके आणीक । बैसला हा एक हरी चित्तीं ॥
वळियाच्या आह्मीं झालों बळिवंता । करूं सर्व सत्ता जगावरी ॥
क्षणभरी आह्मीं सोशिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥
हांसो रुसो आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥
सेवा सुखें करूं विनोद वचन । आह्मीं नारायण एकाएकीं ॥
तुका ह्मणे झालों उदास मोकळ्या । विचारों गोवळ्यासवें आम्हीं॥

'अवघ्या भूतांचें केलें संतर्पण'—अवघी भूमी आह्मी दान दिली, अवघ्या दिनरात्री पर्वकाळ झाला, तीर्थव्रतें, योगयाग, सकळ कर्में सांग झालीं; सर्व फळें अनंताला समर्पिलीं; 'तुका ह्मणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं.'

'देव आड आला'—'अवघा निवारिला शीण शुभ-अशुभाचा. 'जीवशिवाचें भातुकें । केलें क्रीडाया कौतुकें । कैंची येथें लोकें । हा आभास अनित्य' ह्म० शुभाशुभकल्पना निमाल्या. शीवशिवांचा-देवभक्तांचा अभेद आहे पण गमतीखातर भेद केला होता! सप्तलोक व चतुर्दश भुवनें हीं सर्व आभासवत् झालीं. एका हरीवांचून कांहीं नाहीं, वर्णधर्म हा त्याचा खेळ आहे. 'अवघी एकाचीच वीण तेथें कैंचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण तेणें केला निवाडा'

प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस ।
पायांपाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥ ५ ॥

आतां मी केवळ सुखरूप आहें. दुःख जाऊन एवढें सुख कशामुळें उसळलें? 'भावना भेदाची समूळ गेली'—

तुज मज ऐसी परी । जैसे तरंग सागरीं ॥ १ ॥
दोहींमाजीं एक जाणा । विठ्ठल पंढरीचा जाणा ॥ २ ॥
तंतुपट जेवीं एक । तुका विश्वेसी व्यापक ॥ ३ ॥
लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें? ॥ १ ॥
तैसा समरस जालों । तुजमाजी सामावलों ॥ ध्रु० ॥

आग्नि कर्पुराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥ २ ॥
तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥ ३ ॥
बीज भाजुनि केली लाही । आह्मां जन्ममरण नाहीं ॥
आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष झाला देव ॥ ध्रु० ॥
साकरेचा नव्हे ऊस । आह्मां कैंचा गर्भवास ॥ २ ॥
तुका ह्मणे अवघा जोग । सर्वांघटीं पांडुरंग ॥ ३ ॥

बीज भाजून त्याची लाही झाली कीं तें पुन्हां पेरणीच्या उपयोगाचें राहत नाहीं, त्याप्रमाणें आमचें कर्म ज्ञानाग्नींत भस्म झाल्यामुळें आह्मीं जन्ममृत्यूंपासून सुटलों आहोंत. उसाची साखर होते, पण साखर झाल्यावर ऊसपणाला परततां येत नाहीं, त्याप्रमाणें देहाश्रय करून आम्ही ब्रह्मस्थितीला आलों व आतां मागुती देहसंभव नाहीं. सर्वांघटीं पांडुरंग आहे व आम्ही पूर्ण वैराग्यानें व ध्यानचिंतनानें तद्रूप झालों आहोंत. आमचा देह प्रत्यक्ष देव झाला आहे आतां विनाशी देहाचा आमचा संबंध उरला नाहीं !

'झाला प्रेतरूप शरीराचा भाव,' सर्व देहधर्म लयाला गेले. कामक्रोधादिकांचा आधार सुटला ह्मणून ते धाईधाई रडत आहेत व यमधर्म हाय हाय करीत बसला आहे ! शरीराला वैराग्याच्या शेणी ( गोवऱ्या ) लागल्या असून तें ज्ञानाग्नींत जळत आहे. देह घट देवाच्या भोंवतीं फिरवून त्याच्या चरणांजवळ फोडला व महावाक्यध्वनी करून बोंब मारली ! कुळाला व नामरूपाला तिळांजुळी दिली ! हें शरीर ज्याचें त्याला ( पंचमहाभूतांना ) देऊन मी मोकळा झालों.

'बोळविला देह आपुलेनी हातें—' मी आपला पांचभौतिक देह ब्रह्मबोधाच्या अग्नींत जाळला. ज्ञानाग्नीनें पेटलेल्या चितेवर अमृतसंजीवनी शिंपून भूमि शांत केली, घट फोडला तेव्हांच सर्व कर्में संपलीं, फक्त एका हरीच्या नामाशीं संबंध उरला आहे ! 'तुका ह्मणे आतां आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु विस्तारला !

'पिंडदान पिंडें ठेविलें करून—' देहपिंडाचेंच पिंडदान केलें व पिंडाची मूळत्रयी व त्रिगुण याची तिळांजुळी दिली. 'सर्वं विष्णुमयं जगत्' हें वर्म सांपडल्यामुळें सव्यापसव्याकर्म बुडालें. 'तुका ह्मणे केला अवघ्यांचा उद्धार। आतां नमस्कार शेवटींचा!'

**आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां। तो जाला सोहळा अनुपम्य ॥**
**आनंदें दाटलीं तिहीं त्रिभुवनें। सर्वात्मकपणें भोग झाला ॥ २ ॥**
**फिटलें सुतक जन्ममरणांचें। मी माझ्या संकोचें दूरी जालों ॥**

ह्याप्रमाणें तुकोबा नारायणस्वरूप झाले! सदेह वैकुंठाला जाण्याचा निर्धार असल्यामुळें आपली क्रिया मागें कोणाला करायला सांपडणार नाहीं म्हणूनच कीं काय कोण जाणे त्यांनीं याप्रमाणें जिवंतपणीं आपली क्रिया आपणच करून टाकली व ते सकळकर्मबंधांपासून मुक्त झाले! विश्वाला भिवविणाऱ्या कळिकाळावर मात केली. 'विद्ययाऽमृतमश्नुते' 'मृत्योःसमृत्युमाप्नोति' इ० उपनिषद्वचनांप्रमाणें तुकोबाराय मृत्यूला मारून उरले.

'निरंजनीं आह्मीं बांधियेलें घर,' दृश्य विश्वाचा, मायेचा (अंजन) जेथें स्पर्श नाहीं त्या निरंजनीं आमची अखंड वस्ती झाली आहे. अहंकाराचा विटाळ फिटला, शुद्धबुद्ध निराभास अशा परमात्मरसीं आह्मी समरस झालों आहोंत.

'पांडुरंगें सत्य केला अनुग्रह,' पांडुरंगाचा हा प्रसाद आहे. जीवशीवा सेज रचिली आहे, 'निजीं निजरूपीं निजविला तुका। अनुहत बाळका हल्लरू गाती' माझ्या विठाईमाउलीनें मला निजस्वरूपाच्या पाळण्यांत निजविलें असून ती अनुहतध्वनीनें गाणीं गात आहे!

* * * *

**रक्तश्वेत कृष्ण पीत प्रभाभिन्न। चिन्मय अंजन सूदलें डोळां ॥ १ ॥**
**तेणें अंजनगुणें दिव्य दृष्टी झाली। कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥ध्रु०॥**
**देशकालवस्तुभेद मावळला। आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ २ ॥**

**न जाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ॥ ३ ॥**
**तत्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि जाला अंगें तुका आतां ॥४**

रक्त ( रज ) श्वेत ( सत्व ) कृष्ण ( तम ) व पीत (शुद्धसत्व) या गुणप्रकाशापलीकडचें असें चिन्मय अंजन श्रीगुरूंनीं माझ्या डोळ्यांत घातलें व त्यामुळें दृष्टि दिव्य झाली. द्वैत आणि अद्वैत या दोनी कल्पना निमाल्या व निर्विकल्प ब्रह्मस्थिती बाणली. देशगत, वस्तुगत, कालगत सर्व प्रकारचे भेद मावळले व आत्मा विश्वाकारपणें स्वच्छ दिसूं लागला. प्रपंच मुळीं झालाच नाहीं, एकजिनसी एक परब्रह्मच आहे हें उमजलें. जीवशिवैक्य बाणलें. तुका अंगानेंच परब्रह्म झाला आहे !

.... .... .... ...

**क्षरला सागर गंगाओघीं मिळे । आपणाचि खेळे आपणाशीं ॥१॥**
**मधील ते वाव अवधी उपाधी । तुह्मां आह्मांमधीं तेचि परी ॥ध्रु०॥**
**घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि तें ॥ २ ॥**
**तुका ह्मणे बीजें बीज दाखविलें । पत्र पुष्प आलें गेलें वाया ॥ ३ ॥**

समुद्र वाफेच्या रूपानें वर जाऊन मेघरूपानें वृष्टि करून गंगेच्या ओघांत मिळतो व गंगा पुन्हा समुद्राला मिळते व याप्रमाणें पाहतां समुद्रच आपआपणाशीं खेळत असतो, तसाच देवा तुमच्या आमच्यांतला प्रकार आहे ! मधली नामरूपांची उपाधि व्यर्थ आहे. (मुण्डकोपनिषदांतला, ' यथा नद्यः स्यंदमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय ' हा दृष्टांतच वरील अभंगांत स्पष्ट झाला आहे.) जेथून श्रुति बोलली तेथूनच तुकोबा बोलले आहेत यामुळें त्यांच्या वाणीला सहज वेदतुल्यता आली आहे.

... ... ... ...

क्षणभंगुर संसारसुखावर थुंकून तुकोबांनीं जें अविट परमात्मसुख भोगलें तें त्यांच्या भूमिकेवरच्या संतसज्जनांनाच ठाऊक असणार हें उघड आहे. तथापि किंचिद्दिग्दर्शन केलें आहे. यांत ज्ञानाची

व उपासनेची एकात्मता स्पष्ट आहे. हें नुस्तें द्वैत नव्हे, नुस्तें अद्वैत नव्हे. अद्वैतभक्ति, मुक्तीवरील भक्ति, अभेदभक्ति हें भागवतधर्माचें रहस्य आहे ह्मणून पूर्वीं सांगितलें आहे त्याचा प्रत्यय वाचकांना यावरून येईल. सारा आकार काळानें ग्रासला आहे पण नाम अविनाशी आहे असें तुकोबांनीं ह्मटलें आहे त्यावरूनही ज्ञानानंतर भक्तिसुखाचा रंग वाढतच असतो हें उघड आहे.. ‘ तेंचि भक्ति तेंचि ज्ञान । एक विठ्ठलचि जाण ’ हें ज्ञानोत्तर भक्तीचें वर्म आहे. सगुणनिर्गुणरूप जो हरि त्या ‘ मी एक वांचूनि कांहीं । तया तयाही सकट नाहीं ’ अशा भक्ताची सहजस्थिति ती ज्ञानभक्ति होय. त्याला ज्ञानी ह्मणा, भक्त ह्मणा कांहींही साजतें. त्याच्या अध्यात्मरंगांत भक्ति असते व भक्तींत अध्यात्मरंग असतो, याचें कारण ज्ञान आणि भक्ति हे एकरूपच होत. ‘ ॐ तत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ’ असो. ह्याप्रमाणें श्रीहरीच्या रंगांत तुकोबा पूर्ण मिळून गेले व ‘ अवघा अंतर्बाही तोचि झाला ’ असें हरिरूप होऊन ठेले. देहाचें भान सुटलेंच होतें. तुकोबांच्या प्रयाणाचा समय प्राप्त झाला. श्रोत्यांचें भाग्य संपुष्टांत आलें. तुकोबांचें कार्य झालें. शके १५७१ चा फाल्गुनमास उगवला. तुकोबांची वैकुंठस्थिति अचळ राहिली. द्वादशीस जिजाईस पूर्णबोध केला. वद्य १ ला रात्रीं तुकोबा कीर्तनास उभे राहिले. गोपाळपुरा येथें नांदुरगीच्या वृक्षाखालीं कीर्तनास प्रारंभ झाला.

३ निर्याणाचे अभंग गाथ्यांत प्रसिद्ध आहेतच. तुकोबाची कुडी ज्ञानभक्तियोगानें ब्रह्मरूप झाली होती. तुकोबांनीं त्या दिवशीं नामसंकीर्तन भक्तीची अमृतवृष्टि केली. प्रेमामृताचे भोजनानें संतसज्जन तृप्त केले. नामभक्तीच्या उत्कर्षासाठींच तुकोबांचा अवतार होता.

**शोधितांचि नये । ह्मणोनि वोगळतों पायें ॥ १ ॥**
**आतां दिसों नये जनां । ऐसें करा नारायणा ॥ २ ॥**

कीर्तनांत 'घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं' हा अभंग निघाला—

ब्रह्मज्ञानी, मुक्त, तीर्थभ्रामक, यज्ञदानकर्ते, जपी, तपी ह्या सर्वांना ह्या नामसंकीर्तनसुखापुढें लाळ घोटायला लावीन. ज्ञानासगट सर्व साधनें कीर्तनभक्तिसुखापुढें उणीं पाडीन. आम्ही गेल्यावर लोक आमचे धन्यवाद गातील व श्रोते पुढें 'भाग्यें आम्हीं तुका देखियेला' असें मुलानातवांना सांगत राहतील!

भगवन्नामाची थोरवी गातां गातां तुकोबाराय ज्या वैकुंठाहून मृत्युलोकीं आले तें वैकुंठ, ते महाविष्णु, ते सनकादिक संत, ते नारदगरुड, ती आदिमाया लक्ष्मी, ते वैकुंठींचे भक्तजन यांशीं अत्यंत तन्मय झाले. जागृतींत ज्याचा ध्यास असतो तेंच डोळां लागतांच पुढें उभें राहतें त्याप्रमाणें जन्मभर ज्याचा निदिध्यास असतो तेंच प्रयाणकाळीं अंतरांत भरून राहतें. जें नेत्रांनीं पहावें, कानांनीं ऐकावें, मनानें भावावें, वाचेनें बोलावें, चित्तानें चिंतावें, जें आंतबाहेर होऊन रहावें तें तुकोबारायांचें सर्व विठ्ठलमय झाल्यामुळें प्रयाणकाळीं विठ्ठलावांचून त्यांना दुसरी कोणतीही गति उरली नव्हती! विष्णुसहस्रनामांत 'वैकुंठः पुरुषः प्राणः' ह्याप्रमाणें वैकुंठ हें महाविष्णूचें नांव दिलें आहे. त्यांचा लोक तोही वैकुंठच. सर्व निस्सीम विष्णुभक्त वैकुंठांतच राहतात. वैकुंठाहून जगत्कल्याणार्थ मानवलोकीं येतात व धर्मकार्य करून पुन्हां स्वलोकीं जातात. सर्व विश्व अव्यक्तांतून आकाराला येतें व अव्यक्तांतच लीन होतें. जें जेथून येतें तें तेथेंच जातें. तुकोबा वैकुंठाहून आले, सारा जन्म अंतरंगानें वैकंठाच्या निदिध्यासांत काढला व प्रयाणही वैकंठालाच केलें.

तुह्मी सनकादिक संत । ह्मणवितां कृपावंत ॥ १ ॥
एवढा करा उपकार । सांगा देवा नमस्कार ॥ २ ॥
भाकोनी करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥ ४ ॥



वैकुंठगमन झाले तेथील नांदुरकीचा वृक्ष.

A. B. PRESS, POONA.

त्यांनीं गरुडाला ‘ वेगीं आणावा हरी ’ अशी प्रार्थना केली. ‘ पाय लक्ष्मीच्या हातीं ’ ह्मणून तिलाही ते काकुलती आले. ‘ तुका ह्मणे शेषा । जागें करा हृषीकेषा ’ ह्याप्रमाणें त्यांनीं शेषाचीही प्रार्थना केली. “ त्याचि पथें माझें लागलेंसे चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलिया मायबाप ॥५॥ ह्यानंतर तुकोबांच्या अंगीं शुभ चिन्हेंही उमटूं लागलीं. त्यांचे मन वैकुंठास जाण्याविषयीं उत्कंठित झालें. वृत्ति वैकुंठाकडे गेली. देहभाव गळाला. हा प्रपंच, ही मृत्युलोकची संगति हा जगाचा वारा त्यांना सोसेनासा झाला. सनकादि संत ज्या वैकुंठांत नित्य भगवद्दर्शनानें स्वसुखांत रंगून जात होते, गरुडासारखे एकनिष्ठ भक्त जेथें परिचर्या करण्यास तत्पर असत, साक्षात् आदिमाया लक्ष्मी जेथें आपल्या कोमल करांनीं प्रभूचे कोमलतर चरणांबुज चुरण्यांत दंग होऊन गेल्या होत्या, त्या शुद्धसत्वगुणानें पावन झालेल्या दिव्य वैकुंठास जाण्याची तुकोबारायांच्या मनाची उत्कंठा अतिशय तीव्र झाली. श्रीविष्णु ‘ तुका एकला देखोनि ’ वैकुंठाहून आले. ते मंदभाग्यास्तव दुसऱ्या कोणास दिसले नाहींत.

**पैल आले हरी । शंख चक्र शोभे करीं ॥ १ ॥**
**गरुड येतो फडात्कारें । ‘ नाभी नाभी ’ ह्मणे त्वरें ॥ २ ॥**
**मुगुट कुंडलांच्या दीप्ति । तेजें लोपला गभस्ती ॥ ३ ॥**
**मेघश्यामवर्ण हरी । मूर्ति डोळस साजिरी ॥ ४ ॥**
**चतुर्भुज वैजयंती । गळा माळ हे रुळती ॥ ५ ॥**
**पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ६ ॥**
**तुका झालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥ ७ ॥**

इतकें ह्मणत तुकोबाराय कुडीसहित गुप्त झाले. त्यांची कुडी कोणाला दिसली नाहीं. तुकोबांचे पुत्र नारायणबोवा यांनीं तुकोबाराय ‘ कीर्तन करितां अदृश्य झाले ’ असेंच एका लेखांत ह्मटलें आहे. हातींचें चिद्रत्न गळून पडलें म्हणून सर्व शिष्यांनीं शोक

केला. महाराज द्वितीयेला गुप्त झाले, पंचमीला त्यांची टाळवीणा गोधडी सांपडली. पांच दिवस भक्तमंडळींनीं कीर्तनभजनमहोत्सव केला. तुकोबा सदेह वैकुंठाला गेले सबब त्यांचें क्रियाकर्मांतर करण्याचें कारण नाहीं असा सप्तमीस रामेश्वरभटांनीं शास्त्रार्थ दिला व तो सर्वांनीं मान्य केला. त्या वेळेपासून महाराजांच्या प्रयाणाचा महोत्सव देहूस फाल्गुन वद्य २ ते ५ पर्यंत दरसाल होत असतो.

तुकाराममहाराजांचें प्रयाण झाल्यावर तुकोबांच्या भक्तमंडळानें अनिवार शोक केला. त्या प्रसंगीं कान्होबानें जे ३७ अभंग केले त्यावरून त्यांचें चित्त दुःखानें कसें फाटून गेलें होतें याची कांहींशी कल्पना करितां येते.

दुःखें दुभागलें हृदयसंपुट । गहिंवरें कंठ दाटताहे ॥ १ ॥
ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनीयां वनामाजी ॥ध्रु॥
आक्रंदती बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी फुटो पाहे ॥ २ ॥
काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां ॥३॥
तुज ठावें आह्मां कोणी नाहीं सखा । उभयलोकीं तुका तुजविण॥४॥
कान्हा ह्मणे तुझ्या वियोगें पोरटीं । आलों देरे भेटी बंधुराया ॥५॥

* * * *

भुक्ति मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणून भावा वेगीं॥१॥
रिद्धि सिद्धि मोक्ष ठेवी गुंडाळून।दे माझ्या आणून भावा वेगीं ॥२॥
नको आपुलियां नेऊं वैकूंठासी । दे माझ्या भावासी आणुन वेगीं॥३॥
तुकयाबंधु ह्मणे पहाहो नाहीं तरी।हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥४॥

४ तुकोबा सदेह वैकुंठाला गेले याबद्दल अलीकडे विद्वानांनीं बरीच चर्चा करून ज्यानें त्यानें आपले मतीनें विचार प्रगट केले आहेत. त्या विविध मतांच्या खंडनमंडणांत पडण्याचें कारण नाहीं. ‘ सदेह वैकुंठाला कसें गेले ’ हा प्रश्न मला अनेकांनीं विचारला आहे. त्याला म्यां उत्तर काय द्यावें? वैकुंठाहून मुमुक्षुकचेरींत येऊन मी हें चरित्र लिहीत बसलों आहें असें नाहीं, तेव्हां वैकुंठाची प्रत्यक्ष माहिती

मी काय देऊं शकणार ! प्रत्यक्ष प्रमाणाच्या अभावीं शब्द-प्रमाण मानतात, तें या कामीं भरपूर आहे व तेवढें मी देऊं शकेन ! माझा स्वतःचा ह्या गोष्टीवर विश्वास आहे एवढें मी फार तर सांगेन. अधिभौतिक शास्त्रांच्या प्रसाराचा हा काळ आहे, चर्मचक्षूला दिसेल तें मानायचें, अदृश्य सृष्टींच्या पलीकडच्या गोष्टी मानायच्या नाहींत, शब्दप्रमाणाला मान द्यायचा नाहीं, व स्वतःच्या मनाला वाटेल तें लिहायचें अशी सामान्य विद्वानांची प्रवृत्ति असल्यामुळें व 'हा सूर्य हा जयद्रथ' असा अनुभव असल्या श्रद्धाप्रधान धर्मगोष्टींत पटवितां येण्यासारखा नसल्यामुळें आणि माझी तादृश्य योग्यता नसल्यामुळें मी या बाबतींत स्वानुभवाचें असें कांहीं सांगूं शकत नाहीं. देवाच्या दयेनें थोडाफार संतसमागम या जन्मीं मिळाला आहे व आधिभौतिक शास्त्रांला ज्यांचीं उत्तरें देतां येत नाहींत अशा कित्येक गोष्टी मीं संतसंगतींत पाहिल्या आहेत, अनेकांनीं पाहिल्या असतील. कृमिकीटकांपासून तों मनुष्यदेहापर्यंत आपल्याला कांहीं तुटपुंजें ज्ञान आहे; पण मनुष्ययोनीवरच्या योनी व देवगंधर्व आणि नानाविध लोक नाहींतच असें आग्रहपूर्वक प्रतिपादन करण्यासारखा आपल्यापाशीं काय पुरावा आहे ? मनाचे, बुद्धीचे, अंतरात्म्याचे असे कोणते व्यापार आह्मांस निश्चयानें ठाऊक आहेत ? देहाचें तरी आपणांस काय ज्ञान आहे ? स्वप्नसृष्टीचें कोडें कोठें उलगडलें आहे ? जागृतीचें अल्प ज्ञान, स्वप्नसृष्टीचें जवळजवळ नाहीं इतकें ज्ञान, व त्यापलीकडे शून्य ज्ञान—एवढ्या ज्ञानाच्या बळावर अध्यात्मयोगांतील गोष्टी सर्व खोट्या व साधूंचे चमत्कार खोटे असें धडाकून आह्मी सांगत सुटलों तर आमचें तोंड कोण धरणार आहे ह्मणा, पण अधिकारी अनुभवी पुरुष फाल्गुनांतल्या बालकांची आमची बरोबरी करून मात्र स्वस्थ बसतील ! युरोपांत व अमेरिकेंत मानसशास्त्राचा व इतर गूढ शास्त्रांचे शोध

नवीन पद्धतीनें लावण्याचे अलीकडे प्रयत्न चालले आहेत. ते अध्यात्माचा ओनामा शिकत आहेत. भरतभूमि ही अध्यात्माची खाण आहे. येथें कित्येक शतकांपासून गूढ शास्त्रांचे अभ्यास काय पण अनुभव घेतलेले महात्मे झाले आहेत. असो. तुकोबा सदेह वैकुंठाला कसे गेले, वैकुंठ कोणतें, त्याचें स्वरूप काय, वैकुंठाला जाण्याचा मार्ग कोणता या गोष्टींचें ज्ञान तुकोबांच्या कोटीला पोंचलेल्या स्वानुभवी पुरुषांशिवाय कोण सांगूं शकेल? गणिताचीं रहस्यें पट्टीचा गणितीच सांगेल, साधा घोंगड्या तेथें काय सांगणार? व तो जर गणिताची कुचेष्टा करीत बसला तर त्याला आपण जें ह्मणूं तेंच अध्यात्मयोगाचा गंध नसलेल्या केवळ व्यवहारपटूंनीं अध्यात्मांत गडबड केली तर त्यांना तज्ज्ञ ह्मणतील. तुकोबांनीं भक्तियोगाची पराकाष्ठा केली व उत्कट भक्तियोगानें ' अष्टमहासिद्धि द्वारीं वोळंगती ' असें त्यांनीं ह्मटलें आहे. तेव्हां ' पिंडी पिंडाचा ग्रास' करून ह्म० शरीराचा पार्थिवांश आपांत, आपाचा तेजांत याप्रमाणें पंचभूतांच्या देहाचा पाहतां पाहतां लय करून ते वैकुंठस्वरूप झाले असें कित्येक ज्ञात्यांचें ह्मणणें आहे. देहासगट वैकुंठाला जातां येतें असें गुलाबराव महाराजांचें ह्मणणें होतें. शब्दप्रमाण पाहतां रामेश्वरभटांपासून अनेक संतांचीं व कवींचीं वचनें ' सकाय वैकुंठाला गेले ' याच गोष्टीचीं साक्ष देणारीं आहेत:—

**मागे कवीश्वर झाले थोर थोर। नेलें कलेवर कोणे सांगा ? ॥**
**ह्मणे रामेश्वर सकळां पुसोनी। गेला तो विमानीं बैसोनीयां ॥१॥**

निळोबाराय आरतींत ' मानवदेह घेउनि निजधामा गेले ' असें म्हणतात. ' कीं सतनु मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं ' असें मोरोपंत म्हणतात. ' श्रीराम तसा गेला वैकुंठाला सकाय हा कांहीं ' असें पंतांनीं अन्यत्रही ह्मटलें आहे. ' संतांत कीर्ति केली। कुडी सायोज्यीं नेली ' असें कचेश्वर ह्मणतात. ' झाला वैकुंठींचा

घणी ' हें मध्वनाथांचें म्हणणें आहे. भक्तमंजरीमालाकार 'विमानीं बैसविला जडदेह ' असेंच सांगतात. रंगनाथ स्वामींचे यावर एक बहारीचें पद आहे.

पद.

नरदेहा घेउनि वाणी, गेला ती ऐका वाणी ॥ ध० ॥ घट फोडुनि जनकादिक ते, अनुभविते झाले माती ॥ हा नोहे तुकया तैसा, घट राखुनि धरिली चित्तीं ॥ १ ॥ इतर ते हारुनी दुग्धा, परिणामक घेती पाणी । हा नोहे तुकया तैसा, पय राखुनि चाखी लोणी ॥ २ ॥ इतर तें फोडुनि ' कोहं, ' मग चाखियला तो ' सोहं ' । हा नोहे तुकया तैसा, अच्छेद्य पचविला ' कोहं ' ॥ ३ ॥ इतरें या मिश्रपुटातें देऊनियां जड टाकियलें । तो नोहे तुकया तैसा, परिसानें हेमचि केलें ॥ ४ ॥ जडबुद्धि ' अहं ' या देहा, निजस्वरुपीं वाहुनि गेला । निजरंगीं रंग पहाया, रंगानें निश्चय केला ॥ ५ ॥ या बोला साराचि कथितों दिसणें हाची जन्म । अदृश्य मरण योग्यांचें निजरंगीं अघटित धर्म॥६॥

माझे विद्यालयीन गुरु व प्रख्यात संस्कृतशास्त्री गोपाळराव नंदरगीकर यांनीं वाल्मिकिरामायणांत सशरीर स्वर्गास गेल्याबद्दलचें मला ४।५ दाखले काढून दिले ते मी पुढें देत आहें:—

( १ ) कौशिकाची भगिनी सत्यवती सशरीर स्वर्गाला गेली—

**सशरीरा गता स्वर्गं** भर्तारमनुवर्तिनी ।बालकांड सर्ग ३४ ॥ ८

( २ ) बालकांड अ० ५७—६० मध्यें त्रिशंकूची कथा दिली आहे ती समग्र पहावी. एक मोठा यज्ञ करून सदेह स्वर्गास जावें ' गच्छेयं सशरीरेण देवानां परमां गतिम् ! ' ( अ० ५७—११ ) अशी प्रबळ इच्छा त्रिशंकूस उत्पन्न झाली, पण वसिष्ठांनीं त्यास प्रतिरोध करून चांडालाचें रूप प्राप्त होईल असा शाप दिला व तो चांडाल झाला. तो विश्वामित्रास शरण गेला तेव्हां ' अनेन

सह रूपेण सशरीरो गमिष्यसि ' ( अ० ५९-४ ) असें त्यानें त्यास आश्वासन दिलें व यज्ञार्थ ब्राह्मणांस बोलावून आणून विश्वामित्र त्यांस ह्मणाले:—

तेनानेन शरीरेण देवलोकजिगीषया ।
यथायं स्वशरीरेण स्वर्गलोकं गमिष्यति ।
तथा प्रवर्त्यतां यज्ञो भवद्भिश्च मया सह ॥ अ० ६०-३

यज्ञ होत असतांना विश्वामित्रांनीं देवांना आपले हविर्भाग घेण्यास बोलावलें पण ते आले नाहींत. तेव्हां विश्वामित्र संतप्त झाले व ( अ० ६० ) ह्मणाले:—

स्वार्जितं किंचिदप्यस्ति मयाहि तपसः फलम् ।
राजन् स्वतेजसा तस्य सशरीरो दिवं व्रज ॥ १४
उक्तवाक्ये मुनौ तस्मिन्सशरीरो नरेश्वरः ।
**दिवं जगाम** काकुत्स्थ मुनीनां पश्यतां तदा ॥ १५

( ३ ) अयोध्याकांड अ० ११० मध्यें वसिष्ठांनीं रामरायाला त्याच्या सर्व पूर्वजांची नामावळि सांगितली आहे त्यांत त्रिशंकूसंबंधानें ' स सत्यवचनाद्वीरः सशरीरो दिवं गतः ' असेंच ह्मटलें आहे.

( ४ ) सुग्रीव रामासह एका वनाजवळ आला तेव्हां त्या वनाचा पूर्वेतिहास सांगतांना तो ह्मणाला:—

अत्र सप्तजनानाम मुनयः संशितव्रताः ।
सप्तैवासन्नधःशीर्षाः नियतं जलशायिनः ॥ १८
सप्तरात्रकृताहारा वायुना वनवासिनः ।
दिवं वर्षशतैर्याताः सप्तभिः सकलेवराः ॥ १९

—किष्किंधाकांड अ० १३

( ५ ) अदृश्यं सर्वमनुजैः सशरीरं महाबलं ।
प्रगृह्य लक्ष्मणं शक्रस्त्रिदिवं संविवेशह ॥ उत्तरकांड अ० १६०-१७

( ६ ) साक्षात् रामराय आपलें शरीर व भ्राते यांसह वैष्णव तेजामध्यें प्रवेश करते झाले याबद्दल:—

विवेश वैष्णवं तेजः सशरीरं सहानुजः ॥ १२ ॥( उत्तर११० )

महाभारतांत ( स्वर्गारोहण पर्व अ० ३ ) धर्मराजानीं मनुष्य-देहाचा त्याग करून व दिव्यवपु घेऊन दिव्यस्थानाला देवांसमवेत गेल्याचें वर्णन आहे:—

गंगां देवनदीं पुण्यां पावनीमृषिसंस्तुताम् ।
अवगाह्य ततो राजा तनुं तत्याज मानुषीम् ॥ ४२ ॥
ततो दिव्यवपुर्भूत्वा धर्मराजो युधिष्ठिरः ।

तुकोबा सदेह वैकुंठाला गेले व त्यांचा देह कीर्तन करितां क-रितां अदृश्य झाला ही गोष्ट अपूर्व तर खरीच, पण असाच प्रकार आणखी कांहीं महात्म्यांसंबंधानें झालेला आहे, मुक्ताबाई अशाच पाहतां पाहतां गुप्त झाल्या. “ कबीर साहेबांनीं १०१ वर्षांच्या वयांत एके दिवशीं शिष्यमंडळीस गुलाबपुष्पांची सेज तयार कर-ण्यास सांगितली व ते अंगावर शाल घेऊन निजले. कांहीं वेळानें लोकांनीं शाल उचलली तों काय ? खालीं गुलाबपुष्पांशिवाय कांहीं आढळलें नाहीं. ही गोष्ट कित्येक हिंदु व मुसलमान लेख-कांनीं स्वतः पाहिलेली लिहून ठेवली आहे. ” ( आडियार बुले-टिन मार्च १९१६ पृ० ९४ ) शीख धर्माचे संस्थापक गुरुनानक यांचाही शेवट असाच झाला आहे. ते ७० व्या वर्षी सं-पले. “ त्यांचा अंत्य संस्कार हिंदुधर्माप्रमाणें करावा कां मुसलमानी धर्माप्रमाणें करावा याचा शिष्य मंडळींत वाद चालला असतांना एकानें त्यांच्या मृतशरीरावरील वस्त्र उचललें तों मृतशरीरच जा-ग्यावर नाहींसें आढळून आलें यामुळें जाळावें कां पुरावें हा वा-दच मिटला ! ” असें ॲनिबिझांट बाईनीं ‘ शीख धर्म’ ह्या निबंधांत ( धी रिलिजिअस प्राब्लेम इन इंडिया पृ० ७४ ) ह्मटलें

आहे. द्रविड साधु तिरुपन्न ( अझवर ) व शैवसाधु माणिक्य वाचकर यांविषयीं अशाच सदेह हरिस्वरूपीं मिळाल्याच्या कथा तिकडे प्रसिद्ध आहेत. ख्रिस्तीधर्मशास्त्र जें बायबल त्यांतही 'प्रेषितांचीं कृत्यें' या प्रकरणांत ( ९ ) हुबेहुब असेंच वर्णन आहे. सर्व साधुसंत, रामायणभारतासारखे महाग्रंथ, कालिदासासारखे कवीश्वर (रघुसर्ग १५ पहा), व इतर धर्मग्रंथही एकमतानें 'सदेह वैकुंठाला जाणें व जातां जातां कीर्तनांत अदृश्य होणें' या गोष्टीला प्रामाण्य देत असतांना ज्यांचा या सत्कथेवर विश्वास बसत नसेल त्यांनीं कृपा करून तुकोबारायांच्या अभंगांचें तरी 'विश्वास व आदर' बाळगून अध्ययन करावें व त्यांतच त्यांनीं भगवत्प्रसाद जोडण्याचा स्वानुभवानें जो मार्ग सांगितला आहे त्या मार्गानें चालूं लागावें एवढी त्यांस विनंति करून श्रीतुकाराममहाराजांच्या नामघोषांत या त्यांच्या चरित्रग्रंथाची समाप्ति करितों व हें नव वाक्पुष्प श्रीपांडुरंगचरणीं समर्पण करितों.

